# संपादकाचें हृद्गत

श्रीरामकृष्ण परमहंस याच्या पत्नी श्रीशारदामाता याच्या जन्मशताब्दि उत्सवाच्या वेळीं बेलूर येथील श्रीरामकृष्ण मठानें 'The Great Women of India' हें इंग्रजी पुस्तक इ. स. १९५३ सालीं प्रसिद्ध केलें होतें 'भारतातील थोर स्त्रिया' हें जें पुस्तक आम्ही आज प्रसिद्ध करीत आहोत तें या इंग्रजी पुस्तकाचा अनुवाद आहे व तो वाचकाच्या हातीं देण्यास आम्हास अत्यंत आनंद होत आहे

मूळ इंग्रजी पुस्तक ज्या वेळीं प्रसिद्ध झालें त्याच वेळीं या पुस्तकाचा मराठी अनुवाद झाला तर ज्याना इंग्रजी भाषा येत नाहीं अशा असंख्य वाचकाची मोठी सोय होईल असें आम्हास वाटलें. कारण, अशा प्रकारचें पुस्तक मराठींत नाहींच असें म्हटलें तरी चालेल वेगवेगळ्या क्षेत्रात कार्य केलेल्या थोर स्त्रियांचीं चरित्रें निरनिराळीं व्यक्तिश: प्रसिद्ध झालेलीं आहेत. परंतु सर्व भारतातील व वेदकालापासून आतापर्यंतच्या काळात शिक्षण, समाज, धर्म इत्यादि बहुतेक सर्व क्षेत्रात प्रसिद्धि पावलेल्या थोर स्त्रियांचीं चरित्रें एकत्रित करून लिहिलेलें पुस्तक मराठी भाषेत नाहीं आपला समाज सध्या संक्रमणाच्या अवस्थेत आहे जुनीं मूल्यें, जुने आदर्श याना मागें सारून नवीं मूल्यें, नवे आदर्श त्याची जागा घेत आहेत अशा वेळीं वेदकालापासून आतापर्यंत ज्या थोर भारतीय स्त्रिया झाल्या त्याच्या चरित्राचा आढावा घेऊन '**आदर्श भारतीय स्त्री**' म्हणजे काय हें महाराष्ट्राच्या जनमनापुढें ठेवणें अवश्य आहे. ही उणीव भरून काढण्याच्या दृष्टीनें हें पुस्तक अमोल आहे असेंच कोणी म्हणेल

परंतु पुस्तकाचा अनुवाद व्हावा असें नुसतें वाटून काम भागत नाहीं. तो प्रत्यक्षपणें प्रसिद्ध होण्यात अनेक अडचणी असतात प्रथमत पुस्तकाचें सुरस भाषांतर करणें व तें केल्यानंतर छापून प्रसिद्ध करणें हीं दोन्ही कामें कठीण अशीं आहेत. पण आमच्या सुदैवानें या दोन्ही अडचणी दूर होऊन आज हें पुस्तक आम्ही वाच

यांच्या हातांत देणे शक्य आहे व त्यांतहि श्रीरामकृष्ण व श्रीशारदामाता यांच्या निष्काम अपत्याच्या—श्री स्वामी विवेकानंद यांच्या-जन्मशताब्दिदिनाच्या दिवशीं तें प्रकाशित होत आहे यामुळें आम्हांस विशेष आनंद होत आहे.

अनुवादाची पहिली अडचण जी होती ती पुणें येथील श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरशी कॉलेज फॉर वुमेन् या महाविद्यालयाच्या प्रा. सौ. शरयू वाळ, एम्. ए., पीएच्. डी. यांनी तें काम अंगावर घेतल्यानें दूर झाली. किंबहुना त्यांचें जर या कामीं सर्वतोपरी सहाय्य नसतें तर मराठींत अनुवाद करून तो प्रसिद्ध करण्याची आमची कल्पना 'उत्पद्यन्ते विलीयन्ते' या सदरांतच राहिली असती. कारण एवढ्या मोठ्या पांचशें सहाशें पानांच्या पुस्तकाचा अनुवाद करण्याची जबाबदारी घेणें हें कांहीं लहानसहान काम नाहीं.

स्वतः एखादें पुस्तक लिहिणें एका दृष्टीनें सोपें असतें. त्या दृष्टीनें अनुवाद करणें हें कठीण काम आहे. अनुवाद करतांना ज्याचा अनुवाद करावयाचा त्या विषयाशीं समरस होणें व त्याचा समरसतेनें मिळविलेला अर्थ तसाच वाचकांच्या मनांत उतरेल अशा पद्धतीनें मांडणें हें काम अवघड असतें. त्यासाठीं डॉ. सौ. शरयू वाळ यांनीं अनुवाद करतांना पुष्कळ परिश्रम घेतले आहेत. ग्रंथांतील विचार व मांडणी शक्यतोंवर मूळाबरहुकुम ठेवण्याचा त्यांचा प्रयत्न चांगला साधला आहे, असेंच दोन्ही ग्रंथ ताडून पाहणारा वाचक म्हणेल. शिवाय त्यांनीं विषय अशा पद्धतीनें मांडला आहे कीं हें पुस्तक मूळ इंग्रजी पुस्तकाचा अनुवाद आहे असें वाचकाच्या सहजासहजीं लक्षात येणार नाहीं.

वर म्हटल्याप्रमाणें पुस्तकाचा अनुवाद लिहून तयार झाला. पण 'सर्वारंभास्तंडुलाः प्रस्थमूलाः।' पुस्तक छापण्याकरितां द्रव्याची आवश्यकता होती. एक दोन धार्मिक ग्रंथ प्रकाशित करणाऱ्या संस्थांनीं या पुस्तकाच्या प्रकाशनाचा खर्च करण्याचें ठरविलेंहि होतें. पण ऐनवेळीं कांहीं तांत्रिक अडचणींमुळें त्या संस्थांना तें काम अंगावर घेता येईना. पैशाच्या अभावीं हें पुस्तक प्रकाशित होत नाहीं अशी परिस्थिति निर्माण झाली. अशा अडचणीच्या वेळीं या पुस्तकाच्या प्रकाशनाच्या कामीं पुणें व मुंबई येथील स्नेही मंडळींनीं आर्थिक सहाय्य केलें म्हणूनच हे पुस्तक या स्वरूपांत व आजच्या दिवशीं प्रसिद्ध होत आहे. ज्या स्नेही मंडळींनीं द्रव्यसहाय्य दिलें त्यांचा नामनिर्देश करून त्यांचे आभार मानणें अवश्य

आहे. पण तें या सहाय्य करणाऱ्या मंडळींना आवडणार नाहीं म्हणून त्यांचा नामनिर्देश न करतांच त्यांचे आभार मानतों.

मूळ इंग्रजी पुस्तकाच्या मराठी अनुवाद करण्याची परवानगी आम्ही जनरल सेक्रेटरी, श्रीशारदा मठ, दक्षिणेश्वर, पोस्ट-अरिआढा (पश्चिम बंगाल) यांना मागितली व ती त्यांनीं मोठ्या आनंदानें दिली त्याबद्दल आम्ही त्यांचे आभार मानतों.

या पुस्तकाच्या अनुवादक डॉ. सौ. शरयू बाळ; मुद्रितें शुद्ध करून देणारे प्रा. डॉ. वा. दा. गोखले, एम्. ए., पीएच्. डी. व श्री. त्र्यं. रा. दामले आणि ज्ञानेश्वरी प्रेसचे संचालक श्री. रा. गो. पाटील या सर्वांचा संपादक आभारी आहे.

डॉ. सौ. शरयू बाळ यांनीं मूळ इंग्रजी पुस्तकाचा मराठी अनुवाद करून दिला व प्रकाशनाचे सर्व हक्कहि आमच्या सुपूर्त केले आहेत. या पुस्तकाच्या विक्रीपासून मिळणाऱ्या रकमेपैकीं खर्च वजा जाऊन जी रक्कम शिल्लक राहील ती पुणें येथील श्रीरामकृष्ण आश्रम या संस्थेस देण्यांत येणार आहे.

ज्या श्रीपांडुरंगाच्या कृपेनें हें कार्य निर्विघ्नपणें पार पडलें त्यास वंदन करतों व त्यानें अशीच साधुसंतांची सेवा करवून घ्यावी अशी त्याच्या चरणीं नम्र प्रार्थना करतों.

पुणें, ता. १७-१-६३
गुरुवार, पौष व॥ ७ शके १८८४

शं. वा. दांडेकर
संपादक

# नम्र निवेदन



इ. स. १९५३ मध्यें भारतांतील अनेक लहान-मोठ्या शहरांत श्री शारदामणींचा जन्म-शताब्दि-उत्सव मोठ्या उत्साहानें साजरा झाला. पुण्यांत झालेल्या या उत्सवांत सहभागी होण्याचें भाग्य मला लाभलें. या उत्सवप्रसंगीं बेलूरच्या श्रीरामकृष्ण मठामार्फत प्रसिद्ध करण्यांत आलेल्या 'The Great Women of India' या ग्रंथाचें 'केसरी'साठीं' परीक्षण करण्याच्या निमित्तानें माताजींच्या व इतर अनेक थोर स्त्रियांच्या जीवनाशीं माझा परिचय झाला व तेव्हांपासूनच मराठी वाचकांसाठीं या अपूर्व ग्रंथाचें मराठीकरण करावें अशी कल्पना माझ्या मनांत घोळूं लागली. आज या कल्पनेला जें मूर्त स्वरूप येत आहे त्याचें सर्व श्रेय माझे गुरुवर्य प्रा. सोनोपंत दांडेकर, एम्. ए. याना आहे. प्रथमपासून अखेरपर्यंत सर्व हस्तलिखित काळजीपूर्वक वाचून व वेळोवेळीं अमोल सूचना करून डॉ. वा. दा. गोखले यांनीं मला अतिशय उपकृत करून ठेवलें आहे.

'The Great Women of India' या पुस्तकाच्या 'भारतांतील थोर स्त्रिया' या शीर्षकापासून तों शेवटपर्यंत शक्य तितक्या काटेकोरपणें मूळ ग्रंथाला धरून अनुवाद करण्याचा प्रामाणिक प्रयत्न मी केला आहे. अर्थात् इंग्रजी व मराठी भाषेच्या शब्दसंपत्तींतच कमीअधिकपणा असल्यामुळें दोन किंवा अधिक शब्दांनीं दाखविलेल्या विचाराच्या अगर भावनाच्या छटा दाखविण्यासाठीं कांहीं वेळा एकाच मराठी शब्दाचा उपयोग करावा लागला. एका दृष्टीनें अनुवाद करण्याचें कार्य स्वतंत्र ग्रंथ लिहिण्याहूनहि अधिक दुस्तर असतें. भाषांतर तर करायचें पण तें भाषांतर आहे असा भास तर वाचकांस होऊ द्यावयाचा नाहीं! ही तारेवरील कसरत किती प्रमाणांत यशस्वी झाली आहे हें वाचकांनींच ठरवावयाचें आहे. इतर प्रान्तीय विशेषनामांच्या उच्चाराबाबत मतभेद होण्याची शक्यता आहे.

मूळ इंग्रजी पुस्तकाच्या प्रस्तावनेचा मराठी अनुवादहि केलेला आहे. त्यावरून या पुस्तकाची रचना, व्याप्ति व उद्दिष्ट याची वाचकांस कल्पना येईल.

इंग्रजी पुस्तकांतील प्रत्येक प्रकरण व त्याचे मूळ लेखक हेहि वाचकांच्या माहिती-साठीं परिशिष्टांत दिले आहेत. मूळ ग्रंथांतील तळटीपा गाळल्यास कोणतीहि हानी होणार नाहीं म्हणून त्यांचा समावेश मराठी ग्रंथांत केला नाहीं. वैदिक कालापासून तों एकोणिसाव्या शतकापर्यंत समाजकारण, राजकारण, धर्मकारण वगैरे बहुविध क्षेत्रांत भारतीय महिलांनीं केवढी मोलाची कामगिरी बजावलेली आहे हें पाहिलें कीं मन आदरानें भरून येतें, आश्चर्यानें थक्क होतें. अध्यात्मासारख्या परमोच्च ज्ञानशाखेंतहि स्त्रियांनीं दाखविलेली गति विलोभनीय आहे. श्रीशारदामणींचें जीवन आणि कार्य ग्रथित करण्यासाठीं शेवटचें स्वतंत्र प्रकरण योजलेलें आहे. लौकिक शालेय शिक्षणाचा गंधहि नसलेल्या माताजींना जगन्मान्य विद्वान् श्री विवेकानंदहि गुरुस्थानीं मानीत या एकाच गोष्टीवरून माताजींचें अलौकिकत्व सिद्ध होतें. माताजींच्या जीवनदर्शनानें मला जी स्फूर्ति मिळाली ती या ग्रंथाच्या वाचनानें प्रत्येक मराठी वाचकांस मिळावी हीच परमेश्वरचरणीं मनःपूर्वक प्रार्थना.

सौ. शरयू बाळ

# प्रस्तावना

—:OOO:—

२७ डिसेंबर १९५३ रोजीं स्वामी रामकृष्णांच्या पत्नी श्री शारदामणि-देवी यांची जन्मशताब्दि साजरी झाली. या पुस्तकाच्या शेवटच्या प्रकरणांत श्रीशारदामणींचें जें चरित्र दिलें आहे त्यावरून वाचकांस असें दिसून येईल कीं श्रीशारदामणींबद्दल रामकृष्णांच्या अनुयायांच्या व इतर शेंकडो भारतीयांच्या मनांत जो आदरभाव दिसून येतो तो केवळ त्या श्रीरामकृष्णांच्या पत्नी म्हणून नव्हे तर अध्यात्मिक जीवनांत त्या पतीच्या खऱ्याखुऱ्या सहचारिणी होत्या म्हणूनच ! रामकृष्णांच्या मार्गदर्शनाखालीं श्रीशारदामणींनीं तेरा वर्षे खडतर तपश्चर्या केली. या अवधींत त्यांनीं जीवनाचें सर्व तत्त्वज्ञान आत्मसात् केलें व स्वतः पूर्णत्वास पोंचून इतरांनाहि परमेश्वरप्राप्तीचा मार्ग दाखविण्यास सुरवात केली. श्रीरामकृष्णांच्या निर्याणानंतर तर सुमारें चौतीस वर्षे शेंकडों मुमुक्षूंच्या त्या एकमेव आधार बनल्या.

श्रीशारदामणींच्या जीवनांतील सर्वच घटना अतिशय उद्बोधक व कांहींशा विस्मयजनक आहेत. एका छोट्याशा खेडवळ मुलीची एक महान् तपस्विनी कशी झाली हें पाहतांना भारतीय स्त्रीजीवनाचे कांहीं ठळक आदर्श सहजच डोळ्यासमोर उभे राहतात. सामाजिक, राजकीय, अध्यात्मिक वगैरे क्षेत्रांत विशेषत्वानें चमकून गेलेल्या भारतीय स्त्रीरत्नांची ओळख करून देणारा एखादा प्रमाणभूत ग्रंथ प्रकाशित करण्यानेंच शारदामणींचें खरेखुरें स्मारक होईल या कल्पनेनें अद्वैताश्रमातर्फे " दी ग्रेट वुमेन् ऑफ् इंडिया " हा इंग्रजी ग्रंथ प्रसिद्ध करण्यात आला. हा ग्रंथ तयार करतांना श्रीशारदामणि-उत्सव-समितीनें एक विशिष्ट दृष्टिकोन पुढें ठेवला होता. भारतांत होऊन गेलेल्या थोर स्त्रियांच्या जीवनाचें व कार्याचें दिग्दर्शन करून त्यायोगें भारतांतील स्त्रीत्वाचे आदर्श जगापुढें मांडावेत हा या ग्रंथाचा प्रधान हेतु आहे. भारतीय इतिहासाचे प्रमुख कालखंड कल्पून त्या त्या कालांत निरनिराळ्या क्षेत्रांत गाजलेल्या स्त्रियांच्या चरित्राची व कार्याची रूपरेषा देतांना या लोकोत्तर महिलांनीं भारताचा इतिहास घडविण्यास किती बहुमोल साहाय्य केलें आहे याचेंहि दिग्दर्शन वाचकांना या ग्रंथात आढळेल.

स्थूल मानानें ग्रंथाचे दोन विभाग पाडून पहिल्यांत भारतीय स्त्रीजीवनाचे आदर्श व भारतांतील स्त्रियांचा सामाजिक दर्जा यांचा आढावा घेण्यांत आला आहे. हिंदुस्थानांत मातृपूजा कशी निर्माण झाली व या पूजेची पार्श्वभूमि कोणी घडविली यासंबंधीं सविस्तर विवेचन करून मातापूजनाचें अध्यात्मिक जीवनांतील महत्त्व विशद केलें आहे. भूत व वर्तमानकालीन भारतीय स्त्रीचा दर्जा सांगतांना भविष्यकाळांतहि स्त्रीचा दर्जा कसा असावा यासंबंधीं लेखकांनीं कांहीं अपेक्षा व्यक्त केल्या आहेत. दुसऱ्या विभागांत भारतांत प्रत्यक्ष होऊन गेलेल्या व महाकाव्यें, पुराणें व इतर संस्कृत वाङ्मयांत उल्लेखिलेल्या नामवंत स्त्रियांच्या चरित्रांचा व कार्याचा आढावा घेतांनाहि हाच दृष्टिकोन पुढें ठेवण्यांत आला आहे. या ग्रंथांत उद्धृत केलेल्या कांहीं स्त्रिया प्रत्यक्ष इतिहासांत होऊन गेलेल्या आहेत तर कांहींचा फक्त पौराणिक कथांत अगर काव्यांत उल्लेख केलेला आहे. कांहींहि असलें तरी यापैकीं प्रत्येकीनें आजच्या हिंदी स्त्रीला स्फूर्ति दिली आहे, प्रेरणा दिली आहे. भारताच्या सांस्कृतिक घडणीच्या दृष्टीनें ही काल्पनिक स्त्रीरत्नेंहि फार मोलाचीं आहेत. सती, सीता, सावित्री, द्रौपदी, शकुन्तला अगर गांधारी यांनीं जे स्त्रीजीवनाचे आदर्श भारतीय स्त्रीसमोर ठेवले त्यांच्या योग्यतेबद्दल कोण शंका घेईल ! शेंकडों महिलांनीं लहानपणापासून या थोर स्त्रियांच्या गोष्टी ऐकल्या, वाचल्या व त्यांचें मनन करून स्वतःचें नैतिक व धार्मिक जीवन घडविलें. भारतीय स्त्रीजीवनाचे आदर्श या दृष्टीनें जुन्या वाङ्मयांतील या नायिकांचे जीवनपट अत्यंत उद्बोधक नाहींत असें कोण म्हणेल ?

दुर्दैवानें प्राचीन भारतांतील स्त्रीजीवनाबद्दल फारच थोडी माहिती आज उपलब्ध आहे. पण ज्या थोड्याफार गोष्टी इतिहासकालीन थोर स्त्रियांबद्दल ज्ञात आहेत त्यावरूनहि आजच्या समाजाला कितीतरी बोध घेता येईल. ज्या अनेक स्त्रियांचा या ग्रंथांत समावेश केला आहे त्यांच्या जीवन-वृत्तांतातील त्रोटकपणा कदाचित् वाचकाच्या मनाला खुपेल. पण याबाबत लेखकांचाहि नाइलाज आहे. थोर व्यक्तींच्या हयातींत व नंतरहि कित्येक वर्षें त्यांच्या जीवनांतील ठळक गोष्टी नमूद करून ठेवण्याची प्रथा तत्कालीन समाजात नसल्यानें आज आपण आपल्या कितीतरी नामवत पूर्वजांबद्दल अज्ञानीच राहिलों आहोंत. या ग्रंथाचें अवलोकन केल्यानंतर कोणकोणत्या क्षेत्रांत भारतानें थोर स्त्रीरत्नें निर्माण केली, त्यांच्या जीवनांत प्रतिकूल परिस्थितीशीं झगडून किती अपूर्व यश त्यांनीं संपादन केलें व

आजच्या समाजापुढें कोणते आदर्श त्यांनीं निर्माण करून ठेवले यासंबंधीं स्पष्ट कल्पना वाचकांस येईल. या ग्रंथात समाविष्ट केलेल्या स्त्रियांच्या जीवनकार्याचा विचार करतांना अखंड भारताच्या भूमर्यादा लक्षांत घेऊन, वैदिक कालापासून तों एकोणिसाव्या शतकापर्यंतच्या दीर्घ कालाचा समावेश करण्यांत आला आहे. याखेरीज आणखीहि कांहीं पोट-विभाग दुसऱ्या भागांत पाहिलेले आढळतील. हे विभाग निश्चित कालावधि दाखविण्यासाठीं अगर विषयानुक्रम दाखविण्यासाठींच केले आहेत असें नसून त्यांत इतरहि कांहीं मुद्दे विचारांत घेतले आहेत. उदाहरणार्थ, अ व ब विभागांत ब्राह्मण, बौद्ध, जैन वगैरे कालांतील धार्मिक क्षेत्रांतील नामवंत स्त्रियांचा विचार करण्यांत आला आहे. क, ड व ई हे विभाग कालानुक्रमें पाडण्यात आले असून त्यांतहि पुन्हां राजकारण, समाजकारण, धर्म वगैरे क्षेत्रांतील स्त्रियांच्या जीवनाचा वृत्तांत वेगवेगळे विभाग पाडून देण्यांत आला आहे. कालदृष्ट्या विभाग व-व क हे स्वतंत्र नाहींत. क व ड विभागांतील स्त्रियांचें कार्यक्षेत्र एकच असूनहि त्या ज्या प्रान्तांत निर्माण झाल्या त्या भौगोलिक विभागानुसार त्यांच्या चरित्रांची मांडणी करण्यांत आली आहे. क, ड व ई विभागांत समाविष्ट केलेल्या स्त्रियांत अनेक समान गुणधर्म आढळतील. त्यांच्यापैकीं बऱ्याच जणी विदुषी, राजकारणी, कवयित्री अगर योद्धया म्हणून प्रसिद्ध होत्या तर कांहीं प्रखर धार्मिक वृत्तीच्या, दानशूर व आदर्श नैतिक मूल्यांची जोपासना करणाऱ्या होत्या. ताजमहालाच्या वलारूपानें मुमताजमहालसारख्या अमर झालेल्या स्त्रियांचा समावेश या ग्रंथात केलेला नाहीं. कारण कीर्तीचें व कर्तृत्वाचें स्वतंत्र क्षेत्र हाच निकष प्रत्येक स्त्रीची निवड करतांना संपादकांनीं लावला आहे. भारतांतील थोर स्त्रियांच्या जीवनाचा वृत्तात देण्याचाच हेतु प्रमुख मानल्यानें सिस्टर निवेदिता व ॲनी बेझंट यांच्यासारख्या ज्या परदेशीय स्त्रियानीं हिंदुस्थानात आपलें जीवन कोणत्यातरी थोर कार्यासाठीं व्यतीत केलें त्यानाहि या ग्रंथात स्थान देणें शक्य झालें नाहीं. सिस्टर निवेदिताचा माताजीशीं व रामकृष्ण मिशनशीं फार निकटचा संबंध होता. पण निव्वळ त्याचा जन्म भारतात झालेला नव्हता म्हणूनच त्याना या चरित्रमालेंतून वगळण्यात आलें आहे.

कोणत्याहि समाजाच्या संस्कृतीचें व सुधारणेचें स्वरूप प्रामुख्यानें त्या समाजांतील स्त्रियाच्या दर्जावर अवलंबून असतें असें म्हणतात. भारतीय स्त्री-जीवनाचे या ग्रंथांत दिग्दर्शित केलेले नमुने पाहून भारतीय संस्कृतीची कल्पना

प्रत्येक वाचकाला येईल अशी अपेक्षा आहे. भारतीय स्त्री-जीवनाबद्दल आज अनेक गैरसमज रूढ झालेले आहेत. या पुस्तकांत निर्देशित केलेलें आदर्श स्त्रीजीवन पाहिल्यानंतर हे अपसमज दूर होण्यास बरीच मदत होईल असें वाटतें. ह्या स्त्रियांच्या जीवनाबद्दलची संपूर्ण माहिती लेखकांना मिळवितां आली नाही त्यांच्यासंबंधी अधिक संशोधन करण्याची स्फूर्ति निर्माण होऊन या पुस्तकांतील उणीवा दूर करणारे ग्रंथ भविष्यकाळांत निर्माण व्हावेत अशी मनीषा व्यक्त करणें गैर ठरणार नाही.

श्रीशारदामणि–जन्मशताब्दि–महोत्सव–समितीच्या मनांतील या ग्रंथाच्या लेखनामागील पार्श्वभूमि ही अशी आहे. प्रत्यक्ष ग्रंथलेखनांत हे हेतु किती प्रमाणांत साध्य झाले आहेत हें वाचकांनीच ठरवावयाचें आहे.

---

# अनुक्रमणिका

# भारतांतील थोर स्त्रिया

## प्रकरण १ लें

### भारतीय स्त्रीचें गृहजीवनांतील स्थान

#### १. वैदिक काल (पूर्वार्ध)

कोणत्याहि सुधारलेल्या समाजांत स्त्री व पुरुष यांचें पतिपत्नी म्हणून प्रस्थापित होणारें निश्चित स्वरूपाचें नातें ह्राच गृहजीवनाचा पाया होय. स्त्रीनें एकाच पुरुषाशीं एकनिष्ठ राहण्याच्या कल्पनेंतून विवाहविधिप्रणीत पति-पत्नीसंबंध निर्माण होण्याची पद्धति अस्तित्वांत येण्यास कदाचित् हजारों वर्षें लागलीं असतील. लैंगिक स्वैराचारापासून एकपत्नीकत्वापर्यंत समाजांत कसकशीं स्थित्यंतरें होत गेलीं याचा साद्यंत इतिहास देण्यास येथें अवकाश नाहीं. पण निष्ठापूर्ण वैवाहिक जीवनाचें स्वरूप समजावून घेण्यासाठीं थोडी पूर्वपीठिका समजणें अगत्याचें आहे.

अनेक समाजशास्त्रज्ञांच्या मतें समाजाच्या प्रथमावस्थेंत स्त्रीपुरुषांत अनिर्बंध लैंगिक संबंध प्रचलित होते. प्राचीन मानवसमूहांत एकपतित्वाची अगर एकपत्नीकत्वाची कल्पनाच नव्हती. एका मोठ्या गटांतील सर्व स्त्रीपुरुष एकमेकांशीं शरीरसंबंध ठेवीत. अर्थातच प्रत्येक स्त्रीची संतति ही सर्व गटाची संतति मानली जाई. वेस्टरमार्कसारखे शास्त्रज्ञ वरील सिद्धान्त खरा मानीत नाहींत. मात्र भारताच्या प्राचीन वाङ्मयांत लैंगिक स्वैराचारास पोषक अशा कथा आढळतात हें निर्विवाद आहे. महाभारतात श्वेतकेतूसंबंधीं एक कथा आहे. श्वेतकेतूची माता पतीच्या संमतीनें परपुरुषाशीं राजरोस संबंध ठेवी, हें पाहून श्वेतकेतूला पराकाष्ठेचें दुःख वाटे. कुरुवंशांतहि उत्तरकालांत अशीच पद्धति

रूढ असल्याचा उल्लेख महाभारतांत आहे. पांडवकालीन भारतांत स्त्रीपुरुष-स्वैराचार थोड्याफार प्रमाणांत का होईना, पण दिसतो. महाभारतांतील वर्णनें हीं प्रत्यक्ष त्या वेळच्या समाजस्थितीचीं दर्शक आहेत, कीं भारताच्या लेखकानें तीं मानवेतिहासांतील एक अवस्था म्हणून कल्पनेनें रेखाटलेलीं चित्रें आहेत हें निश्चित समजण्यास साधन नाहीं. भारतीय समाजाचें व त्यांतील स्त्री-पुरुषसंबंधाचें यथातथ्य वर्णन करणाऱ्या जुन्यांत जुन्या ऋग्वेद-संहितेंत विवाह-संस्थेसंबंधीचे जे उल्लेख आढळतात, त्यावरून वेदपूर्वकालीन कौटुंबिक जीवनासंबंधींची सर्वसामान्य कल्पना येऊं शकते. या संहितेंतील १० व्या मंडलांतील ८५ व्या सूक्तांत स्पष्टपणें असें म्हटलें आहे कीं, तत्कालीन समाजात विवाहसंस्था रूढ झालेली होती; इतकेंच नव्हे तर, आदर्श वैवाहिक जीवनाच्या सर्व कल्पना समाजांत पूर्णपणें रुजलेल्या होत्या. वैदिक वाङ्मय हें भारतांतीलच नव्हे तर सर्व जगांतील जुन्यांत जुनें वाङ्मय असल्यानें त्यांत वर्णिलेल्या विवाहसंस्थेचें स्वरूप सर्व मानवी समाजांच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. ऋग्वेद-संहितेंतील १०—८५ सूक्तांत रविकन्या सूर्या हिच्या संधिकालाशीं झालेल्या विवाहाचें वर्णन दिलेलें आहे. वराचे कांहीं स्नेही वधूपित्याकडे जाऊन तिची आपल्या मित्रासाठीं मागणी करतात. विवाहसमारंभ वधूच्या घरींच साजरा होतो. सर्वांसमक्ष पत्नीचें पाणिग्रहण करतांना संधिकाल पुढील शब्दात आपलें मनोगत व्यक्त करतो : " माझी अर्धांगी म्हणून तुला दीर्घायुष्य प्राप्त होवो व आपली उभयतांची भरभराट होवो." वधू-पित्यास उद्देशून तो अशाहि प्रार्थना करतो कीं, " हे पूषन् ! माझ्या सर्व सुखाची भागीदारीण म्हणून तुझ्या भाग्यवान् कन्येनें माझ्या घरांत पत्नी या नात्यानें प्रवेश करावा व माझ्या प्रेमाचा स्वीकार करावा." सूर्या पतिगृहीं जाण्यासाठीं निघण्याच्या वेळीं कौमार्यरक्षण करणाऱ्या विश्वावसु गंधर्वास उद्देशून प्रार्थना केलेली आहे : " हे विश्वावसु ! या कन्येस आतां पति लाभलेला आहे. तिला त्यासमवेत सोडून तू इतर कुमारींच्या रक्षणासाठीं जा. " विश्वावसु उत्तरादाखल म्हणतो, " मीं तुला तुझ्या पितृगृहांतून मुक्त केलें आहे, पण तें केवळ तुझ्या पतीसाठीं. त्याच्या प्रेममय जगात पुत्रासमवेत तुझें उर्वरित आयुष्य सुखाचें होवो." यानंतर सूर्या व तिचा पति यांच्या सुखद प्रवासासाठींहि प्रार्थना करण्यांत येतात. पतिगृहीं प्रवेश करतांना त्याचे आप्तेष्ट व मित्र

वधूला सांगतात, " तूंच या घराची आतां स्वामिनी आहेस. घरांतील प्रत्येक गोष्टीबाबत चित्त सावधान ठेवून पतिसमवेत सुखी हो." मित्रमंडळींना उद्देशून असें सांगितलें आहे कीं, त्या सर्वांनीं नववधूच्या मंगलचिन्हांचें अवलोकन करावें, तिला शुभाशीर्वाद द्यावेत व मग आपापल्या घरीं परतावें. सर्व पाहुणे-मंडळी आपापल्या घरीं गेल्यानंतर संधिकाल पत्नीस उद्देशून म्हणतो, " प्रजापतीच्या कृपेनें आपल्या घरांत संतति नांदो. व आपणांस दीर्घायुष्य लाभो. कोणत्याहि अशुभाचा आपल्या घरांत प्रवेश न होवो. घरांतील सर्व द्विपादांचें व चतुष्पादांचें जीवन सुखाचें व भरभराटीचें होवो. तूं तुझ्या सासूसासऱ्यांवर प्रेमाची पाखर घाल व दीरनणंदांवर ममतेचा अधिकार चालव." संधिकाल इंद्राची प्रार्थना करून, सूर्या भाग्याची होऊन तिला पुत्र व्हावेत अशीहि इच्छा प्रदर्शित करतो. यानंतर पति व पत्नी दोघे सर्व विश्वेदेवांना आवाहन करून अशी प्रार्थना करतात कीं, " आपल्या हृदयांचें पूर्ण मीलन व्हावें आणि मातरिश्वन्, धाता व देष्ट्री यांच्या कृपेनें आपली कधींहि ताटातूट होऊं नये. "

वरील वर्णनावरून वेद-पूर्वकालांतील समाजांत रूढ असलेल्या विवाहविषयक कल्पना स्पष्ट होतात. पतिपत्नींच्या सहजीवनाबद्दल केवढी निष्ठा प्राचीनांच्या मनात वसत होती, हेंहि या सूक्तावरून दिसून येतें. ऋग्वेद-संहितेच्या पूर्वींच भारतांत विवाहसंस्था स्थिरावलेली होती, याबद्दल हें सूक्त पाहिल्यानंतर शंका राहत नाहीं. या संस्थेंत पत्नी ही पतीच्या सर्व सुखदुःखांची वांटेकरीण होती; इतकेंच नव्हे तर, ती गृहाची स्वामिनी व धर्मासहित सर्व कार्यांत पतीची सहचारिणी मानली गेली होती. पति व पत्नी यांची एकरूपता ठिकठिकाणीं वर्णिलेली आहे. सासरीं पत्नीचा प्रवेश ही एक अत्यंत भाग्याची घटना मानलेली आहे. हें सूक्त मुलाबाळांसहित सुखी जीवन जगणाऱ्या आदर्श कुटुंबाचें चित्र वाचकांच्या डोळ्यांसमोर तंतोतंत उभें करतें; इतकेंच नव्हे तर, ज्या काळांत अनेक समाजांत लैंगिक स्वैराचार नांदत होता, त्या काळांत भारतीय समाजानें संस्कृतीचा किती वरचा टप्पा गांठलेला होता याचीहि कल्पना आपणांस या सूक्तावरून करतां येईल. विकसित विवाहसंस्थेचीं सर्व अंगोपांगें ऋक्-संहितेच्या कालांतच दिसूं लागलीं होतीं असें म्हटल्यास मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं. वरील

विधानाच्या पुष्ट्यर्थ अशीं आणखींहि कांहीं प्रमाणें देतां येतील. वैदिक वाङ्मयांत आलेल्या ' दंपती ' या शब्दाचा मूळ अर्थ ' एकाच घराचे जोड-मालक ' असा आहे ' आवस्तांत ' हा शब्द पत्नीचा आज्ञाधारकपणा दाखवितो; पण ऋग्वेदांत व गृह्यसूत्रांतील विवाह-वर्णनांत पत्नीच्या आज्ञाधारकपणावर फारसा भर दिलेला दिसत नाहीं. पतीच्या धर्मकार्यांत बरोबरीनें भाग घेणें, ही तत्कालीन समाजांत अतिशय मानाची समजली जाणारी गोष्ट पत्नीबाबत मान्य करण्यांत आली होती. पुरुषांप्रमाणें स्त्रियाहि सर्व संस्कारांस अधिकारी मानल्या जात. पतीसमवेत व त्याच्या गैरहजेरींत स्वतंत्रपणें स्त्रिया अनेक धर्मकृत्यें करीत. कांहीं विदुषी स्त्रियांना ऋषींचा दर्जाहि प्राप्त होई. वेदांतील, विशेषतः ऋक्-संहितेंतील कांहीं सूक्तें स्त्रियांनींच रचलेलीं आहेत. सर्वानुक्रमणिकेंत अशा वीस लेखिकांचीं नांवें आलेलीं आहेत. इतर ऋचांबद्दल जरी निश्चितीनें सांगतां आलें नाहीं, तरी ऋग्वेदांतील कांहीं ऋचा तरी स्त्रियांनीं रचलेल्या आहेत यांत कांहींमात्र शंका नाहीं. लोपामुद्रा, अपाला, विश्ववारा, सिकता, निवावरी, घोषा वगैरे नामवंत स्त्रियांचा उल्लेख उदाहरणादाखल करतां येईल.

स्त्रियांच्या या श्रेष्ठ यशाचें बीज त्या काळच्या शिक्षणपद्धतींत सांपडतें. वैदिक काळात वयाच्या सुमारें आठव्या वर्षी मुलांप्रमाणें मुलींचा उपनयनविधि होऊन त्यांच्या वेदाध्ययनास सुरुवात होई व पुढेंहि मुलींच्या इच्छेनुसार त्यांना हवें तवढें शिक्षण घेतां येई, असें मानण्यास प्राचीन वाङ्मयात अनेक पुरावे सांपडतात. अथर्व-संहितेंत ( ११-५-१८ ) असें म्हटलें आहे कीं, वेदाध्ययनानें मुलगी वराचें मन आकर्षित करून घेई. वैदिक वाङ्मयाच्या उत्तरकालात स्त्रियांचे दोन वर्ग मानले जात. ( १ ) ' सद्योद्वाहा ' या शब्दानें विवाह होईपर्यंत अध्ययन करणाऱ्या तरुणीचा बोध होतो व ( २ ) ' ब्रह्मवादिनी ' या वर्गांत अविवाहित राहून अखंड ज्ञानोपासना करणाऱ्या विदुषी स्त्रिया मोडतात. ब्रह्मयज्ञाच्या वेळीं ज्या थोर ऋषींना आदरानें अभिवादन केलें जाई, त्यात गार्गी, वाचक्नवी प्रातिथेयी, सुलभा, मैत्रेयी वगैरे स्त्रियांचाहि समावेश केला असल्याचा उल्लेख आश्वलायन गृह्यसूत्रात ( ३·४·४ ) आहे. पुढें चौथ्या प्रकरणांत स्त्रीशिक्षणासंबंधीं दिलेल्या सविस्तर माहितीवरूनाहि असें दिसेल कीं,

वैदिक कालांत अध्ययनाबाबत स्त्रीपुरुषांत मुळींच भेद केला जात नसे व म्हणूनच त्या काळांत अनेक स्त्रियांनीं शिक्षक, तत्त्वज्ञ व वादविवादपटु म्हणून नांवें गाजविलीं. आज उपलब्ध असलेल्या इतिहासावरून असें दिसून येईल कीं, ग्रीस व रोम यांसारख्या सुसंस्कृत देशांतील स्त्रियांपेक्षांहि वैदिक कालांतील भारतीय स्त्रीचा दर्जा फार समाधानकारक होता. अर्थात् स्त्रियांना उच्च प्रतीचें शिक्षण देऊं शकणारा वर्ग सर्व समाजाच्या मानानें लहान होता व इतर सर्वसामान्य लोकांत कुटुंब-प्रमुख म्हणून पुरुषाची स्त्रीवर सत्ता चाले हें नाकबूल करून चालणार नाहीं. ऋग्वेदांतील कांहीं सूक्तांत पतिपत्नींतील विरोधाचेहि उल्लेख आहेत. यावरून मानवी स्वभाव कोणत्याहि कालांत बदलूं शकत नाहीं, असेंच म्हणावें लागेल. प्रत्येक समाजांतील कांहीं विशिष्ट रीतिरिवाजांवरून, समाजांतील स्त्रियांच्या दर्जाची कल्पना करतां येते. भारतीय स्त्रियांच्या जीवनाची कल्पना येण्यासाठीं अशा कांहीं गोष्टींचा उल्लेख करतां येईल. प्रत्येक समाजांत मुलाच्या व मुलीच्या जन्मानंतर वेगवेगळ्या भावना प्रकट केल्या जातात. ऋग्वेदांतील एका सूक्तांत पत्नीला दहा पुत्र व्हावेत अशी प्रार्थना केलेली आहे. यावरून कन्येच्या जन्मापेक्षां पुत्रजन्माचा समाजास अधिक आनंद वाटे हें समजून येतें. अथर्ववेदांत तर कन्येपेक्षां पुत्रच व्हावा अशा तऱ्हेचे उल्लेख आढळतात (३·२३ व ६·११). असें असलें तरी संहितावाङ्मयांत कन्येबद्दल कटु भावना कोठेंहि व्यक्त झालेल्या नाहींत. अर्थात् जन्माला आलेल्या मुलीला टाकून देणें अगर तिला ठार मारणें यासारख्या आसुरी पद्धति भारतांत अस्तित्वांत नव्हत्या हें निश्चित. तैत्तिरीय संहितेंतील कांहीं वचनांचा अर्थ लावतांना वेबरनें घोटाळा करून बालिका-हत्येची पद्धति हिंदुस्थानांत होती असा जो निष्कर्ष काढला आहे, तो निर्विवाद चुकीचा आहे. मुलगा झाल्यास ज्या प्रमाणांत आनंदोत्सव करीत त्या प्रमाणांत जरी मुलीच्या जन्मवेळीं आनंदप्रदर्शन करण्यांत आलें नाहीं, तरी मुलामुलींच्या संगोपनाबाबत कोणताहि भेद दाखविला जात नसे. मुला-प्रमाणें मुलीवरहि सर्व संस्कार होत व तिला शिक्षणाच्या सर्व संधि उपलब्ध करून देण्यांत येत. कांहीं अपवाद वगळून सर्वसामान्य मुलींना मात्र घरींच देतां येईल तेवढें शिक्षण दिलें जाई. मुलांप्रमाणें त्यांना गुरुगृहीं अध्ययनास धाडण्याची पद्धति नव्हती.

भारतीयांत रूढ असलेली बहुपत्नीकत्वाची पद्धतिहि स्त्रियांच्या दर्जाचें स्पष्टीकरण करते. एका पुरुषानें अनेक स्त्रिया करण्याची प्रथा ऋक्-संहिता-कालांत प्रचलित होती. अर्थातच स्त्रियांच्या दृष्टीनें बहुपत्नीकत्वाचें कोणासहि समर्थन करतां येणार नाहीं. ऋक्-संहितेंत १·१०५ व १०८, १०·१४५·१–३ या सूक्तांत एका पतीच्या दोन पत्नींपैकीं एकजण दुसरीवर मंत्र-तंत्राचा प्रयोग करून पतीचें मन स्वतःला कसें अनुकूल करून घेई, यासंबंधींचें वर्णन आहे. बहुपत्नीकत्वामुळें गृहजीवनांत कितपत दुःख निर्माण होत असे व स्त्रियांना आपली, 'पत्नी' ही भूमिका कितपत जाचक होई याबद्दल निश्चित विधान करणें थोडें धोक्याचें होईल. बहुपत्नीकत्वाप्रमाणें बहुपतित्वाची पद्धति वैदिक कालांत थोडीफार रूढ असण्याची शक्यता आहे. बहुपतित्वाच्या पद्धतीबद्दल समाजशास्त्रज्ञांत तीव्र मतभेद असले, तरी महा-भारतांतील द्रौपदीनें पांच पति कां केले, या बाबतींत कोणतेंहि समाधानकारक स्पष्टीकरण इतिहासकारांना देतां आलेलें नाहीं. जर त्या वेळच्या समाजाला बहुपतित्व ज्ञात नव्हतें असें मानलें, तर महाभारतकारांनीं आपल्या कथेंतील पांच नायकांचा एका नायिकेशीं विवाह लावून समाजापुढें एक अयोग्य आदर्श ठेवला असें म्हणावें लागेल. पण हें शक्य दिसत नाहीं. पुराणांच्या आधारें व्यासांनीं बहुपतित्वाच्या आणखीहि एकदोन उदाहरणांचा उल्लेख महाभारतांत केला आहे.

वधू ही पतीस नव्हे तर पतीच्या कुटुंबांत देण्यासंबंधीं आपस्तंब धर्म-सूत्रांतहि ( २·२७ व ३·४ ) उल्लेख आहे. त्याच ऋचांत पुढें असेंहि म्हटलें आहे कीं, पुरुषाच्या कमकुवतपणामुळें आतां ही प्रथा बंद पडली आहे. या सूक्तावरून लेखकाला बहुपतित्वाचाच बोध करून द्यावयाचा आहे. जॉली या समाजशास्त्रज्ञानें सुचविल्याप्रमाणें संस्कृत वाङ्मयांत उल्लेखिलेली बहुपतित्वाची चाल व कूर्मांचलमधील ब्राह्मण, शूद्र व रजपुतांत प्रचलित असलेली सर्व भावांनीं मिळून एकच पत्नी करण्याची चाल, यांत बरेंच साम्य आढळून येतें. प्राचीन कालांतील अनेक समाजांत कोणत्याना कोणत्या स्वरूपांत बहुपतित्व रूढ होतें व हिंदुस्थानातहि तें रूढ असलें तर त्यांत कांहींच आश्चर्य नाहीं. एवढें मात्र खरें कीं, बहुपत्नीकत्वाइतकी लोकप्रियता बहुपतित्वाच्या पद्धतीस केव्हांच लाभली नाहीं.

स्त्रीच्या पावित्र्याच्या कल्पनेला धक्का देणारी आणखी एक पद्धति प्राचीन वाङ्मयांत आढळते; व ती म्हणजे नियोग-पद्धति. पति कोणत्याहि कारणानें प्रजोत्पादनास असमर्थ ठरल्यास, त्याच्या पत्नीनें परपुरुषाशीं संबंध ठेवून प्रजोत्पादन करण्यास समाज संमति देई. अर्थात् वंश पुढें चालू राहावा एवढाच यामागील हेतु असे. सौभाग्यवती स्त्रीप्रमाणें विधवेसहि नियोग-पद्धतीचा अवलंब करतां येई. याचा अर्थ इतकाच कीं, स्त्रियांच्या पावित्र्या-पेक्षां वंशरक्षणास प्राचीन भारतांत अधिक महत्त्व दिलें गेलें होतें.

संधिकाल व सूर्या यांच्या विवाहाच्या निमित्तानें ज्या एकनिष्ठ वैवाहिक जीवनाचें वर्णन ऋक्-संहितेंत आलें आहे त्यावरून पतिपत्नींच्या परस्परांवरील प्रेमास व त्या उभयतांच्या गृहजीवनास ऋग्वेदकालापासूनच फार महत्त्व प्राप्त झालें होतें हें निर्विवाद. संस्कृत वाङ्मयांत आलेल्या स्वैरवर्तनाच्या उल्लेखांवरून फार तर एवढेंच म्हणतां येईल कीं, मानवी स्वभावास धरून जरी कांहीं प्रसंगीं स्वैरवर्तन घडत असलें तरी वैवाहिक एकनिष्ठता हा भारतीय समाजाच्या धारणेचा एक प्रमुख घटक मानला गेला आहे. ऋग्वेदाच्या १० व्या मंडलांतील १६२·६ या सूक्तांत 'जार' संबंधाचा जो उल्लेख आहे त्यावरून एका विद्वानानें असें प्रतिपादन करण्याचा प्रयत्न केला आहे कीं, विवाहित स्त्रीचा जाराशीं संबंध ही एक सर्व स्त्रियांत सामान्यपणें दिसून येणारी गोष्ट होती. पण हें विधान सिद्ध होऊं शकणार नाहीं. अविवाहित स्त्रियांस कोणातरी पुरुषाच्या संबंधापासून संतति झाल्याचीं उदाहरणें संस्कृत वाङ्मयांत आहेत. यावरून असें म्हणतां येईल कीं, त्या काळीं वयात आलेलीं मुलें-मुली ज्या मोकळेपणानें वागत, त्यांतूनच असे प्रसंग निर्माण होत. पण अशा घटना मोठ्या मंडळींना कधींच स्वागतार्ह न वाटल्यानें तरुणतरुणी पळूनहि जात. एक गोष्ट मात्र खरी कीं, ऋग्वेदकालांत स्त्रियांच्या नीतिबाह्य वर्तनाला फार कठोर शिक्षा समाज करीत नसे. पुढें पुढें समाजाचा दृष्टिकोण अधिक कडक होत गेला. होमरच्या काळांत ग्रीक समाजांतहि कांहीं बाबतींत स्त्रियांवर नीति-बाह्य वर्तनाची जबरदस्ती करण्यांत येत असे. युद्धांत कैद केलेल्या स्त्रियांनीं जेत्यांच्या वासना तृप्त केल्याच पाहिजेत असा ग्रीकांचा दंडक असे. अशा तऱ्हेचें नीतिबाह्य वर्तन घडलेल्या स्त्रीकडे समाज तुच्छतेनें अगर तिरस्कारानें पाहत नसे. प्राचीन भारतांतहि अशाच कांहींशा कल्पना रूढ असतील,

पण आजचा समाज मात्र नीतिबाह्य वर्तन करणाऱ्या स्त्रीस सहिष्णुता दाखविणार नाहीं.

वैधव्यावद्दलहि ऋग्वेदकालीन समाजाचा दृष्टिकोन बराच उदारमतवादी होता असें दिसतें. विधवा स्त्री पुनर्विवाह करूं शके व कांहीं विशेष परिस्थितींत तिला नियोगाचीहि परवानगी मिळे ( ऋग्वेद १०·४०·२ ). ऋग्वेद १०·१८·८ व अथर्ववेद १८·३·१ व २ यांत असें म्हटलें आहे कीं, लग्न झाल्याबरोबर एखाद्या मुलीचा पति निवर्तल्यास मृत्युशय्येवर त्याच्या शेजारीं निजलेल्या पत्नीस उठवून तिचा दीर हात धरून तिला घरीं आणी व आपली वधू म्हणून तिचा स्वीकार करी. वरील सूक्तांवरून फक्त सतीच्या पद्धतीचा बोध होतो असें कांहींचें म्हणणें आहे. पण सर्व ऋग्वेदांत सती जाण्यासंबंधीं उल्लेख नाहीं. अथर्ववेदांतील ऋचेंत अशा रीतीनें पतीच्या मृत-देहाशेजारीं निजणें ही एक पुरातन काळापासून चालत आलेली धार्मिक क्रिया आहे असें म्हटलें आहे. यावरून सतीची पद्धति प्राचीन भारतीयांना विदित असावी असें दिसतें. पतीच्या मृतदेहाबरोबर पत्नीला जिवंत जाळण्याची प्रथा आशिया व युरोप खंडांतहि रूढ होती.

भारताप्रमाणें इतर कांहीं प्राचीन समाजांत, विशेषतः ज्यू लोकांत पति मेल्यानंतर त्याच्या पत्नीनें दिराशीं लग्न करण्याची पद्धति दिसते. हिंदु-स्थानांत विधवेनें दिराशींच लग्न केलें पाहिजे अशी सक्ती नसे. पण दिराशीं लग्न केल्यानें स्त्री त्याच कुटुंबांत राहून वंशवृद्धीचा मार्गहि सुकर होई. कदा-चित् आर्थिक दृष्टीनें अशा विवाहांत फायदा होऊन, सामाजिक संबंधांत अधिक गुंतागुंत निर्माण न व्हावी असाहि यांत उद्देश असावा. विधवा स्त्रीनें किती वेळां विवाह करावा याबद्दलहि विशेष काटेकोर नियम नव्हते. अथर्ववेदांतील १०·१७·८ ह्या ऋचेंत असें म्हटलें आहे कीं, " पूर्वीचे दहाहि पति जरी अब्राह्मण असले, तरी ब्राह्मणानें विधवेचा हात धरल्यास तोच तिचा पति होतो."

प्राचीन वाङ्मयावरून बोध होणाऱ्या, स्त्रियांच्या दर्जासंबंधींच्या कांहीं रूढींचा आतांपर्यंत उल्लेख केला. स्त्रियांच्या गृहजीवनाबद्दलहि संस्कृत वाङ्मया-वरून कांहीं गोष्टी सांगतां येतील. मुलीचा बोध करून देणारे जे अनेक शब्द इंडो-युरोपियन भाषांत प्रचलित आहेत, त्यांपैकीं ' दुहितृ ' हा शब्द प्रामुख्यानें अनेक भाषांत वापरलेला आढळतो. ' दुह् ' म्हणजे ' धार काढणें ',

या संस्कृत शब्दावरून ' दुहितृ ' हें रूप तयार झालें आहे. कांहींच्या मतें ' दुहितृ ' शब्दावरून स्त्रीची गृहजीवनांतील उपयुक्तता दर्शविली जाते, तर कांहींच्या मतें या शब्दानें मुलाच्या संगोपनाच्या स्त्रीच्या नैसर्गिक कर्तव्याचा बोध होतो. पूर्वी प्रत्येक घरांत गाय असे. गायीचें दूध काढणें, गोठा साफ करणें, ताक करणें, लोणी काढणें हीं मुलींचीं कामें मानीत. याखेरीज वस्त्रें विणणें, पाणी भरणें, सोम वनस्पति जमा करून त्याचा धर्मकार्यासाठीं रस काढून तयार ठेवणें व शेताची राखण करणें हींहि कामें मुलीकडे असत. मात्र या सर्व कामांमुळें तिच्या शिक्षणांत व्यत्यय येत नसे. मुलींचे विवाह प्रौढपणीं झाल्यानें वयांत आलेल्या अविवाहित मुली मोकळेपणानें वागत. ऋग्वेदांतील या ऋचेंत " ज्यांना भाऊ नाहींत अशा मुली अनिर्बंध वागत " असें म्हटलें आहे. कांहीं कन्या विवाह न झाल्यानें वृद्धापकाळीं पितृगृहींच राहत. अर्थात् अशीं उदाहरणें अपवादात्मक असत. कन्येचा विवाह झालाच पाहिजे असा आग्रह नसला तरी, विवाह ही प्रत्येक कन्येच्या जीवनांतील एक ओघानेंच घडून येणारी सर्वसामान्य घटना समजली जाई.

प्राचीन भारतीयांत कोणकोणते विवाहप्रकार रूढ होते व विवाह ठरविण्याबाबतचे नियम काय होते याचा सुसूत्र इतिहास वैदिक वाङ्मयात दिलेला नाहीं. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांतील दहाव्या सूक्तांत बहीण-भावांचा विवाह अनुचित मानल्याचा उल्लेख आला आहे. कन्येनें केलेल्या वराच्या निवडींत आईवडिलांच्या मतास फार मान दिला जाई. अनेक प्रकारच्या सामाजिक उत्सव-समारंभप्रसंगीं तरुणतरुणी एकत्र येत, परस्परांवर अनुरक्त होत व यांतूनहि अनेक विवाह होत. क्वचित् वेळीं आईवडिलांनी विरोध दर्शविल्यानें ठरलेले विवाह मोडल्याचीं उदाहरणें इतिहासांत आहेत. सूत्र व स्मृति या वाङ्मयांत दिलेल्या विवाह-प्रकारांचा जरी ऋग्वेदांत प्रत्यक्ष उल्लेख नसला, तरी त्यापैकीं अनेक विवाहप्रकार ऋग्वेद-वाङ्मयांत सूचित केलेले आहेत. कित्येक ऋचांत मुलीच्या पित्याला पैसे देऊन तिच्याशीं लग्न करण्याच्या आर्ष व आसुर विवाहासंबंधीं उल्लेख आहेत. सूर्या व संधिकाल यांच्या विवाहाचें वर्णन करणाऱ्या ऋचेंत ब्राह्म व प्राजापत्य विवाह अभिप्रेत आहेत व हेच दोन प्रकार ऋग्वेदकालीं लोकप्रिय होते. कांहीं ऋचांवरून स्वयंवर, गांधर्व व राक्षस या विवाहप्रकारांचीहि माहिती मिळते.

ऋग्वेदकाळीं बालविवाह प्रचलित नव्हते, हें आतांपर्यंत केलेल्या चर्चेवरून वाचकांस सहज समजून येईल. मुली पूर्ण वयांत आल्यावर त्यांचे विवाह होत असत. विवाहविधि कसा असे याची चर्चा यापूर्वी आलेलीच आहे. त्यांतच आपल्याला, वराचें सहकुटुंब सहपरिवार मित्रगुर्जीनें वधूगृहीं आगमन, वधूची वेषभूषा, धार्मिक विधि, होम, सप्तपदी, पाणिग्रहण आणि वधूचें वरगृहीं आगमन वगैरेंचें मोठें बहारीचें वर्णन आढळतें.

वधूचें वरगृहांत स्थान काय असे, यासंबंधीं यापूर्वी चर्चा आलेली आहे. गृहिणीचा दिनक्रम व तिचीं कर्तव्यकर्में याबद्दल मात्र तपशीलवार माहिती कोठें दिलेली नाहीं. आजच्या गृहिणींप्रमाणेंच त्या वेळची गृहिणीहि सर्व गृहकृत्यें दक्षतेनें पार पाडीत असावी. परंतु पतीशीं व इतर सवतीशीं विवाहित स्त्रीचे संबंध निश्चितपणें कशा प्रकारचे असत, याचा उलगडा त्या वेळच्या वाङ्मयावरून होत नाहीं. विवाहासंबंधीं ऋग्वेदांत ज्या ऋचा आहेत, त्या सर्वांवरून त्या काळची गृहिणी सुखी होती, कुटुंबांत तिचा योग्य मान राखला जाई व ती खऱ्याखुऱ्या अर्थानें पतीची सहचारिणी होती हें निश्चित.

## २. वैदिक काल ( उत्तरार्ध )

ऋग्वेद-काळाच्या सुरवातीपासून तों ख्रिस्त-शतक १२०० पर्यंत सुमारें दोन ते अडीच हजार वर्षांच्या कालावधींत हिंदु समाजांत अनेक महत्त्वाचे बदल घडून आले. स्त्रियांच्या सामाजिक दर्जांतहि बराच फरक झाला. दुःखाची गोष्ट म्हणजे हा फरक स्त्रियांच्या दृष्टीनें फार प्रतिकूल स्वरूपाचा होता. यासंबंधींची सुसूत्र हकीकत अनुक्रमें संहिता, ब्राह्मण, उपनिषदें, धर्मसूत्रें व स्मृति यांवरून समजते. यापैकीं कालानुक्रमें लिहिला गेलेला प्रत्येक वाङ्मयप्रकार विचारांत न घेता, सर्वसामान्यतः प्राचीन काळाच्या शेवटीं शेवटीं स्त्रियांची परिस्थिति किती बदलली व या बदलाचें स्वरूप कसें होतें, एवढेंच या ठिकाणीं आपणांस पहावयाचें आहे. स्त्रियांची सामाजिक अधोगति जी एकदां स्मृतिकालीं सुरू झाली ती एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत एकसारखी चालूच होती. इंग्रजी वाङ्मयानें भारतीयांत जी वैचारिक क्रांति घडवून आणली त्यांतच स्त्रियांच्या उन्नतीचाहि समावेश झालेला आहे.

आतांपर्यंत ऋग्वेदकालासंबंधीची माहिती देतांना आपण असें पाहिलें कीं, अनेक ऋग्वेदीय सूक्तांत गृहिणी व सहचारिणी म्हणून स्त्रीस कुटुंबांत मानाचें स्थान होतें असें नमूद केलें आहे. तिला स्वतःच्या विकासाबाबत बरेंच स्वातंत्र्य होतें व सामाजिक जीवनांत ती पुरुषाच्या बरोबरीनें भाग घेई. विवाह होत पण प्रत्येक मुलीवर विवाहाची सक्ती होत नसे. ज्ञानार्जनासाठीं किंवा अन्य कांहीं निमित्तानीं कांहीं मुली जन्मभर अविवाहित राहूं शकत. बालविवाह तर प्रचारांत नव्हतेच; उलट विवाहाच्या वेळीं मुलीचा शारीरिक व मानसिक विकास पूर्ण झालेला असे. विधवांना पुनर्विवाहाची मोकळीक असे व प्रसंगीं नियोग-पद्धतीनें वैधव्यांतहि स्त्रीस मातृत्वाचा आनंद उपभोगतां येई. दुर्दैवानें धर्मसूत्रांच्या कालापर्यंत या सर्व कल्पनांचा हळूहळू लोप झाला. मुलींच्या विवाहाच्या वयाबाबत धर्मशास्त्रकारांनीं जो दृष्टिकोण पुढें मांडला तोच स्त्रियांच्या न्याय्य स्वातंत्र्याच्या आड येऊन अनेक प्रकारचीं दुःखें स्त्रियांवर लादलीं गेलीं असें म्हटल्यास गैर होणार नाहीं. कांहीं धर्मशास्त्रज्ञांच्या मतें मुलीनें कौमार्यांत पदार्पण केल्यावर तीन वर्षांच्या आंत तिचा विवाह झाला पाहिजे; तर कांहींच्या मतें कौमार्यांत पदार्पण करतांच तीन महिन्यांच्या आंतच मुलीचा विवाह उरकला पाहिजे. या निर्बंधाच्या बुडाशीं असलेलें मुलीचें शारीरिक पावित्र्यच प्रामुख्यानें विचारांत घेतलेलें दिसतें. जिच्याशीं विवाह करायचा त्या मुलीच्या मनाला वैषयिक प्रेमाचा स्पर्शहि झालेला असतां कामा नये असा दंडक या कालांत रूढ झाला होता. एकेकापेक्षां एकेक अनुदार अशा शास्त्रकारांनीं ही कल्पना आणखी ताणून मुलींच्या विवाहाचें वय कौमार्यावस्थेच्याहि अलीकडे आणून ठेवलें. मनूनें आठ वर्षें हें मुलीच्या विवाहास योग्य वय मानलें असलें तरी त्यानें असेंहि म्हटलें आहे कीं, अयोग्य वराला मुलगी देण्यापेक्षां तिनें अविवाहित अवस्थेंत आमरण पित्याकडेच राहणें इष्ट ( ९·८९ ). विवाहाचें वय ठरविण्याच्या या स्पर्धेत एका शास्त्रकारानें तर असें म्हटलें आहे कीं, ज्या वेळीं मुलगी विवस्त्र हिंडण्याफिरण्याइतकी लहान असते त्याच वयांत तिचा विवाह उरकावा. कांहींच्या मतें उशिरांत उशिरा दहाव्या वर्षी तरी मुलीचा विवाह झालाच पाहिजे. सारांश, सर्व धर्मशास्त्रकारांनीं मुलीच्या विवाहाचें वय कौमार्यावस्थेच्या अलीकडे आणलें व अशा रीतीनें बालविवाहाची

रूढी हळूहळू पक्की होऊं लागली. जनमतानें यांहिपुढें मजल मारून तीन ते चार वर्षांच्या मुलींचे विवाह लावण्यास सुरुवात केली. बालविवाहाचा पहिला दृश्य परिणाम म्हणजे मुलींचें शिक्षण खुंटलें. शैशवावस्थेंतच गृहिणीपद लाभल्यास मुलगी शिकणार तरी केव्हां ? प्रत्येक मुलीवर लग्नाची सक्ती झाल्यानें वैदिक कालाप्रमाणें एखाद्या मुलीला ब्रह्मवादिनीचें जीवन जगण्याची शक्यताहि नाहींशी झाली. वैदिक वाङ्मयाचा अभ्यास करण्याची संधि गमाविल्यानें स्त्रियांचें अपरिमित नुकसान झालें. वैदिक वाङ्मयाचें अध्ययन न झाल्यानें स्त्रिया धर्मकार्यांत भाग घेण्यासहि नालायक ठरल्या. वैदिक मंत्रांच्या साहाय्यानें जे संस्कार पूर्वी मुलींवर होत होते ते मंत्ररहित होऊन पुढें पुढें तर विवाहाखेरीज कोणताच संस्कार मुलींच्या बाबतींत करण्याची आवश्यकता नाहीं असें प्रतिपादन केलें जाऊं लागलें. मुलींचें उपनयन करण्याची प्रथा बंद झाल्यानें त्यांना द्विजत्व मिळविण्याचा मार्ग बंद झाला व कालांतरानें त्यांचा दर्जा शूद्रांबरोबरीचा ठरवून वैदिक मंत्र ऐकण्यासहि त्यांना अपात्र ठरविलें गेलें. भगवद्गीतेंत नवव्या अध्यायांतील ३२ व ३३ या श्लोकांत असें स्पष्टच म्हटलें आहे कीं, वैश्य, शूद्र व स्त्रियाहि भक्तिमार्गानें उद्धरून जातात. नारदाच्या एका टीकाकारानें असें सांगितलें आहे कीं, वेदाध्ययन न केल्यानें स्त्रियांना योग्यायोग्य क्रियेचा निर्णय करतां येत नाहीं व म्हणून त्यांनीं सदैव पुरुषावर अवलंबून राहिलें पाहिजे. बृहदारण्यक उपनिषदांतील ६·१७ हा भाग पंडिता कन्या प्राप्त होण्यासाठीं करावयाच्या धर्मविधीसंबंधीं आहे. यावर टीका करताना खुद्द शंकराचार्यांनीं असें म्हटलें आहे कीं 'पंडिता' या शब्दाचा अर्थ 'विदुषी' असा करतां येणार नाहीं. कारण वेदाचें अध्ययन करण्याचा स्त्रियांना अधिकारच नाहीं आणि म्हणून 'पंडिता' म्हणजे 'गृहकृत्यात निपुण' असाच अर्थ लावला पाहिजे. याच उपनिषदांत पुढें वेदविद्येंत प्रवीण म्हणून गार्गी, मैत्रेयी व वाचक्नवी यांचे उल्लेख आहेत. गार्गीनें तर याज्ञवल्क्याशीं जाहीर रीतीनें तत्त्वचर्चा केली होती. मैत्रेयीनें पतीच्या दौलतीचा हिस्सा नाकारून आत्म्याच्या अमरत्वासंबंधींच्या ज्ञानाची त्याजकडे मागणी केली. शंकराचार्यांच्या काळांत स्त्रियांची शिक्षणविषयक परिस्थिति किती केविलवाणी झाली होती याची यावरून वाचकास कल्पना येईल. मनूनें मुलीला 'अत्यंत नाजूक प्रकृतीची'

मानली आहे. तरी तो व इतर कांहीं स्मृतिकार असें सांगतात कीं, मुला-प्रमाणें मुलीलाहि शिक्षण देणें हें पित्याचें कर्तव्य आहे. पण लग्नच दहाव्या वर्षी झालें तर तत्पूर्वी मुलीचें शिक्षण कितीसें होणार? श्रीमान्, उच्चकुलीन कुटुंबांत स्वतंत्र शिक्षणाची योजना करून नृत्य, संगीत, चित्र वगैरे कलांचें शिक्षण मुलींना देण्याची पद्धत असे. पण सर्वसामान्य मुलींना शिक्षणाची संधि दुर्लभ झाली व मुलींच्या शिक्षणाबद्दल समाजांत काडीचीहि सहानुभूति उरली नाहीं. मुलीला लिहितां-वाचतां येणें ही एक असभ्य गोष्ट मानली जाऊं लागली. वैदिक कालाचा पूर्वार्ध व उत्तरार्ध यांत केवढें हें महदंतर !

स्मृतिकालांत मुलींवर विवाहाची सक्ति होई. पितृहीन मुलांच्या घरांत मुलींच्या लग्नासाठीं संपत्तीचा कांहीं भाग राखून ठेवला जाई. ऋग्वेद-कालापासून जे विवाहप्रकार समाजांत रूढ होते ते असेः—(१) ब्राह्म—वेदाध्ययन केलेल्या विद्वानाकडे जाऊन पिता आपल्या कन्येचा स्वीकार करण्यास त्यास विनंती करी. (२) दैव—यज्ञ चालू असतांना यज्ञांतील एखाद्या ऋत्विजास कन्या अर्पण करणें. (३) आर्ष—वधूपित्यास गाय व बैल अगर गायींची व बैलांची जोडी देऊन वराचा कन्येशीं विवाह करणें. (४) प्राजापत्य—विवाहसमर्थ वधूवरांस उद्देशून वधूपिता असें म्हणतो कीं, "तुम्ही उभयतांनीं आपापलें कर्तव्यकर्म योग्य प्रकारें करावें." (५) आसुर—वधूपित्यास व त्याच्या नातेवाइकांस पाहिजे तेवढें द्रव्य देऊन कन्येशीं विवाह करणें. (६) गांधर्व—कोणाला न कळत परस्परांवर अनुरक्त झालेल्या तरुण-तरुणीनें विवाहबद्ध होणें. (७) राक्षस—बळजबरीनें मुलीस पळवून नेऊन तिच्याशीं विवाह करणें. (८) पैशाच—झोंपी गेलेल्या अगर बेशुद्धावस्थेंत असलेल्या मुलीवर प्रथम बलात्कार करून मग तिचा पत्नी म्हणून स्वीकार करणें.

शेवटच्या तीन विवाहप्रकारांवरून असें दिसून येईल कीं, कोणत्याहि अनैतिक मार्गाचा अवलंब तरुण-तरुणींनीं केला तरी शेवटीं विवाहबद्ध होऊन त्यांनीं जबाबदारीचें आयुष्य जगावें अशी समाजाची इच्छा असे. कालांतरानें पैशाच विवाहप्रकार नष्ट होऊन आसुर विवाह फक्त क्षत्रियांनीच करावेत अशी मान्यता देण्यांत आली. ब्राह्मणांना पहिल्या चार विवाहप्रकारांचाच अवलंब करतां येई (मनु. ३-५३); इतर कांहीं स्मृतिकार आर्ष हा विवाह-

प्रकारहि त्याच्यच समजतात. बाल्यपणीं मुलींचे विवाह करण्याची प्रथा सुरू झाली त्यामुळें गांधर्व विवाहपद्धतिहि आपोआपच नामशेष झाली.

विवाह ही मुलीच्या आयुष्यास नवीन दिशा दाखविणारी एक अतिशय महत्त्वाची घटना असते. वयानें लहान, शिक्षणाचा गंध नाहीं व धर्मकार्यांत पतीबरोबर भाग घेण्यास अपात्र अशी मुलगी पतिगृहीं आल्यानंतर अर्थातच तिच्याबद्दल सासरच्या मंडळींत फारसा आदर निर्माण होत नसे. तिलाहि पतीच्या नातेवाईकांवर विशेष छाप पाडणें अशक्य होई. पतीच्या बरोबरीनें कुटुंबावर अधिकार गाजविणारी नव्हे, तर पतीच्या अर्ध्या वचनांत राहणारी पत्नी ही एक आज्ञाधारक सेविका अशी तिची गत झाली. पतिगृहाचा कायदा कशा प्रकारचा असे याचें सविस्तर वर्णन मनुस्मृतींत आहे. मनूचें लिखाण अनेक शतकें हिंदु समाजानें शिरोधार्य मानल्यानें मनुस्मृतींतील कल्पना जरा अधिक विस्तारानें सांगितल्यास तत्कालीन स्त्रियांच्या जीवनावर भरपूर प्रकाश पडेल.

मनुस्मृतींतील तिसऱ्या व नवव्या अध्यायांतील कांहीं श्लोकांत स्त्रियांबद्दल व पतिपत्नीसंबंधाबद्दल मनूनें फार चांगले उद्गार काढले आहेत. पण त्याचा असा एक मूलभूत सिद्धान्त आहे कीं, स्त्रीनें सदासर्वकाळ पुरुषाचें पालकत्व मान्य केलेंच पाहिजे. नवव्या अध्यायांतील दुसऱ्या व तिसऱ्या श्लोकांत " स्त्रीला स्वातंत्र्य देणें केव्हांहि इष्ट नाहीं " असा शेरा मनूनें मारला आहे. नारदानें याच मताचा पुरस्कार करतांना असें कारण दिलें आहे कीं, शास्त्राध्ययन न केल्यानें स्त्रीला योग्यायोग्य निर्णय करतांच येत नाहीं व म्हणून तिनें पुरुषाच्या आज्ञेंत राहणें इष्ट आहे. मनूची स्त्रीजातीविषयींची कल्पना याहूनहि हीन स्वरूपाची आहे. त्याच्या मतें निसर्गानें स्त्रीची मनोरचना अशी बनविली आहे कीं, तिला थोडें स्वातंत्र्य दिलें तर ती लगेच स्वैर वर्तन करण्यास प्रवृत्त होते. म्हणून तिला सदासर्वकाळ कडक बंधनांत ठेवलें पाहिजे. नवव्या अध्यायातील १४ व १५ व्या श्लोकांनंतर स्त्रीचें वर्णन इतक्या ग्राम्य भाषेंत केलें आहे कीं त्याचा अनुवाद देणेंहि अनुचित ठरेल. मनूच्या मतें विधात्यानें स्त्रींत तीव्र विषयवासना, अलंकारांचा लोभ, अपवित्र भावना, राग, अप्रामाणिकपणा व नीतिबाह्य वर्तनाचें बीज जन्मतःच

घालून ठेवलें आहे (९·१७). क्रौर्य हा स्त्रीचा उपजत गुण असल्यानें पुरुषानें तिजपासून नेहमीं सावध राहिलें पाहिजे.

वरील वर्णनावरून मनूचें स्त्रीजातीविषयीं काय मत होतें तें स्पष्ट दिसून येईल. या मताच्या पार्श्वभूमीवर मनूनें स्त्रियांवर घालतेल्या निर्बंधांचा सहज उलगडा होतो. मनुस्मृतीच्या पांचव्या अध्यायांतील १५१ ते १५४ या श्लोकांत असें म्हटलें आहे कीं, स्त्रीनें पतीची नेहमीं मनोभावें सेवा करावी, त्याच्या आज्ञेंत असावें व तो नाखूष होईल असें कांहींहि करूं नये. पति जरी अनीतिमान् असला तरी त्याची सेवा करणें हाच खरा पत्नीधर्म होय. व्यसनी, दुराचारी अगर रोगी पतीबद्दल जरी एखाद्या स्त्रीनें अनादर दाखविला तरी त्यानें तिचा तीन महिनेपर्यंत त्याग करावा, तिचे दागिने काढून घ्यावेत व इतर चीजवस्तुहि घ्यावी (९·७८). दुर्गुणी पति वंदनीय मानावा. पण पत्नी जर दुर्गुणी असेल तर मात्र पतीनें तिचा त्याग करावा. पत्नी वंध्या ठरल्यास विवाहानंतर आठव्या वर्षी तिचा त्याग करावा. मुलें होऊनहि तीं सर्व निवर्तल्यास दहा वर्षांनीं व पत्नीस सर्व मुली झाल्यास विवाहानंतर अकराव्या वर्षी तिचा त्याग करावा. पत्नी भांडखोर असल्यास तिला कोणत्याहि क्षणीं हांकलून द्यावें. कोणत्याहि परिस्थितींत परित्यक्ता स्त्रीनें कुरकूर न करतां मुकाट्यानें आपलें दुःखी जीवन जगावें. आठव्या अध्यायांतील २९९ व्या श्लोकांत तर पत्नीनें चूक केल्यास तिला दोरीनें अगर वांबूनें मारावें असेंहि सांगितलें आहे; आणि आश्चर्य असें कीं, टाकून दिलेल्या पत्नीवरहि पति पाहिजे तसा अधिकार गाजवूं शके. विधवेनें आपल्या मृत पतीच्या स्मृतीशीं जन्मभर एकनिष्ठ राहावें, पण पत्नी मेल्यानंतर लगेच पतीनें मात्र दुसऱ्या लग्नाचे बेत करण्यास हरकत नाहीं. मनु विधवापुनर्विवाहाच्या व विधवेनें दिराशीं संबंध ठेवण्याच्या पद्धतीच्या विरुद्ध होता. स्मृतिकालानंतर विधवाविवाह पूर्णपणें बंदच झाले. नारद व इतर कांहीं स्मृतिकारानीं मात्र दीर-भावजयींच्या संबंधास कांहीं विशिष्ट परिस्थितींत मान्यता दिली. पति बेपत्ता झाल्यास, त्यानें संन्यास घेतल्यास अगर तो नपुंसक असल्यास पत्नीनें दुसरा विवाह करावा असें या स्मृतिकारांचें मत आहे. कौटिल्याच्या मतें पति अनीतिमान् असल्यास अगर बरींच वर्षे परागंदा झालेला असल्यास पत्नीनें पुन्हां विवाह करण्यास हरकत नाहीं. पण हीं मतें कालाच्या प्रवाहात विरून गेलीं व विधवाविवाह

सरसहा निषिद्ध ठरविला गेला. पति-पत्नींत तीव्र मतभेद अगर शत्रुत्वाची भावना निर्माण झाल्यास विवाहविच्छेद करावा असें कौटिल्य म्हणतो. पण ब्राह्म, आर्ष, दैव व प्राजापत्य या विवाहप्रकारांस हा नियम लागू नाहीं. कौटिल्यानंतरच्या स्मृतिवाङ्मयांत विवाहविच्छेदाचा कोठेंच उल्लेख नाहीं.

विधवांचें समाजांतील दुःख दिवसेंदिवस वाढतच होतें. या दुःखांतून सुटकेचा एक मार्ग म्हणूनच कीं काय सती जाण्याची चाल हिंदु समाजांत रूढ होऊं लागली. वैदिक कालांत सतीची चाल नव्हती हें मत आतां सर्वमान्य झालें आहे. या चालीचा जुन्यांत जुना उल्लेख खि. पू. चवथ्या शतकांत सांपडतो. खि.श. १०० च्या सुमारास झालेल्या विष्णुस्मृतींत असें म्हटलें आहे कीं, सती गेल्यानें पत्नीचा आत्माहि पतीच्या आत्म्याबरोबर जाऊं शकतो. कांहीं स्मृतिकार सतीच्या चालीचें समर्थन करतात तर कांहीं या चालीचा निषेध करतात. अंगिरसाच्या मतें धर्मानुसार सती जाणें हीच स्त्रीस उत्तम गति. हारीताच्या मतें सती जाण्यानें स्त्री पतीस सर्व पापापासून मुक्त करते. या मतानुसार अनेक स्त्रिया सती जाऊं लागल्या. एकोणिसाव्या शतकापर्यंत ही पद्धत रूढ होती. ज्या बेफिकीर वृत्तीनें स्मृतिकारांनीं सतीची चाल उचलून धरली त्यावरून धर्मशास्त्रकाराचा स्त्रियांविषयीं काय दृष्टिकोण होता तो स्पष्टपणें दिसून येतो. कांहीं स्मृतिकारांनीं स्त्रियांची स्तुति करून त्यांचा दर्जा उच्च असावा असें मत प्रतिपादन केलें आहे. पण प्रत्यक्ष जीवनात मात्र अनुदार विचारांचेंच अधिक प्राबल्य होत गेलें. पहिल्या पांच-सहा शतकांतहि मुलींना उच्च शिक्षण देणारीं व प्रौढावस्थेपर्यंत त्यांच्या विवाहाचा विचार न करणारीं कांहीं कुटुंबें होतीं. पण तुलनात्मक दृष्ट्या स्मृतींच्या कठोर मतांचेंच पालन सर्वसामान्य समाजानें अधिक प्रमाणात केलें.

स्त्रियांसंबंधीं प्रतिकूल लिखाण केल्याबद्दल स्मृतिकारांनाहि सर्वस्वी दोष देतां येणार नाहीं. तत्पूर्वीच्या वाङ्मयांतूनच त्यांनीं हा दृष्टिकोण कांहीं प्रमाणांत उचलला आहे. अथर्व-संहितेंत गर्भांतील स्त्रीबीजाचें पुरुषबीज करण्यासाठीं कांहीं मंत्र दिले आहेत. ऐतरेय ब्राह्मण या ग्रंथांत असें म्हटलें आहे कीं, मुलगा हा कुटुंबाच्या आशेचा उगम आहे, तर मुलगी ही कुटुंबाच्या दुःखाचें उगमस्थान आहे. मुलींबद्दलच्या अप्रिय भावनांच्या बुडाशीं कदाचित् आर्थिक कारणें असतील किंवा मुलींना अनुरूप वर मिळण्याच्या मार्गांतील अडचणींमधूनहि मुलींबद्दल कटुता निर्माण झाली असेल.

स्त्री हें वैषयिक वासनापूर्तीचें एक साधन आहे अशीहि कल्पना संस्कृत वाङ्मयांत आढळते. ज्या कालिदासानें आदर्श स्त्रीची प्रतिमा म्हणून सीतेचें मनोहर शब्दचित्र रेखाटलें तोच कालिदास सीतात्यागाच्या प्रसंगीं रामाच्या कृतीचें समर्थन करतांना असें म्हणतो कीं, पुरुषाला स्त्रीपेक्षां केव्हांहि कीर्तिच अधिक प्रिय असते. कारण स्त्री ही केवळ विषयवासनेच्या पूर्तीसाठीं आहे. स्त्रीसंबंधींच्या अशा दृष्टिकोणांतून आणखी कांहीं कल्पना स्पष्ट होतात. स्त्रीच्या शारीरिक पावित्र्याबद्दल समाजांत दिसून येणारा काटेकोरपणा व त्यामधून निर्माण झालेला बालविवाहाबाबतच्या प्रवृत्तीचा उलगडा वरील कल्पनेवरून होतो. स्त्री ही पुरुषाला मोहांत पाडणारी एक मोठी आकर्षक वस्तु आहे व म्हणून पुरुषानें तिजपासून दूर राहिलें पाहिजे या खि. पू. सहाव्या शतकांतील समजुतीचा अर्थहि याच संदर्भांत लागतो. पुरुषाच्या परमार्थसाधनांत स्त्री ही एक मोठी धोंड आहे अशी समजूत हळूहळू रूढ होऊं लागली. सर्व दृष्टीनें स्त्रिया समाजाच्या तिरस्काराचा विषय बनल्या. जगाच्या इतिहासांत ख्रिश्चन धर्मांतहि एके काळीं स्त्रियांबद्दल अशीच भावना प्रचलित होती. मॅकॉन येथें खि. श. ५८५ च्या सुमारास ख्रिश्चन धर्मगुरूंची एक मोठी परिषद् भरून स्त्रियांची गणना मनुष्यप्राण्यांत करावी कीं नाहीं यासंबंधीं चर्चा झाल्याचें इतिहासांत नमूद केलें आहे.

गौतम बुद्धाचा स्त्रियांविषयीचा दृष्टिकोणहि काहींसा असाच होता. धर्मस्थापना केल्यानंतर बरींच वर्षें स्त्रियांना आपल्या पंथांत समाविष्ट करण्यास त्यानें विरोध दर्शविला. जेव्हां स्त्रियाना भिक्षुणी होण्याची परवानगी त्यानें दिली तेव्हांच त्यानें असें भाकित करून ठेवलें कीं, त्याच्या पंथाचें आयुष्य स्त्रियांमुळें निम्में कमी होईल व पावित्र्यहि कमी होईल. भिक्षूपेक्षां भिक्षुणींना धर्मप्रवेशाच्या वेळीं अधिक कडक परीक्षा द्यावी लागे व नंतरहि त्यांचा दर्जा भिक्षूपेक्षां कमीच मानला जाई. उदाहरणार्थ, भिक्षुणी शंभर वर्षांची वृद्धा असली तरी तरुण भिक्षूपुढें तिला विनम्र व्हावें लागे. इतर धर्मपंथांतहि स्त्रियांबद्दल हा भेदभाव दिसतो. जगाच्या पाठीवरील कोणत्याहि समाजाकडे नजर टाकल्यास स्त्रियांसंबंधीं अनुदार कल्पनाच आढळतात. कन्फ्यूशिअस्, ॲरिस्टॉटल्, मिल्टन व पुरोगामी विचारांचा रूसोसुद्धां स्त्रियां-

बद्दल कांहीं वेगळें सांगत नाहीं. या सर्वांच्या मतें स्त्री ही सदासर्वकाळ पुरुषापेक्षां कमी योग्यतेचीच राहणार.

भारतीय समाजांत स्त्रियांबद्दल अशा तऱ्हेचा दृष्टिकोण असला तरी प्राचीन काळीं स्त्रियांना कांहीं विशेष अधिकार प्राप्त झाले होते. स्त्रीहत्या हें महत्पाप मानलें जाई. पतित पुरुषाची कन्या पतिता मानली जात नसे. एखाद्या अपकृत्याबद्दल पुरुषास जेवढें प्रायश्चित्त घ्यावें लागे त्याच्या निम्मेंच स्त्रीस घ्यावें लागे. रस्त्यानें स्त्री जात असेल तर पुरुषांनीं तिला प्रथम वाट करून दिली पाहिजे असा नियम असे. नौकाकरांतून स्त्री मुक्त असे. स्त्रीधनावर पतीचा अधिकार चालत नसे. पत्नीचा कांहींहि अपराध नसतांना जर पतीनें तिला टाकलें तर दंड म्हणून खूप मोठी रक्कम पतीला पत्नीस द्यावी लागे. एखाद्या म्लेच्छानें पत्नीवर बलात्कार करून ती गरोदर राहिल्यास प्रायश्चित्त घेऊन तिला परत पतीजवळ राहण्यास परवानगी असे. श्री. काणे व श्री. आळतेकर यांनीं आपल्या पुस्तकांत स्त्रियांच्या स्तुतीनें व निंदेनें भरलेले असे संस्कृत वाङ्मयांतील अनेक उतारे उद्धृत केले आहेत. उदा. एका उताऱ्यांत असें म्हटलें आहे कीं, "अशीं कोणतीं अपकृत्यें जगांत आहेत कीं तीं स्त्रियांच्या हातून घडतात व पुरुषांच्या हातून घडत नाहींत? पुरुषांनीं स्त्रियांची कितीहि निंदा केली तरी पुरुषांपेक्षां सद्गुणांचें माप स्त्रियांकडेच अधिक झुकतें. स्त्रियांचा तिरस्कार करून पुरुष कसे सुखी होतील? वैवाहिक जीवनाची शपथ मोडल्यास स्त्री व पुरुष सारखेच दोषी ठरतील. शास्त्रशुद्ध वर्तनाची चाड पुरुषापेक्षां स्त्रीसच अधिक असते. यावरून पुरुषापेक्षां स्त्री अधिक श्रेष्ठ आहे असें म्हणण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं." या शब्दांतून खरें हिंदु मन प्रतीत होतें. वराहमिहिर या एकाच लेखकानें प्रथमपासून शेवटपर्यंत स्त्रियांची बाजू उत्कृष्ट रीतीनें मांडली आहे.

स्मृतिवाङ्मयांत एकच सद्गुण आहे व तो म्हणजे माता या भूमिकेवरील स्त्रीचें सर्वोच्च स्थान प्रत्येक स्मृतिकारानें मान्य केलें आहे. मातृत्वाची स्तुति करण्यांत महाकाव्यें, धर्मसूत्रें व स्मृति यांची जणूं अहमहमिका लागलेली दिसते. हजार पित्यांहून मातेचें महत्त्व अधिक आहे. ती गुरूची गुरुदेवता मानली आहे. जातिबाह्य पित्यास झिडकारलें तरी जातिबाह्य मातेस

मुलानें सांभाळलेंच पाहिजे. इतर कोणाच्याहि शापास उःशाप आहे पण आईनें शाप दिल्यास तो परत फिरविणें अशक्य आहे.

स्त्रीबद्दल स्मृति कितीहि कठोरपणें बोलल्या तरी पुरुषाच्या प्रेमळ साहचर्यानें स्त्रीचें गृहजीवन आजवर सुखी झालें. मातृप्रेम, पत्नीप्रम व दुहितृप्रेम ही पुरुषाची उपजत भावना आहे व या भावनेची छाप सर्वकाळ गृहजीवनावर पडलेली दिसते. मनूच्या कल्पनेप्रमाणें स्त्रीजीवनाला स्मृतिकालांत जी कलाटणी मिळाली त्यांतूनहि स्त्रियांनीं समाजांत कांहीं आदर्श निर्माण केले. पतीशीं मनानें एकरूप होऊन त्याच्या सुखांत स्वतःचें सुख पाहणारी व त्याची प्रत्येक आज्ञा शिरोधार्य मानणारी सीता आमच्या स्त्रियांचा आदर्श बनली. तिनें पतीबरोबर वनवास पत्करला, स्वतःचें पावित्र्य सिद्ध करण्यासाठीं अग्निदिव्य केलें व शेवटीं जननिंदेनें पति विह्वळ झालेला पाहतांच त्याला सोडून तिनें पुन्हा वनवास पत्करला. सीतेच्या चारित्र्यानें शेंकडों भारतीय स्त्रियांची घडण केली. आज्ञाधारकपणाचें टोंक गांठून द्रौपदीनें पतीच्या इच्छेनुसार स्वतःच्या देहाची विटंबना करून घेण्यासहि मागेंपुढें पाहिलें नाहीं. पतिप्रेमापुढें इतर कोणत्याहि भक्तीची अगर प्रेमाची मातब्बरी सतीनें मानली नाहीं. गेल्या हजार वर्षांतील हिंदु स्त्री ही स्मृतिवाङ्मयानें घालून दिलेल्या आदर्शांनीं घडविलेली कलाकृति आहे.

सर्वसामान्य व्यक्तीस जेवढें आचार व विचार यांचें स्वातंत्र्य मिळतें तेवढेंहि या लोकोत्तर महिलांना मिळालें नाहीं. अनेक वेळां पुरुषांच्या लहरींनीं त्यांच्यावर घोर अन्याय झाले. पण त्या मात्र प्रेमासाठीं जगल्या व प्रेमासाठींच मेल्या. मृत्यूनंतर आज अनेक शतकें प्रत्येक हिंदु कुटुंबाच्या त्या जणूं रक्षकदेवता बनल्या आहेत. संपूर्ण शरणागति, दुबळें व आंधळें प्रेम हे गुण बुद्धिनिष्ठता, स्वातंत्र्य, प्रेम, कर्तृत्व वगैरे गुणांशीं तुलनेंत कितपत टिकतील हा जरी वादाचा मुद्दा असला, तरी ज्या नैतिक मूल्यांची जोपासना शेंकडों वर्षे या थोर स्त्रियांनीं केली, तिची कदर करणें व कृतज्ञता व्यक्त करणें हें प्रत्येक भारतीयाचें आद्य कर्तव्य आहे.

---

# प्रकरण २ रें

## सामाजिक जीवनांत भारतीय स्त्रीचें स्थान

### १. वैदिक काल (पूर्वार्ध)

आधुनिक काळांत कोणत्याहि समाजाचा दर्जा त्या समाजांतील शिक्षण, आर्थिक परिस्थिति व राजकीय हक्क यांवर अवलंबून असतो. प्राचीन भारतांत समाजाच्या दर्जाचें मूल्यमापन धार्मिक अधिकारावरून केलें जाई. या दृष्टीनें वैदिक कालावधींत धार्मिक क्षेत्रांत भारतीय महिलेचें स्थान कसें होतें याचें निरीक्षण केल्यास सामाजिक जीवनांतील तिच्या भूमिकेचा आपोआपच उलगडा होईल.

खि. पू. ५०० पर्यंत म्हणजेच उपनिषत्कालाच्या अखेरीपर्यंत धर्माचरणाबाबत स्त्रिया व पुरुष यांच्यांत भेद केला जात नसे. पण खि. पू. ५०० ते खि. श. ६०० पर्यंतच्या काळांत एकदमच स्त्रिया धर्माचरणास व वेदाध्ययनास अपात्र ठरविल्या गेल्या. वैदिक काळांत स्त्रिया वेदाध्ययन करीत, इतकेंच नव्हे तर वेदांतील कांहीं ऋचाहि स्त्रियांनीं रचल्या आहेत असें मानण्यास भरपूर पुरावा मिळतो. स्त्रियांनीं आरंभिलेल्या यज्ञांत पुरुषांनी पौरोहित्य करणें कमीपणाचें आहे असें मनूनें म्हटलें आहे. वेदकाळांत स्त्रिया स्वतंत्रपणें यज्ञविधि पार पाडीत. उपनिषत्कालानंतर जेव्हां संन्यासधर्माचें महत्त्व वाढलें तेव्हां स्त्रिया ह्या धर्माचरणांत व्यत्यय आणणाऱ्या आहेत ही कल्पना प्रसृत होऊं लागली. उलट वेदकालांत अविवाहित पुरुष यज्ञकर्मास अपात्र मानला जाई. यावरून असें स्पष्ट दिसून येईल कीं, वेदकालांत धर्माचरणाबाबत स्त्रियांवर कोणत्याहि प्रकारचा अपात्रतेचा शिक्का मारला गेला नव्हता. ऋतुकाळ वगळून इतर वेळीं स्त्रिया सर्व धर्मकार्यांत पतीच्या बरोबरीनें भाग घेत.

वैदिक काळांत मुलाप्रमाणेंच सुमारें आठव्या वर्षीं मुलीचें विधियुक्त उपनयन करण्यांत येई. उपनयन व वेदाध्ययन ह्या दोन्ही गोष्टी विवाहाच्या

वेळीं वधूचे आवश्यक गुण म्हणून मानल्या जात. वैदिक धर्मांत यज्ञविधीस पत्नीची आवश्यकता असे. पण प्रत्येक मुलीनें विवाह केलाच पाहिजे अशी सक्ती नसे. अविवाहित मुली सोमरस प्राशन करून इन्द्राला आहुति देत, असे उल्लेख जुन्या वाङ्मयांत सांपडतात.

वेदकालीन समाज सामान्यतः प्रवृत्तिपर होता. पत्नीखेरीज धर्माचरणहि होऊं शकत नसे. शतपथ ब्राह्मणांत असें म्हटलें आहे कीं, स्वर्गांत जातांना पति पत्नीस आपल्यामागें येण्याची सूचना करतो (५.२.१.८). यज्ञपरिसरांत पत्नीसाठीं स्वतंत्र कुटि उभारली जाई. साम ऋचा म्हणण्याची कामगिरी तिच्यावरच सोंपविली जाई. यज्ञकुंडाची रचना करतांना पायाचा पहिला दगड बसविणें, अग्निकुंडाची रचना करणें आणि आहुति देणें हीं कामें पत्नीकडेच असत. पति परगांवीं गेल्यास उभयतांनीं करावयाचीं यज्ञकर्में एकटी पत्नी करी. हंगामाच्या वेळीं करावयाचे सीतायज्ञ व रुद्रयज्ञ हे फक्त स्त्रियाच करीत.

पतीच्या बरोबरीनें अध्ययन केलेल्या व धर्माचरण करणाऱ्या पत्नीस कुटुंबांत जवळजवळ पतीच्या बरोबरीचें स्थान असे. समाजांतहि तिचा दर्जा समाधानकारक होता. आश्चर्याची गोष्ट म्हणजे औद्योगिक क्षेत्रांतहि स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीनें काम करीत. धनुष्यबाण तयार करणें, टोपल्या बनविणें, कापड विणणें व शेतीचीं कामें करण्यांत स्त्रियांचा विशेष भाग असे. ललित कलांपैकीं संगीत व चित्र या दोन कलांत स्त्रियांनीं उल्लेखनीय प्रगति केली होती. घराबाहेरील व्यवसायांत स्त्रिया मोकळेपणीं वावरत असल्यानें पडदापद्धति त्या काळांत समाजाला ज्ञातच नव्हती.

राज्यकर्त्या अगर प्रशासक स्त्रिया मात्र वैदिक काळांत आढळत नाहींत. भारतीय समाजांत त्या काळीं पितृप्रधान कुटुंबपद्धति रूढ होती. राजकीय परिस्थिति अस्थिर असल्यानें वारंवार युद्धें होत. मनगटाच्या बळावरच सर्व राजकारण अवलंबून असल्यानें नाजूक प्रकृतीच्या स्त्रियांचें हें काम नव्हे असें मानलें जाई.

कायद्याच्या दृष्टीनें घरांतील सर्व वस्तूंवर पति व पत्नी यांचा सारखाच अधिकार चाले. पितृकुलपद्धतीनुसार पतीला पत्नीपेक्षां अधिक मालकी हक्क

मिळे. स्त्रिया व्यवसाय करून स्वतंत्र रीतीनें जें अर्थोत्पादन करीत त्यावर बहुतांशीं त्यांचाच अधिकार चाले. स्त्रीधन या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या वस्तु म्हणजे भांडींकुंडीं, दागदागिने व इतर वस्तु पूर्णपणें स्त्रीच्याच मालकीच्या मानल्या जात. पतिनिधनानंतर त्याच्या संपत्तीचा वारसा मात्र पत्नीकडे जात नसे. एकत्रकुटुंबपद्धति असल्यानें संपत्तीहि बहुतांशीं एकत्रच असे. त्या काळच्या इतर समाजांप्रमाणें भारतीय समाजांतहि नियोग-पद्धति रूढ होती. विधवांना पुनर्विवाह करण्याची मोकळीक असे व त्यामुळें संपत्तींत स्वतंत्र हिस्सा मागणारी निपुत्रिक विधवा क्वचितच आढळे. मुलाप्रमाणें मुलीला संपत्तीचा हिस्सा मिळे व अविवाहित मुलगी बापाच्या संपत्तीची वारस मानली जाई. जिला भाऊ नाहीं अशी मुलगी लग्नासाठीं मुलगा सहसा पसंत करीत नसे. कारण तिला झालेला पहिला मुलगा आज्याकडे जाऊन संपत्तीचा वारस ठरे. विवाहित मुलींना मात्र बापाच्या इस्टेटींतील भाग मिळत नसे. मुलीनें अशी मागणी केल्यास भावानें तिला स्पष्ट नकार द्यावा अशीहि शास्त्राज्ञा आहे. विवाहित मुलीला भाऊ अगर इतर कोणीच जवळचे नातेवाईक नसल्यास बापाच्या मृत्यूनंतर त्याची संपत्ति मुलीस मिळे; अर्थात् अशीं उदाहरणें क्वचितच असत.

वरील वर्णनावरून वाचकांच्या लक्षांत येईल कीं, वैदिक कालांत स्त्रियांचा दर्जा खूपच समाधानकारक होता. त्यांना शूद्रांप्रमाणें वागविण्याची कल्पनाहि त्या काळीं कोणाच्या मनाला शिवली नाहीं. कारण उपनयन व वेदाध्ययन यांबाबत पुरुष व स्त्री असा भेद केला जात नसे. वैदिक कालांत आर्यांचें लक्ष मुख्यत्वेंकरून मुलूख वाढविण्याकडे व राजकीय स्थैर्य निर्माण करण्याकडे होतें. अप्रत्यक्ष रीतीनें स्त्रिया त्यांना मदत करीत. गुलामांकडून विनामूल्य काम करून घेण्याची पद्धति या काळांत नव्हती व अनार्य स्त्रियांशीं लग्नें करून त्यांचा शेतीच्या अगर घरच्या कामासाठीं उपयोग करण्याची कल्पनाहि आर्यांना आलेली नव्हती. आर्य स्त्रिया भारभूत न होतां उलट अर्थार्जनापासून तों गृहकृत्यांपर्यंत सर्व क्षेत्रांत पतीला साहाय्य करीत व अनेक दृष्टींनीं पत्नीचें सहकार्य पतीच्या भरभराटीस फार उपयुक्त ठरे. क्वचित् एखाद्या काव्यांत अगर कथेंत स्त्रीच्या अस्थिर वृत्तीवर टीका आढळली तरी समाजांतील जबाबदार लोकमत स्त्रियांना अनुकूल व उदार असे.

सामाजिक जीवनांत शांततेच्या काळीं पतीस सुखी व संपन्न होण्यास मदत करणें व युद्धकालांत जय मिळविण्यासाठीं पतीच्या पाठीशीं उभें राहणें हें स्त्रियांचें ध्येय असे. मुलूखगिरीसाठीं मनुष्यबळाची गरज भासे. यासाठीं दहा ते बारा मुलांची माता होऊन त्यांना वाढविण्याची कष्टदायक कामगिरी स्त्रिया आनंदानें पत्करीत. सर्व गृहकृत्यें सांभाळून उरलेल्या वेळांत शेतीचीं कामें, कापड विणणें, शस्त्रें बनविणें वगैरे गोष्टी स्त्रिया करीत. इतके कष्ट करूनहि अध्ययनांत पुरुषांशीं चढाओढ करण्याची त्यांना उमेद असे. वाचन व लेखन हे बुद्धिमान् स्त्रियांचे आवडते व्यवसाय असत. वैदिक वाङ्मयाच्या अभ्यासानें व धर्माचरणानें जीवन्मुक्ति प्राप्त व्हावी अशी तीव्र इच्छा प्रत्येक आर्य स्त्री करी.

२. ब्राह्मण-उपनिषद् काल (ख्रि. पू. १००० ते ख्रि. पू. ५००)

ब्राह्मण व उपनिषद् ग्रंथांच्या कालांत उत्तर हिंदुस्थानभर आर्यांचें प्रभुत्व प्रस्थापित झालें होतें व या भागांत त्यांना एकहि प्रतिस्पर्धी उरला नव्हता. तद्देशीय जित जमाती आर्यांच्या सेवेसाठीं उपलब्ध होऊं लागल्या होत्या म्हणूनच कदाचित् स्त्रियांनीं युद्धोपयोगी साहित्य तयार करण्याची गरज आर्यांना भासेनाशी झाली असावी. शेतीच्या कामासाठींहि जित समाजांतील लोकांचा भरपूर उपयोग होऊं लागल्यानें स्त्रिया याहि क्षेत्रांतून हळूहळू दूर होऊं लागल्या. राहतां राहिला वस्त्र विणण्याचा व्यवसाय ! त्याचें स्वरूप आजच्या घरगुती छोट्या धंद्यांप्रमाणेंच होतें. स्त्रियांना हा एकच व्यवसाय उरल्यानें अर्थार्जनाच्या दृष्टीनें त्यांची योग्यता कमी झाली.

धर्माचरणाबाबत मात्र वैदिक कालापेक्षां नवीन कांहीं फरक अजूनहि घडून आलेला नव्हता. पूर्वीप्रमाणें मुलींचें उपनयन व वेदाध्ययन चालूच होतें. रामाच्या राज्याभिषेकप्रसंगीं त्याला अशुभाची बाधा न व्हावी म्हणून कौसल्येनें अनेक यज्ञ केले. सुग्रीवाबरोबरच्या द्वंद्वयुद्धांत वालीला जय मिळावा म्हणून त्याची पत्नी तारा हिनेंहि यज्ञ केल्याचा उल्लेख रामायणांत सांपडतो. सीता दररोज सायंकाळीं वेदप्रणीत प्रार्थना करीत असे असें रामायणांत दिलें आहे.

वैदिक कालाच्या पूर्वार्धांत पिताच मुलांचा शिक्षक असे. पुढें पुढें व्यवसायी शिक्षकवर्ग निर्माण झाला. स्त्रियांनाहि शिक्षकिणीचा पेशा पत्करतां

येई. शिक्षक स्त्रियांना 'आचार्या' अशी संज्ञा देत. मुली बहुधा वडील, भाऊ अगर चुलता यांकडे शिकत. कांहीं बाहेरच्या शिक्षकाकडे जात व क्वचित् छात्री-शाळांत राहून मुली शिक्षण घेत. विदुषी स्त्रियांचा एक वर्ग या कालांतहि आढळतो.

वेदाध्ययनास उतरती कळा लागली होती तरी मीमांसा-वाङ्मयाचा अभ्यास करणाऱ्यांत स्त्रियाहि असत. काशकृष्ण ऋषींच्या शिष्या 'काशकृष्णा' या नांवानें ओळखल्या जात. तत्त्वज्ञानाचा अभ्यास अधिक लोकप्रिय होत होता. सुलभा, गार्गी व मैत्रेयी या स्त्रिया थोर तत्त्ववेत्त्या म्हणून प्रसिद्धीस आल्या. संसारांत न पटतां संन्यासिनींचें जीवन जगणाऱ्या अलौकिक स्त्रिया बौद्ध कालापूर्वींहि भारतांत आढळत. जाहीर रीतीनें होणाऱ्या तत्त्वचर्चेत स्त्रिया भाग घेत. याज्ञवल्क्यास अशा एका चर्चेत गार्गीनें विचारलेले प्रश्न स्त्रियांच्या प्रखर तत्त्वचिंतनाचे निदर्शक म्हणून सांगतां येतील. हळूहळू संन्यासमार्गाचा अधिक प्रसार समाजांत होऊं लागला व विवाह ही तत्त्व-चिंतनाच्या वाटेंतील एक अडचण आहे असें मानलें जाऊं लागलें.

राज्यकर्त्या स्त्रीची कल्पना मात्र आर्य समाजाला कधींच स्वागतार्ह वाटली नाहीं. राजघराण्यांत जन्माला आलेल्या गांधारी, द्रौपदी, कुंती वगैरे स्त्रियांच्या विचारांची छाप त्यांच्या पतींवर व पुत्रांवर बरीच पडे; पण महा-काव्यांच्या व पुराणांच्या कालांत एकाहि स्त्रीनें राज्य केल्याचा उल्लेख नाहीं. कुरुक्षेत्रावरील घोर संग्रामानंतर भीष्मानें युधिष्ठिरास अशी सूचना केली कीं, ज्या राजांनीं रणांगणावर देह ठेवले त्यांना मुलगे नसल्यास मुलींना सिंहासना-वर बसवावें. परंतु एखाद्या मुलीनें खरोखर राज्य केल्याचा पुरावा देतां येणार नाहीं. जात्या नाजूक व मनानें कमकुवत असल्यामुळें स्त्रिया प्रशासक होऊं शकणार नाहींत अशी त्या वेळीं लोकांची कल्पना असे.

वारसाहक्काच्या कल्पनाहि या कालांत पूर्वींप्रमाणेंच राहिल्या. विधवेस पतीच्या संपत्तीचा वारसा मिळत नसे व मुलगा असल्यास मुलीला बापाच्या संपत्तीचा हिस्सा मागतां येत नसे. खि. पू. सातव्या शतकांत लिहिलेल्या निरुक्तांत असें म्हटलें आहे कीं, वडिलार्जित संपत्तींत मुलगे व मुली यांना समान वांटणी मिळावी. पण हें मत निरुक्तांत मागाहून घुसडलेलें आहे असें निश्चितपणें सिद्ध करता येईल.

स्त्रियांची पडदापद्धति या कालांतहि अस्तित्वांत आलेली नव्हती. वैदिक वाङ्मयासंबंधींच्या कांहीं नवीन कल्पना या काळांत पुढें येऊं लागल्या व त्यांचा परिणाम नकळत स्त्रियांवरहि झाला. सुरवातीच्या कालांत वेद हे अपौरुषेय आहेत, ते ईश्वराचे शब्द आहेत, मानवी लेखकांकडून वेद लिहिले गेले नाहींत, अशा कल्पना वेदांबद्दल नव्हत्या. पण ब्राह्मण व उपनिषत् ग्रंथांच्या कालांत मात्र ह्या कल्पना प्रसृत होऊं लागल्या. तत्पूर्वी लोक वेदाध्ययन करीत. शब्दार्थांचा कीस न काढतां भावार्थ जाणून घेत. पण आतां वेदांतील प्रत्येक शब्दाच्या मागें एक गूढ शक्ति आहे, नव्हे वेदांतील प्रत्येक शब्द प्रत्यक्ष परमेश्वराच्या तोंडून आलेला आहे व म्हणून वेदमंत्रांचें पठन अत्यंत काळजीपूर्वक व्हावयास पाहिजे ही कल्पना दृढ होऊं लागली. शब्दोच्चारांचें शास्त्र तयार झालें व अशा कठीण पद्धतीनें वेदांचें अध्ययन करणें ही गोष्ट दिवसेंदिवस अवघड होऊं लागली. उपनयनापासून पद्धतशीर वेदपठन करण्यास कमींत कमी बारा वर्षांचा अवधि लागे. मुलींची विवाहाची वयोमर्यादा फार फार तर सोळा वर्षांपर्यंत नेतां येई. पण येवढा काल वेदाध्ययन पूर्ण होण्यास अपुरा पडे. अर्थात् मुलींना वेदवाङ्मयाचा थोडाच भाग शिकतां येई व वेदाध्ययन पूर्ण केलेले पुरुष ज्या प्रमाणांत आढळत त्या प्रमाणांत स्त्रिया आढळत नसत.

आर्यांच्या जीवनास उपनिषत् कालांत बरेंच स्थैर्य लाभल्यानें त्यांची सुखासीनता वाढली. मुलांमुलींचीं लग्नें लवकर करण्याच्या कल्पना आर्यसमाजांत निर्माण होऊं लागल्या. खि. पू. ५०० च्या सुमारास कायद्यां-वर जे ग्रंथ झाले त्यांत कौमार्यावस्थेच्या सुरवातीसच मुलीचा विवाह व्हावा अशी शिफारस करण्यांत आली. त्यामुळें १३ ते १४ हें मुलींचें विवाहयोग्य वय मानलें जाऊं लागलें व तिच्या अध्ययनाचा काल आणखी कमी झाला.

वैदिक कालाच्या पूर्वार्धांत आर्य-अनार्य विवाह झाल्याचे उल्लेख नाहींत. पण या कालांत महाभारतांत भीम, अर्जुन वगैरेंनीं हिडिंबा, उलूपी वगैरे अनार्य स्त्रियांशीं लग्नें केल्याचा वृत्तान्त आला आहे. आर्यकुटुंबांत अनार्य स्त्रियांचा पत्नीच्या नात्यानें प्रवेश झाल्यामुळें, आर्य स्त्रियांचा दर्जा आपोआपच कसा खालावत गेला, याची हकीकत पुढील भागांत येणारच आहे.

## ३ (अ). स्मृति व पुराण काल ( ख्रि. पू. ५०० ते ख्रि. श. ६०० )

वरील विभागांत सूचित केलेल्या विचारप्रवाहांचे सामाजिक परिणाम स्मृति व पुराण कालांत स्पष्टपणें दिसूं लागले. ख्रि. पू. ५०० च्या सुमारास १४ते१५ वर्षें हें मुलींचें विवाहयोग्य वय मानलें जाई. तें खाली उतरत उतरत ख्रि. पू. २०० च्या सुमारास १२ ते १३ वर्षांवर येऊन टेपलें. आर्थिक व राजकीय स्वास्थ्य हें जरी मुलांमुलींचे लवकर विवाह होण्याचें एक कारण असलें, तरी आणखीहि कांहीं गोष्टी वैवाहिक कल्पनांत फरक घडवून आणण्यास जबाबदार आहेत. वेदाध्ययनाच्या वदललेल्या कल्पना व यज्ञविधींची गुंतागुंत ह्या गोष्टींनीं स्त्रियांच्या वेदाध्ययनांत अनेक अडथळे निर्माण केले. ब्राह्मण व उपनिषद् ग्रंथांची भर पडल्यानें वैदिक वाङ्मयाचा विस्तार खूप वाढला. अभ्यासक्रम वाढल्यानें मुलींना थोड्या अवधींत विशेष अध्ययन करणें अशक्य झालें. ख्रि. पू. ४०० च्या सुमारास वेदाध्ययन पूर्ण करणाऱ्या ब्राह्मण कन्यका बोटावर मोजण्याचीच वेळ आली व मुलींचें उपनयन हा एक नांवापुरता संस्कार उरला. मुलींचें उपनयन झालें नाहीं तर त्यांची शूद्रांत गणना होईल या कल्पनेनें कांहीं काळ समाजानें हा संस्कार चालू ठेविला. ख्रि. पू. ३०० च्या सुमारास मनूसारख्या स्मृतिकारांनीं असें सांगण्यास सुरवात केली कीं, मुलींचें उपनयन वैदिक मंत्ररहित केलें तरी चालेल. पण मंत्रांखेरीज उपनयन ही एक हास्यास्पद गोष्ट होई व यापेक्षां मुलींचें उपनयन न केलेलेंच काय वाईट अशी लोकांची भावना होऊं लागली. ख्रि. पू. २०० च्या सुमारास होऊन गेलेला याज्ञवल्क्य व इतर स्मृतिकार मुलींचें उपनयन करूं नये अशा मताचे होते. उपनयनाच्या वयाच्या वेळीं एक-दोन वर्षें मागेंपुढें मुलीचा विवाहच उरकून टाकलेला बरा अशी कल्पना या वेळीं पुढें आली. मनूच्या व याज्ञवल्क्याच्या मतें उपनयनाच्या वयांत मुलीचा विवाह केल्यास पतीच तिचा गुरु होईल व गृहव्यवस्था हेंच मुलीचें धर्माचरण असें मानतां येईल.

उपनयन-संस्कार रद्द होणें व अध्ययनास बंदी होणें या दोन्ही गोष्टींचा स्त्रियांच्या सामाजिक दर्जावर फार प्रतिकूल परिणाम झाला. अनार्य लोकांना उपनयनाची बंदी प्रथमपासूनच होती. आर्य स्त्रियांचें उपनयन बंद

झाल्यानें आपोआपच त्यांची योग्यता अनार्य अथवा शूद्र या सदरांत होऊं लागली. स्त्रियांना वेदाध्ययनाचा अधिकार नाहीं हें मत खि. पू. ३०० च्या सुमारास आर्य समाजांत प्रचलित होऊं लागलें. वैदिक कालाच्या उत्तरार्धापर्यंत वन्याच लहानमोठ्या गृह्ययज्ञांत पत्नी पतीबरोबरीनें भाग घेई व साममंत्रांचें पठनहि करी. पण या कालांत ऐतिशायन व त्याचे अनुयायी यांनीं स्त्रियांच्या या हक्कावरहि गदा आणली आणि स्त्रियांना कोणत्याच यज्ञांत भाग घेण्याची परवानगी असूं नये अशा मताचा पुरस्कार करण्यास सुरुवात केली. हा दृष्टिकोण फारच क्रान्तिकारक स्वरूपाचा असल्यानें, जैमिनी व त्याचे सहकारी स्त्रियांच्या कैवारार्थ सिद्ध झाले व वैदिक कालापासून चालत आलेली स्त्रियांनीं यज्ञविधींत भाग घेण्याची प्रथा मोडूं नये असें त्यांनीं ठासून सांगितलें. पण असें असलें तरी स्त्रीनें धर्माचरणाच्या वेळीं पतीबरोबर फक्त हजर रहावें. विद्वत्तेच्या बाबतींत ती पतीच्या पासंगालाहि पुरणार नाहीं अशी जैमिनीचीहि विचारसरणी होती. वैदिक विवाहविधींत पत्नी गृहाची स्वामिनी होवो अशा अर्थाचे मंत्र असत. तर स्मृतिकालांत गुरूला जसा शिष्य तशी पतीला पत्नी या अर्थाच्या मंत्रास महत्त्व आलें. उपनयन बंद झाल्यानें वैदिक वाङ्मयांतील प्रार्थना करण्यासहि स्त्रीस स्वातंत्र्य राहिलें नाहीं इतकी तिची केविलवाणी स्थिति झाली.

उपनयन व वेदाध्ययन बंद झालें तरी कांहीं सुशिक्षित कुटुंबांतून मुलींचें भाषा, ललितकला वगैरेंचें शिक्षण चालू होतें व अपवादात्मक स्त्रिया लेखिका अगर कवयित्री म्हणून पुढें येत होत्या. पण विसाव्या शतकाच्या प्रारंभीं ज्याप्रमाणें उच्चशिक्षित स्त्रिया नाममात्रच सांपडत, त्याचप्रमाणें या कालांत शिक्षित स्त्रियांचें प्रमाण फारच थोडें होतें. सर्वसामान्य स्त्रिया या दोन्हीहि कालखंडांत अतिशय अज्ञानी व असहाय बनल्या होत्या. वयाच्या १० ते १२ वर्षांतच मुलींचे विवाह होण्याची पद्धति सुरू झाल्यानें पतीची निवड करण्याची कामगिरी पूर्णपणें आईवडिलांवरच पडली. क्षत्रियांत मात्र या व पुढील कालांतहि स्वयंवरपद्धति चालू राहिली.

खि. पू. ३०० च्या सुमारास पत्नीची शैक्षणिक पात्रता पतीहून फारच कमी असे. मुलींना शिक्षण न मिळाल्यानें त्यांची बौद्धिक वाढ खुंटली व

मनोवृत्तीहि संकुचित बनली. स्त्रियांच्या मनांत निर्माण झालेल्या न्यूनगंडाची जबाबदारी सर्वस्वीं मनूच्या स्त्रीसंबंधींच्या अनुदार दृष्टिकोणावरच पडते. स्त्रीनें सदासर्वदा पुरुषाच्या आज्ञेंतच राहिलें पाहिजे, ती बौद्धिक स्वातंत्र्यास पात्र नाहीं हा सिद्धान्त प्रथम त्यानेंच पुरस्कारला. शास्त्राध्ययनानें बौद्धिक प्रगल्भता येते व स्त्रियांनीं शास्त्राध्ययन न केल्यानें त्या अप्रबुद्ध राहतात हें तर्कशास्त्र असहाय या नारद-स्मृतीच्या टीकाकाराच्या लेखनांतहि आढळतें. खि. श. ६०० च्या कालांत स्त्रिया व शूद्र यांच्यांत जवळजवळ कांहीं भेद उरला नाहीं.

बौद्ध व जैन तत्त्वज्ञानाच्या प्रसारामुळें संन्यासमार्गावर हिंदु समाजाची अधिकाधिक श्रद्धा बसत चालली. या कालांतील संतमहंतांची स्त्रीनिंदेबाबत जणूं अहमहमिका चालू होती. स्त्रियांचें अस्तित्वच पापमूलक आहे असें म्हणण्यापर्यंत पुरुषांची मजल गेली होती. योगवासिष्ठांत जगाचा त्याग करावयास निघालेल्या रामाच्या तोंडीं असे विचार घातले आहेत कीं, " सुखाची इच्छा स्त्रीसंगामुळेंच उत्पन्न होते. स्त्री ही सर्व दुःखाची जननी आहे. स्त्रीचा त्याग करा म्हणजे जगाचा त्याग सुलभ होईल व जगाचा त्याग केला कीं तुम्ही आपोआप मुक्त व्हाल. " दुसरा एक लेखक स्त्रीला नरकाची वाढाडी म्हणतो तर तिसरा तिला उत्पत्तीचें बीज मानतो. संन्यासमार्गाच्या पाश्चिमात्य पुरस्कर्त्यांनीहि स्त्रीला अशींच शेलकीं विशेषणें लाविलीं आहेत. सॉक्रेटिसाच्या मतें स्त्री ही सर्व अशुभाचें उगमस्थान आहे तर टरटयुल्लिन म्हणतो कीं ती नरकाचें महाद्वार आहे. तिसऱ्या एका धर्मगुरूच्या मतें देवाची प्रतिमा जो पुरुष, त्याचा स्त्री सर्वनाश करते. स्त्रीचें पावित्र्य भ्रष्ट करण्यास पुरुष जबाबदार असूनहि लेखिकांनीं थेरीगाथेंत पुरुषाविरुद्ध एक शब्दहि उच्चारला नाहीं, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

संन्यासमार्गी लोकांनीं स्त्रीची इतकी निंदा केली ती त्यांचें मत खरोखरच स्त्रियांबद्दल तितकें कलुषित झालेलें होतें म्हणून नव्हे, तर पुरुषांना विवाहापासून व गृहजीवनापासून त्यांना परावृत्त करावयाचें होतें म्हणून. वराहमिहिरानें ही गोष्ट स्पष्टपणें नमूद करून ठेवली आहे. कांहींहि असलें तरी निवृत्तिमार्गी पुरुषांनीं स्त्रियांवर घोर अन्याय केला असेंच म्हणणें भाग

आहे. कारण अशा विचारप्रणालीनें स्त्रियांचा सामाजिक दर्जा घसरण्यास मदत झाली.

घटस्फोट व विधवाविवाह बंद पडण्यासहि कांहीं अंशीं निवृत्तिपर विचारसरणी कारणीभूत होती. पतिनिधनाबद्दल दैवास दोष देऊन पत्नीनें पुन्हां संसारसुखाची इच्छा न करतां परलोकाचाच विचार करावा; पण हें तत्त्वज्ञान पुरुषांना शिकविलें गेलें नाहीं याचें उघड उघड दिसून येणारें कारण एकच कीं, सामाजिक नीतिशास्त्र शिकविणारे सर्व पुरुष होते.

वैदिक कालांतील धर्माचरणाच्या सर्वच कल्पना हळूहळू नष्ट होत होत्या व त्या जागीं स्मृति व पौराणिक धर्मकल्पना रूढ होऊं लागल्या होत्या. स्मार्त यज्ञकर्मांतून व पौराणिक व्रतवैकल्यांतून स्त्रिया वगळल्या गेल्या नाहींत हें स्त्रियांचें भाग्यच समजलें पाहिजे ! खरें पाहिल्यास या पुढील कालांत दृढमूल झालेला पौराणिक धर्म पुरुषांपेक्षां स्त्रियांनींच टिकविला असें म्हणणें अधिक सयुक्तिक होईल.

या कालांत आचारधर्म-प्रधान अशा पुढें आलेल्या बौद्ध धर्मानें स्त्रियांना भिक्षुणी होण्याची परवानगी देऊन परमार्थाचा मार्ग त्यांना मोकळा केला. बौद्ध भिक्षुणींनीं रचलेल्या ज्या कांहीं प्रार्थना आज उपलब्ध आहेत, त्यावरून पारमार्थिक क्षेत्रांतील या स्त्रियांचा अधिकार किती मोठा होता व त्यांची रचना किती प्रगल्भ होती याची खात्री पटते. पण येथेंहि स्त्री-पुरुष हा भेद खटकतोच ! भिक्षुणी स्त्रिया नवीन दीक्षा घेतलेल्या स्त्रियांच्या शिक्षिका होत. पण पुरुष भिक्षु मात्र त्यांच्या कक्षेंत येत नसत. मठांत भिक्षूपेक्षा भिक्षुणीला कमी मान दिला जाई. पश्चिम हिंदुस्थानांतील गुहांच्या खोदीव शिलालेखावरून खि. श. ३ पर्यंत त्या भागांत स्त्रियांनीं या धर्माच्या प्रसारार्थ केलेल्या कार्याची कल्पना येते.

हिंदूंच्या धार्मिक जीवनांत संन्यासिनी फारशा आढळत नाहींत. वानप्रस्थाश्रमांत पत्नीसह वनांत जाण्यास मनूचीहि संमति आहे. पण अशी उदाहरणें तुरळकच दिसतात. कलियुगांत स्त्रियांना संन्यास घेतांच येणार नाहीं अशी धर्माज्ञा रूढ झाली.

मुलीचा विवाह करण्याची सक्ती या काळांत आली. लग्नाचें वय सुमारें बारा वर्षे हें समाजानें मान्य केलें. मुलींना नांवापुरतेंसुद्धां शिक्षण मिळेनासें झालें. अर्थात् स्वतंत्रपणें व्यवसाय करणाऱ्या स्त्रिया दिसेनाशा झाल्या. मागें उल्लेखिल्याप्रमाणें बोटावर मोजण्याइतक्या लेखिका अगर कवयित्री वगळल्यास शिक्षिकेचा पेशा घेतलेली स्त्रीहि या काळांत दिसत नाहीं. नृत्य अगर संगीतपटु स्त्रियांना आपल्या कलेचा उपयोग स्वतःपुरता किंवा फारतर कुटुंबांतील मंडळीकरितां करतां येई. फक्त गणिकांना आपल्या नृत्य व संगीत कलांचा व्यवसायासाठीं उपयोग करतां येई. त्या वेळच्या वाङ्मयांतील उल्लेखावरून हा वर्ग समाजांत मान्यताहि पावलेला दिसतो. कोणत्याहि अडचणींत स्त्रिया फक्त कापड विणण्याचा उद्योग करूं शकत. राजकारणांतून स्त्रिया दूरच होत्या. नायनिका व प्रभावती गुप्ता यांच्यासारख्या धुरंधर राण्या राज्य करतांना दिसत. पण राज्यांतील एखादी जबाबदारीची जागा स्त्रीला देण्याची प्रथा नव्हती. पडदापद्धति हळूहळू डोकें वर काढूं लागली होती. पण अजून ती राजघराण्यांतच रेंगाळत होती.

एकूण गृहजीवनांत स्त्रीची परिस्थिति असमाधानकारक होत चालली होती तरी कायद्याच्या दृष्टीनें स्त्रीची बाजू अधिक भक्कम बनत होती. मुलगा नसल्यास मुलीला बापाची सर्व संपत्ति मिळण्याची व मुलीच्या लग्नासाठीं संपत्तीचा हिस्सा राखून ठेवण्याची पद्धति यापूर्वींच समाजानें मान्य केलेली होती. या काळांतील एक प्रमुख सुधारणा म्हणजे जर पति एकत्र कुटुंबापासून विभक्त झाल्यानंतर निधन पावला, तर त्याची विधवा पत्नी त्याच्या सर्व संपत्तीची वारस ठरे. मुलाला किंवा नातवाला मूल नसल्यास त्यांच्या संपत्तीचा वारसा आई व आजीकडे जाई. खि. पू. ४०० ते २०० च्या सुमारास होऊन गेलेल्या स्मृतिकारांना पतीच्या संपत्तीची पत्नी वारस व्हावी ही कल्पना मान्य नव्हती. मनु तर म्हणे कीं निपुत्रिकाची इस्टेट त्याच्या गुरूला, शिष्याला किंवा सपिंडास द्यावी पण पत्नीला देऊं नये. खि. श. १०० पर्यंत नियोगपद्धति जवळजवळ बंद झाली होती व विधवेच्या पोटापाण्याची व्यवस्था पतीमार्गे नीट झाली पाहिजे ही जाणीव उत्पन्न होऊं लागली. कौटिल्यानें असें मत दिलें आहे कीं, निपुत्रिकाची संपत्ति कायद्यानें कोणालाहि देण्यांत आली तरी त्याच्या पत्नीच्या निर्वाहाची सर्व जबाबदारी वारसावर

असावी. हीहि व्यवस्था फारशी समाधानकारक ठरली नाहीं. खि. पू. १०० च्या सुमारास लिहिलेल्या विष्णुस्मृतींत असें प्रथमच म्हटलें आहे कीं, पति मेल्यानंतर मुलगा नसल्यास त्याच्या सर्व धनावर फक्त पत्नीचाच अधिकार असावा. कांहीं शतकांनंतर याज्ञवल्क्यानें असेंच मत पुन्हां एकदा ठासून मांडलें. पुढें ब्रिटिशांनीं विधवेचा पतीच्या धनावरील हक्क मान्य करतांना याज्ञवल्क्याचेंच मत प्रमाण मानलें आहे. स्त्रियांच्या हक्कासंबंधींचा याज्ञवल्क्याचा एकूण दृष्टिकोणच उदार आहे. उपनिषत् कालांतील याज्ञवल्क्यानें वनांत जाण्यापूर्वीं आपली सर्व दौलत आपल्या दोन स्त्रियांत समान विभागून दिली ही गोष्ट सर्वश्रुतच आहे. विष्णु व याज्ञवल्क्य या दोन स्मृतिकारांचे विचार अर्थातच लोभी समाजवृत्तीला फारसे रुचले नाहींत व म्हणून पत्नीला पतीच्या संपत्तीचा वारसाहक्क देण्याबाबत खि. श. १००० पर्यंत झगडे चालूंच होते. विशेषत: नारदानें पत्नीच्या ह्या हक्काला तीव्र विरोध दर्शविला. विधवेस कोणत्याहि परिस्थितींत फक्त अन्नवस्त्र मागण्याचा अधिकार आहे असें त्याचें मत होतें.

कालांतरानें असें एक मत पुढें आलें कीं, विधवा पत्नीला स्त्रीधन व त्याबरोबर सुमारें दोन ते तीन हजारांचा ऐवज फारतर मिळावा. कांहींच्या मतें तिला फक्त घरांतील वस्तु मिळाव्यात पण स्थावरापैकीं काहीं मिळूं नये. तिसरें एक मत असेंहि पुढें आलें कीं, पतीस आईवडील अगर भाऊ नसल्यासच पत्नीला संपत्तीची वारस ठरवावी. विसाव्या शतकाच्या आरंभापर्यंत हें वादंग असेंच चालू होतें. याचें निदर्शक म्हणजे कांहीं जमातींत विधवेस वारसाहक्क आहे व कांहींत नाहीं.

स्त्रीधनाची कल्पना याच काळांत निश्चित करण्यांत आली. मनु व याज्ञवल्क्य यांच्या मतें स्त्रीधनांत स्त्रीला लग्नापूर्वीं व नंतर मिळालेल्या वस्तूंचा समावेश होतो. पण नंतरच्या शास्त्रकारांना ही मर्यादा फार संकुचित वाटली. खि. श. ६०० त होऊन गेलेल्या देवल स्मृतिकाराच्या मतें स्त्रीधनांत दागदागिने, अन्नवस्त्र व इतर प्रासंगिक लाभांचाहि समावेश करण्यांत यावा. पण या सर्वांचा त्या फक्त उपभोग घेऊं शकतील. त्यांची पाहिजे तशी विल्हेवाट लावण्याचा त्यांना अधिकार नाहीं. स्त्रियांनीं व्यवसाय करून

मिळविलेलें धन व त्यांना देणगी म्हणून मिळालेलें धन यांचा कांहीं स्मृतिकार स्त्रीधनांत समावेश करीत नाहींत. कारण ज्या समाजांत पुरुषांबरोबर स्त्रियाहि दरमहा अर्थोत्पादन करीत त्यांनीं सर्व पैसा जर स्वत:साठीं ठेवला असता तर कुटुंबाचा चरितार्थ चालण्याचीहि पंचाईत पडली असती. बक्षीस अगर देणगी याद्वारा मिळणारा पैसाहि सर्व कुटुंबीयांच्या उपयोगी पडावा या हेतूनें त्याचा स्त्रीधनांत समावेश केला गेला नाहीं.

### ३ (ब). ख्रि. श. ६०० ते ख्रि. श. १८००

कायद्यांतील स्थान वगळून इतर सर्व क्षेत्रांत स्त्रियांचा दर्जा जास्त-जास्तच खालावत चालला होता. खि. श. २०० पर्यंत मुलींच्या मौंजी-बंधनाची प्रथा कशीबशी जीव धरून होती. पुढें ती पूर्णपणें बंद होऊन ब्राह्मणांसकट सर्व जातींच्या स्त्रियांची बरोबरी धर्माचरणाबाबत शूद्रांशीं करण्यांत येऊं लागली. वेदाध्ययन व यज्ञयाग करण्याची बंदी झाली म्हणून प्रत्यक्ष व्यवहारांत स्त्रीवर कांहीं अन्याय होई असें नाहीं. हळूहळू पुरुषांनींहि फक्त वेदाध्ययन करण्याचें सोडून काव्यांचा व धर्मशास्त्रांचा अधिक अभ्यास करण्यास सुरुवात केली. यज्ञयाग पुरुषसुद्धां क्वचितच करीत. स्त्रियांचें सामाजिक स्थान घसरण्यास मुख्यत: उपनयनाची बंदी हीच कारणीभूत होती.

या काळांत पौराणिक व्रतवैकल्यांचें खूप प्राबल्य माजलें. समाधानाची गोष्ट अशी कीं, हीं व्रतें स्त्रिया करूं शकत. किंबहुना पौराणिक धर्म हा पुरुषांपेक्षां स्त्रियांनींच अधिक प्रमाणांत टिकविला. खि. श. १००० च्या सुमारास पुराण व स्मृति यांतील विदग्ध संस्कृत सर्वसामान्य लोकांना समजत नसे. स्थानिक बोलीभाषांचा विकास होत होता, व खि. श. १५०० च्या सुमारास महाकाव्यें व पुराणें यांची या भाषांत केलेलीं रूपांतरेंच खेडोपाडीं देवळांत पुराणिकांकडून वाचलीं जात. हीं प्रवचनें ऐकण्यास पुरुषांपेक्षां स्त्रियांची अधिक गर्दी जमे. अशा रीतीनें सनातन्यांनीं वैदिक धर्माचरणास अपात्र ठरविलेल्या स्त्रियाच पौराणिक धर्माचें जतन करीत होत्या.

या काळांतील अद्वैत, विशिष्टाद्वैत, द्वैत वगैरे प्रमुख तत्त्वप्रणालि स्त्रियांना अशिक्षितपणामुळें अनाकलनीय होत्या. पण पंधराव्या शतकानंतर भक्तिमार्गाचा प्रसार सुरू झाला व अनेक स्त्रिया या मार्गानें आत्मोद्धार

करण्याच्या उद्योगास लागल्या. बौद्धिक विकास अनेक शतकें खुंटल्यानें स्त्रियांत उपजतच एक प्रकारचा भित्रेपणा व आत्मविश्वासाचा अभाव दिसे. अज्ञानी व सूचनात्मक प्रवृत्तीच्या स्त्रियांची भक्तिजीवनांतील अद्भुततेवर ताबडतोब श्रद्धा बसे. स्त्रियाच काय पण पंधराव्या शतकांतील पुरुषहि असेच दुर्बल बनले होते. भक्तिमार्गानें गेलेल्यांत राजपुतान्यांतील मीराबाई व महाराष्ट्रांतील जनाबाई भारताच्या इतिहासांत अजरामर झाल्या आहेत.

उच्च जातींतील विधवा स्त्रियांना पुनर्विवाहाची बंदी असे. अशा स्त्रिया कुटुंबाच्या सेवेंत संन्यासिनीचें जीवन जगत. त्यांच्या विरक्त जीवनाकडे पाहिलें म्हणजे त्या जणूं श्रद्धेच्या, भक्तीच्या व त्यागाच्या मूर्तिच भासत. स्त्रियांच्या श्रद्धाळू व पवित्र जीवनक्रमामुळेंच हिंदु समाजांत धर्म, नीति व आध्यात्मिक जीवन यांची पाळेंमुळें खोलवर रुजलीं. मुसलमानी अंमल भारतांत स्थिर झाल्यावर पूर्वीच्या अध्ययनाच्या कल्पना बदलल्या. ज्ञानाची तपश्चर्या मतस्य वृत्तीनें करावी लागते ही कल्पनाहि गेली. कांहीं श्रीमान् ब्राह्मण व राजपूत स्त्रिया थोडेंफार शिकत. एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीस शंभरांत एका स्त्रीलासुद्धां लिहितां वाचतां येत नसे. किंबहुना लिहितां वाचतां येणें ही एक अपकीर्तीचीच बाब समजली जाई; कारण वेश्याव्यवसाय करणाऱ्या स्त्रिया इतर शिक्षणाबाबतहि अधिक औत्सुक्य दाखवीत. हिंदु स्त्रिया अशिक्षित होत्या म्हणून त्या असंस्कृत होत्या असा जर कोणी निष्कर्ष काढला तर तो मात्र साफ चुकीचा ठरेल. शिक्षित पुरुषांपेक्षांहि नित्य कथा-पुराणें ऐकणाऱ्या स्त्रिया अधिक बहुश्रुत व सुसंस्कृत असत.

या कालांत संगीत व नृत्य या कलांनाहि वाईट दिवस आले. खि. श. ५०० ते १००० या कालांत सुखवस्तु कुटुंबांतील मुली या कलांचें शिक्षण घेत. पण पुढें पुढें देवदासी होणाऱ्या मुलींनीच फक्त नृत्य व संगीत शिकावें अशी कल्पना रूढ होऊं लागली. खालच्या वर्गांतील स्त्रियांना राजघराण्यांत अगर मोठमोठ्या सरदार-जहागिरदारांच्या घरीं विडे करण्याचें, वारा घालण्याचें, फुलें आणण्याचें व माळ्याचें अशा प्रकारचीं कामें मिळत. अर्थात् तरुण स्त्रियांवर अशा नोकऱ्या करतांना शीलभ्रष्टतेचें संकट अनेक वेळां ओढवे. कुलीन मध्यम वर्गांतील स्त्रियांना म्हणण्यासारखें कोणतेंच

शिक्षण मिळत नसे. लेखिका म्हणून पुढें आलेल्या विजयांका, शीलाभट्टारिका व देवी अशा तुरळक स्त्रिया वगळल्यास सर्वसामान्य स्त्रिया पूर्ण अज्ञानांतच होत्या. सतराव्या व अठराव्या शतकांत वैद्यक व्यवसाय करणाऱ्या कांहीं स्त्रिया आढळतात. स्त्रियांच्या रोगांवर स्वतंत्रपणें लिहिलेल्या एका ग्रंथाचें भाषांतर आठव्या शतकांत अरबींत झाल्याचा उल्लेख सांपडतो. त्यानंतर मात्र वैद्यांच्या कुटुंबांतील कांहीं विधवा स्त्रिया हा व्यवसाय करतांना दिसत.

राजघराण्यांतील मुलींना युद्ध व प्रशासन यांचें स्वतंत्र शिक्षण मिळे. चालुक्य घराण्यांतील विजया भट्टारिका व काश्मीरच्या राजघराण्यांतील सौगंध व दिद्दा या उत्तम योद्ध्या व राजकारणपटुहि होत्या. चालुक्य घराण्यांतील तिसऱ्या जयसिंहाची बहीण अक्कादेवी (खि. श. १०२५), सोमेश्वराची राणी मैलादेवी (खि. श. १०५०), सहाव्या विक्रमादित्याची पट्टराणी लक्ष्मीदेवी (खि. श. ११००) या प्रांतप्रमुख म्हणून कारभार पहात. उत्तरेकडच्या इतर राज्यांत मात्र स्त्रियांना प्रशासक नेमल्याचा कोठें उल्लेख नाहीं. राजपुतान्यांतील स्त्रिया शांततेच्या काळांत व आणीबाणीच्या काळांतहि पुरुषांबरोबर राज्यकारभाराचीं कामें करीत व युद्धांत भाग घेत. समरसीची पत्नी कूर्मादेवी हिनें तर पतीच्या मृत्यूनंतर स्वतः सैन्याचें नेतृत्व पत्करून इ. स. ११९५ त कुतुबुद्दिनाच्या स्वारीचा प्रतिकार केला. सुल्तान बहादुरशहाशीं लढा देत असतांना जेव्हां राणा संगाचे सैनिक निराशेनें रणांगणास पाठ दाखवून सैरावैरा धावूं लागले तेव्हां कर्णावतीच्या स्फूर्तिदायक तेजस्वी शब्दांनींच त्यांना धीर दिला व पुन्हां परत वळून ते प्राणपणानें लढले. राणा संगाची दुसरी पत्नी जवाहरबाई हिनें सैन्याचें नेतृत्व केलें व प्रत्यक्ष युद्धांत ती धारातीर्थी पडली. मराठ्यांच्या इतिहासांत कोल्हापूरची ताराबाई व इंदूरची अहिल्याबाई यांनीं कुशल राज्यकर्त्या म्हणून नांव मिळविलें. ज्या ज्या वेळीं स्त्रियांनीं राजकारणात भाग घेतला त्या त्या वेळीं त्यांनीं या क्षेत्रांत आपली चमक दाखविली हें इतिहासावरून स्पष्ट दिसून येतें. एका ॲंग्लो-इंडियन् अधिकाऱ्यानें जे. एस्. मिल्जवळ असे उद्गार काढले कीं, ज्या प्रांतांत शिस्त व समाधान नांदतांना दिसली, शेतीची भरभराट दिसली व कारभार काटकसरीचा पण चोख दिसला, त्यांत प्रत्येक चारांपैकीं तीन ठिकाणीं स्त्रिया प्रशासक होत्या असें आढळून आलें. ज्या काळांत स्त्रियांचा

सर्वसामान्य दर्जा हीन मानला जाई त्या कालांत स्त्रिया राजकारणासारख्या क्षेत्रांत आपल्या बुद्धीची चमक दाखवीत ही खरोखर आश्चर्याची गोष्ट होय. अर्थात् राजघराण्यांतील मुलींना तसें व्यवस्थित शिक्षण प्रथमपासूनच दिलें जाई. सर्वसामान्य स्त्रियांना कांहींच शिक्षण न मिळाल्यानें त्या कोणत्याच क्षेत्रांत पुढें येऊं शकत नसत.

या कालांत मुलींचीं लग्नें बहुधा आठव्या अगर नवव्या वर्षी होत. तत्पूर्वीहि गृहकृत्यांच्या माहितीपलीकडे इतर कसलेंच शिक्षण त्यांना मिळत नसे; त्यामुळें पतीच्या शिक्षणाच्या मानानें त्या अगदींच अशिक्षित वाटत. चाळीस ते पंचेचाळीस वर्षांच्या विधुरांलासुद्धां ११ ते १२ वर्षांच्या मुलीशींच पुनर्विवाह करावा लागे. याखेरीज अनेक पुरुषांचीं 'अंगवस्त्रें' असत तीं वेगळींच ! शिक्षणाचे संस्कार न घडल्यानें व सासूच्या अधिकारांत लहानपणापासून वागण्याची संवय झाल्यानें स्त्रिया असहाय, अडाणी व कूपमंडूक वृत्तीच्या होत. स्त्रीनें नेहमीं पुरुषाच्या संरक्षणांतच राहिलें पाहिजे ही समाजाची समजूत अधिकाधिक दृढ होत चालली होती.

इ. स. १२०० च्या सुमारास उत्तरेंत मुसल्मानी अम्मल स्थिर झाला होता व श्रीमंत हिंदु घराण्यांत पडदा-पद्धति रूढ झाली होती. सुमारें १०० वर्षांपूर्वी एखाद्या सासऱ्यास आपली सून कांहीं ओळखतां आली नसती. कारण तिचें तोंडच त्यानें कधीं पाहिलेलें नसायचें ! दक्षिणेंत मात्र फक्त राजघराणीं सोडून इतर स्त्रिया मोकळेपणीं हिंडत. इ. स. ७०० च्या पुढें मुसल्मानी धर्म स्वीकारण्याचा भारतीयांवर जुल्म होऊं लागला व या घटनेचा स्त्रियांवर गंभीर परिणाम घडून आला. स्मृतिकारांनीं ही गोष्ट विचारांत घेऊन असें सांगितलें कीं, जबरदस्तीनें धर्मांतराचा प्रसंग एखाद्या स्त्रीवर ओढवल्यास प्रायश्चित्त देऊन तिला पुन्हा नांदविण्यास हरकत नाहीं. देवल स्मृतींत याहिपुढें जाऊन असें म्हटलें आहे कीं, मुसल्मानी बलात्कारानें स्त्री गरोदर राहिली तरीहि तिला दोषी समजूं नये. प्रायश्चित्तानें शुद्ध होऊन ती पुन्हा हिंदु म्हणून जगूं शके. इ. स. १००० नंतर हा उदार दृष्टिकोण मागें पडला व एकदां मुसल्मान झालेल्या स्त्रीस पुन्हा आपल्या जातींत प्रवेश मिळेनासा झाला. मुसल्मान समाजहि बाटलेल्या हिंदु स्त्रियांस वेश्यांप्रमाणें वागवी.

या काळांत स्त्रीची कायदेशीर भूमिका बरीच समाधानकारक राहिली. भाऊ असल्यास सामान्यतः मुलीला बापाच्या संपत्तींत हिस्सा मिळत नसे. शुक्र या एकाच लेखकानें बापाच्या संपत्तींत मुलाइतकाच मुलीलाहि वांटा मिळावा असें म्हटलें आहे. इतर सर्व स्मृतिकारांनीं येवढें मात्र निश्चित सांगितलें आहे कीं, भावांनीं वडिलांच्या संपत्तीची वांटणी करतांना सर्व *बहिणींच्या लग्नांसाठीं प्रथम जरूर ती रक्कम बाजूला काढून ठेवली* पाहिजे. प्रत्येक मुलाच्या हिस्स्याच्या चवथ्या भागापेक्षां ही रक्कम कमी असतां कामा नये.

स्त्रीधनाबद्दलची कल्पनाहि या काळांत सुधारली. इ. स. ११०० च्या सुमारास विज्ञानेश्वरानें असें मत दिलें कीं, बक्षीस, वारसा, विभागणी अगर अन्य कोणत्याहि मार्गानें स्त्रीच्या वांटणीस आलेल्या सर्व धनाची जमा स्त्रीधनांतच करावी. मिताक्षराकारांचेंहि मत असेंच होतें. फक्त स्त्रीधनाची विल्हेवाट लावण्याचा अधिकार स्त्रीस नसावा असें सर्वांचेंच मत होतें. *बंगालमध्यें 'दायभाग' मान्य करणाऱ्यांना स्त्रीधनाची ही विशाल कल्पना* पटली नाहीं. पण देणगी व दागदागिने यांचा स्त्रीधनांत समावेश करून त्यांची मनाप्रमाणें विल्हेवाट करण्याची परवानगी मात्र 'दायभाग' मानणाऱ्यांनीं स्त्रियांना दिली.

इ. स. ६०० च्या सुमारास पतीच्या संपत्तीवर त्याच्या विधवेचा वारसा-हक्क मान्य करण्याबाबत स्मृतिकारांत किती तीव्र मतभेद होते हें आपण मागें पाहिलेंच आहे. हे वाद अनेक शतकें चालूच होते. इ. स. १०२५ च्या सुमारास भोज या शास्त्रकारानें असें मत दिलें कीं, विधवा स्त्री त्याच कुटुंबांत नियोगास तयार असल्यास तिला पतीच्या संपत्तींत हिस्सा मिळावा. पण नियोग-पद्धति या काळांत त्याज्य मानली गेल्यानें कोणतीहि विधवा स्त्री ही अट मान्य करण्यास तयार होण्याची शक्यता नव्हती. ही अशक्य अट स्त्रियांवर लादण्यांत विधवा स्त्रियांना पतीच्या संपत्तीपैकीं कांहींहि हिस्सा मिळूं नये असाच भोजाचा हेतु असावा. बृहस्पति, प्रजापति आणि कात्यायन यांसारखे पुरोगामी विचारसरणीचे स्मृतिकार मात्र मोठ्या हिरीरीनें विधवांच्या वारसाहक्कासाठीं झगडत होते. दुर्दैवानें या लेखकांचें मूळ लिखाण आज

उपलब्ध नाहीं. पण इतरांनीं यांच्या लिखाणांतील जे उतारे उद्धृत केले आहेत त्यांवरूनहि या लेखकांची विचारसरणी किती रेखीव व ठांशीव स्वरूपाची होती याची सहज कल्पना येते. उदाहरणार्थ, बृहस्पतीनें असें म्हटलें आहे कीं, कायद्याच्या क्षेत्रांत पति व पत्नी मिळून एक पूर्ण व्यक्तित्व मानलें जातें. मग पत्नी हयात असेपर्यंत पतीच्या संपत्तीचा वारसा इतरांकडे कसा जाऊं शकेल ? प्रजापतीनें विधवांची बाजू मांडतांना असा युक्तिवाद केला आहे कीं, पतीची सर्व स्थावर व जंगम संपत्ति नैसर्गिकरीत्याच पत्नीकडे जाते. पतीच्या नातेवाइकांस ती योग्य तो आदर दाखवील पण त्यांचा त्याच्या संपत्तीशीं काय संबंध ? जर एखाद्या नातेवाइकानें एखाद्या विधवा स्त्रीच्या मालकीच्या संपत्तीचें अपहरण करण्याचा प्रयत्न केला, तर त्यास चोर समजून राजानें कडक शासन करावें. बाराव्या शतकांत होऊन गेलेल्या जीमूतवाहन या बंगाली कायदेपंडितानें आणखीहि कांहीं मुद्दे मांडले आहेत. अर्धांगी या नात्यानें पतीच्या सर्वच वस्तूंची मालकी लग्न होतांक्षणींच पत्नीकडे येते. मग पति मरतांच तिचा मालकी हक्क नाहींसा कसा होतो ? जुन्या स्मृतिकारांनीं जेव्हां विधवेस पतीच्या संपत्तीवर हक्क नाहीं असें सांगितलें, त्या वेळीं त्यांच्या डोळ्यांसमोर रखेली म्हणून राहिलेल्या स्त्रिया कदाचित् असाव्यात.

इतक्या शास्त्रकारांनीं झगडूनहि विधवांना पतीच्या संपत्तीवर पूर्ण हक्क बाराव्या शतकापर्यंत प्राप्त झाला नाहीं. निपुत्रिकाची संपत्ति सरकारजमा होई, पण त्याच्या पत्नीची विचारपूस कोणी करीत नसे. गुजराथेंत कुमारपाल राजानें पतीच्या संपत्तीवरील पत्नीचा हक्क इ. स. ११५० मध्यें प्रथम मान्य केला. त्याच्यासंबंधीं लिहितांना त्याच्या राजकवीनें असें म्हटलें आहे कीं, जी सुधारणा रघु, नहुष किंवा नाभाग अशा थोर राजांनाहि करतां आली नाहीं ती कुमारपालानें केली. इ. स. १२०० नंतर पतीच्या संपत्तीची पूर्ण मालकी त्याच्या विधवा पत्नीस मिळूं लागली. दायभाग मान्य करणाऱ्या बंगाली शास्त्रकारांनींहि अविभक्त कुटुंबांत राहणाऱ्या विधवेचा पतीच्या संपत्तीवरील हक्क मान्य केला. मिताक्षराकारांच्या मतें जर मृत्यूपूर्वी पति एकत्र कुटुंबापासून विभक्त झाला असेल, तरच त्याच्या मृत्यूनंतर त्याची पत्नी संपत्तीची वारस ठरावी. दायभागाच्या कायद्यांत योग्य ती दुरुस्ती करून

पत्नीचा संपत्तीवरील हक्क सर्व भारतांत मान्य व्हावा अशी जी चळवळ सध्यां चालू आहे तिला लवकरच यश येईल अशी आशा करण्यास हरकत नाहीं.

इ. स. ५०० पासून स्त्रीचें घर हें एकमेव कार्यक्षेत्र कां बनलें याचीं कारणें आपण यापूर्वी पाहिलींच आहेत. हिंदुस्थानाप्रमाणेंच अनेक पौर्वात्य व पाश्चात्य देशांत गेल्या कांहीं शतकांत स्त्रियांना अशाच तऱ्हेची वागणूक मिळत होती असें म्हटल्याने भारतीय स्त्रियांवर झालेल्या अन्यायाचें परिमार्जन होणार नाहीं. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत पाश्चात्य स्त्रियांनाहि मुळींच शिक्षण मिळत नसे. पण भारतांत एके काळीं स्त्रीशिक्षणाचें महत्त्व लोकांना उमगलें होतें तरी-सुद्धां त्यांनीं नंतर या प्रश्नाबद्दल प्रतिगामी वृत्ति कां दाखवावी याचें समाधान-कारक उत्तर देतां येणार नाहीं. इतर कित्येक देशांत मुलींच्या बालविवाहांची प्रथा रूढ होती हें खरें असलें, तरी आम्ही विवाहाचें वय मागें आणून मुलींचें जें अपरिमित नुकसान केलें त्याबद्दलचा पश्चात्ताप कमी होत नाहीं. त्याच-प्रमाणें मुसल्मानांची पडदापद्धति मान्य करून आमच्या स्त्रियांना आम्ही अंधकारांत कां खितपत ठेवल्या याचें उत्तर आम्ही देऊं शकणार नाहीं.

वरील सर्व आरोप मान्य करूनहि एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, स्त्रीला शूद्राप्रमाणें मानणारे धर्मशास्त्रांत पारंगत असलेले कांहीं पंडित सोडल्यास सामान्य भारतीयांस स्त्री ही त्याग, अध्यात्म व पावित्र्य यांची मूर्तीच वाटत आली आहे. हिंदुधर्म व हिंदुसंस्कृति स्त्रियांनींच जगविली आहे. विधवेचें दर्शन कांहीं प्रसंगीं अशुभ मानलें गेलें असलें तरी या संन्यासिनींनीं आपल्या मुलां-पुढें व कुटुंबापुढें त्यागी जीवनाचे आदर्श उभे केले आहेत. भक्ति, त्याग, सेवा वगैरे जे जे हिंदु संस्कृतीचे विशेष आहेत ते सर्व वैधव्यदशेंतील हिंदु स्त्रींत साकार झाले आहेत. गेलीं दोन हजार वर्षें आम्हीं आमच्या स्त्रियांना अन्यायानें वागविलें आहे हें कोणीच नाकारूं शकणार नाहीं. या कालांतील स्त्रिया मात्र समाधानांत होत्या. लहानपणीं आईवडिलांचा प्रेमळ सहवास, मग पतीच्या छायेंतील सुरक्षित भक्तियुक्त जीवन आणि म्हातारपणीं मुलांची आदरयुक्त वागणूक यांतच त्यांच्या सुखी जीवनाचें सारसर्वस्व सांठविलेलें होतें. पण अनेक वेळां वैधव्यांतील दुःखानें, सतीच्या क्रूर सक्तीनें अगर पतीच्या अनैतिक वर्तनानें हें सुख तळापासून ढवळून निघे. वैवाहिक नीति फक्त स्त्रियांनींच पाळावी

असा समाजाचा अट्टाहास असे. स्त्रियांवर आपण सारखे कसलेतरी उपकार करींत आहों अशी भावना पुरुषवर्गांत दिसे. स्त्रियांना शिक्षण न दिल्यानें घराबाहेरील जीवनांत त्या क्वचितच डोकावत.

सर्व हिंदु समाज धार्मिक रीतिरिवाजांबाबत अगतिक बनला होता. वेदांचें अपौरुषेयत्व, संन्यास मार्गाची समाजमनावरील पकड व जातिसंस्थेची मगरमिठी यांतून मार्ग काढण्याची शक्यताच नाहीं असें सामान्य मनाला वाटे. विधवेचा पतीच्या संपत्तीवरील हक्क मान्य करण्याबाबत तेवढी समाजानें भरपूर कणखर वृत्ति दाखविली.

आधुनिक कालांत स्त्रियांवरील अन्याय दूर करण्याची तीव्र जाणीव समाजांत निर्माण झालेली आहे. स्त्रियांना शिक्षण मिळावें यासाठीं अनेक समाजसुधारक यत्न करीत आहेत. स्त्रिया घराबाहेर पडून अनेक सार्वजनिक कार्यांत भाग घेऊं लागल्या आहेत. स्मृतिकारांच्या मनाविरुद्ध जाऊन पुन्हा प्रौढ विवाहपद्धति समाजांत रुजत आहे. इ. स. १८५० च्या सुमारास विधवाविवाहास मान्यता देणारें बिल लोकसभेंत आलें. विवाह-विच्छेद मान्य करून बहुभार्याप्रतिबंधक कायदे काहीं प्रांतांत झाले आहेत व इतर प्रांतांहि त्यांच्या पावलावर पाऊल टाकतील अशीं शुभ चिन्हें दिसूं लागलीं आहेत. वारसा-हक्काबाबत स्त्रियांवर होत असलेले अन्याय दूर झाले आहेत. गृहजीवनांत व सामाजिक जीवनांत स्त्रीचें स्थान पुन्हा समाधान-कारक होत आहे व हा बदल घडवून आणण्यास पुरुषच अधिक उत्सुक आहेत ही अतिशय अभिमानाची गोष्ट आहे.

———

# प्रकरण ३ रें

## भारतांतील मातृपूजेच्या कल्पनेचा विकास

### १. मातृपूजेच्या कल्पनेचा उगम व स्थान

भारतीय वाङ्मय, कला, धर्म व तत्त्वज्ञान यांतून प्रतीत होणारी मातृपूजेची भावना जितकी महत्त्वाची तितकीच गुंतागुंतीची आहे. यासंबंधींच्या विविध कल्पनांची छाननी केल्यास असें दिसतें कीं, निरनिराळ्या कालखंडांत अनेक समजुतींची व तत्त्वांची कमीजास्त प्रमाणांत भेसळ होऊन त्यांतून मातृपूजेसंबंधींच्या दंतकथा, पूजाविधि व विचारसरणी निर्माण झाल्या. पुराणकालापासून आतांपर्यंत मातृपूजनाबद्दल निरनिराळ्या नवीन नवीन कल्पना निघाल्या आणि जुन्या पार्श्वभूमीवरच आजची मातृपूजेची भावना घडविली गेली. मातृपूजनाच्या पद्धतींत विविध प्रकार दिसून आले तरी साधकांचें या पूजेमागील हेतुविषयीं मात्र एकमत आहे.

मातृदेवतेची कल्पना सेमेटिक, हेलेनिक, ट्यूटॉनिक व नॉर्डिक वंशांच्या समाजांतहि फार पुरातन काळापासून अस्तित्वांत आलेली दिसते. भारताचें वैशिष्ट्य असें कीं, येथें मातृपूजन करणाऱ्या जुन्यांत जुन्या जमातीपासून तों आधुनिक कालांतील विचारप्रधान धर्मपंथांपर्यंत सुसूत्र इतिहास मिळूं शकतो. मातृपूजेच्या कल्पनेचा एकूण भारतीय मनोवृत्तीवर फार खोल ठसा उमटलेला आहे.

भोंवतालच्या सृष्टीबद्दल व शक्तींबद्दल मानवाच्या मनांत जी आदरयुक्त भीति निर्माण झाली, तिला किंवा आद्य मानवाच्या जीवनमूल्यांतून निर्माण झालेल्या प्रत्येक भावनेला मानवानें दिव्यत्व व आकार देण्याची वृत्ति आजपर्यंत सतत दाखविली आहे, असें सर्व मानववंशशास्त्रज्ञांचें मत आहे. या प्रवृत्तींतूनच सर्व धर्मकल्पनांचा उगम झालेला आहे असा सिद्धान्त आहे. जेव्हां समाज मातृ-

सत्ताप्रधान होता त्या वेळीं साहजिकच मातेच्या कल्पनेभोंवतीं सर्व सामाजिक हालचाली केन्द्रित झालेल्या होत्या. अशा कालांत मातृपूजनाचे कांहीं धार्मिक विधि व रूढि निर्माण झाल्या. मातेला प्राचीन कालांत महत्त्व येण्याचीं कारणें दोन सांगतां येतील; एक आर्थिक दृष्ट्या मातेचें महत्त्व व दुसरें ठराविक स्वरूपाच्या विवाहपद्धतीच्या अभावामुळें पित्यापेक्षां मातेची निश्चित भूमिका. त्या कालांत मुलाचा सामाजिक दर्जा आईवरून ठरे व संपत्तीचा वारसाहि आईच्या घराण्याकडून येई. माता हें सामाजिक व आर्थिक सत्तेचें प्रतीकच बनलें होतें. अनियंत्रित मातृसत्तेच्या या कालांत ज्या निसर्गशक्तींबद्दल मानवाला भय व आदर वाटे त्या शक्तींच्या ठिकाणीं मातृत्वाच्या कल्पनेचा आरोप जर प्राचीन मानवानें केला असला, तर त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहींच नाहीं.

हिंदुस्थानांत मातृपूजेची कल्पना कशी निर्माण झाली याचा इतिहास सांगतांना कांहीं समाजशास्त्रज्ञ व मानववंशशास्त्रज्ञ असें म्हणतात कीं, अनार्य लोकांत मातृपूजेच्या कल्पनेचा प्रथम उगम झाला. आर्य व अनार्य यांच्या संघर्षांतून त्यांचें जें सामाजिक व सांस्कृतिक एकीकरण झालें त्यापूर्वीं-पासूनच शक्ति-पंथ अस्तित्वांत येऊन त्यानें मातृपूजनाचा धर्म व विधि यासंबंधींच्या बऱ्याच कल्पनांचा समाजांत प्रसार केलेला होता. किंबहुना अनार्य लोकांचा वैदिक धर्मावर रोप होण्याचें एक प्रमुख कारण म्हणजे या धर्मांत देवच पुष्कळ, देवी जवळजवळ नाहींतच. अनार्यांच्या मतें याचें कारण आर्यांची पितृसत्तात्मक कुटुंबपद्धति हें होय. आर्यांच्या पूर्वीं गंगा नदीच्या खोऱ्यांतील संस्कृतींत शिवाबरोबरच पार्वती या देवतेची कल्पना आढळते. मोहेंजोदारो व हरप्पा येथील उत्खननावरून हिंदु संस्कृतीचा जो इतिहास कळून येतो, त्यावरून समाजशास्त्रज्ञांनीं 'पार्वती' म्हणजे मातृपूजनाचें प्रतीक असा निष्कर्ष काढला. हा निष्कर्ष खरा मानल्यास असें म्हणतां येईल कीं, आर्य हिंदुस्थानांत येण्यापूर्वीं हिंदुस्थानच्या कांहीं भागांत उल्लेखनीय संस्कृति नांदत होती व या संस्कृतींत पृथ्वीदेवतेच्या रूपानें मातृपूजन केलें जात होतें. पुढच्या कालांत मातेचें रौद्र स्वरूप प्रकट करणारी 'काली' ही देवता दिसते. पृथ्वी देवतेसंबंधीं उल्लेख करतांना सर जॉन मार्शलनें आपल्या एका पुस्तकांत असें म्हटलें आहे कीं, ल्हान

प्रमाणांत कोरलेल्या कितीतरी देवतांच्या मूर्ति पर्शिया, इस्लाम, मेसापोटेमिया, एशिया-मायनर, सीरिया, पॅलेस्टाईन, सायप्रस, बाल्कन राष्ट्रे व इजिप्त देशांतील प्राचीन संस्कृतींत आढळून येतात. यावरून लेखकाला असेंहि सुचवावयाचें असेल कीं, प्राचीन हिंदु संस्कृतींत दिसून येणारी मातृपूजा हा अनेक देशांतील या सांस्कृतिक वैशिष्ट्यांचा व धार्मिक समजुतींचा एक भाग आहे. भारतीय आर्यांत दिसून येणाऱ्या मातृपूजेचें मूळ इतक्या जुन्या काळांत शोधूं पहाणें कदाचित् धाष्टर्याचें ठरेल. मातृपूजेसंबंधींच्या धार्मिक कल्पना मातृप्रधान कुटुंबपद्धतींतून निघाल्या असल्या पाहिजेत हें म्हणणेंहि शंभर टक्के खरें मानतां येणार नाहीं. आर्य हिंदुस्थानांत येण्यापूर्वी ज्या जमाती येथें होत्या त्यांच्याकडून मातृपूजेची कल्पना आर्यांनीं उचलली हें नाकारण्याचा अट्टाहास आज कोणताहि शास्त्रज्ञ करणार नाहीं. अनार्य या शब्दानें रानटी जमाती असा अर्थ न करतां, आर्यांच्या पूर्वी हिंदुस्थानांत वस्ती करून असलेल्या जमाती एवढाच बोध घ्यावयास हवा. वेदांत नसलेल्या सर्व कल्पना अनार्यांच्या आहेत हा समज चुकीचा आहे. त्याचप्रमाणें फक्त वेदांत नमूद केलेली संस्कृति म्हणजेच आर्य संस्कृति हाहि समज बरोबर नाहीं.

## २. वैदिक वाङ्मयांतील प्रमुख मातृदेवता

हिंदुस्थानांतील मातृपूजेचा इतिहास सांगतांना वेदांपासूनच सुरुवात करावयास हवी. कारण जुन्यांत जुन्या वैदिक वाङ्मयावरूनच हिंदूंच्या धर्माची, वाङ्मयाची व संस्कृतीची साग्र कल्पना करतां येते. पूर्वी एकदां सूचित केल्याप्रमाणें वेदांत देव पुष्कळ आहेत. देवता मात्र अगदीं तुरळक असून त्यांनाहि दुय्यम स्थान आहे.

१. अदितिः—वेदकालांतील एक प्रमुख मातृदेवता या दृष्टीनें अदितीचा प्रथम उल्लेख करावा लागेल. अनेक वेळां तिचा देवमाता म्हणून निर्देश केलेला आढळतो. कांहीं वेळां सर्व विश्वाची जननी असेंहि अदितीचें वर्णन केलें आहे. पुराणकालापर्यंत अदिति देवमाता मानली गेली होती. पण हिंदु धर्माच्या इतिहासांत मात्र या देवतेस केव्हांच फारशी लोकप्रियता लाभलेली आढळत नाहीं.

२. पृथिवीः—मातृपूजेच्या इतिहासांत पृथिवी या मातृदेवतेस फार महत्त्वाचें स्थान दिलेलें आहे. "घोर माता" असेंहि पृथिवीला म्हटलेलें

आहे. आणखी एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी कीं, ज्या ज्या ठिकाणीं पृथिवीची स्तुति अगर प्रार्थना केली आहे त्या त्या ठिकाणीं पिता म्हणून आकाशाचा उल्लेख केला आहे. एवढें मात्र खरें कीं, पृथिवीच्या विशाल व दैदीप्यमान स्वरूपाकडे पाहून तिच्या अनेक सुपुत्रांना उत्कृष्ट काव्य स्फुरलें ( उदा. ऋग्वेद १·१६८·३३ ). पृथिवी व आकाश या उभयतांच्या प्रार्थनांत धनधान्याची समृद्धि, भरभराट, शौर्य, सुख, वंशवृद्धि व दीर्घायुष्य यांची अपेक्षा व्यक्त झालेली दिसते. युद्धांत पृथिवी देवतेनें संरक्षण करावें व तिचा तिच्या मुलांवर केव्हांहि कोप होऊं नये म्हणून या देवतेची पूजा करीत. पृथिवी-मातेवर रचलेल्या प्रार्थनांत तिच्यांत दिसून येणारें मातृप्रेम, मनाचें औदार्य, क्षमाशीलता यांचा प्रामुख्यानें उल्लेख केला आहे. अशा मातेचे सुपुत्र म्हणविण्याचें भाग्य लाभल्याबद्दल कवींना फार अभिमान वाटतो. पृथिवी-मातेची संपत्ति, वैचित्र्य यांचींहि भरपूर वर्णनें कवींनीं केलीं आहेत. पृथिवीस माता मानून तिची स्तुति करणाऱ्या कांहीं ऋचा अथर्ववेदांतहि आहेत ( उदा. १२·१·१·१८ ). या ऋचांत पृथिवीची धारणा होण्यास सत्यनिष्ठा, त्याग, यज्ञ, तपश्चर्या हे गुण कारणीभूत असून ब्रह्मामुळेंहि पृथिवीची धारणा होते असें म्हटलें आहे. पृथिवी अनेक उपयुक्त वनस्पतींचें पोषण करते. तिच्या अंकावर अनेक नद्या, समुद्र व शेतें पसरलेलीं आहेत. प्रत्येक सजीव प्राण्याचें भरण पोषण तिच्याकडूनच होतें असें वर्णन करून, पृथिवीनें सुवत्ता, दीर्घायुष्य, बुद्धिमत्ता व बल द्यावें अशा प्रार्थना केल्या आहेत. " पृथ्वीवर दिवसा व रात्रीं नियमितपणें पाणी वहातें. तिनें आम्हांस भरपूर दूध द्यावें." " हे पृथिवी-माते, तूं सर्वांच्या निवाऱ्याचें एकमेव स्थान आहेस. तुझा कंप भयप्रद आहे. देवाधिदेव इंद्र तुझ्या रक्षणार्थ सतत सज्ज असतो. आम्हांला सुवर्णाप्रमाणें तेजस्वी कर. कोणीहि आमचा द्वेष न करो." अशा तऱ्हेचा अनेक प्रार्थनांचा आशय आहे. यावरून प्राचीन ऋषिमुनींना पृथिवी-मातेबद्दल किती आदर व प्रेम वाटत होतें हें सहज दिसून येईल.

पृथिवीला माता व आकाशाला पिता मानण्याची कल्पना सर्वच जुन्या धर्मांत आढळते. आकाशांतून वृष्टि होते व त्यायोगें सुपीक पृथिवी अमाप धान्य निर्माण करते, ही कल्पना मानवी संस्कृतीच्या सुरुवातीपासूनच रूढ झालेली दिसते. हिंदुस्थानांतील प्रत्येक अनार्य जमातींत पृथिवी-मातेची

उपासना आढळून येते. वैदिक काळांत किंवा नंतर निर्माण झालेल्या मातृ-पूजनाच्या कल्पना अनार्यांच्या मातृपूजेच्या कल्पनेशीं जुळत्या असल्या तरी त्या स्वतंत्र रीतीनें निर्माण झाल्या असण्याचीहि शक्यता आहे. हें सर्व जग परमेश्वरस्वरूप आहे असें मानणाऱ्या वैदिक धर्मांत पृथिवी मातेला फारसें महत्त्वाचें स्थान दिलेलें नाहीं हें मान्य केलें, तरी कांहीं ठिकाणीं पृथिवी-मातेची पूजा आढळतेच. उदा. रामायणाची नायिका सीता ही पृथ्वीकन्या मानली असून प्रत्यक्ष शेतांत नांगरणी करीत असतांना ती एका शेतकऱ्यास सांपडली असा उल्लेख आहे. प्रसिद्ध कवि रवीन्द्रनाथ टागोर यांनीं आपल्या काव्यांत अशाच तऱ्हेची पृथ्वीमातेची कल्पना अनेक ठिकाणीं घातलेली आहे.

ऐतरेय ब्राह्मण ( ८·५ ) या ग्रंथांत पृथिवी व श्री एकच मानल्या आहेत. नंतरच्या कांहीं उपनिषदांतून पृथिवी म्हणजेच श्री किंवा लक्ष्मी असें मानून ती समृद्धि व संपत्ति देणारी देवता आहे, असें म्हटलें आहे. तिची अनेक प्रकारें प्रार्थनाहि केली आहे. पौराणिक वाङ्मयांत पृथिवी शक्तिदात्री देवता व मानवाची थोर माता मानलेली दिसते. गुप्त साम्राज्याच्या काळांत प्रत्येक ठिकाणीं विष्णूच्या मूर्तीशेजारीं कांहीं वेळां श्री आणि भू व कांहीं वेळां श्री, भू व नीला या देवतांच्या मूर्ति कोरलेल्या असून, त्या विष्णूची शक्ति दर्शवितात अशी कल्पना केलेली आहे. विष्णूच्या या कोरीव मूर्तींचें वेदांतील सूर्याशीं थोडेंफार साम्य असून श्री व भू या दोन देवता पृथिवीचा बोध करून देतात व त्या समृद्धीच्या निदर्शक आहेत असें मानण्यास हरकत नाहीं.

पुराणांतील दुर्गादेवीसंबंधीं अनेक दंतकथा उपलब्ध आहेत. या कथांतून कितीहि तत्त्वज्ञानप्रचुर दृष्टिकोण दिसत असला तरी बंगालमध्यें प्रचलित असलेल्या दुर्गापूजेच्या कल्पनेचें पृथ्वीच्या उपासनेशीं असलेलें साम्य चटकन डोळ्यांत भरतें. दुर्गादेवीचा वार्षिक उत्सव बंगालमधील जमिनीच्या लावणीच्या वेळींच असतो. सर्वसामान्य बंगाली मनुष्य दुर्गेला पिकांची समृद्धि करणारी देवता मानतो. सुगीच्या सुरुवातीस बिल्वपत्रांची फांदी दुर्गादेवीचें प्रतीक मानून तिची पूजा करतात. या पूजेंत देवीनें जागें होण्यासाठीं प्रार्थना असतात. नंतर केळें व आणखी आठ वनस्पति एकत्र घेऊन नवपत्रिका नामक

दुर्गादेवीची एक आकृति तयार केली जाते. प्रत्येक वनस्पतीची स्वतंत्र पूजा करून नंतरच्या प्रार्थनेंत देवीनें त्यांची वाढ व जोपासना करावी असें म्हटलेलें असतें. कांहीं वेळां तांदुळाशीं देवीची एकरूपता मानून तिला "धान्यरूपा" अशी संज्ञा दिलेली आढळते. हिंदुस्थानांतील बऱ्याच मोठ्या भागांतील सामान्य लोकांचें मुख्य अन्न तांदूळ हें असल्यानें, धान्यांपैकीं तांदुळाशींच देवीचें साहचर्य कां मानलें आहे हें कळतें. 'शाकंभरी' असें दुर्गादेवीचें एक नांव आहे. याचा अर्थ 'वनस्पतींचें रक्षण करणारी' असाच होतो. दुर्गेला 'अन्नदा' व 'अन्नपूर्णा' असें म्हणतात. यांवरूनहि तिच्याकडून धनधान्यसमृद्धीची असलेली अपेक्षा व्यक्त होते. वसंत ऋतूंत तिची 'वासंती देवी' म्हणून पूजा करतात. सुगीच्या वेळीं हीच लक्ष्मी होते. मातृपूजेची कल्पना प्रथम पृथिवी व नंतर इतर समृद्धि देणाऱ्या देवतांमधून कशी प्रगट होते हें यावरून सहज दिसून येईल.

आणखी एक गोष्ट विद्वानांनीं यापूर्वींच निदर्शनास आणली आहे व ती म्हणजे पुराणकालांतील दुर्गा अगर चंडी या देवतांना 'भ्रामरी' अगर 'भ्रमरी' अशी जी संज्ञा दिलेली आढळते, त्यावरूनहि तिचें पृथ्वीदेवीशीं साम्य असल्याचेंच दिसून येतें. वेदांत पृथ्वीदेवीचें मधाशीं साहचर्य जोडलें आहे. ती मध निर्माण करते, वांटते, ती मधानें कांठोकाठ भरलेली आहे, नव्हे पृथ्वीदेवता म्हणजे मधच आहे. मधाप्रमाणें मधुर असें पाणी, दूध व निरनिराळे रस पृथ्वीमुळें आपणांस मिळतात म्हणून तिला भ्रमरी अशी संज्ञा प्राप्त झाली. तैत्तिरीय ब्राह्मणांत पृथ्वीला सरघाशीं एकरूप मानली आहे. अमरकोशांत 'सरघा' म्हणजे भ्रमर असा अर्थ दिलेला आहे.

बंगाल प्रांताच्या कांहीं भागांत पौष महिन्याच्या शेवटच्या दिवशीं चुलीच्या मूळ पुरुषाची पूजा करण्याची पद्धत आहे. वैदिक धर्माप्रमाणें हा देवपुरुष असला तरी अनेक खेड्यांतून देवतास्वरूपानेंहि त्याची पूजा केली जाते. हिंदु विधवा स्त्रिया उन्हाळ्याच्या अखेरीस व पावसाळ्याच्या आरंभीं कच्चें धान्य खाण्याचें व्रत घेतात, कारण त्या वेळीं पृथ्वीदेवी ऋतुकालांत असल्यानें तिला दुखवायचें नाहीं अशी यामागें कल्पना असते. पहिला पाऊस पडल्यानंतर धान्याची पेरणी सुरू होते व पुढें समृद्धिकाल येतो.

या वस्तुस्थितीला वरील मतानें धार्मिक आवरण घातलेलें दिसतें. हिंदुस्थानांतील बहुतेक खेड्यांत ग्रामदेवता असतात. *अनार्यांच्या पृथ्वीमातेच्या कल्पनेशी* ग्रामदेवतेची कल्पना बरीच जुळते असें कांहीं शास्त्रज्ञांचें म्हणणें आहे. मातृ-पूजेची कल्पना वैदिक काळापासून कशी सतत चालत आली आहे, याची *वाचकांस वरील वृत्तांतावरून कल्पना येईल.*

३. सरस्वती:—वैदिक काळांत व नंतरहि अतिशय लोकप्रिय झालेली दुसरी देवता म्हणजे सरस्वती. सरस्वती हें ऋग्वेदकालांतील एका नदीचें नांव होतें व नंतर ती नदी देवता बनली. नदीला मातेचें स्थान देण्याचें कारण म्हणजे तिचें थंड व चवदार पाणी दुधाप्रमाणेंच माणसांचें पोषण करतें. पयस् हा शब्द दूध व पाणी दोन्ही अर्थी वापरला जातो. नदीला मातेसमान मानणें व नदीची पूजा करणें या दोन प्रवृत्तींतून नदी-देवता हिंदुस्थानांत निर्माण झाल्या. हिंदु धर्मांत गंगामातेच्या पूजनास फार महत्त्व प्राप्त झालें आहे. बंगालमधील कांहीं जुन्या हिंदु कुटुंबांत विवाहापूर्वी गंगापूजन करण्याची पद्धत दिसून येते. *पुराणकालापासून गंगेबद्दल अनेक कथा प्रचलित आहेत. गंगा नदीचें ब्रह्मा,* विष्णु व महेश या देवांशीं निकटचें साहचर्य जोडलेलें आहे व कांहीं हिंदु असें मानतात कीं, आयुष्याच्या शेवटचे कांहीं तास जर गंगेंत कमरेइतक्या पाण्यांत उभें राहिलें तर मुक्ति मिळते. मनुष्य मेल्या-नंतर त्याची रक्षा गंगेंत विसर्जन करण्यामागें हीच मुक्तीची कल्पना आहे. यमुना नदी ( अगर जमुना ) ही सूर्याची कन्या मानलेली आहे. वृंदावनांतील गोपींसमवेत कृष्णानें अनेक क्रीडा यमुनाकांठीं केल्या, त्यामुळेंच ह्या नदीचें धर्मदृष्ट्या महत्त्व वाढलें. सरस्वती नदीचा देवता या दृष्टीनें विचार केल्यास थोडा वेगळा इतिहास दिसतो. ऋग्वेदांत सरस्वतीच्या स्तुतिपर ज्या ऋचा आहेत त्यांत तिचें वर्णन, सर्व मातांत श्रेष्ठ, सर्व नद्यांत श्रेष्ठ व सर्व देवतांत श्रेष्ठ असें केलें आहे व यामुळेंच देवांना यज्ञांत दिलेल्या आहुतींत सरस्वतीचा भाग असतो असेंहि म्हटलें आहे. यानंतरच्या काळांत तिची वाचेशीं एकरूपता मानून ती विद्येची देवता ठरविली गेली. फक्त हिंदूच सरस्वतीला *विद्यादेवी मानतात असें नाहीं तर तिबेट, जावा, जपान वगैरे आशियाई* देशांतहि विद्येच्या देवता व मूर्ति दिसतात. तत्त्ववेत्त्यांच्या मतें अनंतांतून ही ज्ञानगंगा सतत पृथ्वीवर वाहत आहे. ज्ञानाच्या त्रिपुटींत वाचेचें दुसरें स्थान

वाङ्मयांत ' लोगॉस ' या शब्दानें दाखविलें जातें. त्यालाच मराठी
ाब्द ' वाचा ' असा आहे. यावरून सरस्वती म्हणजे ज्ञानाची देवता ही
ना रूढ झाली. वैदिक वाङ्मयांत सरस्वतीबरोबर कांहीं वेळां इडा व
ी या दोन देवतांचा उल्लेख केलेला आढळतो. कांहीं शास्त्रज्ञांच्या मतें या
ोहि विद्येच्याच देवता आहेत. अशी एक आख्यायिका आहे कीं, एकदां
व देव दोहोंनीं वाग्देवी प्रसन्न होण्यासाठीं वीणेवर गायनास सुरुवात
. यावरून सरस्वती ही विद्या व कला यांची देवता मानण्याच्या कल्पनेचें
सांपडतें. सरस्वतीचीं वस्त्रें व इतर सर्व साज पांढऱ्या रंगाचा दाखवितात,
ग पांढरा रंग पावित्र्यदर्शक आहे. हंस या तिच्या वाहनाचा रंगसुद्धां
ा आहे.

पौराणिक कालांत इतर देवतांप्रमाणेंच सरस्वती ही शक्तिदात्री देवता
नहि मानलेली दिसते. सर्व विश्वोत्पत्तीच्या बुडाशीं असलेल्या आदिमातेचा
ती हा एक अंश आहे. प्रसिद्ध 'गायत्री' मंत्रांत अशी प्रार्थना केलेली
कीं, " ज्या ईश्वरानें पृथ्वी, वातावरण व आकाश निर्माण केलीं आहेत
ा तेजाची आम्ही उपासना करतों. त्यानें आमच्या बुद्धीस मार्गदर्शन
ं. " पुढें गायत्रीची प्रतिमा निर्माण झाली आणि ती विश्वनिर्मात्या
ची पत्नी मानली गेली. हिच्यापासूनच चारी वेद निर्माण झाले
समजूत आहे. यानंतरच्या कालांत गायत्री म्हणजेच सरस्वती अगर
ता असें मानलें जाऊं लागलें. विश्वोत्पत्तीच्या बुडाशीं असलेल्या एकमेव
स्तूच्या अनंत शक्तीचा व प्रकाशाचा गायत्री हा एक भाग असून, तिचीं
रूपें दिवसाच्या निरनिराळ्या भागांत दिसतात अशीहि समजूत आहे.
काळीं गायत्री, मध्यान्हीं सावित्री व सायंकाळीं सरस्वती हीच तीं तीन
ोत.

कांहीं वेळां सरस्वती ही ब्रह्मयाची मानस-कन्या मानली जाते तर
वेळां ती त्याची शक्ति अगर पत्नी मानली जात; म्हणूनच ब्रह्मयाप्रमाणें
हंस हें तिचें वाहन मानतात. काहीं लोक ती श्रीकृष्णाच्या मुखांतून
ा झाली असें समजतात, तर कांहीं तिला शिवापासून दुर्गादेवीस
ा कन्या मानतात. पर्जन्यकाळाच्या आरंभीं दुर्गापूजेच्या वेळीं लक्ष्मी

व सरस्वती यांना तिच्या पत्न्या मानून त्यांचीहि पूजा केली जाते, अथवा या तिघी शिव, विष्णु व ब्रह्मा यांच्या शक्ति अशीहि कल्पना करणें शक्य आहे. सरस्वतीचें साहचर्य या तिन्ही देवांशी जोडलें जातें. सरस्वतीला देवता या दृष्टीनें बौद्ध व जैन धर्मांतहि मानाचें स्थान लाभलेलें आहे. फक्त या दोन धर्मांतील सरस्वतींच्या मूर्ति हिंदूंच्या मूर्तींहून जरा वेगळ्या असतात. बौद्ध धर्माच्या उत्तरकालांत सरस्वती ही मंजुश्री या नांवानें विद्येची देवता म्हणून ओळखली जाऊं लागली. बौद्धांच्या उपासना-वाङ्मयांत सरस्वतीचा महासरस्वती, आर्यवज्रा-सरस्वती, वज्रवीणा-सरस्वती, वज्र-शारदा वगैरे नांवांनीं उल्लेख केलेला आढळतो. जैन धर्मीयांनीहि सरस्वतीस अशींच वेगवेगळीं नावें दिलेलीं आहेत.

४. श्रीः—संपत्तीची देवता म्हणून हिंदु धर्मवाङ्मयांत ओळखली जाणारी श्री अगर लक्ष्मी हिच्याबद्दलचा थोडासा इतिहास या ठिकाणीं देणें अनुचित होणार नाहीं. ऋग्वेदाच्या पांचव्या मंडळांत " श्री-सूक्त " या शीर्षकाखालीं लक्ष्मीच्या स्तुतिपर पंधरा श्लोक आलेले आहेत. या श्लोकांचा उल्लेख पंचरात्र वैष्णवांच्या जुन्या धर्मवाङ्मयांत व कांहीं जुन्या पुराणांतून सांपडतो. या श्री-सूक्तांतील वर्णनांत लक्ष्मी लाल रंगाच्या कमळांत बसलेली असून, तिच्या गळ्यांत लाल कमळांची माळा आहे, तिचा वर्ण या कमळांच्या वर्णाप्रमाणेंच तांबूस आहे व ती कमळांची देवता ( म्हणजे 'पद्मा' ) आहे असें म्हटलें आहे. तिच्या कृपेसाठीं यज्ञयाग करून साधक धन, गायी, घोडे, उत्तम पीकपाणी, सौंदर्य व कीर्ति यांची मागणी करतात. अग्निपुराणांत दिलेले चार श्लोक चार वेदांतून घेतलेले आहेत. शुक्ल यजुर्वेदांत ( ३१·२२ ) असें म्हटलें आहे कीं, लक्ष्मी व श्री या दोन आदित्याच्या स्त्रिया आहेत. तैत्तिरीय शाखेच्या वाङ्मयांतहि ही कल्पना पुन्हां आली आहे. शतपथ ब्राह्मणांत लक्ष्मी ही प्रजापतीपासून निर्माण झाली असें सांगितलेलें आहे. मुळांत श्री किंवा लक्ष्मी ही धान्य-समृद्धीची देवताच मानली गेली असावी हें ऐतरेय ब्राह्मणांतील लक्ष्मी म्हणजे पृथ्वी अशा अर्थाच्या वर्णनावरून सिद्ध होतें. बौद्धायनाच्या धर्मसूक्तांतहि श्रीच्या उपासनेसंबंधीं उल्लेख सांपडतात. रामायण व महाभारत या दोन ग्रंथांत श्रीच्या स्तुतिपर कांहीं श्लोक आहेत. बार्हत व इतर कांहीं बौद्ध धर्माच्या क्षेत्रस्थानांत लक्ष्मीच्या ( श्रीच्या ) प्रतिमा आढळतात. गुप्त कालांत

अस्तित्वांत असलेली श्रीची प्रतिमा व मुद्राहि इतिहाससंशोधकांना मिळाली आहे. लक्ष्मीची माता या दृष्टीनें उपासना करण्याची पद्धत गुप्तकालापासूनच सुरू झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. लक्ष्मीच्या उपासनेबाबत दोन कल्पना स्पष्ट दिसतात. कांहीं वेळां तिला विष्णूची शक्ति मानून तिची उपासना केली जाते तर कांहीं वेळां तिला समृद्धीची देवता म्हणून भूमातेशीं एकरूप मानून तिची उपासना करतात. भू अगर श्रीच्या वार्षिक उत्सवाचा काल कोजागिरी पौर्णिमेचा समजतात. बंगालमध्यें याच वेळीं नवपत्रिकेची पूजा होते. या समयीं केलेल्या वर्णनांत तिला गृहदेवता व धान्य निर्माण करणारी देवता असें संबोधिलें जातें. घराची भरभराट व सौंदर्य वाढावें हा स्त्रियांच्या लक्ष्मीपूजनामागील उद्देश असतो. दर गुरुवारीं सायंकाळीं कुटुंबांतील सर्व स्त्रिया एकत्र जमून भूमातेचें गुणगान करण्याची पद्धतहि बंगाली हिंदूंत असते. कुलीन घराण्यांतील सद्गुणी व लावण्यवती स्त्रीस ' लक्ष्मी ' हें नामाभिधान देण्याची वहिवाट जुन्या काळापासून चालत आलेली आहे.

तत्त्वज्ञानदृष्टया लक्ष्मी या देवतेसंबंधीची कल्पना पंचरात्रविचार-प्रणालीच्या वैष्णव वाङ्मयांत प्रथम स्पष्ट केलेली आढळते. या ठिकाणीं सर्व-शक्तिमान् विष्णु अगर वासुदेव हा सर्व सृष्टींतील चराचर वस्तूंत भरून राहिलेला आहे व ज्ञान, इच्छाशक्ति व क्रिया यांतून त्याची शक्ति प्रगट होते अशी कल्पना केलेली आहे. ही शक्ति म्हणजेच लक्ष्मी. ती जरी शेवटीं परमेश्वरा-शीच एकरूप असली तरी अद्वैताच्या ठिकाणीं द्वैताचा आभास ती निर्माण करते. पौराणिक वाङ्मयांत लक्ष्मीच्यासंबंधीं अनेक कथा दिलेल्या असून, सर्व ठिकाणीं ती विष्णूची शक्ति व अर्धांगी मानलेली आहे. सृष्टिनिर्मितीच्या बुडाशीं कार्यकारणभावरूप एक महासागर असून त्यात शेषावर पहुडलेल्या नारायण-स्वरूपाशीं लक्ष्मीचा विशेष संबंध नेहमीं जोडला जातो. दक्षिणेकडील वैष्णव लोकांत लक्ष्मी या देवतेस फारच मानाचें स्थान दिलें गेलें आहे. श्री-पंथ म्हणून वैष्णवांत जो एक पंथ आहे त्यानें विष्णूच्या शक्तीची 'माता' ही भूमिका प्रमुख मानली आहे. कुटुंबांत ज्याप्रमाणें वडील व मुलगा या दोघांत मध्यस्त म्हणून माता एक विशिष्ट भूमिका वजाविते त्याप्रमाणें परमेश्वर व जीव या दोघांमध्यें लक्ष्मी मध्यस्थाची भूमिका अंगीकारते. परमे-

भरानें जीवांवर अधिक कृपा करावी व त्यानें अपराधांची क्षमा करावी म्हणून ती प्रयत्न करते व जीवांनीं अधिक भक्तिमार्गी व कर्तव्यदक्ष व्हावें म्हणूनहि तिची खटपट चालू असते.

५. देवी:—ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांतील १२५ व्या सूक्तांत देवीचें वर्णन आलें असल्यानें तें देवीसूक्त म्हणूनच प्रसिद्ध झालें आहे. या सूक्तामधून हिंदूंच्या मातृपूजापंथाचा उगम आहे असें अनेक शास्त्रज्ञांचें मत आहे. अंभृण ऋषींची कन्या 'वाक्' हिला आत्मज्ञान झाल्यानंतर, आपण त्या विश्ववस्तूशीच एकरूप आहोंत या भावनेनें तिला उन्मनी अवस्था प्राप्त झाली. त्या अवस्थेंत तिच्या तोंडून जे उद्गार बाहेर पडले तेच या सूक्तांत दिले आहेत. ती म्हणते, "रुद्र, वसु, आदित्य वगैरे देवांच्या रूपानें मीच सर्व विश्वांत भ्रमण करतें. मित्र व वरुण, अग्नि व इंद्र आणि अश्विनीकुमार यांना मीच आधारभूत आहें. शत्रूचा नाश करणाऱ्या चंद्राचा व त्वष्टृ, पूषन् व भग यांचाहि आधार मीच आहें. यज्ञ करणाऱ्यांस व देवांना आहुति देण्यास सिद्ध झालेल्यांवर मीच कृपा करतें व त्यांना संपन्न करतें. सर्व देवहि माझेंच स्तवन करतात व अनेक रूपांनीं मी सर्व विश्वांत वास करतें. माझ्यामुळेंच प्राणी खातात, श्वसन करतात, पाहूं शकतात व ऐकूं शकतात. प्राण्यांना माझ्यामुळेंच अस्तित्व प्राप्त होतें. हें जे जाणत नाहींत त्यांचा नाश होतो. हे भक्ता, ऐक, मी सांगतें आहें तें त्रिकालाबाधित सत्य फक्त श्रद्धावंतच जाणूं शकतील. माझ्या शब्दाचा देव व मानव सारखाच आदर पाळतात. ज्यांवर माझी कृपा होते त्यांस माझ्या इच्छेनुसार मी निर्माता, द्रष्टा अगर प्रज्ञावंत करतें. ब्राह्मणांच्या क्रूर शत्रूचें निर्दालन करण्यासाठीं व दुष्टांच्या नाशासाठीं मी युद्ध करतें. मी पृथ्वी व आकाश सर्वांना व्यापून राहिलेली आहें. पृथ्वीवरील आकाशाची अफाट व्याप्ति मींच निर्माण केली. माझें जन्मस्थान खोल समुद्राच्या तळाशीं आहे. तेथून मी सर्व अंतराळाचा ठाव घेऊ शकतें. वाऱ्याच्या रूपानें मीच वाहतें. मी पृथ्वी व आकाश याच्याहि पार आहे. अशी माझी थोरवी आहे." येथें 'मी' या शब्दानें ज्या देवतेचा उल्लेख केलेला आहे तिचें रूप म्हणजेच सच्चिदानंद वस्तु होय.

६. रात्रि:—ऋग्वेदातील १० व्या मंडलातील १२७ व्या सूक्तात रात्रीचें जें वर्णन आलें आहे त्याचा संबंध मातृपूजापथाशीं जोडला जातो. या

सूक्तांत रात्रीला देवता असें संबोधून ती आकाशाची कन्या आहे असें म्हटलें आहे. एखाद्या प्रेमळ मातेप्रमाणें पृथ्वीवरील सर्व प्राणिमात्रांस रात्रिदेवतेच्या कुशींत विसांवा देण्यासाठीं आकाश आपल्या या कन्येची योजना करतें असेंहि यांत वर्णिलें आहे. नंतरच्या काळांत सामविधानब्राह्मणांत (३·३·८) पुन्हां रात्रिदेवतेचें वर्णन मातेप्रमाणेंच केलें आहे. पौराणिक वाङ्मयांत रात्र ही मायेपासून निर्माण झाली असून ती सर्व जगताची स्वामिनी ( भुवनेश्वरी ) आहे असें वर्णन आढळतें. ब्राह्मण-ग्रंथांत रात्रीचा उल्लेख स्त्रीलिंगी केला आहे. तांत्रिक तत्त्वज्ञानांत रात्र अगर चंद्र ही एका अंतिम सद्वस्तूची स्त्रीरूप शक्ति मानून सूर्य अगर दिवस हे शब्द पुरुषवाचक शिवरूप आहेत असें मानलें आहे. आणखी एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी कीं, वैदिक वाङ्मयांत चंद्रिका या देवतेसंबंधीं अनेक प्रकारचीं वर्णनें आहेत. शिनीवाली व कुहू हे दोन शब्द प्रतिपदेच्या चंद्रिकेचा प्रारंभींचा व नंतरचा असे दोन भाग दाखवितात, तर अनुमति व राका या शब्दांनीं पौर्णिमेच्या चंद्रिकेचे भाग दर्शविले जातात ( ऐतरेय ब्राह्मण ७·११ व महाभारत ८·३४·३२ ). कांहींच्या मतें प्रथम चंद्रिका ही एकच देवता होती व नंतरच्या काळांत या देवतेंतून अनेक निरनिराळ्या समृद्धिदात्या देवता निघाल्या. मार्कंडेय पुराणांत चंडीसंबंधींच्या प्रकरणांत दुर्गादेवीस दिलेल्या नामाभिधानांत बऱ्याच नावांच्या शेवटीं 'रात्रि' हा शब्द आलेला दिसतो.

७. अंबिका, उमा व दुर्गा:—शुक्लयजुर्वेदांत ( ३·५७ ) अंबिकेला रुद्राची भगिनी असें संबोधून रुद्रयज्ञांत तिनें येऊन आपल्या भागाचा स्वीकार करावा अशी विनंती केली आहे. याच प्रार्थनेची पुनरुक्ति तैत्तिरीय ब्राह्मणांतहि झालेली आहे (१·६·१०·४). मैत्रायणी संहितेंत (१·१०·२०) अंबिकेस रुद्राची भगिनी व 'योनि' असें म्हटलें आहे. तैत्तिरीय ब्राह्मण व मैत्रायणी आणि काठक संहितेंत अंबिकेचा रुद्राची भगिनी म्हणून तर उल्लेख आहेच, शिवाय तिला शरद्-ऋतूशीं एकरूप मानलें आहे व यामुळेंच अंबिका ही धान्यसमृद्धीची देवता ठरली. पुढें अंबिका व दुर्गा या दोन्ही देवता एकच अशी कल्पना निघाल्यावर दुर्गादेवीच्या शरद्-ऋतूंतील वार्षिक उत्सवास खूपच महत्त्व प्राप्त झालें. ऋग्वेदाच्या एका परिशिष्टांत व तैत्तिरीय आरण्यकांत ( १०·१·२ ) दुर्गेचा रंग अग्नीप्रमाणें लाल असल्याचा उल्लेख सांपडतो.

हिरण्यकेशी गृह्यसूत्रांत 'भवानी' देवीचें वर्णन असून ही भवानी म्हणजे शिवाची पत्नी आहे असें म्हटलें आहे. भवानीनें यज्ञाहुतींतील आपल्या भागाचा स्वीकार करावा अशी प्रार्थना या सूत्रांत केली आहे. एक गौण देवता म्हणून भद्रकालीचा शांख्यायन गृह्यसूत्रांत उल्लेख आला आहे.

अथर्ववेदांत (६·३८) महामातृदेवतेस उद्देशून एक सूक्त रचलेलें आहे. या सूक्तांत देवीस तेजाला तेजस्वी करणारी व सर्व देवांत बलाढ्य असलेल्या इंद्राची माता असें संबोधिलें आहे. केनोपनिषदांत देवीचें वर्णन करतांना तिच्या अनुपमतेची स्तुति करून इंद्राला तिनें कसें दर्शन दिलें याचें वर्णन केलें आहे. असुरांविरुद्ध चाललेल्या लढ्यांत देवांना विजय मिळवून देण्यास अद्वितीय व अनाकलनीय ब्रह्मच कारणीभूत असल्याची जाणीव इंद्रास करून देऊन त्या ब्रह्माची उपासना करण्याचा देवी त्यास आदेश देते.

या ठिकाणीं ऐतिहासिकदृष्ट्या दोन गोष्टी ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेत. देवतेच्या वर्णनांत अनेक ठिकाणीं तिला 'उमा' असें संबोधिलें आहे. उमेस हैमवती अशीहि संज्ञा देतात. हैमवती या शब्दाचा अर्थ सोनेरी रंगाची असा लावतां येतो अगर हिमालयाची कन्या असाहि लावतां येतो. उमा या शब्दाची व्युत्पत्ति अनिश्चित स्वरूपाची आहे. 'उमा' या शब्दांतील पहिल्या अक्षरानें शिवाचा बोध होतो व 'मा' म्हणजे 'मोजणें', जी शिवाला मोजते म्हणजेच जी शिवाची शक्ति आहे ती उमा. 'कुमारसंभवांत' कालिदासानें असें स्पष्टीकरण दिलें आहे कीं, पार्वतीनें शंकरासाठीं तप आरंभिलें तेव्हां तिची आई मेनका हिनें तीस तपापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. उमा म्हणजे पार्वती. "हे (पार्वती, तू तप) करूं नकोस." या प्रार्थनेवरून पार्वतीस उमा हें नांव मिळालें. हरिवंशात पार्वतीचें मूळ नांव अपर्णा असें दिलें आहे. 'उमा' या शब्दात ॐ मधील स्वर येत असल्यानें अव्यक्ताचें पहिलें व्यक्त स्वरूप म्हणजे उमा अशीहि एक उमा या शब्दाची व्युत्पत्ति सांगतात. बॅबिलोनिअन् संस्कृतींतील 'उम्मु', अकेडिअन् 'उम्मी' व द्राविडिअन् 'उम्मा' या सर्व शब्दांनीं उमा ही देवताच दर्शविली जाते असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

हुविष्काच्या नाण्यांवर जी देवता आहे ती ओम्मो या नांवाची आहे. हैमवती या नांवावरून दोन तर्क करतां येतात. एक म्हणजे ती हिमालयाची कन्या मानली असली पाहिजे किंवा हिमालय हें तिचें निवासस्थान असलें पाहिजे. पौराणिक कालांत उमेचा संबंध विंध्य व इतर कांहीं पर्वतांशीं जोडण्यांत आला आहे. उमा ही मंदार, मेरु अथवा कैलास यावरील रहिवासी आहे असेहि उल्लेख आढळतात. पार्वती अगर गिरिजा या दोन्ही नांवांवरून असें दिसून येतें कीं ती पर्वतवासी देवता आहे. इतर अनेक प्राचीन समाजांतहि माता मानलेल्या देवतांचें निवासस्थान म्हणून एखादा पर्वतच कल्पिलेला आढळतो. इतर कांहीं देशांतील देवतांप्रमाणें पार्वतीचें वाहन सिंह मानलेलें आहे.

आरण्यकें व उपनिषदें यांमध्यें उमेचा प्रत्यक्ष उल्लेख जरी सांपडत नसला तरी आरण्यकांतील कांहीं परिच्छेद उमेच्याच संदर्भांत लिहिलेले आहेत असें टीकाकारांचें म्हणणें आहे.उदा.तैत्तिरीय आरण्यकांतील 'सोम' या शब्दाचें स्पष्टीकरण करतांना ' उमेसह वर्तमान असणारा ' असें प्रसिद्ध टीकाकार सायणाचार्यांनीं म्हटलें आहे ( उमया सह वर्तमानः ). याठिकाणीं ' उमा ' या शब्दाचा अर्थ ' ब्रह्माचें ज्ञान ' असा घ्यावयाचा आहे. 'सोम' या शब्दाचें स्पष्टीकरण करतांना वाजसनेयी संहितेचा टीकाकार महीधर व तैत्तिरीय संहितेचा टीकाकार भट्ट भास्कर यांनींहि सायणाचार्यांसारखाच अर्थ दिला आहे. तैत्तिरीय आरण्यकांत ' अंबिकापतये ' ( अंबिकेचा पति ) असा शब्दप्रयोग आढळतो. वैदिक वाङ्मयांतील गायत्रीमंत्राच्या धर्तीवर पुढील संस्कृत वाङ्मयांत अनेक देवदेवतांना उद्देशून म्हणण्यासाठीं गायत्रीमंत्र दिले आहेत. असाच एक गायत्रीमंत्र दुर्गादेवीच्या स्तवनार्थ तैत्तिरीय आरण्यकास जोडलेल्या याज्ञिकी उपनिषदांत दिला आहे. या मंत्राचा आशय असा आहे- " कात्यायनी ( दुर्गा ) देवी आम्हांस ज्ञात आहे. आम्ही कन्याकुमारीचें ( दुर्गेचें ) चिंतन करतों. तिनें आम्हांस मार्गदर्शन करावें. " ऋक्परिशिष्ट, नारायणीय उपनिषद्, देवी-उपनिषद् वगैरेंतहि अशा अर्थाच्या प्रार्थना आहेत व हे सर्व ग्रंथ पुराणकालांतील अगर नंतरचे आहेत.

रामायणाच्या व महाभारताच्या काळांत दुर्गा, चंडी अगर काली वगैरे देवतांच्या उपासना व प्रार्थना प्रचलित होत्या किंवा नाहीं हें सांगणें कठीण

आहे. रामायणाच्या पहिल्या अध्यायांत उमेचा हिमालय व मेनका यांची कन्या व गंगा नदीची भगिनी म्हणून उल्लेख आहे. हिचा महादेवाशीं विवाह होऊन ती त्याची अर्धांगी होते असेंहि येथें म्हटलें आहे. या कथेची महाभारतांतहि पुनरुक्ति झालेली आहे. श्री अगर लक्ष्मी हिचाहि विष्णूची शक्ति म्हणून रामायणांत अनेक ठिकाणीं उल्लेख केला आहे. महाभारताच्या सौप्तिक पर्वांत कालीचें वर्णन, "काळ्या रंगाची, लाल डोळ्यांची, तोंड व अंग रक्तानें माखलेली, हातांत पाश घेतलेली" असें केलेलें आढळतें. हिला 'कालरात्री' अशी संज्ञा दिली आहे. यावरून ऋग्वेदांतील रात्रीच्या वर्णनाचा संबंध कालीमातेकडे लावण्यांत आला असावा व तिला विनाशाची देवता असें म्हटलें असावें. वैदिक वाङ्मयांत उल्लेखिलेल्या निर्ऋति या देवतेचें वर्णनहि ब्राह्मणग्रंथांत कृष्णवर्णी व भयानक असें केलेलें आढळतें. ही मानवांवर संकटें आणते. तिला स्मशानभूमि फार प्रिय असते.

महाभारतात कात्यायनीदेवीची उपासना दिली आहे. प्रद्युम्नाच्या मुखीं हिचें सविस्तर वर्णन घातलें आहे. त्याचप्रमाणें अनिरुद्धाच्या तोंडीं चंडीच्या वर्णनाची एक ऋचा आहे. युधिष्ठिराच्या तोंडून दुर्गेची स्तुति करणारें सूक्त सर्वांत महत्त्वाचें म्हणून सांगतां येईल. ह्या ठिकाणीं दिलेलें दुर्गेचें वर्णन पौराणिक कालातील दुर्गादेवीच्या वर्णनासारखें आहे. दुसऱ्या एका पाठभेदांत हे वर्णन अर्जुनाच्या तोंडीं घातलेलें आहे. महाभारतांतील या उल्लेखांच्या सत्यतेबद्दल विद्वानांत एकमत नाहीं. पौराणिक कालांतील महाशक्तिकल्पनेच्या बुडाशीं उमा अगर पार्वती हीच देवता बहुतांशीं असावी. इतकेंच नव्हे तर, हिंदु जमातींतील अनेक देवता महाशक्तीच्या कल्पनेंतूनच निघाल्या किंवा तींत विलीन झाल्या असें दिसून येतें. तत्त्वज्ञानांतील 'शक्ति' संबंधीच्या विवेचनानें या विलीनीकरणास मदतच केली आहे. परमेश्वराची शक्ति ही केव्हांहि एकच असणार व म्हणून या शक्तीच्या अनेक प्रतिमा आपोआपच एकमेकात विलीन अगर एकरूप झाल्या असाव्यात. खिस्ती शतकाच्या सुरवातीपासून शिव व त्याची अर्धांगी पार्वती अगर उमा ही कल्पना स्थिर व लोकप्रिय झाली असें दिसतें. विश्वाची माता व पिता या दृष्टीनें उमा-महेश्वर किंवा पार्वती-हर या जोडीस सर्वच समाजांत महत्त्वाचें स्थान दिलें गेलें आहे.

कालिदासानें आपल्या रघुवंश नामक महाकाव्याच्या सुरवातीस पार्वती-परमेश्वरांस वंदन करून असें म्हटलें आहे कीं, ह्यांनींच जग निर्माण केलें. अनादि कालापासून हीं दोघें एकमेकांच्या अखंड सहवासांत आहेत. शब्द व अर्थ हीं जशीं अभिन्न तशीच पार्वती व परमेश्वर ही जोडी अभिन्न आहे. कुमारसंभवांत कालिदासानें, उमेनें शंकरास आपल्या खडतर तपश्चर्येनें कसें प्रसन्न करून घेतलें त्याचें वर्णन केलें आहे. या ठिकाणीं उमेला त्यानें गौरी असें संबोधिलें आहे. पार्वती तपश्चर्या करीत असतांना अन्न तर नाहींच, पण झाडाच्या गळलेल्या पानांचेंसुद्धां सेवन करीत नसे म्हणून तिला अपर्णा हें नांव प्राप्त झालें. शिव-पार्वतीच्या विवाहसमयीं शिवाच्या मिरवणुकीला हजर असलेल्या अनेक देवतांचा उल्लेख कवि कालिदासानें केला आहे व शेवटीं कृष्णवर्णी कालिमाता गळ्यांत मुंडक्यांची माळा धारण करून इतरांच्या मागून कशी जात होती त्याचेंहि वर्णन केलें आहे. कुमारसंभवांत दक्षासंबंधीं आणखी एक कथा आहे. दक्षानें एक वैदिक यज्ञ आरंभिला, पण त्या वेळीं आपला जांवई शिव यास त्यानें निमंत्रण न दिल्यानें त्याची पत्नी म्हणजेच दक्षाची मुलगी सती ही अतिशय रागावली. हा अपमान सहन न होऊन सतीनें आत्महत्या केली. पुढल्या जन्मीं ती उमा झाली व परत तप करून तिनें शिवाला वरलें.

निरनिराळ्या नांवांखालीं देवतेच्या उपासनेबद्दलचे उल्लेख असलेले आणखी कांहीं ग्रंथ सांगावयाचे झाल्यास सुबंधूचा ' वासवदत्ता ' हा सहाव्या शतकाच्या अखेरीस लिहिलेला ग्रंथ, वाक्पतिराजाचा ' गौडवहो ' हा आठव्या शतकांतील प्राकृत ग्रंथ व भवभूतीचें ' मालती-माधव ' हे सांगतां येतील. गौडवहो या ग्रंथांत शबर या अनार्य जमातींत रूढ असलेल्या ' पर्ण-शबरी ' या विंध्यवासी देवीच्या उपासनेची हकीगत दिली आहे. ती फक्त पानेंच परिधान करी म्हणून तिला पर्णशबरी हें नाव मिळालें होतें. बाणभट्टाच्या कादंबरींतहि शबरांच्या देवी-उपासनेबद्दल उल्लेख आहेत. हरिवंश या महाभारताच्या खिलपर्वांत असें म्हटलें आहे कीं, शबरांप्रमाणें बर्बर व पुलिंद या रानटी जमातींतहि दुर्गादेवीची उपासना करण्याचा प्रघात होता. दुर्गादेवीस मद्य व मांस ह्या दोन गोष्टी फार प्रिय असत. वरील सर्व उल्लेखां-वरून असें अनुमान निघतें कीं, खिस्ती शतकाच्या सुरवातीपासून दहाव्या

शतकापर्यंत लाल्च्या अनार्य जमातींतील अनेक देवता आर्यांच्या धर्मकक्षेत आल्या व अद्वैत तत्त्वज्ञानानुसार एकाच विश्वशक्तीचीं या देवता म्हणजे अनेक रूपें होत असें मानण्यांत येऊं लागलें. पुराणकालांत निर्माण झालेल्या एका विश्वमातेच्या अगर शक्तीच्या कल्पनेंतून नंतर अनेक देवता निर्माण झाल्या ही समजूत तितकीशी खरी नाहीं; उलट अनेक देवतांतूनच एका विश्वमातेची अगर शक्तीची कल्पना निघाली हें म्हणणें अधिक सयुक्तिक वाटतें.

## ३. शक्तितत्त्व

पौराणिक कालांत दिसून येणाऱ्या मातृदेवतेसंबंधीं चर्चा करण्यापूर्वी हिंदूंच्या 'शक्ति' तत्त्वासंबंधींच्या कल्पना काय आहेत तें सांगणें इष्ट ठरेल. शक्तिविषयक आर्य तत्त्वज्ञानांत तर्क व अनुभव यांचें सुंदर मीलन झालेलें दिसून येतें. अनुभवाच्या कक्षेत शक्तीचा संबंध विश्वोत्पत्तीशीं जोडण्यांत आला आहे. आजपर्यंत मानवानें जें संशोधन केलें त्यावरून त्याला एक गोष्ट निश्चित करून चुकली ती अशा कीं, स्त्री-पुरुष बीजांच्या संयोगानेंच निर्मिति होऊं शकते. मानवानें स्वतःच्या वंशनिर्मितीचे सिद्धान्त विश्वनिर्मितीस लावून जगन्मातेची कल्पना केली असल्यास कांहींच आश्चर्य नाहीं. वाल्कजन्माचें कोडें उलगडेपर्यंत प्राचीन मानवसमाजांत मातेलाच सर्व महत्त्व दिलें गेलें होतें व मानवी मातेवरूनच विश्वमातेची कल्पना करून मानवानें तिला देवता बनविलें. जुन्यांत जुन्या हिंदु संस्कृतीपासून आजतागायत देवाची कल्पना करतांना लिंग व देवीची कल्पना येण्यास योनि हीं प्रतीकें वापरलीं जातात. शिव-पार्वतीच्या अनेक देवाल्यांतून याच प्रतीकांच्या प्रतिमा दिसतात. बौद्ध व हिंदु तंत्र-वाङ्मयांत भगवानाचा बोध पांढऱ्या ठिपक्यानें ( श्वेत-बिंदु ) व भवानीचा लाल ठिपक्यानें ( शोण-बिंदु ) करून देण्याची प्रथा आहे.

१. तर्कदृष्ट्या ज्या वस्तु पृथ्वीतलावर अस्तित्वांत आहेत त्या प्रत्येकींत विशिष्ट शक्ति आहे. अर्थात् विश्वनिर्मात्या, पालनकर्त्या व संहारकर्त्या ईश्वराची शक्ति अमाप असली पाहिजे. ईश्वराचें अस्तित्व अशा शक्तीखेरीज संभवनीय नाहीं. आमच्याच नव्हे तर इतर सर्व धर्मांत देवाच्या शक्तीसंबंधींच्या कल्पना आहेत. हिंदु धर्माचें वैशिष्ट्य इतकेंच कीं, त्यात शक्ति ही ईश्वराची अर्धांगी मानली आहे. त्यामुळें केवळ शक्तिपंथीयांनींच नव्हे, तर शैव, वैष्णव,

गाणपत्य वगैरे सर्वांनीच शक्तिदेवतेला महत्त्वाचें स्थान दिलें आहे. पौराणिक कालांतील देवांचा विचार केल्यास असें दिसून येईल कीं, कोणत्या तरी रूपानें शक्तीचें साहचर्य लाभलेलें नाहीं असा एकहि देव हिंदु धर्मांत नाहीं.

शक्तिवादानें एका अर्थी निरनिराळ्या तत्त्वज्ञानप्रणालींत एकवाक्यता आणली आहे. जगताच्या आरंभास पुरुष व प्रकृति यांचें स्वतंत्र अस्तित्व कारणीभूत आहे असें सांख्य मानतात; तर वेदान्ती, माया ही निर्मितीस कारणीभूत अशी एक परमेश्वरी शक्ति आहे असें म्हणतो. वैष्णव व तंत्रवादीहि अशा तऱ्हेचें शक्तीचें गृहीतक मानतातच. पुराणांत प्रकृति ही पुरुषाची अर्धांगी आहे असें स्पष्टच म्हटलेलें आहे. तांत्रिकांच्या 'शिव-शक्ति' कल्पनेंत व 'पुरुष-प्रकृति' त कांहींहि फरक नाहीं. 'विष्णु-लक्ष्मी (श्री)', 'राम-सीता' अगर 'कृष्ण-राधा' या जोड्या जगताच्या निर्मितीच्या बुडाशीं असलेल्या ईश्वर व त्याची महाशक्तिच दाखवितात.

शाक्त तत्त्वज्ञानाचा मागोवा बृहदारण्यक उपनिषदांतील कांहीं उताऱ्यांवरून घेतां येतो (१·४·१·३). या उताऱ्यांत असें म्हटलें आहे कीं, सुरवातीस विश्वात्मा अगदीं एकाकी असल्यानें त्यास अस्वस्थता वाटूं लागली. त्याला सहवासाची इच्छा उत्पन्न झाली. विश्वात्म्याच्या ठिकाणीं स्त्री-पुरुष तत्त्वें जणूं समतोल व सुप्त अशा अवस्थेंत वास करीत होतीं. हीं दोन तत्त्वें स्वतःच विलग करून त्या विश्वात्म्यानें पहिली जोडी निर्माण केली. नंतरच्या सर्व जोड्या म्हणजे या पहिल्या जोडीच्या प्रतिकृतिच होत. शक्तीविषयींचें गृहीतक मांडतांना बृहदारण्यकांतील या उताऱ्यांचा पुढील पुराणांत, तंत्रवाङ्मयांत व वैष्णवांच्या लिखाणांत भरपूर उपयोग केला आहे. या क्षणभंगुर जगांत जें जें निर्माण झालें आहे त्या सर्वांच्या मागें जड वस्तु व चेतना हीं दोन्ही आहेतच. एकाच नित्य, अविनाशी व अद्वैत सद्वस्तूचीं हीं दोन रूपें आहेत. सत् एकच; रूपें क्षणिक व नाशिवंत. कारण नित्य, कार्य अनित्य. शैव व शाक्त तत्त्वज्ञानांत, प्रश्नोपनिषदांतील 'प्राण-रयि' अगर 'अग्नि-सोम' या जोड्या मूळ पुरुष व स्त्रीतत्त्व यांचाच बोध करून देतात.

श्वेताश्वतर उपनिषदांत परमेश्वराच्या निरनिराळ्या शक्तींचा उल्लेख केलेला आहे. ज्ञान व क्रिया या ईश्वरी शक्तीच आहेत (६·८). दुसऱ्या एका ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, माया अगर प्रकृति या गूढ शक्तीच्या

साहाय्यानें ईश्वरानें सृष्टि निर्माण केली. जो स्वतः रंगरहित व एक आहे त्यानें अनेक विविध-रंगी वस्तु निर्माण केल्या. सर्व जीवजात ईश्वराच्या मायेंत बद्ध झालेली आहे.

२. वैष्णव व शैव पंथ:—शक्तिवादाची सविस्तर चर्चा पुराणें, उपपुराणें, संहिता व तंत्रवाङ्मयांत केलेली आढळते. पण पुराणांत शक्तीविषयीं दिलेल्या हकीगती तर्कशास्त्र अगर तत्त्वज्ञान या शास्त्रांच्या पातळीवरून लिहिलेल्या नाहींत. हिंदुस्थानांतील देवीपूजा मानणाऱ्या पंथांत चंडीला फार महत्त्व दिलें गेलें आहे. या चंडीसंबंधीं माहिती देणारें मार्कंडेय पुराणसुद्धां तत्त्वज्ञानाच्या पातळीवर येऊं शकत नाहीं. शक्तीसंबंधींचें पुराणांतील लिखाण तुरळक व विस्कळीत स्वरूपाचें आहे. हिंदु व बौद्ध यांच्या तंत्रवाङ्मयांतील शक्तीसंबंधींचें लिखाण मूलतः एकच आहे. हिंदूंचें बहुतेक तंत्रवाङ्मय उत्तरेकडे काश्मीर व पूर्वेकडील बंगाल प्रांतांत लिहिलें गेलें आहे. बंगालमधील सर्व तांत्रिक वाङ्मय दहाव्या शतकानंतर लिहिलें गेलें आहे असें अनेक तज्ज्ञांचें मत आहे. काश्मीरमधील तंत्रवाङ्मय मात्र दहाव्या शतकापूर्वीचें असावें. कारण नवव्या व दहाव्या शतकांत तेथें विस्तार पावलेल्या शैवपंथीय लिखाणांत जुन्या तंत्रवाङ्मयांतील बरेच उतारे उद्धृत केले आहेत. वैष्णवांतील पंचरात्र-प्रणालीच्या नांवावर असलेल्या कांहीं संहिता शैव वाङ्मयापूर्वीच्या आहेत. यांपैकीं अहिर्बुध्न्य संहितेंत शक्तीची तत्त्वज्ञानदृष्ट्या उत्कृष्ट चर्चा केलेली आढळते. अर्थात् हा वैष्णवपंथ असल्यानें शक्तीचें साहचर्य शिवाशीं न दाखवितां विष्णूशीं दाखविलें आहे. या ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं, जगाच्या बुडाशीं असलेल्या सद्वस्तूस दोन पैलू आहेत. एक पैलू क्रियाशून्य असून येथें उत्पत्तीची प्रवृत्ति सुप्त असते. या अवस्थेंत जग हें फक्त संभवावस्थेंत असतें. एका अर्थी या अवस्थेस शून्यावस्था असें म्हणतां येईल. पण यांतहि शक्तीचा वास आहेच. फक्त या वेळीं ती अगदीं गाढ निद्रेंत व स्थिर असते, जशूं सद्वस्तूच्या बाहुपाशांत ती स्वतःला विसरून गेलेली असते. या शांततेंत विश्वात्म्याच्या मनांत एकाएकीं संकल्प उद्भवतो. संकल्पांतून इच्छा बळावते. ईश्वरी इच्छेंतून शक्तीचें प्रथम दर्शन घडतें. विश्व-सागरांत पहिला तरंग उठतो. सूर्य अगर चंद्र जसे किरणांपासून अविभाज्य, अग्नि जसा उष्णतेशीं व ठिणग्यांशीं एकरूप किंवा सागर व

त्याच्या लाटा हीं दोन्ही जशीं अभिन्न, तशीच एकरूपता ईश्वर व त्याची शक्ति यांच्यांत असते. ईश्वराच्या पहिल्या संकल्पाबरोबर मात्र शक्ति जागृत होऊन स्वतंत्रपणें तीन मार्गांनीं प्रगट झालेली दिसते. इच्छा, ज्ञान व क्रिया हेच ते तीन मार्ग. मातृदेवतेच्या कल्पनेच्या बुडाशीं हीच त्रिपुटी ( यंत्र ) गृहीत धरली आहे. खरें पाहतां शक्तीचें अस्तित्व ईश्वरापासून स्वतंत्र मानता येणार नाहीं व म्हणून कार्यरूप शक्ति हेंच परमेश्वराचें स्वरूप असें म्हणणें सयुक्तिक ठरेल. शक्तीचें प्रकटीकरण म्हणजेच ईश्वराच्या सुप्तावस्थेंतील पैलूंची जागृति, 'अहम्' चा उदय. किंबहुना शक्ति म्हणजेच ईश्वराची पूर्ण अहंता. शक्ति म्हणजे ईश्वराची आनंद-स्वरूप पूर्णावस्था. गाढ प्रेमालिंगनांत ज्याप्रमाणें पतिपत्नी पूर्ण एकरूपता अनुभवतात, त्याचप्रमाणें पूर्णावस्थेंत परमेश्वर व शक्ति यांच्यांत द्वित्वाची जाणीव अंशतःसुद्धां उरत नाहीं. दुसऱ्या एका दृष्टि-कोनांतून शक्तीचे दोन पैलू भिन्नपणें प्रतीत होतात. तिचें परमेश्वरांत विलीन असलेलें अदृश्य रूप व सत्त्व, रज आणि तम प्रकृतिरूपानें विश्वनिर्मिति करणारें शक्तीचें दृश्य रूप.

काश्मीरच्या तांत्रिक वाङ्मयांतहि विश्वाधार अशा सत्यवस्तूंत निर्मितीस कारणीभूत असलेली शक्ति सुप्तावस्थेंत वास करीत असते असे उल्लेख आहेत. शक्तीचें हें रूप म्हणजे चराचर वस्तूंचें बीजरूप अस्तित्वच होय. जगताचा आधार मानलेला परमेश्वर जितका अनादि व सत्य, तितकीच शक्तीहि. परमेश्वरानें स्वतःचेंच प्रतिबिंब पाहण्याच्या इच्छेनुसार शक्तीला विश्व-क्रीडेसाठीं कार्यप्रवण करावें व त्याच्या समाधानासाठीं शक्तीनें अनेक साधनें निर्माण करावीत असा हा विश्वनिर्मितीचा पसारा निर्माण होतो. ईश्वरच हेतुपुरस्सर शक्तीच्या सुप्त स्वरूपांतील त्रिगुणांचा समतोल नाहींसा करतो. कांहीं वेळा शक्ति हा ईश्वरानें करमणुकीसाठीं स्वतःचें प्रतिबिंब पाहण्याच्या निमित्तानें निर्माण केलेला एक आरसा आहे असेंहि वर्णन केलें आहे. शिव म्हणजे एक अमूर्त बुद्धितत्त्व व त्याचें मूर्त प्रतिबिंब पाहण्याचें माध्यम म्हणजे शक्ति. परमेश्वराची विश्वोत्पत्तीची इच्छा पूर्ण करण्याचें कार्य शक्ति करते म्हणून तिला कामेश्वरी अशी संज्ञा दिली जाते.

३. शिव आणि शक्तिः—शक्ति-तत्त्वज्ञानासंबंधीं निरनिराळ्या काळां-तील निरनिराळ्या तंत्रग्रंथांत वेगवेगळे विचार मांडले आहेत. त्या सर्वांचा

परामर्श घेण्याचें हें स्थळ नव्हे. परंतु पौराणिक व तंत्रवाङ्मयांत शिव आणि शक्ति यांच्या परस्परसंबंधाविषयीं मांडलेल्या तीन स्वतंत्र सिद्धान्तांचें थोडक्यांत दिग्दर्शन करणें मात्र आवश्यक आहे. एका सिद्धान्तानुसार शिव अगर शक्ति दोघेहि स्वतंत्र स्वरूपांत विश्वाचें सत्स्वरूप दर्शवीत नाहींत. ज्या अवस्थेत शिव आणि शक्ति पूर्णपणें एकरूप असतात ती आनंदमय पूर्णावस्था (सामरस्य) म्हणजे सत्. या एका सत्याचे शिव व शक्ति हे दोन पैलू आहेत. पैकीं पहिला अचल आहे व दुसरा गतिमान् आहे. पहिला ऋणात्मक, दुसरा धनात्मक; पहिला अमूर्त तर दुसरा मूर्त. शिव पुरुषतत्त्वाचा व शक्ति स्त्रीतत्त्वाचा आविष्कार करतात. बौद्धांच्या तंत्रवाङ्मयांत एकरूप पूर्णावस्थेस ' अद्वय बोधिचित्त ' असें संबोधिलें आहे. या अवस्थेंतून दोन स्वतंत्र विचारप्रवाह निर्माण होतात. एक शून्यता व दुसरा करुणा. शून्यतेंत विश्वाच्या क्षणभंगुरत्वाचा बोध होतो व करुणेंत सहानुभावाचा व बुद्धीचा ( प्रज्ञा ) प्रकाश दिसतो. प्रज्ञा हें अचल तत्त्व असून उपाय हें गतिमान् तत्त्व आहे असें बौद्ध मानतात. बौद्ध तंत्रवाङ्मयांतील प्रज्ञा व उपाय ही जोडी हिंदु तंत्रवाङ्मयांतील शिव व शक्ति या जोडीप्रमाणेंच आहे. फरक इतकाच कीं, बौद्ध प्रज्ञेला स्त्रीतत्त्व व उपायाला पुरुषतत्त्व मानतात.

दुसऱ्या सिद्धान्ताप्रमाणें शिव हेंच अनादि सत्तत्त्व असून त्याची सहचरी शक्ति हीहि अनादि आहे. उभयतांचें अस्तित्व एकमेकांवर पूर्णपणें अवलंबून आहे. शिव मानल्याखेरीज शक्ति मानण्यांत अर्थ नाहीं व शक्तीखेरीज शिवांत हालचाल व गतिमत्त्व कल्पितां येणार नाहीं.

तिसरा सिद्धान्त शक्ति हेंच एक अनादि सत्तत्त्व मानतो व शिव हा तिनें घेतलेला आधार आहे. विश्वनिर्मितीची व नाशाची पात्रता शक्तींतच अधिक असल्यानें शिवापेक्षांहि तिला जास्त महत्त्व दिलें आहे. पुरुषतत्त्व या दृष्टीनें शिव हा आदि-शक्तीचा एक पैलू आहे असें काहीं पुराणांत म्हटलें आहे. शाक्तपंथात शिवाला दुय्यम स्थान मिळण्याचें कारण हीच विचारसरणि आहे. या पंथांत शक्ति हें एक थोर आदितत्त्व असें मानलें जातें. कांहीं ठिकाणीं मूळ शक्तीस ललितादेवी असें नांव देऊन शिव म्हणजे तिचें एक

रूपांतर होय असें म्हटलेलें आहे. तंत्रवाङ्मयांत शक्तीचा उल्लेख त्रिपुरसुंदरी असाहि केलेला आढळतो.

४. **श्रीअरविंदांचें शक्तितत्त्व:**– श्रीअरविंद हे विसाव्या शतकांतील एक थोर शक्तिपूजक म्हणून ओळखले जातात. त्यांच्या मतें मूळ आदि-तत्त्वाची शक्ति तीन वेगवेगळ्या रूपांत प्रतीत होते. हिचें पहिलें रूप म्हणजे दृश्य जगताच्या पलीकडील महान् शक्ति. या रूपानें जगत् व परमेश्वर यांना जोडणारा दुवा निर्माण होतो. प्रत्येक दृश्य वस्तूस हिच्यामुळेंच रूपगुणाची प्राप्ति होते. या रूपाचें वर्णन अनंताची जाणीव अगर प्रभा असें करतां येईल. आदि-शक्तीचें दुसरें रूप महाशक्ति या नांवानें ओळखलें जातें. हिचें कार्य विश्वोत्पत्तीनंतर सुरू होतें. प्राणिमात्रांस जन्मास घालून त्यांचें भवितव्य ठरविणें व सृष्टींतील सर्व शक्तींचें नियमन करणें हें ह्या दुसऱ्या रूपांतील शक्तीचें कार्य आहे. शक्तीचें तिसरें स्वरूप वैयक्तिक आहे. पहिल्या दोन रूपांतील शक्तीच्या स्वरूपाची मानवास जाणीव देऊन त्याचा व दैवी शक्तीचा संबंध प्रस्थापित करणें हें या तिसऱ्या रूपांतील शक्तीचें कार्य आहे.

पुराण व तंत्रवाङ्मयांत असा उल्लेख आहे कीं, मूळ शक्ति अगर प्रकृति तीन रूपांत कार्यप्रवण होते. तिचें सत्त्वप्रधान रूप महासरस्वती, रज:प्रधान रूप महालक्ष्मी व तम:प्रधान रूप महाकाली या नावांनीं ओळखलें जातें. श्रीअरविंद मूळशक्तीचीं चार रूपें मानतात एका रूपांत ती शांत, तैलबुद्धीची, दयाळू, सर्वशक्तिमान् व सर्व निर्मितीवर प्रभुत्व गाजविणारी अशी दिसते. दुसऱ्या रूपांत तिचें विलोभनीय बल, अनिवार भावना, युद्धपिपासा, प्रबळ इच्छाशक्ति, चापल्य व भयानकता जाणवते. तिसऱ्या रूपात ती अतिशय सुंदर, आश्चर्यजनक, गूढ व तालबद्धता आणि सुसंबद्धता राखणारी अशी असते. तिची अनाकलनीय संपन्नता व ऐश्वर्य आणि तिचें आकर्षक व्यक्तिमत्त्व मनाला भुरळ पाडतें. चौथ्या स्वरूपांत ज्ञान व क्रिया यांचें पूर्णत्व दृष्टीस पडतें. ही चार रूपें महेश्वरी, महाकाली, महालक्ष्मी व महासरस्वती या नांवांनीं प्रसिद्ध आहेत.

५. **पुराणांतील चंडी सप्तशती:**–थोर माता व एकमेव सत्तत्त्व या दृष्टीनें शक्तीचें विस्तृत वर्णन मार्कंडेय पुराणांतील 'देवी-माहात्म्य' या भागांत

घेतलेले आढळते. देवी-माहात्म्याची एकूण तेरा प्रकरणे आहेत ( मार्कंडेय पुराण ८१ ते ९३ ). भारतांतील सर्व देवी-पूजकांनीं ही तेरा प्रकरणे अत्यंत पवित्र धर्मशास्त्र म्हणून मानलेली असून, यांत वर्णिलेली देवी 'चंडी' या नांवानें ख्यातनाम झालेली आहे. मूळ कथेंत देवी असा शब्दप्रयोग केला असला तरी पुढें तिचें नांव ' दुर्गा ' असें पडलें. पौराणिक व तंत्रग्रंथांत ' दुर्गा ' या शब्दाचे वेगवेगळे अर्थ लावलेले आहेत. पण त्या सर्वांचा रोख असा कीं, ' दुर्गा ' ही ग्यांना दुःखमुक्त करणारी दयाळू माता आहे. दुर्गेला ' चंडी ' असेंहि म्हणतात. ' चंडी ' या नांवानें ज्या भयानक व रौद्र स्वरूपाचा बोध होतो तें स्वरूप देवीचें असुरमर्दनाचें कार्य दर्शवितें. सज्जनांच्या रक्षणासाठीं व शांतीसाठीं देवी अवतार घेते व असुरांचा संहार करते अशी ' चंडी ' या नांवांत कल्पना आहे. शरदृतूंत दुर्गेचा फार मोठ्या प्रमाणावर उत्सव साजरा करण्याची पद्धत बंगालमध्यें दिसून येते. अन्नपूर्णा अगर अन्नदा या नांवानेंहि तिचें पूजन होतें. शरदृतूच्या पूर्वी पृथ्वीची रक्षणकर्त्री देवता म्हणून दुर्गापूजा करतात. वसंतऋतूंत ' वासंती ' या नांवानें देवीचा उत्सव साजरा करतात. पुराणांतील 'देवी'च्या कल्पनेंत त्या वेळच्या अनेक देवतांचा समावेश झालेला दिसतो. कांहीं पुराणांतून असे उल्लेख आढळून येतात कीं, भारतांतील १०८ ठिकाणीं १०८ नांवांनीं देवीपूजन होत होतें. कांहीं पुराणग्रंथांत देवीची एक हजार नांवें देण्याचा प्रयत्न केला आहे. या नांवांच्या याद्या पाहिल्यास असें दिसून येतें कीं, कांहीं नांवें गुणदर्शक आहेत व कांहीं नावें स्थानिक देवतांची असून, त्या देवता कालांतरानें ' देवी ' या महादैवतांत समाविष्ट झाल्या.

' देवी-कवच ' सूक्तात देवीचा उल्लेख अनेक नांवांनीं केला आहे. उदा. नवदुर्गा, शैलपुत्री, ब्रह्मचारिणी, चंद्रघंटा, कुशमांडा, स्कंदमाता, कात्यायनी, कालरात्री, महागौरी, सिद्धिदात्री वगैरे. चामुंडा देवी प्रेतावर वसते तर वाराही म्हशीवर वसते. ऐंद्रीचें वाहन हत्ती तर वैष्णवीचें गरुड. नारसिंही, शिवदूती व माहेश्वरी यांचें वाहन बैल तर कौमारीचें मोर. लक्ष्मी कमलांत वास करते. हंस पक्षी हा ब्राह्मीचें वाहन आहे. अशा शेंकडों प्रकारांनीं देवीचीं निरनिराळीं वर्णनें केलेलीं आढळतात. सर रामकृष्ण भांडारकर यांनीं हिंदु धर्मांतील ' देवी 'संबंधीं लिहिताना असें म्हटलें आहे कीं, या सर्व

देवतांतून एकाच देवतेचा बोध होतो. मात्र त्यांच्या नांवांवरून त्या निरनिराळ्या ऐतिहासिक कालखंडांत व परिस्थितींत निर्माण झाल्या असाव्यात व नंतर हिंदु मनाच्या नैसर्गिक प्रवृत्तीनुसार त्यांचें एकीकरण कल्पिलें असावें. वरील निरनिराळ्या नांवांवरून देवता म्हणजे देवांच्या शक्ति असाहि अर्थ निघतो. उदा. वराहाची शक्ति वाराही, नारसिंहाची शक्ति नारसिंही वगैरे. कांहीं देवता प्रथम अनार्यांच्या असून नंतर आर्यांनीं त्या आपल्या 'देवी'-च्या कल्पनेंत एकरूप केल्या असाव्यात. उदा. चामुंडा ही रक्तपिपासु देवता अनार्यांतून नंतर आर्यांत आली असावी. भांडारकरांच्या मतें कात्यांची देवी ती कात्यायनी व कौशिक जमातीची देवता ती कौशिकी अशी यांची उपपत्ति लावतां येईल. अनार्यांप्रमाणें बौद्ध धर्मांतूनहि हिंदूंनीं कांहीं देवता आपल्यांत नंतर सामावून घेतल्या असाव्यात. उदा. 'तारा' ही देवता बौद्ध धर्मांतून नंतर हिंदु धर्मांत आली. बौद्धांच्या वज्रयोगिनीवरून हिंदूंत 'छिन्नमस्ता' ही देवता आली. 'पूर्णशबरी' ही मूळ बौद्ध देवताच होती. बौद्ध देवता अगर जैन देवता हे शब्दप्रयोग वापरतांना एक गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे ती अशी कीं बुद्ध अगर महावीर हे हिंदुस्थानांतच होऊन गेले. त्यांच्यावर पहिले संस्कार हिंदु धर्माचे झाले व त्यांत कांहीं फेरफार करून त्यांनीं आपल्या विचारप्रणालि निर्माण केल्या. म्हणजे एका अर्थी या सर्व देवता हिंदूंच्याच निरनिराळ्या काळांत निरनिराळ्या जमातींत निर्माण झाल्या असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. प्रश्न इतकाच कीं, एक देवता अगर माता या कल्पनेंतून वेगवेगळ्या देवता नंतर निर्माण झाल्या कीं, अनेक देवतांतून मागाहून एका देवतेची कल्पना आली.

आज हिंदुस्थानात देवीपूजेसाठीं प्रसिद्ध अशीं एकावन्न क्षेत्रें आहेत. तीं कशीं निर्माण झालीं याबद्दलची कथा अशी—दक्षकन्या सतीनें पतीच्या अपमानाच्या निषेधार्थ देहत्याग केल्यानंतर शिव तिचा मृतदेह खांद्यावर घेऊन दुःखविव्हल स्थितींत त्रिभुवनात हिंडूं लागला. हें पाहून विष्णूनें आपलें सुदर्शन चक्र सावरलें व हळूच शिवामागें जाऊन सतीच्या देहाचे त्यानें एकावन्न तुकडे केले व ते एकावन्न ठिकाणीं विखुरले. ज्या ज्या ठिकाणीं हे तुकडे पडले त्या त्या ठिकाणीं एकेक क्षेत्र वसलें. या कथेंत अनेक देवता ह्या एकाच देवीचीं रूपें आहेत हें सिद्ध करण्याचा प्रयत्न केलेला आहे असेंहि म्हणतां

येईल. आणखी एक अशी कथा प्रचलित आहे कीं, दक्षाच्या यज्ञाला हजर राहण्यासाठीं महादेवाची परवानगी मिळावी म्हणून सतीनें दहा रूपें घेऊन त्याला भिवविलें. हीं दहा रूपें म्हणजे दहा महाविद्या असें मानलें जातें. साधकांच्या दृष्टीनें हीं दहा रूपें म्हणजे एका शक्तीचीं गुणवैशिष्ट्यें होत. प्रत्येक साधकाच्या कुवतीनुसार तो देवीच्या त्या त्या रूपांचा अर्थ लावतो.

दुर्गादेवीचें पूजन, आराधना व उत्सव याबाबत इतर कोणत्याहि प्रांतापेक्षां बंगाल प्रांत अधिक प्रख्यात आहे. वार्षिक उत्सवकालीं दुर्गादेवीच्या मातीच्या मूर्ति मुद्दाम घडवितात. या मूर्तींत देवीनें महिषासुरास पायाखालीं घातलें आहे, तिच्या दोन्ही बाजूंना जया व विजया (लक्ष्मी व सरस्वती) या तिच्या कन्या आहेत व बाजूला गणपति व कार्तिक (देवांचा सेनाप्रमुख) हे दोघे आहेत असें दाखवितात. काली ही बंगाली लोकांची दुसरी आवडती देवता. हिचीं अनेक देवळें असून शेंकडों लोक रोज तिची पूजाअर्चा करतात. दुर्गादेवीचा वार्षिक उत्सव झाल्यानंतर तीन आठवड्यांनीं अमावास्येस कालिमातेचाहि उत्सव मोठ्या प्रमाणांत साजरा होतो.

निरनिराळ्या पुराणांत देवीपूजनाचे अनेक प्रकारचे विधि दिलेले आहेत. त्यांच्या तपशिलांत जाण्याचें कारण नाहीं. बीजमंत्राखेरीज इतरहि अनेक प्रकारचे जे मंत्र पौराणिक वाङ्मयांत दिलेले आहेत त्यांच्या पठनानें अद्‌भुत शक्ति येते असें मानतात. देवीच्या भक्तांत अनेक गीतें, आरत्या, नृत्यें व रूढिबद्ध आचारविशेष यांचा समावेश झालेला आहे. कांहीं देवतांचा कांहीं रोगांशीं संबंध जोडण्याची वृत्ति भारतीयांतच नव्हे तर जगांतील इतर मानवगटांतहि दिसून येते. हिंदु लोकांत सर्पांची एक देवता मानली जाते. तिला 'मनसा' किंवा 'विषहरी' असें म्हणतात. तिचा कोप झाल्यास एकप्रकारचा विषारी व्रण निर्माण होतो असें मानतात. देवी, कॉलरा व मुलांचे अनेक साथीचे रोग निर्माण करणाऱ्याहि स्वतंत्र देवता अनेक जमाती मानतात. बंगालमधील व भारताच्या इतर भागात रूढ असलेल्या देवीभक्तीच्या कल्पनाचें परीक्षण करतांना, भारतीय मनाचा धार्मिक कल व जीवनमूल्यें घडविण्यास मातापूजनानें कशी मदत केली आहे या मुद्द्याचा विचार प्रामुख्यानें करावयास हवा. कारण संस्कृतीची घडण श्रद्धा व जीवन-

मूल्यें यांतूनच होत असते. विश्वचालिका शक्तीच्या कल्पनेनें व तत्त्वज्ञानानें भारताच्या जीवनाला एक विशेष वळण लावलें आहे. चंडीच्या स्वरूपांत शक्तीविषयींच्या सर्व कल्पना साकार झाल्या आहेत.

चंडीच्या कथेंतील पहिली कल्पना महामायेची आहे. महामाया या शब्दानें असा बोध होतो कीं, जगताच्या खऱ्या स्वरूपावर आवरण घालून भ्रांति निर्माण करणारी ही एक शक्ति आहे. या मायेमुळें प्राणिमात्रांचीं विचलित मनें क्षणभंगुर वस्तूंना सत्य मानूं लागतात व त्यांच्या लाभहानीनुसार सुखी अगर दुःखी होतात. पण ही मायारूप शक्ति निर्माण कशी होते ? मूळ सत्-तत्त्वाची जी शक्ति विश्व निर्माण करते तीच शक्ति ही भ्रांतीहि निर्माण करते. जगताच्या निर्मितीपूर्वींहि ती परमतत्त्वाचा एक भाग म्हणून अस्तित्वांत असते व जग निर्माण झाल्यानंतरहि तिचें कार्य चालू राहते. तिची सत्ता फक्त प्राणिमात्रांवर चालते असें नव्हे तर परमतत्त्वावरहि ती प्रभुत्व गाजविते. शक्ति जेव्हां तिच्या सत्‌तत्त्वाच्या सान्निध्यांत असते तेव्हां तिचें वर्णन योगमाया असें केलें जातें. विश्वसंहाराच्या वेळीं महामाया अथवा महाशक्ति क्रियाशून्य बनते व परमतत्त्वास जणूं कार्यकारणाच्या बीजरूपी महासागरांत निद्रिस्त ठेवते. महाकाली या अभिधानानें शक्तीचें कालावरील प्रभुत्व दर्शविलें जातें. विश्व-निर्मितीनंतर कालाचा ओघ हीच निर्माण करते. महाशक्तीचें स्वरूप फक्त आध्यात्मिकच नाहीं तर नैतिक, मानसिक, जीवशास्त्रीय, शरीरशास्त्रीय व भौतिकहि आहे. या विश्वांतील प्रत्येक वस्तूचें अस्तित्व व कार्य या शक्तीच्या प्रेरणेमुळेंच घडते.

महाशक्ति मानवी मनांत वैचारिक व मानसिक आंदोलनें उत्पन्न करते, भावनांची पखरण करते, बुद्धीची चमक निर्माण करते व आध्यात्मिक आकांक्षाहि फुलविते. प्राण्यांच्या नैसर्गिक क्रियाप्रवृत्तींचें उगमस्थान ही शक्तिच आहे. ज्या घटनांना आपण नैसर्गिक प्रक्रिया या सदरांत घालतों त्या ही शक्तिचे घडवून आणीत असते. यामुळें देवांना व पितरांना संतुष्ट करणारे ' मंत्र ' शक्तीवरच रचलेले असतात. ॐ व त्यांतील तीन वर्ण म्हणजेच प्रणवरूप शक्ति. शक्ति म्हणजे गायत्री. जे मंत्र वाचेपलीकडे ( उच्चारास अशक्य ) आहत

ते म्हणजेहि शक्तिच. विश्वाची निर्मात्री, धात्री व विनाशकर्त्री शक्ति हीच! महाविद्या व महामेधा या नांवांनीं हिचाच बोध होतो. विलोभन व विस्मरण ह्या क्रियाहि शक्तिच घडविते. देव आणि दैत्य यांना हिच्यामुळेंच सामर्थ्य-प्राप्ति होते. शक्ति म्हणजेच लावण्यांतील मोहिनी, बलाचें बलशालित्व, लज्जेंतील विनीतता व बुद्धींतील तेजस्विता. पोषणकर्त्री शक्ति म्हणजेच समाधान-वृत्ति, मनःस्वास्थ्य व क्षमाशीलता. युद्धांत तिचें स्वरूप अत्यंत भयानक तर शांतताकालांत अत्यंत कोमल! सत्यव्रताच्या घराची भरभराट व अपवित्र घराचा नाश हीं शक्तीचींच रूपें! अज्ञानाच्या व दुर्गुणांच्या ठिकाणीं हिचें अस्तित्व जसें भासमान होतें तसेंच तें ज्ञानांत व सदभिरुचींतहि भासमान होतें. ब्रह्मयाचें कर्तृत्व शक्तीमुळेंच प्रकट होतें. क्षुद्र कीटकहि शक्तिविरहित नाहीं. अत्युत्तम मुक्तावस्थेंत व हीनतम बद्धावस्थेंत शक्तीचा प्रभाव सारखाच दिसतो. निष्पाप स्मितांतून ती जशी प्रकाशमान होते तशीच भेसूर व पापमय विकारांतूनहि शक्ति प्रकट होत असते.

शक्तीविषयींच्या या ज्ञानातून साधकानें जो बोध घ्यावयाचा तो असा कीं, परमतत्त्व व शक्ति हीं एकच असून सर्व स्थिरचरांत शक्ति नित्य वास करीत असते. अवघ्या विश्वांत एखादा परमाणुहि शक्तिविरहित नाहीं. शक्ती-मुळेंच सर्व जगत् निर्माण झालें व कार्यप्रवण झालें. खऱ्या साधकाचा प्रमुख उद्देश स्वतःतील शक्तीचें अस्तित्व जाणणें हा असतो. मानवी देह आणि मन यामधून जीवनसंगीताचे सुरेल स्वर निघावेत हें त्याच्या साधनेचें उद्दिष्ट असतें. शक्तीचें विश्वव्यापी स्वरूप ओळखल्यामुळें साधक खऱ्याखुऱ्या अर्थी सर्व निर्मितीशीं एकरूप होतो—त्याचें सामरस्य साकार होतें. अंतःसृष्टि व बहिः-सृष्टि एकमेकांत विलीन होतात. म्हणून चंडीचे भक्त सुषुप्तावस्थेंत देवीला चहूंकडे पाहूं शकतात. दशदिशांना भरून राहिलेली महाशक्ति जणूं प्रत्यक्ष त्यांच्या प्रत्ययास येते.

देवीच्या जीवन-चरित्रांत तिचें व राक्षसांचें सतत युद्ध चालू असतें. याचा अर्थ इतकाच कीं, साधकाच्या मनांत सतत असद्विकार व सद्विकार यांचा झगडा चालू असतो. एकेक प्रमुख असद्विकार म्हणजे एकेक राक्षस-प्रमुख. ज्या वेळी प्रबळ विकार दाबण्याचा अगर उखडून काढण्याचा प्रयत्न

केला जातो त्या वेळीं तो वेगवेगळ्या रूपांत व्यक्त होण्याची धडपड करतो व पूर्ण नाहींसा होण्याऐवजीं खोल जाऊन नेणिवेंत कोठेंतरी दडून राहतो; हें आधुनिक मनोविश्लेषणानें सिद्ध केलें आहे. विकाररूपी राक्षसहि शक्तीशीं सामना देण्याचा प्रसंग आल्यास अशींच क्षणोक्षणीं रूपें पालटतो व अदृश्यहि होतो. चंडिचरित्रांत तिचें रक्तबीज राक्षसाशीं घनघोर युद्ध झाल्याची हकीकत दिलेली आहे. या राक्षसाच्या धरणीवर पडणाऱ्या रक्ताच्या प्रत्येक थेंबापासून एकेक बलाढ्य राक्षस निर्माण होई. हाच प्रकार मनोविकारांचाहि आहे. देवतेच्या उपासनेनें माणसाचें आत्मिक बल वाढतें व विश्वाचा खरा अर्थ त्याला उमजल्यानें तो विकारांना जिंकूं शकतो.

६. तंत्रवाङ्मयः—यांत महामातेच्या उपासनेमुळें साधकास अंतिम सत्याचा बोध व्हावा हाच खरा उद्देश आहे. तंत्रवाङ्मयांत ह्या विचाराचें प्रतिपादन केलें असल्यानें, मातृपूजनाच्या कल्पनेचा तंत्रवाङ्मयाशीं निकटचा संबंध मानला जातो. सामान्य भाषेंत ' तंत्र ' ह्या शब्दाभोंवतीं गूढतेचें एक वलय निर्माण झालेलें आढळतें. पण हें गूढ उकलण्याची यातायात न करतां एक गोष्ट निर्विवादपणें सांगतां येईल कीं, निरनिराळीं दर्शनें, परमतत्त्वाचें स्वरूप व तें जाणण्याचे मार्ग यांची तात्त्विक चर्चा करतात, तर तंत्रवाङ्मयांत या अंतिम सत्तत्त्वाप्रत जाण्याचा व्यावहारिक मार्ग सांगितलेला आढळतो. " सर्व विश्वांत भरून राहिलेल्या शक्तीचें स्वरूप कसें जाणाल ? " असा प्रश्न विचारल्यास " यंत्र, मंत्र व विधिविधान यांच्या साहाय्यानें " असें उत्तर कोणीहि तांत्रिक ताबडतोब देईल.

मंत्र म्हणजे महामातेचें शाब्दिक स्वरूप असें म्हणता येईल. निर्मितीच्या प्रक्रियेंत प्रथम संकल्प उद्‌भवतो. संकल्पांतून क्रिया व क्रियेंतून अहंता साकार होते. ही अहंता म्हणजे शक्तीची प्राथमिक अवस्था. दुसरी अवस्था नाद. यांत स्फुरण व लयबद्धता प्रत्ययास येते. तिसऱ्या अवस्थेंत आकार दृश्यमान होतो. अक्षर व शब्द म्हणजे विश्वस्फुरणाचें मूर्त स्वरूप. अक्षर म्हणजे प्रत्यक्ष महामाता नव्हे, तर तिच्या सन्निध राहून तिच्या सेवेंत रत असणाऱ्या देवता. यांना ' मातृका ' असें संबोधलें जातें. महामातेंत व मातृकांत खूपच साम्य असतें. पुराणांतील व तंत्रवाङ्मयांतील मातृकांसंबंधींच्या कल्पनेंत बराच भेद आहे.

रामप्रसाद या प्रसिद्ध बंगाली भक्तकवीनें आपल्या एका काव्यांत असें म्हटलें आहे कीं, भाषेतील पन्नास वर्णांतून ( स्वर व व्यंजनें ) कालिमातेचीं *अनंत नांवें निर्माण होतात व प्रत्येक वर्णांतून देवीच जणूं साकार होते.* तांत्रिक पूजापद्धतींत ' अंगन्यास ' या नांवाची एक पद्धति रूढ आहे. यांत शरीराच्या निरनिराळ्या भागांवर निरनिराळीं अक्षरें लिहिलीं जातात. एकेक अक्षर म्हणजे एकेक मातृका असें मानलें जातें. याचा अर्थ असा कीं, देहाचा कणन्कण देवतेच्या अस्तित्वाची साक्ष देतो. आपण ज्या देहाबद्दल आत्मत्व दाखवितों तो देह म्हणजे देवतेचें मंदिर ही भावना अंगन्यासाच्या मुळाशीं आहे.

यंत्र म्हणजे अंतिम सत्य जाणण्यास उपयुक्त असें माध्यम. तांत्रिकाच्या मतें मानवी देह म्हणजे परमतत्त्व जाणण्यासाठीं अतिशय उपयुक्त असें एक यंत्र आहे. मानवी देह म्हणजे विश्वांतील एक वस्तु नव्हे, तर एक छोटेंसें विश्वच. विश्वांतील सर्व प्रक्रिया मानवी देहांत प्रत्ययास येतात. या कल्पनेस अनुसरून तांत्रिक साधक पृष्ठवंशरज्जूंत पर्वत, नसांत नद्या व निरनिराळ्या अवयवांत पवित्र क्षेत्रांची कल्पना करतात. प्राण व अपान या वायूंत काल, सूर्य, चंद्र व त्यांचें परिभ्रमण कल्पितां येतें. अनंत विश्व व अनादि काल यांचें हुबेहूब दर्शन मानवी देहांत घडतें. म्हणून तांत्रिक साधक विश्वाचें गूढ उकलण्याची निष्फळ यातायात करीत न बसतां स्वतःच्या देहावर लक्ष केन्द्रित करतो व देहांतच परमतत्त्वाचा शोध घेऊन तेंच बाह्य विश्वांत सामावलेलें आहे असें मानतो.

*महामातेच्या रूपात दोन परस्परविरुद्ध ध्रुवांचें दर्शन घडतें. एका* बाजूनें ती जड विश्वाशीं एकरूप, निद्रिस्त व सुप्त अशी भासते, तर पूर्णावस्थेंत ती चैतन्यस्वरूप, ज्ञानमय व शिवस्वरूप असते. तांत्रिक साधनेंत मूलाधारचक्र हें सर्वांत खालच्या पातळीवरील नाडीचक्र मानतात. जड वस्तूंची पातळी असाहि मूलाधारचक्रावरून बोध होतो, तर सहस्रार हें अत्युत्तम *पातळी दर्शवितें. देहाच्या भाषेंत ही पातळी मेंदू दर्शवितो. कारण मेंदूच्या* ठिकाणीं विचार उद्भवतो व विचारांतूनच अनुभूति उत्पन्न होते. साधनेच्या प्रक्रियेंत योगविद्येच्या साहाय्यानें प्रथम मूलाधारचक्र जागृत केलें जातें. येथें

जड वस्तूंतील महामातेच्या स्वरूपाची प्रतीति येते. क्षुद्रांत क्षुद्र निर्मितींतहि महामातेचा अंश पाहण्यास साधक शिकतो. हळूहळू योगसाधनेंत साधक जसा पारंगत होत जाईल, तसतशी त्याला मातेच्या शिवस्वरूपाची जाणीव होऊं लागते. साधकाचें यापुढील कार्य म्हणजे अगदीं खालच्या पातळीवर असणाऱ्या जड वस्तूंतहि चैतन्याचा आविष्कार झालेला पाहणें. महाशक्तीच्या या तत्त्वज्ञानानें हिंदुधर्मांत एक विशिष्ट दृष्टिकोण निर्माण केला आहे. या दृष्टींतून साधक जड विश्वांतील वस्तुमात्रास त्याज्य न समजतां सर्व विश्वांत एक चैतन्य खेळत आहे व कोणतीहि वस्तु या शिवशक्तिविरहित नाहीं ही विश्वात्मकता निर्माण करूं शकतो.

महामातेचे परम भक्त रामप्रसाद यांच्या जीवनांत याच तत्त्वाचा आविष्कार झालेला दिसून येतो. त्यांच्या जीवनांतील अशी एक कथा सांगतात कीं, ते स्वतः ज्या वेळीं आपली झोपडी बांधत होते त्या वेळीं मुलीच्या स्वरूपांत प्रगट होऊन प्रत्यक्ष महामाता त्यांना बांधकामांत मदत करीत असे.

**७. कांहीं नामवंत शक्तिसाधकः**-- अठराव्या शतकांत व तत्पूर्वी होऊन गेलेल्या रामप्रसादांनीं व इतर शेंकडों शाक्तपंथीयांनीं सांगितलेल्या तत्त्वज्ञानाची पुनरावृत्ति एकोणिसाव्या शतकांत दक्षिणेश्वरीं असलेल्या श्रीरामकृष्णांच्या तत्त्वज्ञानांत झालेली दिसून येते. ब्राह्मण जातीचा एक महंत बंगालमधील कालीमातेच्या दगडी मूर्तीची भक्ति करतो व सर्व धर्मांना मान्य होण्यासारखें तत्त्वज्ञान सांगतो हा अनेकांना एक विरोधाभास वाटतो. परंतु याचें उत्तर शाक्त तत्त्वज्ञानाच्या आधारें असें देतां येईल कीं, महामातेच्या भक्तांची, सर्व विश्वांत एकच चैतन्यमय शक्ति नांदत आहे असें पाहण्याची दृष्टि, ही जगताच्या बुडाशीं एकच परमतत्त्व आहे असें सांगणाऱ्या हिंदु तत्त्वज्ञानाशीं पूर्णपणें एकरूप आहे. आपल्या प्रासादिक व काव्यमय वाणीनें आबालवृद्धांना मोहून टाकणाऱ्या रामप्रसादांना व श्रीरामकृष्णांना महामाता व परमसत्तत्त्व ब्रह्म यांत कांहींच फरक दिसत नव्हता. रामकृष्णांच्या मतें अव्यक्त परमतत्त्वाचाच आविष्कार व्यक्तसृष्टींत होतो. व्यक्त हा अव्यक्ताचाच एक पैलू आहे; गुणमय जगत् हीं निर्गुणाचीच एक बाजू आहे. आकार व निराकार यांत मूलभूत फरक नाहीं. शक्ति हा शक्तिमत् परमतत्त्वाचाच

अविभाज्य अंश आहे. सगुण परमेश्वराची अगर देवीची आराधना किंवा भक्ति केल्यानें एका निर्गुण तत्त्वाच्या मान्यतेस कोणताहि बाध येत नाहीं. निर्गुण सत्तत्त्वाच्या आकलनाचें दालन सगुण भक्तीनेंच खुलें होतें आणि असें होत असतांना परमतत्त्वाच्या पावित्र्यास व निरामयतेस कोणताहि दोष लागत नाहीं. कारण भक्तींत सर्व धार्मिक प्रवृत्ति सफल होत असतात.

परमेश्वरी इच्छेपुढें व शक्तीपुढें विनम्र होणें हें रामकृष्णांच्या महामातेच्या आराधनेचें प्रमुख सूत्र होतें. त्यांच्या उपदेशांतील एकाच वाक्यांत सर्व जीवनाचें तत्त्वज्ञान सांठविलेलें दिसतें. " हें माझें, तें माझें (आमार ! आमार!) म्हणून जीवनाशीं पाठशिवणी खेळूं नका " अशी त्यांची शिकवण होती. जगतांतील कोणत्याहि वस्तूशीं अगर विकारांशीं मनुष्य जेव्हां स्वतः एकरूप होतो तेव्हांच दुःखाची सुरुवात होते. 'आमार' मधील 'आ' हा उपसर्ग काढला कीं 'मार' या शब्दानें महामातेच्या स्वामित्वाचा बोध होईल. जें दिसतें अगर भासमान होतें तें सर्व 'मातेचें' आहे हें समजणें म्हणजेच एकतत्वाची जाणीव होणें. या जाणिवेतून सर्व जगताबद्दल प्रेमाची व विश्वबंधुत्वाची भावना निर्माण होते. ज्याप्रमाणें अग्नि एक, पण ठिणग्या अनेक; त्याचप्रमाणें सर्व जीवजात व वस्तुजात हीं महामातेचींच रूपें होत हेंच रामकृष्णांच्या तत्त्वज्ञानाचें सार होय. अशा रीतीनें रामकृष्णांच्या तत्त्वज्ञानांत मानवता व सेवाभाव यांचें सुंदर मीलन झालेलें आढळतें. मानवाची सेवा म्हणजेच महामातेची सेवा असें त्यांचें समीकरण होतें.

परमेश्वरी इच्छेपुढें विनम्र होणें हेंच श्रीअरविंदांच्या शिकवणीचेंहि सूत्र होतें. त्यांनीं आपल्या साधनेनें तान्त्रिक साधनेचा एक आदर्श नमुना जगापुढें ठेवला. शक्तिरूपानेंच परमतत्त्वाचा आविष्कार होतो म्हणून शक्तिरूप महामातेची आराधना म्हणजेच परमतत्त्वाचा बोध होण्यासाठीं केलेली साधना होय अशी अरविंदांची विचारसरणी आहे. ते म्हणत, [" महाशक्तीपुढें हृदयाचीं सर्व दालनें खुलीं झालीं पाहिजेत, सर्वस्वाचें मनःपूर्वक दान झालें पाहिजे व ही वृत्ति सतत चिरस्वरूप झाली पाहिजे. मनानें निर्माण केलेलें कल्पनामय जगत् व सृष्टींतील सर्व जड, दृश्य व गतिमान् वस्तूंचें असत्-स्वरूप पूर्णपणें पटलें तरच ही आत्यंतिक नम्रता अंगीं बाणेल] या विनम्र

वृत्तीनें अंतर्बाह्य व्यक्तिमत्त्वाचा ताबा घेतला पाहिजे. मनाचा कप्पान्‌कप्पा, हृदयाचा कोपरानूकोपरा चैतन्यस्वरूपाच्या जाणिवेनें पुनीत झाला पाहिजे इतकेंच नव्हे तर देहांतील कणन्‌कण परमशक्तीच्या प्रकाशानें उजळून निघाला पाहिजे. या अवस्थेंत संदेह, शंका, अश्रद्धा यांना मुळींच थारा नाहीं. साधकाची तपश्चर्या जों जों अधिक होत जाईल तों तों त्याला दिव्य अनुभूतीचे क्षण अधिक प्रमाणांत अनुभवावयास सांपडतात. स्वतःचें आत्मिक पावित्र्य त्याच्या प्रत्ययास येऊं लागतें व मुक्तावस्थेच्या आनंदसाम्राज्यांत तो स्वतःसहि विसरून जातो." आणखी एके ठिकाणीं त्यांनीं असें म्हटलें आहे कीं, "साधकाच्या प्रत्येक क्रियेंतून त्याची समर्पणसिद्धता दिसावयास हवी. त्याच्या क्रियेक्रियेंतून त्याची महाशक्तीवरील असीम श्रद्धा प्रकट व्हावयास हवी. शेवटीं साधक म्हणजे चेतनाशक्तीचें स्वरूप ओळखण्याचें एक साधन येवढाच अर्थ त्याच्या जीवनांत उरला पाहिजे. महाशक्तीशीं मनोमय एकरूपता प्राप्त झाल्यानंतर चैतन्याची प्रेरणा तीच साधकाची प्रेरणा, चैतन्याचा आविष्कार म्हणजेच साधकाची क्रिया व महाशक्तीचें कार्य तेंच साधकाचें कार्य अशी अवस्था येते. ही सफलता एकदम येणार नाहीं. त्यापूर्वींच्या प्रथमावस्थेंत साधकानें त्याचा देह व आत्मा हीं महाशक्तीच्या उपासनेसाठीं निर्माण झालेलीं साधनें आहेत असें मानलें पाहिजे. अर्थात् कर्मापासून कोणत्याहि फळाची अपेक्षा न ठेवतां आपण आचरलेल्या सेवेचा निर्मळ आनंद साधकास उपभोगतां आला पाहिजे. यातूनच हळू हळू मनाचें स्थैर्य, वृत्तीचा समतोल व निरामय आनंद याची प्राप्ति होऊं लागते. दुसऱ्या अवस्थेंत साधकाचा अहंभाव आणखी कमी होतो. कोणतीहि सेवा 'मी करतों' असें न मानतां 'माझ्या हातून घडते' अशी त्याची भावना होते. शेवटीं साधकास असा अनुभव येऊं लागतो कीं, महामाताच त्याला विशिष्ट कार्याची प्रेरणा देते व या दैवी प्रेरणेनुसार त्याच्या सर्व क्रिया घडूं लागतात. त्याचा देह, त्याचें मन, नव्हे त्याचें सर्व जीवनच शक्तिमय व चैतन्यमय बनतें. महामातेच्या शक्तीचा आविष्कार येवढेंच त्याच्या जीवनाचें स्वरूप शिल्लक राहतें." अरविंदांच्या या तत्त्वज्ञानात हिंदुस्थानांतील शक्तिपंथीय तत्त्वज्ञानाचें सारसर्वस्व सांठविलेलें आहे.

मानवी मातेसंबंधींच्या उदात्त कल्पनांचा उदय महामातेसंबंधींच्या

तत्त्वज्ञानांतूनच झाला असें ठामपणें सांगतां आलें नाहीं तरी मानवी मातेच्या सद्‌गुणांवरून महामातेच्या विशाल हृदयाची व विश्वप्रेमाची कल्पना मानवाला करतां आली आणि महामातेवरील श्रद्धेमुळें मानवी मातेची थोरवी वाढली असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. प्रत्येक सुसंस्कृत हिंदु मनुष्यास महामातेविषयीं आदर वाटत असल्यामुळें, मानवी माता हें विश्वमातेचें एक छोटेसें प्रतीक आहे अशी त्याची भावना असते. या भावनेला शब्दस्वरूप देतांना एका प्रसिद्ध बंगाली कवीनें असें म्हटलें आहे कीं, 'गायीच्या खुरामुळें पृथ्वीवर निर्माण झालेल्या छोट्याशा खळग्यांत पाणी सांटलें तरी विशाल आकाशाचें प्रतिबिंब ज्याप्रमाणें त्यांत दिसूं शकतें, त्याचप्रमाणें महामातेचें म्हणजेच चित्‌शक्तीचें प्रतिबिंब प्रत्येक मानवी मातेच्या हृदयांत उमटलेलें दिसतें.'' यावरून हिंदूंच्या सामाजिक व कौटुंबिक जीवनांत मातेचें स्थान किती मोठें मानलें आहे याची कल्पना येते. इतकेंच नव्हे तर सर्व स्त्रीजातच देवतास्वरूप मानण्याची हिंदी लोकांची प्रवृत्ति आहे. कौमार्यावस्थेंत ती कन्याकुमारीप्रमाणें व विवाहित अवस्थेंत उमेप्रमाणें आदरणीय समजतात. स्त्रियांना महामातेचें प्रतीक समजण्याच्या रूढीचा, हिंदु नीतिकल्पनांवर फार परिणाम झालेला दिसून येईल. नैतिक जीवनांतील पावित्र्याचें सर्व श्रेय याच रूढीस द्यावें लागेल. एकोणिसाव्या व विसाव्या शतकांत निर्माण झालेल्या देशप्रेमाच्या भावनेचें मूळहि देशाला मातेसमान मानण्याच्या कल्पनेंतच दिसून येतें. महामाता म्हणजेच सुख व समृद्धि देणारी भूमि व भूमि म्हणजेच मातृभूमि असें हें समीकरण हिंदु मनांत पक्कें झालेलें आहे. या ठिकाणीं धर्म व देश यासंबंधींच्या भावनांचा सुंदर मिलाफ झाला आहे. बंकिमचंद्रांच्या ' वंदे मातरम् ' या गीतावरून देशभक्तीवर हिंदु धर्माची केवढी जबरदस्त छाप पडलेली आहे हें स्पष्ट दिसून येतें.

---

# प्रकरण ४ थें

## प्राचीन हिंदमधील स्त्रीशिक्षण

कोणत्याहि देशाच्या संस्कृतीची व सुधारणेची इमारत त्या देशांतील शिक्षणपद्धति व शिक्षणाचीं उद्दिष्टें यावरच आधारलेली असते. नुसतीं ध्येयें उदात्त असूनहि उपयोग नाहीं. तीं प्रत्यक्षांत उतरविण्यासाठीं त्या देशांतील लोकांनीं कसे प्रयत्न केले ही गोष्ट अधिक महत्त्वाची आहे. शिक्षण हाच देशाच्या जीवनाचा गाभा आहे. शिक्षणांतूनच समाजाची जीवनसरणी घडते, सर्वांगीण प्रगति होते, आदर्श निश्चित होतात व प्रेरणा निर्माण होतात. म्हणून कोणत्याहि देशाचा आत्मा जाणून घेणें म्हणजेच त्या देशांतील शिक्षण-पद्धति व तिचीं उद्दिष्टें जाणून घेणें होय.

स्त्रियांच्या शिक्षणविषयक दृष्टिकोनावरून तर समाजाची नाडी तावडतोब पारखतां येते. खरें पाहतां स्त्रिया व पुरुष यांच्या जीवनांत भेद दाखविण्यासारखें किंवा कमीजास्त लेखण्यासारखें कांहीं नाहीं. एका समाज-शरीराचीं तीं दोन अंगें आहेत. पण स्त्रिया पुरुषांपेक्षां शरीरानें कमी सामर्थ्यवान् असतात, येवढ्याच कारणानें त्यांची सर्वच कार्यक्षेत्रें पुरुषांनीं आज शेंकडों वर्षें भिन्न ठरविलीं. इतकेंच नव्हे, तर बुद्धीनेंहि स्त्री पुरुषापेक्षां कमी प्रतीची आहे असा एक अपसिद्धान्त अनेक शतकें रूढ होऊन बसला आहे. यामुळें सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक व कौटुंबिक क्षेत्रांत स्त्री व पुरुष यांच्या भूमिका भिन्न आहेत असा समज रूढ झाला. हिंदुस्थानांतच नव्हे, तर अनेक देशांच्या इतिहासात ह्या वृत्तीचा प्रभाव दिसून येतो व यामुळेंच जगांतील निरनिराळ्या समाजांनीं प्राचीन काळांत स्त्रियांना व इतर उपेक्षित वर्गांना कशा तऱ्हेची वागणूक दिली याची माहिती पाहणें फार मनोरंजक ठरेल.

निव्वळ स्त्रिया म्हणून स्त्रियांना कमी लेखून त्यांच्या जीवनाचा विकास कृत्रिम बंधनांनीं खुंटवून टाकण्याची क्षुद्र वृत्ति भारतीयांनीं मात्र केव्हांहि दाखविली नाहीं; ही गोष्ट भारतास अत्यंत अभिमानास्पद अशी समजली पाहिजे. स्त्रीच्या शारीरिक कमकुवतपणाचा गैरफायदा घेऊन हिंदु पुरुषांनीं स्त्रियांवर अन्याय्य सामाजिक अगर राजकीय बंधनें कधीं लादलीं नाहींत. वैदिक काल हा स्त्रियांच्या सर्वांगीण प्रगतीच्या दृष्टीनें सुवर्णाक्षरांनीं लिहिण्यासारखा होता यांत संशय नाहीं. नंतरच्या स्मृतिकालांत स्त्रियांचें स्वातंत्र्य मर्यादित झालें, त्यांच्यावर शिक्षणविषयक व विवाहविषयक अनेक कडक बंधनें लादलीं गेलीं हें खरें; पण स्मृतिकारांच्या लिखाणापेक्षां त्या कालांतील राजकीय व इतर क्षेत्रांतील परिस्थिति या बदलास अधिक प्रमाणांत कारणीभूत होती असें म्हणणें सयुक्तिक ठरेल. जुन्यांत जुन्या आणि प्रमाणभूत मानलेल्या मनुस्मृतीनें स्त्रियांबद्दल सर्वांत अधिक गौरवपूर्ण उद्गार काढले आहेत. मनु म्हणतो—

यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः ।
यत्रैतास्तु न पूज्यन्ते सर्वास्तत्राफलाः क्रियाः ॥

जेथें स्त्रियांचा आदर होतो व त्यांना योग्य तो मान दिला जातो तेथें देवहि संतोष पावतात. उलट जेथें स्त्रियांना अनादर दाखविला जातो त्या समाजांतील सर्व धर्मकार्येहि निष्फळ ठरतें. बृहदारण्यक उपनिषदांत असा उल्लेख आहे कीं परमात्म्यानें स्त्रीस पुरुषाची अर्धांगी म्हणूनच निर्मिली. शिंपला ज्याप्रमाणें दोन समान भागाच्या संयोगानें बनतो, त्याप्रमाणें परिपूर्ण मानवाची कल्पना स्त्री व पुरुष यांच्या समान व पूरक अस्तित्वानेंच सिद्ध होते ( १·४·३ ). मातृत्वाच्या निसर्गदत्त वरदानामुळें स्त्रीची सामाजिक व गृह-जीवनांतील भूमिका पुरुषाहूनहि श्रेष्ठ दर्जाची मानली पाहिजे असा संकेत भारतीय संस्कृतींत वैदिक कालापासून रूढ आहे. शिक्षणाचें क्षेत्रहि या कल्पनेला अपवाद नाहीं. अनादिकालापासून भारतीय स्त्रियांना शिक्षणाची समान संधि मिळालेली असून, शिक्षित स्त्रियांना जीवनाच्या प्रत्येक सामान्य व असामान्य कार्यक्षेत्रांत चमकणें शक्य झालेलें आहे.

१. वैदिक कालांतील शिक्षणपद्धतिः--वैदिक कालांतील स्त्रियांना ज्या पद्धतीनें शिक्षण दिलें जाई त्या पद्धतीची सर्वसामान्य रूपरेषा अगोदर पाहिली पाहिजे. ही पद्धति समजावून घेतल्यानंतर मुलांनाहि शिक्षण देण्यासाठीं त्याच पद्धतीचा उपयोग केला जात असे कीं काय याहि प्रश्नाचा विचार करावयास हवा.

सर्व जगांतच प्राचीन भारतांतील शिक्षणपद्धति अतिशय वैशिष्ट्यपूर्ण होती असें इतिहासावरून दिसून येतें. भारतानें पुरस्कारलेलीं शिक्षणाचीं ध्येयें अद्वितीय असल्यानें शिक्षणाच्या पद्धतींत हें वैशिष्ट्य आपोआपच निर्माण झालें.

अनादि कालापासून स्वस्वरूपाचें सत्यज्ञान करून घेणें हेंच भारतीय जीवनाचें आदर्श तत्त्व मानलें गेलें आहे. क्षणभंगुर जीवनांतील जड वस्तूंच्या ज्ञानास फारसें महत्त्व न देतां, परिपूर्ण जीवनांतील सत्, चित् व आनंद शोधण्यांत आजपर्यंत भारतीय मनानें धन्यता मानली आहे. अर्थातच व्यक्तिमत्त्वाचा व आत्मत्वाचा सर्वांगीण विकास हा येथील शिक्षणाचा प्रधान हेतु बनला. बाह्य जड वस्तूंचें तात्पुरतें ज्ञान किंवा कलाकौशल्याचा व्यावहारिक उपयोग करून देण्याच्या दृष्टीनें भारतांत कधींच शिक्षणाची आंखणी झाली नाहीं. याचा अर्थ व्यवहारांतील हेतूंची पूर्ति शिक्षणांतून होत नसे असें नव्हे, पण ज्ञानाची खरी नजर मोक्षाकडे अगर मुक्तीकडे असे. भौतिक सुखसमृद्धीपेक्षां आध्यात्मिक जीवनाच्या पूर्तीची मोहिनी भारतीयांवर अधिक प्रमाणांत पडल्यानें, शिक्षणाच्या रचनेंत व पद्धतींतहि हा जीवनविषयक दृष्टिकोण प्रतिबिंबित झाला असल्यास नवल नाहीं.

शिक्षणाच्या आदर्शाप्रमाणेंच आणखी एका बाबतींत भारतीय शिक्षणपद्धतीचें वैशिष्ट्य सांगता येईल. अगदीं प्रथमपासून इकडील शिक्षणतज्ज्ञाच्या मनें शिक्षणाची आंखणी करतांना वैयक्तिक कुवत व अभिरुचि लक्षांत घेतली पाहिजे. एकाच शैक्षणिक चाकोरींतून सर्वांना ओढीत न बसता बौद्धिक पातळीनुसार प्रत्येकाच्या शिक्षणाची व्यवस्था होई. म्हणूनच तत्त्वज्ञानापासून तों हस्तव्यवसायापर्यंत सर्व विषयांना शिक्षणांत स्थान मिळालें आहे. आत्म-

ज्ञानाची तळमळ व तें मिळविण्याची कुवत ज्यांच्यांत दिसून येत नसे त्यांना त्यांच्या आवडीच्या विषयांचें व व्यवसायांचें शिक्षण घेण्यास मोकळीक असे.

भारतीय शिक्षणाचें आणखी एक वैशिष्ट्य असें आहे कीं, त्यांत संस्कृतिसंवर्धनास फार महत्त्वाचें स्थान दिलेलें आहे. संस्कृति हें एक आंतरिक मूल्य असल्यानें या मूल्याचा विकास करतांना वैयक्तिक शिक्षणपद्धतीस आपोआपच प्राधान्य मिळालें. शिक्षण म्हणजे जीवन जगण्याचें शास्त्र व कला असें हें समीकरण असल्यानें, आमच्या शिक्षणांत व्याख्यान-पद्धतीला जवळ-जवळ मुळींच स्थान नाहीं. शिक्षक व विद्यार्थी यांच्या विचारांची देवघेव, चर्चा व परिसंवाद हेंच भारतीय शिक्षणपद्धतीचें यथार्थ स्वरूप असें म्हणण्यास हरकत नाहीं. शिक्षणाच्या कार्यांत गुरु व विद्यार्थी यांचें व्यक्तिगत संबंध अत्यंत जिव्हाळ्याचे हवेत. या दोघांचे जीवनप्रवाह जर एकरूप झाले नाहींत तर व्यासपीठावरून एखाद्या वक्त्यानें दिलेल्या व्याख्यानाचा जितका क्षणैक परिणाम श्रोत्यांवर होतो, तेवढाच परिणाम विद्यार्थ्यांच्या मनावर गुरूच्या सांगण्याचा होईल. शिक्षक व विद्यार्थी यांच्या भावनात्मक जीवनांचे प्रवाह जर एकमेकांत मिसळले नाहींत तर शिक्षकाच्या विचारांचा परिणाम विद्यार्थ्यांच्या बौद्धिक जीवनावर होणार नाहीं.

वरील विवेचनावरून प्राचीन शिक्षणपद्धतीचा आणखी एक विशेष समजून येईल. विद्यार्थ्यानें शिक्षणाच्या सुरुवातीपासून तों अखेरीपर्यंत गुरु-गृहींच राहिलें पाहिजे असा कटाक्ष असे. गुरूच्या कुटुंबीयांपैकींच एक असें समजून शिष्याचें संगोपन केलें जाई. शिष्यास पुत्रासमान लेखून त्याच्या व्यक्तिमत्त्वाची जोपासना गुरूकडून केली जाई. चोवीस तास गुरूच्या सान्निध्यांत राहिल्यानें गुरुजींच्या फक्त शिकविण्याचाच नव्हे तर सर्व दिनक्रमाचा विद्यार्थ्यांच्या मनावर खोल ठसा उमटे. याचा अर्थ असा कीं, पूर्वीच्या भारतीय शिक्षणपद्धतींत वर्ग, तास व वेळापत्रक या गोष्टींना महत्त्व नव्हतें, तर गुरूच्या सर्व जीवनाचा आदर्शपटच शिष्यासमोर सतत ठेवून प्रत्येक क्षणाक्षणाचा उपयोग शिक्षणाच्या कार्याकडे केला जाई.

प्राचीन काळीं शुल्क या स्वरूपांत विद्यार्थ्यांकडून कांहींहि घेतलें जात नसे. इतकेंच नव्हे तर शिष्यांना आपल्या घरीं ठेवून घेऊन त्यांच्या

राहण्या-जेवण्याची व्यवस्था करून त्यांना शिक्षण देणें हा गुरूचा समाजांतील एक विशेष अधिकार आहे असें मानलें जाईल.

भारतीय शिक्षणपद्धतींत श्रमाला फार महत्त्वाचें व मानाचें स्थान दिलेलें आढळतें. म्हणून विद्यार्थिदशेंत प्रत्येकानें कांहींना कांहीं शारीरिक श्रम करणें आवश्यक समजलें जाई. पुढें महान् तत्त्वज्ञ होण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्या शिष्यासहि सरपण जमा करणें, गुरें चारणें, यज्ञकुंडाचें रक्षण करणें व भिक्षा मागणें ह्या गोष्टी कराव्या लागत.

ब्रह्मचारिन् ह्या शिष्यदर्शक शब्दावरून असें दिसून येईल कीं, जो ब्रह्म जाणण्याची इच्छा करतो व ब्रह्मपदाप्रत पोंचण्याचा मार्ग जाणण्यासाठीं परिश्रम करतो तो शिष्य. यावरून प्राचीन काळीं शिक्षणांत नैतिक व धार्मिक दृष्टिकोण प्रमुख होता हें स्पष्ट होतें. शिक्षणास सुरुवात होण्यापूर्वी उपनयन हा धार्मिक विधि करण्यांत येत असे. उपनयनानंतर बटु ' द्विज ' या अभिधानास पात्र होई. उपनयनानंतरच्या तीन दिवसांत मुलाचा जणूं पूर्ण कायापालट होऊन तो एका नव्या जबाबदार, ध्येयपूर्ण व आध्यात्मिक जीवनांत प्रवेश करी.

ही झाली प्राचीन भारतांतील शिक्षणाची सर्वसामान्य रूपरेषा. यानंतर स्त्रियांच्या शिक्षणाविषयीं विशेषतः प्राचीनांचा दृष्टिकोण कसा होता तें पाहूं.

वर दिलेल्या स्वरूपाचेंच शिक्षण भारतीय स्त्रियांनाहि मिळत होतें कीं नाहीं हा सर्वांत महत्त्वाचा प्रश्न आहे. प्राचीन इतिहासांत जे पुरावे आज उपलब्ध आहेत त्यावरून शिक्षणाबाबत प्राचीन काळीं मुलगा अगर मुलगी हा भेद मुळींच लक्षात घेतला जात नसे असें निश्चितपणें म्हणतां येईल. शिक्षणाचा काल दर्शविणाऱ्या ब्रह्मचर्यावस्थेंत पुढील घटक प्रामुख्यानें असलेले आढळतात.

उपनयनः—या विधीनें गुरु शिष्याचा अध्ययनासाठीं औपचारिक रीतीनें स्वीकार करी. या विधीनंतरच वैदिक मंत्रांच्या पठणाचा व वैदिक वाङ्मय वाचण्याचा अधिकार प्राप्त होई. उपनयनानंतर शिक्षण संपेपर्यंत म्हणजे सामान्यतः सुमारें बारा वर्षें शिष्य गुरुगृहींच राही. गुरुगृहीं रहात असताना शिष्यानें वर्तें

कोणतीं वापरावींत, त्याचें आसन कसलें असावें वगैरेसंबंधीं कडक नियम केलेले असत. वसावयास कृष्णाजिन, नेसायला वल्कलें, हातांत दंड, गळ्यांत उपवीत, मेखला व केसांच्या जटा अशाच वेषांत शिष्याला अध्ययनकाल संपेपर्यंत रहावें लागे.

या ठिकाणीं पहिला महत्त्वाचा असा प्रश्न उद्भवतो कीं, ज्या उपनयन-विधीनें मुलांना शिक्षणास व वेदाध्ययनास पात्र ठरविलें जाई, त्या उपनयन-विधीस मुली पात्र असत कीं नाहीं ? आमच्या जुन्यांत जुन्या वैदिक वाङ्मयांत अध्ययनाबाबत स्त्रिया व पुरुष असा भेद केलेला आढळत नाहीं. दुर्दैवानें पुढें जनमतांत व त्यामुळें धार्मिक वाङ्मयांत फेरफार होऊन स्त्रिया उपनयनास व वेदाध्ययनास अपात्र ठरल्या ही गोष्ट निराळी. पण यांत त्या काळच्या शास्त्रज्ञांचा कलुषित दृष्टिकोण व जुन्या वाङ्मयाचा चुकीचा अर्थ लावण्याची प्रवृत्तिच दिसून येते.

**२. स्त्रियांचा वेदाध्ययनाचा अधिकार:**— (अ) स्त्रियांच्या उपनयन-विधीसंबंधीं विचार करण्यापूर्वी स्त्रियांच्या ब्रह्मचर्याबाबत व अध्ययनाबाबत वैदिक व वैदिकोत्तर कालातील वाङ्मयांत कांहीं पुरावे सांपडतात कीं काय याचा विचार करणें क्रमप्राप्त ठरेल. अथर्ववेद ११·५·१८ या ऋचेंत असें म्हटलें आहे कीं, ब्रह्मचर्य व वेदाध्ययन यांच्या साहाय्यानें मुलगी अनुरूप पति प्राप्त करून घेते ( ब्रह्मचर्येण कन्या युवानं विन्दते पतिम् ). या एकाच ठिकाणीं स्त्रियांच्या ब्रह्मचर्याचा व अध्ययनाचा प्रत्यक्ष उल्लेख केलेला असल्यानें ह्या ऋचेस फार महत्त्व दिलें पाहिजे. चारहि वेदांत फक्त अथर्ववेदांतच ब्रह्मचर्य व अध्ययन यासंबंधीं विवरण केलेलें आहे हें समजल्यानंतर स्त्रियांबाबतच्या एकुलत्या एक उल्लेखाबद्दल फारसें आश्चर्य वाटणार नाहीं. पुढील काळांत हारित या कायदेपंडितानें *स्त्रियांच्या वेदाध्ययनाच्या अधिकारासंबंधीं स्पष्ट उल्लेख केले आहेत.*

आश्वलायन गृह्यसूत्र ३·८·११ त असें म्हटलें आहे कीं, वेदाध्ययन पुरें करून जेव्हा शिष्य स्वगृहीं परतेल त्या वेळीं समावर्तन नांवाचा विधि केला जातो. या प्रसंगीं हातावर घेतलेलें सुगंधी द्रव्य ब्राह्मणानें प्रथम तोंडास लावावें,

क्षत्रियानें हातास लावावें, वैश्यानें पोटास लावावें, स्त्रीनें कमरेच्या खालच्या भागास लावावें व पायीं श्रम करून पोट भरणाऱ्यांनीं मांडीस लावावें. यावरून ब्रह्मचर्य व अध्ययनाबाबत मुलें व मुली यांत भेद केला जात नसे हेंच स्पष्ट होतें.

हारिताच्या मतें मुलींचा समावर्तनविधि त्यांच्या ऋतुकालापूर्वी होत असे ( प्राग्रजसः समावर्तन इति । हारितोक्त्यासंस्कारप्रकाश, पा. ४०४ ). यानंतर सातव्या शतकांतील बाणभट्टाच्या कादंबरींत स्त्रियांनीं यज्ञोपवीत धारण करण्याबाबतचे उल्लेख आहेत. ब्रह्मसूत्र परिधान केल्यामुळें महाश्वेतेच्या देहास विशेष पावित्र्य प्राप्त झाल्याचें वर्णन बाणभट्टानें केलें आहे (भाग १,पा. १३३).

(ब) शुक्लयजुर्वेद २६·२ मध्यें एका परिच्छेदांत सर्वांना असलेल्या अध्ययनाच्या अनुमतीबद्दल सुंदर विवरण केलेलें आढळतें. रचनाकार ऋषि म्हणतात, " वेदातील तत्त्वज्ञान ब्राह्मण व क्षत्रिय, क्षूद्र आणि वैश्य इतकेंच नव्हे तर मित्र व शत्रु सर्वांना सांगण्याची माझी इच्छा आहे " ( वाचं कल्याणीम् ). यामध्यें निःसंशयपणें स्त्रियांचा समावेश झालेला आहे. वैदिक व वेदोत्तर कालांतील अनेक महान् स्त्रियांचीं चरित्रेंहि त्या कालांतील स्त्रीशिक्षणाची साक्ष देऊं शकतील.

३. स्त्रियांना उपनयनाचा अधिकारः—( अ ) ख्रि. पू. ६ ते ३ या शतकांतील गृह्यसूत्रात उपनयनविधीसंबंधींचे सर्व नियम दिलेले आढळतात. उदा. " ब्राह्मणाचें उपनयन आठव्या वर्षी करावें " ( आश्वलायन गृह्यसूत्र १·१९·१ ). येथें असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, सूत्रांत फक्त पुल्लिंगी नामाचा उपयोग केला आहे. तेव्हां यांत स्त्रियाचाहि समावेश होतो कीं नाहीं ? परंतु प्राचीन वाङ्मयांत जेथें जेथें आचार-विचाराचें वर्णन केलें आहे तेथें सर्व ठिकाणीं पुल्लिंगीच शब्दप्रयोग केलेला दिसतो. ही त्या वेळच्या सर्वच लिखाणाची सामान्य पद्धति दिसते. यावरून स्त्रियांच्या आचारासंबंधीं जुन्या वाङ्मयानें कांहींच सांगितलें नाहीं असा निर्णय काढणें गैर ठरेल. उदाहरणार्थ, ' स्वर्गकामो यजेत ' हें सूत्र घेऊं. येथें शब्दप्रयोग जरी पुल्लिंगी असला तरी तें स्त्रिया व पुरुष या दोहोंना उद्देशून आहे, ही गोष्ट जैमिनी व इतर अनेक पंडितहि मान्य करतात.

वरील सूत्राचा अर्थ ' यः स्वर्गकामः स यजेत ' असाच लावावयास हवा. म्हणजे जो स्वर्गाची अपेक्षा करतो त्यानें यज्ञ करावेत. कात्यायनानें श्रौतसूत्र १·१·७ मध्यें स्पष्ट म्हटलें आहे कीं ' स्त्री च अविशेषात् । ' याचा अर्थ असा कीं, वरील सूत्र फक्त पुरुषांना उद्देशून नाहीं तर स्त्रियांनींहि स्वर्गप्राप्तीसाठीं यज्ञ करावेत. माधवाचार्यांनीं आपल्या ' न्याय-माला-विस्तर ' या ग्रंथांत असें स्पष्टपणें म्हटलें आहे कीं, " आठव्या वर्षी ब्राह्मणाची मुंज करून त्याच्या अध्ययनास सुरुवात करावी. मुलींच्या बाबतहि हाच नियम लागू करावा. "

नामकरण-विधीबद्दल आश्वलायनानें असें नमूद करून ठेवलें आहे कीं, ऐहिक सुखसमृद्धि हेंच उद्दिष्ट पुढें असल्यास मुलाचें नांव दोन अक्षरी ठेवावें व त्यानें आध्यात्मिक क्षेत्रांत परिपूर्णता मिळवावी अशी अपेक्षा असल्यास त्याचें नांव चार-अक्षरी ठेवावें. मुलाच्या नांवाचीं अक्षरें सम असावींत व मुलीच्या नांवांत अक्षरांची संख्या विषम असावी. प्रत्येक मुलाचें एक अभिवादनीय नांव ठेवावें व तें मातापित्यांनीं उपनयनविधि होईपर्यंत गुप्त ठेवावें ( आश्वलायन गृह्यसूत्र १·१५·४ ). यावरून असा निश्चित बोध होतो कीं, प्रत्येक मुलाचीं व मुलीचीं दोन नांवें ठेवण्याची प्रथा प्राचीन काळीं होती; एक प्रचारांत वापरण्याचें नांव ( सांव्यवहारिक ) व दुसरें उपनयन-प्रसंगीं गुरूला वंदन करून सांगण्याचें नांव. वेदोत्तर कालांतील आणखी एक प्रसिद्ध पंडित गोभिल यानें असें म्हटलें आहे कीं, विवाहविधीच्या वेळीं वरानें विशिष्ट पोशाख घातलेल्या व उपवीत परिधान केलेल्या वधूस न्यावें. या सर्व उल्लेखांवरून पूर्वीच्या कालांत मुलींना मुलाइतकाच उपनयनाचा व अध्ययनाचा अधिकार होता असें स्पष्ट दिसतें.

**( च ) वैदिक विधींतील मंत्रपठन करण्याचा स्त्रियांचा अधिकारः—** उपनयन झाल्याखेरीज वैदिक विधि मंत्रसहित पाठ करण्याचा अधिकार कोणालाच प्राप्त होत नसे आणि अविवाहित मुली, विवाहित स्त्रिया व विधवा स्त्रियाहि अनेक गृह्यज्ञ व इतर यज्ञ मंत्रपठनासहित करीत असत, असे कितीतरी उल्लेख जुन्या वाङ्मयांतून काढून दाखवितां येतील. *अविवाहित मुलीनें यज्ञविधि* केल्याचें एकच उदाहरण यजुर्वेदांत दिलेलें आहे. यावरून येवढाच निष्कर्ष

निघतो की बहुतेक सर्व यज्ञ विवाहितांनींच करावयाचे असत व त्यामुळें एकट्या मुलीनें यज्ञ केल्याचीं उदाहरणें विरळा दिसतात. ब्रह्मचर्याची शपथ घेतलेल्या मुलामुलींनाच फक्त एकट्यानें यज्ञ करण्याची विशेष परवानगी असे. पण विवाहित स्त्रियांनीं पतिसमवेत केलेल्या यज्ञांचीं अनेक उदाहरणें वैदिक वाङ्मयांत आहेत. पत्नी या शब्दाचा मूळ अर्थ 'यज्ञांत सहभागी होणारी' असाच पाणिनीनें दिला आहे ( ४·१·३३ ).

पतीच्या गैरहजेरींत एकट्या स्त्रिया 'सीतायज्ञ' नेहमींच करीत. हा यज्ञ सुगीच्या पूर्वी करावयाचा असे. पारस्कर गृह्यसूत्रांत ( २·१७ ) असा उल्लेख आहे कीं एकट्या स्त्रीनें सीतायज्ञ करण्याची ही वहिवाट फार पूर्वीपासून चालत आलेली आहे. 'आग्रहायणी कर्म' या ग्रंथावरील टीकेंत हरिहर म्हणतो, 'अत्र स्त्रीणां अपि मंत्रपाठः' म्हणजे 'पुरुषाणां स्त्रीणां सर्वेषां मंत्रपाठः' स्त्रिया व पुरुष सर्वांना मंत्रपठन करण्याचा अधिकार आहे.

## वैदिक व वेदोत्तर कालांतील विदुषी

वैदिक व सूत्रकालांतील स्त्रिया विद्वत्तेबद्दल इतक्या ख्यातनाम आहेत कीं त्यासंबंधीं सविस्तर पुनरुक्ति करण्याची कांहींच गरज नाहीं. जगांतील जुन्यांत जुनें वाङ्मय म्हणून प्रसिद्ध असलेल्या ऋग्वेदांत घोषा, गोधा, विश्ववारा, अपाला वगैरेसारख्या सत्तावीस ब्रह्मवादिनींनीं रचलेल्या ऋचा आढळतात. ही सर्व भारतीयांना फार अभिमानाची गोष्ट आहे. अंभृण ऋषींची कन्या वाच् हिला महत्तत्त्वाशीं एकरूप असल्याचा साक्षात्कार झाला त्या वेळीं तिच्या तोंडून आनंदातिशयानें असे उद्गार बाहेर पडले कीं, "मी सर्व जगाची साम्राज्ञी आहें. प्रत्येक प्राणी माझ्यामुळेंच बघूं शकतो, ऐकूं शकतो व खाऊं शकतो. एकेक वस्तु निर्माण करीत मी वाऱ्याच्या वेगानें पुढें जात आहें. आकाशापलीकडे व पृथ्वीपलीकडेहि सर्वत्र माझाच वास आहे" (ऋग्वेद १०·१२५). मानवी संस्कृतीच्या उषःकालांत सत्तत्वाच्या दिव्य साक्षात्कारानें परमपदाला पोंचलेल्या स्त्रीचें हें उदाहरण भारतीय वाङ्मयांतच नव्हे तर सर्व जगांतील वाङ्मयांत अद्वितीय आहे.

उपनिषद् कालांतहि स्त्रियांचा शैक्षणिक दर्जा कायम होता. अनेक नामवंत विदुर्षींत गार्गीचें नांव प्रामुख्यानें सांगतां येईल ( बृहदारण्यक उपनिषद् ३·६; ३·८ ). बृहदारण्यक उपनिषदाच्या तिसऱ्या प्रकरणांत जनकासंबंधीं एक गोष्ट आलेली आहे. विद्वत्तेंत परमोच्च बिंदु गांठलेल्या ब्राह्मणास एक हजार गायी बक्षिस देण्याचें त्यानें जाहीर केलें होतें. या देणगीस याज्ञवल्क्य हा एकच ब्राह्मण पात्र ठरला. या प्रसंगीं याज्ञवल्क्याशीं जाहीर रीतीनें तत्त्वचर्चा करणाऱ्या आठ विद्वानांत गार्गीचाहि समावेश केलेला होता हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. गार्गीच्या सल्ल्यावरूनच सर्व ब्राह्मणांनीं याज्ञवल्क्यास ‘ ब्रह्मवेत्ता ’ म्हणून मान्यता दिली.

बृहदारण्यक उपनिषदांत ( २·४·३ ) आणखीहि एका विदुर्षीचा उल्लेख आहे. मैत्रेयी ही याज्ञवल्क्याच्या दोन पत्न्यांपैकीं एक. आपल्या दोन्ही स्त्रियांना संपत्तीची सारखी वांटणी करून धावी अशी इच्छा त्यानें व्यक्त केली तेव्हां तत्त्वचिंतनांत नेहमी गर्क असणारी मैत्रेयी लगेच म्हणाली, “ मला अमरत्व प्राप्त करून देणारें ज्ञान द्या. तत्त्वज्ञानापासून परावृत्त करणारी ही संपत्ति मला मुळींच नको. ” या गोष्टीवरून त्या काळच्या स्त्रिया पुरुषांप्रमाणेंच तत्त्वज्ञानाचा अभ्यास करून परमोच्च ज्ञानाची प्राप्ति करून घेण्याची अपेक्षा बाळगीत हें सिद्ध होतें.

केनोपनिषदांत उमा हैमावती ब्रह्मचर्चा करतांना आढळते ( ३·१२ ). कौषीतकी ब्राह्मणांत ( ७·६ ) पथ्यास्वस्ति ही स्त्री उत्तरेकडचा खडतर प्रवास करून अध्ययन करते व तिच्या पारंगततेबद्दल ‘ वाच् ’ ही उच्च पदवी तिला मिळते असा उल्लेख आहे.

ऋग्वेदीय गृह्यसूत्रांपैकीं आश्वलायन ( ३·४·४ ) व सांख्यायन ( ४·१० ) या सूत्रांत तीन तत्त्वज्ञ स्त्रियांचा उल्लेख आहे. गार्गी वाचक्नवी, वधवा प्रातिथेयी व सुलभा मैत्रेयी या त्या स्त्रिया होत. पतंजलीनें पाणिनीवर केलेल्या महाभाष्यांत कदाचित् सुलभेचाच उल्लेख केलेला असावा ( सौलभानि ब्राह्मणानि—४·३·१०५ ).

पाणिनीनंतरच्या ख्रि. पू. पांचव्या शतकांतहि नामवंत शिष्य व गुरु म्हणून समाजात वावरणाऱ्या अनेक स्त्रिया दिसून येतात. स्त्रियांनीं शिक्षिकेचा

पेशा पत्करणें ही त्या काळांत इतकी सर्वमान्य पद्धति होती कीं स्त्रीशिक्षिकेच्या समानार्थी उपाध्याया अगर उपाध्यायी आणि आचार्या हे स्वतंत्र शब्द प्रचारांत आले होते. शिक्षकाच्या पत्नीस उपाध्यायानी अगर आचार्यानी अशीं अभिधानें असत. भट्टोजी दीक्षितांनीं आपल्या 'सिद्धान्तकौमुदींत' उपाध्याया अगर आचार्या याचा अर्थ 'शिक्षकाचें काम करणारी स्त्री' असा दिला आहे. वासुदेव दीक्षितांनीं आपल्या 'बालमनोरमा' (भाग १, पान ३७९–८०) या ग्रंथामध्येंहि हेंच मत ग्राह्य मानलें आहे.

वेदांच्या निरनिराळ्या शाखांचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थिनींचा उल्लेख पाणिनीनें केला आहे. 'कठ' या शाखेचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थिनींना "कठी" अशी संज्ञा दिली जाई. बाव्हृचीनें ऋग्वेदाचें अध्ययन करणाऱ्या स्त्रियांचा निर्देश बालमनोरमा व काशिका या नांवांनीं केला आहे. पतंजलीनें आपिशलीच्या व्याकरणाचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थिनींना उद्देशून 'आपिशला' असा शब्दप्रयोग केला आहे. 'काशकृष्णा' या नांवानें काशकृष्णाच्या मीमांसेचा अभ्यास करणाऱ्या स्त्रिया असा अर्थ अभिप्रेत आहे. 'औदमेघ' या शब्दाचा अर्थ त्यानें 'औदमेघया नांवाच्या शिक्षिकेचे शिष्य' असा लावला आहे.

वरील माहितीवरून असें निश्चितपणें सांगतां येईल कीं, प्राचीन काळांत भारतीय स्त्रिया व्याकरण, मीमांसा वगैरेसारख्या अवघड विषयांचें नुसतें अध्ययन करीत इतकेंच नव्हे तर त्यांच्या हाताखालीं अशा शाखांचें अध्ययन करण्यासाठीं अनेक शिष्य येत. या शिष्यसमुदायांचा उल्लेख करण्यासाठीं स्वतंत्र शब्द भाषेंत तयार झाले. ऋग्वेदकालापासूनच भारतीय स्त्रिया खऱ्या अर्थानें पुरुषांच्या सहचारिणी आहेत. विशेषतः बौद्धिक व सांस्कृतिक क्षेत्रांतील प्रगतीचें निम्में श्रेय तरी स्त्रियांनाच द्यावें लागेल. स्मृतिकालानंतर स्त्रियांवर शिक्षणाबाबत अपात्रतेचा जो शिक्का मारण्यांत आला तो किती निरर्थक आहे हेंहि वर दिलेल्या माहितीवरून दिसून येईल. ज्यांनीं वेदांतील तत्त्वज्ञानप्रचुर व काव्यमय ऋचांपैकीं कांहीं ऋचा रचल्या, ज्यांनीं जाहीर रीतीनें पुरुषांना तत्त्वचर्चेचें आव्हान दिलें, ज्यांनीं अवघडांत अवघड अध्ययनशाखांत आपला शिष्यवर्ग तयार केला व ज्यांनीं जगताचा अर्थ लावण्यासाठीं

पुरुषांसारखीच खडतर साधना केली, त्या स्त्रियांबाबत ' अमंत्रा हि स्त्रियो मताः ' असे उद्गार काढणें शुद्ध अन्यायाचें आहे. स्त्रियांना मंत्रपठनाचा अधिकार नाहीं या अर्थाचें वरील संस्कृत वचन बौद्धायननें म्हटल्याचा उल्लेख रघुनंदनाच्या स्मृति-तत्त्व या ग्रंथांतील भाग १ पान २९८ वर केलेला आहे. आश्वलायन गृह्यसूत्रांत ( ३·४·४ ) असें म्हटलें आहे कीं, दररोज अर्घ्य देण्यासाठीं ज्या ऋषींचीं नांवें घेतलीं जातात त्यांत गार्गी वाचक्नवी, वडवा प्रातिथेयी, सुलभा मैत्रेयी या तीन स्त्रियांचाहि समावेश केलेला आहे. यावरून विदुषी स्त्रियांबद्दल वैदिक काळांत किती आदर असे हें दिसून येते. सारांश, जुन्या वाङ्मयांतील अनेक उल्लेखांवरून असें सहज सिद्ध करतां येते कीं, वैदिक काळांत स्त्रियांना पुरुषांप्रमाणेंच उपनयनाचा व अध्ययनाचा अधिकार होता.

### प्राचीन भारतीय महिलांची शिक्षणपद्धति

प्राचीन भारतांत मुलांसाठीं जी शिक्षणपद्धति आंखलेली होती तीच पद्धति मुलींसाठींहि वापरण्यांत येई कीं तींत कांहीं फेरफार केलेले होते हा प्रश्न आतां विचारांत घ्यावयाचा आहे. मागें आपण असें पाहिलें कीं उपनयन झाल्याबरोबर मुलांना गुरुगृहींच राहून शिक्षण घ्यावें लागे. या अध्ययनकाळांत मुलांना विशिष्ट वेष धारण करावा लागे व श्रमहि करावे लागत. मुली उपनयनानंतर गुरुगृहीं गृहावयास जात किंवा नाहीं यासंबंधीं कोठेंहि प्रत्यक्ष उल्लेख आढळत नाहींत. कांहीं स्मृतिवचनावरून व यम आणि हारित या पंडितांच्या वचनांवरून आपणांस स्त्रियांच्या शिक्षणपद्धतीविषयीं कांहीं अनुमानें काढतां येतात.

यमाच्या " वीरमित्रोदय-संस्कार-प्रकाशांत " पान ४०२-४०३ वर खालील उतारा मिळतो—

पुराकल्पे कुमारीणां मौंजीबंधनमिष्यते,
अध्यापनं च वेदानां सावित्रीवाचनं तथा
पिता पितृव्यो भ्राता वा नैनां अध्यापयेत् परः
स्वगृहे चैव कन्याया भैक्ष्यचर्या विधीयते
वर्जयेत् अजिनं चीरम् जटाधारणमेव च ।

याचा अर्थ असा कीं, प्राचीन काळीं भारतीय स्त्रियांनीं उपनयन करून वेदाध्ययन करण्याचा परिपाठ असे. स्त्रिया सावित्री ( गायत्री ) मंत्राचा जपहि करीत. परंतु आतां यापुढें फक्त पिता, बंधु अगर चुलत्याकडेच त्यांनीं शिकावें, आपापसांतील नातेवाईक कुटुंबांतच त्यांनीं भिक्षेस जावें, कृष्णाजिन वापरणें, जटा ठेवणें वगैरेसारखे परिपाठ स्त्रियांनीं सोडून द्यावेत.

संस्कार-रत्नमाला भाग १, पान १६५ वर हारिताच्या तोंडचे खालील उद्गार आढळतात—

द्विविधाः स्त्रियो ब्रह्मवादिन्यः सद्योवध्वश्च । तत्र ब्रह्मवादिनीनां उपनयनं अग्नीन्धनं वेदाध्ययनं स्वगृहे च भिक्षाचर्येति । सद्योवधूनां तूपस्थिते विवाहे कथंचिद् उपनयनमात्रं कृत्वा विवाहः कार्यः । ( संस्काररत्नमाला भाग १, पान १६५ ).

याचा अर्थ असा कीं, स्त्रियांत दोन प्रकार आढळतात. ब्रह्मवादिनी म्हणजे ब्रह्मसंबंधीं ज्ञानाची इच्छा व साधना करणाऱ्या व दुसरा प्रकार सद्योवधूंचा. यांच्या जीवनांत विवाह ही आवश्यक घटना मानलेली आहे. ब्रह्मवादिनींना उपनयन, यज्ञास आहुति देणें, वेदाध्ययन करणें व आपसांतील घरांत भिक्षा मागणें ह्या सर्व गोष्टींची परवानगी आहे. सद्योवधूचें विवाहापूर्वी फक्त उपनयन करतात.

जुन्या काळांत स्त्रियांबाबत धर्माचा दंडक काय असे तो कळण्याच्या दृष्टीनें हे दोन उतारे फार महत्त्वाचे मानले पाहिजेत. स्वतःच्या कालाबद्दल बोलतांना यम असें सांगतो कीं, ब्रह्मचर्याच्या कष्टाळू जीवनाची बाजू व पेहेरावाची विशिष्ट पद्धति सोडून स्त्रियांनीं उपनयन व अध्ययन करावें. हारिताच्या लिखाणावरून असें दिसतें कीं, एखाद्या स्त्रीला अविवाहित राहून ज्ञानसाधना करावयाची असो अगर विवाह करून संसार मांडावयाचा असो, दोन्ही प्रकारांत मुलीचें उपनयन करावें. ब्रह्मवादिनीला वेदाध्ययन व ब्रह्मचारी जीवनाच्या इतर अंगांचाहि स्वीकार करता येतो. यावरून असा निष्कर्ष निघतो कीं, उपनयन झाल्यावर जिला वेदाध्ययन करावयाचें आहे ती स्त्री गुरुगृहीं राहूं शके व ब्रह्मचर्याचा कडक दिनक्रम व वेष यांचाहि अंगीकार ती

करूं शकत असे. कालांतरानें स्त्रियांनीं गुरुगृहीं जाऊन राहण्याची कल्पना समाजांत अप्रिय होऊं लागली. ब्रह्मचारी वेष धारण करणें, भिक्षा मागणें व इतर कष्ट करणें या गोष्टींपासूनहि स्त्रियांना दूर ठेवावें असें मत मान्य होऊं लागलें. गुरुसारख्या थोर व्यक्तींचें सान्निध्य नाहींसें झाल्यानें स्त्रियांचा विकास खुरटला. पिता, चुलता, बंधु अगर पति हेच तिचे गुरु बनले. अर्थात स्त्रीच्या ज्ञानाची मर्यादाहि संकुचित झाली. यावरून असें दिसतें कीं, निव्वळ समाजमनाचा कौल फिरल्यानें भारतीय स्त्रीचें उपनयन व वेदाध्ययन यांस बंधन घातलें गेलें.

स्मृतिकालांतील व त्यानंतरच्या वाङ्मयांतहि स्त्रिया अध्ययनासाठीं गुरुगृहीं गेल्याचीं उदाहरणें सांपडतात. भवभूतीच्या उत्तररामचरित्रांतील दुसऱ्या अंकांत असें म्हटलें आहे कीं, आत्रेयी ही सुद्धां लव व कुश यांच्या-बरोबर वाल्मीकि ऋषींच्या आश्रमांत राहिली होती व तिनें वेदाध्ययनहि केलें होतें. पण त्या दोन अत्यंत बुद्धिमान् मुलांचा अध्ययनाचा वेग तिला झेपेना म्हणून ती दक्षिणेस दंडकारण्यांत जाऊन अगस्त्य व इतर ऋषींकडे वेदान्त शिकली. भवभूतीच्या मालती-माधवाच्या पहिल्या अंकांतहि असाच एक उल्लेख आहे. कामंदकी या बौद्ध भिक्षुणीकडे अनेक ठिकाणचे शेंकडों विद्यार्थी अध्ययनासाठीं येत, असें ती स्वतः सांगते. या संदर्भावरूनहि असा निर्णय निघतो कीं, प्राचीन भारतांत स्त्रिया अध्ययन व अध्यापनाचें काम स्वेच्छेनें करीत. विवाहाबाबत त्यांच्यावर कोणत्याहि प्रकारची सक्ती नसे. 'अमाजुर' या वैदिक वाङ्मयांतील शब्दावरून असा स्पष्ट बोध होतो कीं, घोषेसारख्या कांहीं विरळा स्त्रिया वैवाहिक जीवन झुगारून तत्त्वचिंतन व ब्रह्मचर्यच पसंत करीत. वैदिक कालांतील ज्या ब्रह्मवादिनींनीं संसार सोडून आयुष्यभर कडक ब्रह्मचर्य पाळलें व तत्त्वचिंतन केलें त्यांचें स्थान भारतांतच नव्हे तर सर्व जगांतील थोर तपस्विनींत मानाचें ठरेल याबद्दल दुमत होणार नाहीं.

## वैदिक व वेदोत्तर कालांतील स्त्रियांचा अभ्यासक्रम

ज्या कालांत अध्ययनाबाबत स्त्रिया व पुरुष यांना समान संधि दिली जाई त्या कालांत मुलामुलींच्या अभ्यासक्रमांत फारसा फरक असणें शक्य नाहीं. विशेषतः उच्च शिक्षणक्रमांत पुरुषांप्रमाणेंच स्त्रियाहि वेद, ब्राह्मणें व उपनिषदें यांचे अध्ययन

करीत. मुंडक उपनिषदांत ( १·१·५ ) उल्लेखिलेल्या वेदांगांचाहि ( उदा. शिक्षा, उच्चार व पाठांतराचें शास्त्र ) स्त्रिया अभ्यास करीत. कल्प ( वैदिक विधि करण्याच्या पद्धति ), निरुक्त ( शब्दांचें मूळ सांगणारें शास्त्र ), व्याकरण, छंद, ज्योतिष वगैरेंचा वेदांगांत समावेश होई. चार वेद व वेदांगें या सर्वांना मिळून ' अपरा विद्या ' या सदरांत घालीत. एका अविनाशी तत्त्वाचें ज्ञानच फक्त ' परा विद्येंत ' जमा होई. छांदोग्य उपनिषदांत ( ७·१·२ ) नारदानें स्वतः अध्ययन केलेल्या वीस शाखांचा उल्लेख केलेला आहे. यांत त्यानें चार वेद, महाकाव्यें, पुराणें, अंत्यविधि व उत्तरक्रिया, व्याकरण, गणित, परमार्थविद्या, कालानुक्रमशास्त्र, तर्कशास्त्र, राज्यशास्त्र, धर्मशास्त्र, अतिमानुष जगताचें शास्त्र, संरक्षणशास्त्र, ज्योतिष, सर्पमोहिनी विद्या व ललितकला यांचा समावेश केला आहे. एवढ्या अध्ययनानंतरहि त्याला फक्त ' मंत्रविद् ' ही पदवी प्राप्त होऊं शकली. ' आत्मविद् ' या अभिधानापर्यंत तो पोंचूं शकला नाहीं.

पुरुषांप्रमाणेंच वरील सर्व अध्ययनशाखांत स्त्रियांना प्रवेश मिळे व त्या त्यांत पारंगत होत. प्रापंचिक व कौटुंबिक विषयांचें अध्ययनहि स्त्रिया व पुरुष बरोबरीनें करीत. वेदांतील स्त्रियांनीं रचलेल्या ऋचा पाहिल्यानंतर स्त्रियांच्या काव्यगुणाची भरपूर कल्पना येते. या ऋचांतून भावनोत्कटता, स्वतंत्र बुद्धि, रचनाचातुर्य, माधुरी, लालित्य वगैरे गुण प्रकर्षानें आढळतात. स्त्रियांची ही काव्यपरंपरा पुढें अनेक शतकें चालू राहिलेली दिसते. हालाच्या ' गाथा-सप्तशती ' ( ख्रि. पू. १ लें शतक ) नांवाच्या काव्य-संग्रहांत आठ कवयित्रींचीं प्राकृत भाषेंत रचलेलीं काव्यें आहेत. अनुलक्ष्मी, असुलब्धी, माधवी, प्रहता, रेवा, रोहा, शशिप्रभा व वद्धावही या त्या आठ कवयित्री होत.

ललितकलांचें शिक्षणहि स्त्रियांना मिळे. विशेषतः संगीत, नृत्य व वादन या कलांकडे स्त्रियांचा विशेष ओढा असे. वैदिक विधींच्या वेळीं जें मंत्रपठन करीत त्यांत स्त्रिया मोठ्या प्रमाणावर भाग घेत. कदाचित् सामवेद-पठनाचा एक भाग म्हणूनहि स्त्रियांना संगीताचें शिक्षण दिलें जात असावें काहीं विशेष धार्मिक समारंभप्रसंगीं स्त्रियांच्या गायनाचा कार्यक्रम करण्याच्या

प्रथेचा उल्लेख ऋग्वेदांत आढळतो ( ९.६६.८ ). महाव्रताच्या वेळीं पत्नीनें गायन व वाद्यवादन करावें अशी प्रथा असे ( ९.५६.३ ). वाजविण्यास अतिशय अवघड अशा कांहीं वाद्यांचा उल्लेख सत्याषाढ श्रौतसूत्र ( १६.६.२१ ), सांख्यायन श्रौतसूत्र ( १७.३.१४ ) लाट्यायन श्रौतसूत्र ( ४.६ ) वगैरेंत आहे ( तालुकवीणा, कांडवीणा, पिछोरा इत्यादि ). लाट्यायन श्रौतसूत्रांत ( ४.२.५ ) असें म्हटलें आहे कीं, पत्न्यांनीं मंत्रपाठकाच्या पश्चिम दिशेस बसावें व आळीपाळीनें वादन करावें. वराह गृह्यसूत्रांत असा उल्लेख आहे की, बुद्धिमान् मुलगे व रूपवती कन्या प्राप्त व्हाव्यात म्हणून वधू दुंदुभी व गोमुख वाजविते. ऋग्वेदांत ( १.९.२.४ ) स्त्रियांच्या नृत्यकलेबाबतच्या स्वाभाविक अभिरुचीचा अनेक ठिकाणीं उल्लेख आढळतो. वक्तृत्वकलेंत स्त्रिया प्रावीण्य संपादन करीत, इतकेंच नव्हे तर समासंमेलनांत व जाहीर चर्चामंडळांत त्या भाग घेत.

आजच्या समतेच्या काळांतहि स्त्रियांना सैन्याच्या निरनिराळ्या शाखांत प्रवेश मिळत नाहीं. पण ऋग्वेदांतील घोषा या विदुषीनें रचलेल्या सूक्तांत ( १०.३९.४० ) दोन स्त्रीयोद्ध्यांचा उल्लेख आढळतो. वध्रिमति व विश्पला या दोघीहि प्रत्यक्ष रणांगणावरील लढाईंत भाग घेत. अशाच एका युद्धाच्या वेळीं वध्रिमतीचे दोन्ही हात तुटले. तिनें अश्विनीकुमारांस प्रार्थना केली व ते प्रसन्न होऊन तिला सुवर्णहस्त प्राप्त झाले. विश्पला ही खेल राजाच्या सैन्यांतील एक अधिकारी होती. शत्रुसैनिकांनीं एकदां तिचा पाय तोडला त्या वेळींहि अश्विनीकुमारांच्या कृपेनें तिला पुन्हां नवीन पाय प्राप्त झाला.

मुद्गलाची पत्नी मुद्गलानी हिच्यावरूनहि वैदिक काळांत स्त्रियांना सर्व प्रकारचें सैनिकी शिक्षण मिळत असे हें सिद्ध होतें. ती युद्धाच्या वेळीं पतीचें सारथ्य करी व शत्रूंचा पाटलाग करून त्यांना पिटाळून लावी. ' शशीयसी ' मध्येंहि ( ऋग्वेद ५.६१.६,९ ) एका लढाऊ आर्य स्त्रीचा उल्लेख आहे.

दस्युसमाजांत स्त्रिया युद्ध करीत, इतकेंच नव्हे तर लढाऊ स्त्रियांची मोठमोठीं पथकें नेहमीं सज्ज असत. एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, "दस्यूंचीं शस्त्रें म्हणजे त्यांच्या स्त्रिया ! असलें सैन्य आमचें काय नुकसान करणार ? "

( ५·३०·९ ). सैन्यांत स्त्रियांना सरसहा प्रवेश मिळत असल्यानें त्या काळीं रणांगणावर स्त्रियांना ठार करण्यांत कांहीं गैर मानलें जात नसे. इन्द्रानें वृत्राच्या बरोबरीनें लढणाऱ्या त्याच्या मातेस (दनूस) ठार केल्याचा उल्लेख ऋग्वेदांत आहे ( १·३२·९ ). पतंजलीच्या लिखाणांत ( ४·१·१५,६ ) 'शाक्तिकी' म्हणजे 'खड्ग धारण करणारी स्त्री' असा जो शब्द आहे त्यावरूनहि स्त्रियांच्या सैनिकी पेशाची कल्पना येऊं शकते.

खि. पू. दुसऱ्या शतकांत झालेल्या वात्स्यायनाच्या कामसूत्रांत स्त्रियांनीं चौसष्ट कलांत अनेक विषयांचा समावेश केलेला आहे. उदा० गायन, क्रीडा, नृत्य, चित्रकला, अलंकार घडविणें, शिवण, काव्य, बागकाम, सुतारकाम, शारीरिक शिक्षण व युद्धकला.

वरील सर्व वृत्तान्तावरून वैदिक व वेदोत्तर कालांत स्त्रियांना कोणतीहि अध्ययनशाखा बंद नव्हती व निरनिराळ्या शिक्षणशाखांत त्या पुरुषांइतकीच चमक दाखवीत हें स्पष्ट दिसून येतें.

### महाकाव्यांच्या कालांतील स्त्रीशिक्षण

१. रामायणकाल :—वैदिक कालांत सुरू झालेली स्त्रीशिक्षणाची उच्च परंपरा सुदैवानें महाकाव्यांच्या कालांतहि चालू राहिली. रामायण व महाभारत या दोन ख्यातनाम महाकाव्यांत शिक्षित स्त्रियांची कितीतरी उदाहरणें सांपडतात. यांपैकीं कांहींचा फक्त थोडक्यांत उल्लेख येथें करतां येईल. रामायणाच्या आदिकाण्डांतील एका श्लोकांत अयोध्येंतील स्त्रियांच्या विविध गुणांचें वर्णन केलें आहे. दशरथ राजाच्या योग्यतेस साजेसें शिक्षण राज्यांतील स्त्रियांना दिलें जाई. निरनिराळ्या ज्या वैदिक विधींत व मंत्रपठनांत स्त्रिया भाग घेत त्यावरून उपनयनाची व अध्ययनाची संधि पुरुषांइतकीच स्त्रियांना मिळे असें दिसून येतें. वनवासानंतर रामचंद्र ज्या वेळीं अयोध्येंत परतले त्या वेळीं त्यांना पहिलें मंगलस्नान घालण्याचा मान कुमारिकांना मिळाला. यावरून अयोध्येंतील कुमारिकांची सद्गुण, शील व पावित्र्य याबाबत केवढी थोर कीर्ति होती हें दिसून येतें. सीता रोज संध्या करीत असे असेंहि वर्णन रामायणांत आढळतें. हनुमानाला जेव्हां सर्व लंकेंत सीता कोठें

सांपडली नाहीं तेव्हां त्यानें नदीतीरावर तिची वाट पहात थांबण्याचा निश्चय केला. कारण नेहमींच्या नियमानुसार ती आपली सायंसंध्या व प्रार्थना करण्यास नदीवर नक्की येईल अशी त्याची खात्री होती ( ५·१४·५०१ ). रामाची माता कौसल्याहि वैदिक यज्ञ करी. वनवासांत जाण्यापूर्वी राम आईचा निरोप घेण्यासाठीं गेला असतांना ती मंत्रपठनानें अग्नीला आहुति देत असलेली त्याला आढळली ( २·२०·१५ ). वालीची पत्नी तारा हीहि वैदिक कर्मकाण्डांत पारंगत स्त्री म्हणून प्रसिद्ध होती. अशा प्रकारें रामायणकालीन स्त्रिया पुरुषांप्रमाणेंच मंत्रपठन व यज्ञयाग करीत असें दिसून येतें. त्याचप्रमाणें खडतर तपश्चर्या व साधना करणाऱ्या तपस्विनीहि रामायणांत आहेत. पुरावा म्हणून मातंग ऋषींची शिष्या श्रमणी शबरी हिचें उदाहरण सांगतां येईल. पंपा सरोवराच्या कांठीं झोंपडी बांधून, वल्कलें परिधान करून व जटा वाढवून शबरी अत्यंत व्रतस्थ वृत्तीनें राही. तिचा परमार्थांतील थोर अधिकार जाणून अनेक ऋषि तिच्यापुढें विनम्र होत ( ३·७४·१०,३२ ).

रामायणांतील वर्णनावरून त्या काळीं स्त्रियांचा सामाजिक दर्जा फार उच्च प्रतीचा व समाधानकारक असे असें दिसून येतें. पत्नी कौटुंबिक जीवनाचा आधारस्तंभ मानली जाई. मातेची भूमिकाहि अतिशय आदरणीय होती. किष्किंधा काण्डांत एके ठिकाणीं असा उल्लेख आहे कीं पत्नी ही पतीचा आत्माच होय ( २४·३८ ). अयोध्याकाण्डांत मातेची खूप स्तुति केलेली आहे.

राजकीय क्षेत्रातहि स्त्री व पुरुष यांचा दर्जा समान होता. ज्या वेळीं रामाबरोबर वनांत जाण्याचा सीतेनें हट्ट धरला त्या वेळीं दशरथाचे गुरु वसिष्ठ यांनीं तिला वनांत न जाता रामाच्या गैरहजेरींत राज्याची धुरा वाहण्याचा आग्रह केला ( २·३७·२३-४ ). यावरून रामायणकालीन स्त्रिया सर्व क्षेत्रांत पुरुषांप्रमाणेंच निपुण असत असें दिसून येईल. तत्कालीन समाज कोणत्याहि कार्यक्षेत्रांत स्त्री अगर पुरुष असा भेद करीत नसे व म्हणूनच रामाच्या गैरहजेरींत सीतेनें राज्य करावें असें वसिष्ठासारख्या विद्वानानें सुचविलें.

२. महाभारतकाल:–' महाभारत ' या शब्दावरूनच असें लक्षांत येतें कीं, रामायणकालापेक्षां या कालांत भारताच्या भौगोलिक मर्यादांचा खूप

विस्तार झाला होता. या कालांतील स्त्रियांसंबंधीं अधिक सविस्तर माहिती मिळूं शकते.

इतर कालखंडांप्रमाणेंच महाभारतकालीन स्त्रियांच्या शिक्षणासंबंधीं येरचसे उल्लेख अप्रत्यक्ष आहेत. महाभारतांतील अनेक सुशिक्षित विदुषी स्त्रियांकडे पाहिल्यास त्या कालांत पुरुषांप्रमाणें स्त्रियांना अध्ययनाच्या सर्व शाखा मोकळ्या होत्या असें सिद्ध होतें. महाभारतकालांतील स्त्रियांवर पुढें दोन स्वतंत्र प्रकरणें घातलेलीं असल्यानें या ठिकाणीं कांहीं त्रोटक उल्लेख देण्याचाच फक्त विचार आहे. वैदिक कालाप्रमाणें या कालांतसुद्धां स्त्रियांचा नैष्ठिक ब्रह्मचर्याचा अधिकार समाजानें मान्य केला होता. सुलभा ही अशाच प्रकारची एक नामवंत ब्रह्मवादिनी होती. योग्य वर न मिळाल्यानें तिनें खडतर साधनेचा मार्ग धरला, देशपर्यटन केलें व शेवटीं मिथिलेच्या जनक राजाकडे ती आली. जनक हा जसा थोर राजा होता तसाच तो एक महान् चिंतनशील तत्त्वज्ञ होता. जनकाकडून परमतत्त्वाचें ज्ञान संपादन करावें हा मिथिलेला येण्यांत सुलभेचा मुख्य हेतु होता. त्यानें तिची कसून चांचणी केली व तिच्या पारमार्थिक अधिकाराची खात्री पटल्यावरच तिला आत्मज्ञानाचा मार्ग दाखविला (१२·३२०). आत्मसाक्षात्काराला पात्र ठरलेली दुसरी तपस्विनी शिवा ही होय (५·१०९·१८·९). शाण्डिल्याच्या कन्येनेंहि आमरण कौमार्य व्रत पाळून ज्ञानसाधना केली (९·५४·६-८). कांहीं विवाहित स्त्रियाहि अतिशय मोठ्या तत्त्वज्ञ होत्या असें दिसून येतें. हरिवंशांत प्रभासाच्या पत्नीचें वर्णन ब्रह्मवादिनी असें केलें आहे. ब्रह्मज्ञान प्राप्त करून घेऊन संन्यस्त वृत्तीनें ती पायीं देशपर्यटन करी व भिक्षेवर उदरनिर्वाह करी. गौतमी ही एक दुसरी अशी ब्रह्मवादिनी होती कीं स्वतःचा एकुलता एक मुलगा सर्पदंशानें निधन पावल्यावर रडत न बसतां तिनें मृत्यूनंतरच्या मानवी जीवनाविषयीं सुंदर विवेचन केलें (१३·१). वसिष्ठ मुनींची पत्नी अरुंधती ही पतीइतकीच ज्ञानसंपन्न म्हणून प्रसिद्ध होती. ती स्वतः उत्कृष्ट विद्यार्थी निवडून त्यांना उच्चशिक्षण देत असे (१३·१३०·२).

महाभारतकालांत पुरुषांप्रमाणें स्त्रियांनाहि वानप्रस्थाश्रम स्वीकारून परमार्थसाधनेसाठीं वनांत जाण्याची मुभा असे. पंडु राजाच्या निधनानंतर

त्याच्या आजीनें आपल्या दोन सुनांसह वानप्रस्थाश्रम स्वीकारला व तेथेंच त्यांनीं परमेश्वरचिंतनांत अखेरपर्यंत कालक्रमणा केली ( १·१२८-१२·३ ). कृष्ण परमात्म्याच्या देहत्यागानंतर त्याच्या सत्यभामादि राण्यांनीं वनवासांत जाऊन खडतर तपश्चर्या केली ( १६·७ ·७४ ).

या सर्व उदाहरणांवरून असें निश्चितपणें सांगतां येईल कीं, महाभारताच्या कालांत स्त्रियांना ब्रह्मज्ञान प्राप्त करून घेण्याची मोकळीक होती. उपनयनविधि व वेदाध्ययन यांचे पूर्ण अधिकार त्यांना होते.

तत्त्वज्ञानाप्रमाणेंच इतर अध्ययनशाखांतहि या काळीं अनेक स्त्रिया नैपुण्य दाखवीत. राजघराण्यांतील स्त्रिया राजकारणांत तर चमक दाखवीतच शिवाय त्यांची परमार्थसाधना व धार्मिक वृत्ति वाखाणण्यासारखी असे. त्याचें अद्वितीय उदाहरण म्हणून आंधळ्या धृतराष्ट्राच्या पत्नीचा-गांधारीचा-उल्लेख करतां येईल. तिची सत्यनिष्ठा इतकी दांडगी होती कीं, युद्धाला जातांना प्रत्यक्ष स्वतःचा पुत्र दुर्योधन आशीर्वाद मागावयास आला असतां तिनें त्याला स्पष्ट नकार दिला व सांगितलें, " यतो धर्मस्ततो जयः "— जिकडे धर्म तिकडेच यश जाणार. यावरून तिची निःस्पृहता दिसून येते. स्वतःच्या मुलांबरोबर ती भर दरबारांत अनेक वेळां महत्त्वाच्या राजकीय प्रश्नांवर चर्चा करी ( ५·१२९ ).

कुंती व द्रौपदी याहि महाभारतातील अत्यंत विद्वान् व सत्त्वशील स्त्रिया म्हणून सांगतां येतील. द्रौपदी-वर्णनांत तिचें पांडित्य व धर्माचरण यांचाच प्रामुख्यानें वारंवार उल्लेख केलेला आढळतो ( १२·१४·४ ). पराजय झाल्यानंतर मुलाला सर्वतोपरी धीर देऊन पुन्हा शत्रूशीं सामना देण्यास सिद्ध करणारी विदुला ही धीरोदात्ततेची मूर्तिच म्हणावी लागेल.

महाभारतांतील अनेक उल्लेखांवरून असें दिसून येतें कीं त्या काळीं मुलींना संगीत, नृत्य व वाद्य या कला शिकविण्याची चाल रूढ होती. विराट राजाची कन्या उत्तरा व तिच्या मैत्रिणी यांना संगीत व नृत्य शिकविण्यासाठीं खास शिक्षक नेमलेले होते ( ३·२३२ ). ययातीची मुलगी माधवी ही नामांकित गायिका म्हणून प्रसिद्ध होती.

या काळांत पुरुष व स्त्रिया दोघांचेंहि शिक्षण प्रायः घरींच होई. प्रत्यक्ष पुरावा देतां आला नाहीं तरी एकूण असें म्हणतां येईल कीं, सुलभे-सारख्या विरळा स्त्रिया आपली परमार्थसाधना करण्यासाठीं गुरुगृहीं जाऊन रहात. सर्वसामान्यतः मुलींना घरींच शिकविण्याची व्यवस्था होई. याबाबत उत्तरा व द्रौपदी यांचा उल्लेख वर आलाच आहे. ज्यांचे वडील पेशानें शिक्षक असत ते अर्थातच आपल्या मुलींना स्वतः शिकवीत. सारांश, महा-भारतकाल हा स्त्रीशिक्षणाच्या दृष्टीनें खूप भरभराटीचा काल होता. सर्व कौटुंबिक व सामाजिक क्षेत्रांत पुरुष व स्त्रिया यांची भूमिका समान असे. स्त्री ही पुरुषाची खरी हितचिंतक व सखी मानली जाई ( १·७४·४१ ). भारतीय समाजांत स्त्रियांचें स्थान आदरणीय असे. त्या सद्‌गुण, सौंदर्य व पावित्र्य यांचे प्रतीक मानल्या जात. स्त्री म्हणजे कुटुंबाचें तेज, आनंद व भूषण अशी भावना असे. या प्रकरणाच्या सुरवातीस मनूचे जे उद्‌गार दिले आहेत, त्याच आशयाचा मजकूर महाभारत १३·३५·५ व ६ यांत आढळतो.

३. जैन व बौद्ध कालांतील स्त्रीशिक्षणः—इतर कालखंडांप्रमाणेंच बौद्ध व जैनांच्या कालांतहि स्त्रियांनीं शैक्षणिक व सांस्कृतिक क्षेत्रांत आपली कीर्ति कायम राखली होती. पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांनाहि मठांत प्रवेश मिळे व तेथें राहून त्यांना कोणत्याहि शास्त्राचें अध्ययन मनाप्रमाणें करतां येई. बौद्ध व जैन धर्मीयांनीं जगांत सर्वकडे जात, पंथ अगर लिंग-भेद यांचा विचार न करतां सर्वांच्यासाठीं जी उच्च शिक्षणाची पद्धति आंखली त्याबद्दल सर्व मानवजातच त्यांची ऋणी राहील. बौद्ध मठांत राहून अनेक स्त्रियांनीं अध्ययन केलें व त्यापैकीं पुष्कळांनीं व्रतस्थ धार्मिक आचरण पत्करून इतरांना प्रेम व विश्वबन्धुत्व यांचा संदेश देण्यासाठींच आपलें जीवन व्यतीत केलें.

जैनांच्या चोवीस तीर्थंकारांपैकीं शेवटचा महावीर अतिशय उदार-मतवादी होता. त्याच्या धर्मपंथांत स्त्रियांना केव्हांहि प्रवेश मिळे. आपल्या अनुयायांचे त्यानें चार भाग पाडले होते. (१) साधु ( धर्मगुरु-भिक्षु ), (२) साध्वी ( भिक्षुणी- संन्यासिनी ), ( ३ ) श्रावक ( सामान्य पुरुष ) व ( ४ ) श्राविका ( सामान्य स्त्रिया ). कालांतरानें दिगंबर व श्वेतांबर असे दोन उप-पंथ जैन धर्मांत निर्माण झाले. यांपैकीं दिगंबरपंथीयांचें मत असें कीं, स्त्रिया

मोक्षास पात्र नाहीत. यासाठीं त्यांना जैन धर्माची दीक्षा देऊं नये. पण श्वेतांबरपंथीय असा भेद करीत नाहीत. स्त्रिया व पुरुष हे दोघेहि सारख्याच प्रमाणांत मोक्षाचे अधिकारी आहेत, असें मानून दोघांनाहि धर्माची दीक्षा घेण्याची मोकळीक श्वेतांबर पंथानें ठेवली आहे. जैन धर्माच्या शिकवणीनुसार संसार सोडून मोक्षमार्ग चोखाळणाऱ्या स्त्रियांची संख्या छत्तीस हजार असून अशा पुरुषांची संख्या फक्त चौदा हजार आहे. महावीराची पुतणी (कांहींच्या मतें मावशी) चंदना ही अतिशय तेजस्वी संन्यासिनी म्हणून प्रसिद्ध होती. संन्यासिनींच्या समूहांत राणीपासून (पोमावई) तों सामान्य स्त्रियांपर्यंत सर्वांचा समावेश झालेला असून त्यांना श्रेष्ठ स्त्रिया असेंहि म्हणत. इतक्या पुराण कालांतहि जैनधर्मीय लोक अतिशय सुधारलेले होते. त्यांनीं शिक्षणांत किंवा धर्मसाधनेंत स्त्री व पुरुष हा भेद केव्हांच केला नाहीं.

गौतम बुद्धाकडे त्याची मावशी महाप्रजापती ही अनेक स्त्रियांसमवेत तीन वेळां गेली व त्या सर्वांनीं बौद्धधर्मांत व मठांत स्त्रियांना प्रवेश देण्याबद्दल गौतमास विनंती केली. तीनहि वेळां त्यानें ही विनंती अमान्य केली. शेवटीं बुद्धाचा आवडता शिष्य आनंद यानें प्रभावी मध्यस्थी करून स्त्रियांना बौद्ध धर्माची दीक्षा देण्यास त्याची परवानगी मिळविली. पण बुद्धाला स्त्रियांच्या पारमार्थिक सामर्थ्याविषयीं शंका वाटत होती असा कोठेंहि प्रत्यक्ष उल्लेख नाहीं. एका उपदेशपर ग्रंथांत बुद्धानें असें म्हटलें आहे कीं, " स्त्री असो अगर पुरुष असो, दोघांनाहि एकाच रथांतून निर्वाणाचा प्रवास करतां येईल व निर्वाणपद प्राप्तहि करून घेतां येईल. ( The Book of the Kindred Sayings, Part I. Page 45. )

वरील विवेचनावरून बौद्ध व जैन कालांत शिक्षण व परमार्थसाधना याबाबत स्त्रियांना पुरुषांइतकेंच स्वातंत्र्य असे, असें निश्चित दिसून येईल. या संधीचा स्त्रिया कसा फायदा करून घेत याचा एकच पुरेसा पुरावा द्यावयाचा झाल्यास 'थेरीगाथेचा' निर्देश करतां येईल. या गाथेंत एक्काहत्तर उत्कृष्ट भक्तिगीतांचा समावेश केलेला आहे व त्यांतील प्रत्येक गीत आपल्या काव्यगुणांनीं वाङ्मयांत अमर झालेलें आहे. ही भक्तिगीतें रचणाऱ्या सर्व स्त्रिया शास्त्रपारंगत व श्रेष्ठ दर्जाच्या कवयित्री होत्या.

प्रत्येक गीताचा आशय एकच व तो म्हणजे बौद्ध धर्मतत्त्वांचें विवेचन व त्यासंबंधींची परमनिष्ठा. निर्वाणाचें स्वरूप व निर्वाणाप्रत जाण्याचा मार्गहि या कवयित्रींनीं सांगितला आहे. यांपैकीं कांहींनीं संसारांतील संकटांना व दुःखांना वैतागून बौद्ध धर्माचा व संन्यासमार्गाचा अवलंब केलेला असेल, पण इतर अनेक स्त्रिया अशा दाखवितां येतील कीं त्यांना निसर्गतःच सुखोपभोगांचें आकर्षण वाटलें नाहीं. जीवनाचा खरा अर्थ शोधण्याच्या तळमळींतून त्यांनीं बौद्ध मठाकडे धाव घेतली व संन्यस्त वृत्तीनें आमरण परमार्थसाधना केली. उदा. थेरीगाथेंतील सतराव्या गीताची रचनाकर्त्री धम्मा हिचें वैवाहिक जीवन सुखी असूनहि ती त्यांत रंगूं शकली नाहीं. मठप्रवेश करण्यास पतीची अनुमति मिळेना म्हणून त्याच्या निधनानंतर तिनें बौद्ध धर्माची दीक्षा घेतली. अनोपमा ही अतिशय सुंदर व श्रीमंत होती. लग्नासाठीं तिला अनेकांनीं मागण्या घातल्या. पण तिनें स्वेच्छेनें आजन्म कौमार्यव्रत पाळून निर्वाण-साधना केली (श्लोक १५५). गुत्ता (श्लोक १६३) व रोहिणी (श्लोक २७१) या श्रीमंत व सर्वगुणसंपन्न स्त्रिया असूनहि त्यांनीं विवाहास नकार दिला. स्वतः बौद्ध धर्माची दीक्षा पत्करून त्यांनीं आपल्या मातापित्यां-नाहि बौद्ध धर्म स्वीकारावयास लावले (श्लोक २८८).

थेरीगाथेच्या बऱ्याचशा लेखिका नामवंत शिक्षिका, धर्मोपदेशिका व सामाजिक कार्यकर्त्या म्हणून प्रसिद्ध होत्या. यांपैकीं धम्मदिन्ना हिची धर्मो-पदेशिका (धम्मकथिका) म्हणून सर्वकडे फार ख्याति होती. तिच्या पतीनेंच कांहीं प्रश्न विचारल्यावरून तिनें एकदां बौद्ध तत्त्वज्ञानावर जें प्रवचन केलें त्याची स्वतः गौतम बुद्धांनीं फार स्तुति केली. सुक्का हीहि एक नामवंत प्रवचनकार होती. मोठमोठ्या समुदायापुढें आपल्या रसाळ व गोड वाणीनें बौद्ध धर्माचें विवरण करण्याबद्दल तिची मोठी ख्याति होती. थेरीगाथेंत लिहिणाऱ्या 'पटाचारा' हिनें आपल्या लोभस वाणीनें सुमारें ५०० स्त्रियांना बौद्ध धर्माची दीक्षा देऊन निर्वाणाचा मार्ग दाखविला. यांतील पुष्कळशा स्त्रिया प्रिय पुत्रांच्या निधनामुळें दुःखीकष्टी झालेल्या होत्या (थेरी-गाथा ११२). आणखी तीस स्त्रियांचें तिनें असेंच मतपरिवर्तन केलें. बौद्ध तत्त्वज्ञानाचा आपल्या प्रभावी वाणीनें प्रसार करणारी आणखी एक नामवंत स्त्री म्हणजे बिंबिसार राजाची पत्नी खेमा ही होय. खेमा व उप्पलवण्णा या दोघीहि

इतरांनीं आदर्श म्हणून पुढें ठेवण्याजोग्या धर्मोपदेशिका असल्याचें खुद्द गौतम बुद्धानें म्हटलें आहे. खेमानें एकदां पसेनदी राजापुढें मृत्यूनंतरच्या जीवाच्या अवस्थेवर व्याख्यान केलें आणि आश्चर्य असें कीं, प्रत्यक्ष गौतमाच्या याच विषयावरील व्याख्यानाशीं खेमाचें व्याख्यान शब्दशः जुळलें. थुल्लनंदाच्या प्रवचनावर खूप होऊन पसेनदीनें तिला आपला राजवेश बहाल केला. विनय-पीटकाच्या चौथ्या विभागांत एक नामवन्त धर्मोपदेशिका व उत्कृष्ट पाठक ( भाषिका ) म्हणून थुल्लनंदेचा उल्लेख केला आहे. अशाच तऱ्हेचा स्तुतिपर उल्लेख भद्दा कपिलानीसंबंधींहि आढळतो. " द बुक ऑफ द ग्रॅज्युअल सेइंग्ज् " या पुस्तकांत एके ठिकाणीं असें नमूद केलें आहे कीं, कजंगला हिनें बुद्ध अथवा त्याच्या शिष्यांच्या तोंडून एकदांहि प्रवचन न ऐकतां ती बुद्धाचीं धर्मतत्त्वें इतरांना उत्कृष्टपणें समजावून सांगे. गौतमाच्या कानांवर तिची कीर्ति गेली तेव्हां त्यानेंसुद्धां तिजबद्दल धन्योद्गार काढले. भद्दा कुंडलकेशा हिनें अनेक वर्षें प्रवास करून प्रत्येक ठिकाणच्या तज्ज्ञ गुरूकडे अध्ययन केलें. तिला वादांत एकटा सारिपुत्तच हरवूं शकला. प्रत्यक्ष गौतमाशीं विद्वत्तापूर्ण चर्चा करणाऱ्या स्त्रियाहि पुष्कळ होत्या. सुमना व चंडी या दोन राजकुमारींनीं गौतमाशीं भिक्षा देण्याच्या तत्त्वांवर व नैतिक वर्तनाच्या पांच तत्त्वांवर वाद घातला होता.

वरील सर्व उदाहरणांवरून बौद्ध धर्माच्या कालांतील स्त्रियांची बौद्धिक व आध्यात्मिक क्षेत्रांत किती प्रगति झाली होती हें दिसून येईल.

### आद्यस्मृतिकालांतील स्त्रियांचें शिक्षण

अनेक सामाजिक व राजकीय कारणांनीं स्मृतिकालाच्या सुरवातीसच स्त्रीशिक्षणाचा दर्जा खालावलेला दिसतो. या सर्व कारणांची सविस्तर चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे. पण वेदाध्ययनाची व अध्ययनाच्या उच्च शाखांत प्रवेश मिळण्याची सवलत स्त्रियांना ठेवूं नये असें मत रूढ होऊं लागलें. अर्थात् स्त्रियांचें शिक्षण पूर्णपणें बंद पडलें असें समजणें मात्र चुकीचें होईल. ही गोष्ट स्मृतिकालांत मातेला दिलेल्या महत्त्वावरून स्पष्ट होईल. मनूनें लिहिलेली सर्वांत जुनी स्मृति-संहिता स्त्रियांच्या स्तुतिपर काय उद्गार काढते हें आपण पूर्वी पाहिलेंच आहे. दुसऱ्या एका ठिकाणीं मनु-स्मृति असें म्हणते

कीं "दहा पगारी शिक्षकांपेक्षां (उपाध्याय) एक आध्यामिक गुरु (आचार्य) श्रेष्ठ, शंभर आचार्यांहून पिता श्रेष्ठ व हजार पित्यांपेक्षां मातेची योग्यता अधिक आहे (२·१४५-६).

अत्रिस्मृतीमध्यें (१४) असें म्हटलें आहे कीं, "माता ही सर्वांत श्रेष्ठ गुरु आहे." बलात्कार झालेल्या स्त्रियांबद्दलहि या स्मृतीचा दृष्टिकोन अतिशय सहानुभूतीचा आहे. अशा स्त्रिया निर्दोष समजाव्यात व त्यांना समाजानें वाळींत टाकूं नये असा स्पष्ट अभिप्राय अत्रिस्मृतीनें दिला आहे (१८८). याज्ञवल्क्य व पराशर स्मृतींतहि स्त्रियांबद्दल अशाच तऱ्हेचें मत व्यक्त केलें आहे (याज्ञवल्क्यस्मृति ७१ व पराशरस्मृति २४-५). या सर्व स्मृतींत स्त्रियांच्या शिक्षणाबद्दल प्रत्यक्ष कोठेंहि उल्लेख नाहीं. परंतु स्त्रियांबद्दलचे जे आदराचे उद्‌गार ठिकठिकाणीं काढलेले आहेत त्यावरून घरच्या घरीं जमेल तेवढें शिक्षण घेण्यास स्मृतिकारांचा विरोध नसावा येवढें अनुमान काढण्यास हरकत नाहीं. जातकर्मापासून उपनयनापर्यंत सर्व संस्कारांचें वर्णन करून शेवटीं मनु असें म्हणतो कीं, हे संस्कार मुलींनाहि करावेत. पण मुलींच्या संस्कारास वैदिक मंत्रांची गरज नाहीं. विवाह हा एकच संस्कार समंत्रक करून घेण्याचा स्त्रियांना अधिकार आहे (मनुस्मृति २-६६-७). यावरून असें म्हणतां येईल कीं, वैदिक पद्धतीनें मुलींचें उपनयन स्मृतिकालीं बंद झालें होतें तरी कोणत्यातरी स्वरूपांत हा विधि करून मुलींना त्यानंतर शिक्षण घेतां येई.

आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून वैदिक व वेदोत्तर कालांत स्त्रियांचा अध्ययनाचा अधिकार व सामाजिक दर्जा अतिशय समाधानकारक होता असें दिसून येईल. स्मृतिकालाच्या सुरुवातीपासून हळूहळू स्त्रियांना वाईट दिवस येऊं लागले. धार्मिक वाङ्मयांत व कायद्याच्या ग्रंथात कांहीचाहि आधार नसलेल्या अनिष्ट रूढि त्यांच्यावर लादल्या जाऊं लागल्या. अध्ययनबंदी, बालविवाह, वडिलार्जित संपत्तींत हिस्सा न मिळणें, सती जाण्याची सक्ती अशा एकापाठोपाठ एक आपत्तींनीं भारतीय स्त्रीजीवन बरबाद केलें. मध्यंतरीच्या अंधारयुगातहि स्त्रियांनीं आपला सांस्कृतिक विकास व नैतिक निष्ठा कायम ठेवल्या आणि कौटुंबिक जीवनांतील आपलें मानाचें

स्थान अबाधित राखलें. महानिर्वाण तंत्रांत असें स्पष्ट म्हटलें आहे की (८·४७) " संवर्धन व शिक्षण यावाबत मुलगा व मुलगी हा भेद केव्हांहि करूं नये. "—कन्याप्येवं पालनीया शिक्षणीयातियत्नतः। काव्यमीमांसेंत प्रसिद्ध कवि राजशेखर असें ठासून सांगतो कीं, " पुरुषवत् योषितोऽपि कवीभवेयुः, संस्कारो ह्यात्मनि समवैति, न स्त्रैणं पौरुषं वा विभागं अपेक्षते। श्रूयन्ते दृश्यन्ते च राजपुत्र्यो महामात्यदुहितरो गणिकाः कौतुकि भार्याश्च शास्त्र-प्रहतबुद्धयः कवयश्च।" (पान ५३)—पुरुषांप्रमाणें स्त्रियाहि प्रतिभावंत कवयित्री असूं शकतात. कोणता गुण सुप्तावस्थेंत कोणामध्यें असेल हें लिंग-भेदावर अवलंबून नाहीं. इतिहासांत असें दिसतें कीं राजकुमारी, अमात्यकन्या, गणिका व भार्या यांपैकीं कोणत्याहि भूमिकेवर असणाऱ्या कित्येक स्त्रिया विदुषी होत्या, त्यांनीं धर्मग्रंथांचें अध्ययन केलें होतें व त्या उत्कृष्ट कवयित्रीहि होत्या. अशा प्रकारें मानवी संस्कृतीच्या सुरुवातीपासूनच भारतीय स्त्रिया अनेक अध्ययनशास्त्रांत व कलाक्षेत्रांत चमकल्या आहेत आणि ही उज्ज्वल परंपरा त्यांनीं अनेक शतकें कायम राखली आहे. महाभारतकारांनीं म्हटलेंच आहे कीं, " नित्यं निवसते लक्ष्मीः कन्यकासु प्रतिष्ठिता।" स्त्रीच्या व्यक्तिमत्त्वांत भाग्य व तेज यांचें अनुपम मीलन नेहमींच आढळतें. कालिदासानेंहि स्त्रियांसंबंधीं " कन्येयं कुलजीवितम् " असें गौरवोद्गार काढले आहेत (कुमारसंभव ६·६३). भारतीय मनोवृत्तीबद्दल वरवर कितीहि गैरसमज असले तरी प्रत्येक भारतीयाच्या मनांत स्त्रियांबद्दल फक्त नितान्त आदरच दिसता.

---

# प्रकरण ५ वें

## आधुनिक भारतांतील स्त्रियांचें स्थान

### सामाजिक परिवर्तन

आधुनिक भारतांतील स्त्रियांचा दर्जा व सामाजिक स्थान अजमावण्यापूर्वी गेल्या कांहीं शतकांतील स्त्रियांच्या आकांक्षा व त्यांची फलश्रुति यांचा संगतवार इतिहास अभ्यासिला पाहिजे. त्याखेरीज आजच्या स्त्रीच्या यशापयशाचें मूल्यमापन करतां येणार नाहीं. यापूर्वीच्या प्रकरणांत अशाच तऱ्हेचा थोडाफार प्रयत्न करण्यांत आला आहे.

भारतीय समाजाची मूल प्रकृति आध्यात्मिक. परंतु या प्रवृत्तीशीं विसंगत अशा ऐहिक सुख व भोगप्रधान प्रवृत्तीच्या लोकांनीं भारतावर शेकडों वर्षे राजकीय प्रभुत्व गाजविल्यानें या राज्यकर्त्यांच्या मनोवृत्तीचे परिणाम येथील समाजावरहि झाले. आमचे जगन्मान्य तत्त्वज्ञ समाजाला अधोगतीपासून वांचवूं शकले नाहींत. याचें कारण समाजानें त्यांनीं पुरस्कारलेल्या तत्वांचा पाठपुरावा केला नाहीं. आचरण शुद्ध ठेवलें नाहीं व जुन्या उपयुक्त रूढींचा आदरहि केला नाहीं. राजकीय पारतंत्र्यामुळें भारतीयांवर ओढवलेली आर्थिक संकट-परंपरा हीहि त्यांच्या ऱ्हासास कारणीभूत झाली. स्वतःच्या गलितधैर्य व तेजोहीन पतिपुत्रांकडे पाहून स्त्रियांना निराशा वाटे, म्हणूनहि कदाचित् त्यांनीं पाश्चात्त्य स्त्रियांच्या जीवनाकडे आशेनें दृष्टि लावली असेल ! परकीय सत्तेच्या जुलमानें आमच्या पुरुषवर्गाचें शौर्य व स्वाभिमान पूर्णपणें नष्ट झालेला होता. भूतकालीन सहनशीलता, विनम्र वृत्ति व भक्ति या गुणांवरील स्त्रियांचीहि श्रद्धा डळमळली होती.

भारतीय स्त्रियांचा धर्म आज शतकानुशतके त्यांच्या रक्तांत मुरला आहे. दैनंदिन जीवनांतील कर्तव्यकर्मांत त्यांच्या प्रत्येक सहजप्रवृत्तीचें उदात्तीकरण झालेलें दिसून येतें. पण गतकालांतील सुरक्षिततेची भावना हळूहळू नाहींशी होत चालली. एकेका महायुद्धानें सर्व नैतिक व सामाजिक मूल्यें

मुळापासून उपटून काढलीं. मोठमोठे दुष्काळ जातीय वैमनस्य, आर्थिक क्रांति व सत्ताधीशांचें जीवनतत्त्वज्ञान या सर्वांचा भारतीय स्त्रीजीवनावर गंभीर परिणाम घडून आला. आज अनेक विचारवंतांच्या मतें स्त्रियांची जी अधोगति झालेली दिसते तिची कारणपरंपरा ही अशी आहे. तरी एक गोष्ट अशी लक्षांत ठेवली पाहिजे कीं, एखाद्या समाजाचे उपजत गुण फारसे बदलत नाहींत. वरवर दिसणाऱ्या या वैचारिक घसरगुंडींतूनहि भारतीय स्त्रियांची थोरवी अधूनमधून प्रगट होतांना दिसते. पाश्चात्त्य राजकीय तत्त्वज्ञानाचें स्वरूप फार भिन्न आहे. ऐहिक सुख हेंच साध्य, भोगप्रधान प्रवृत्ति व त्यासाठीं लागणाऱ्या संपत्तीची पूजा व जेवढे देश पादाक्रांत करतां येतील तेवढे करून त्यावर राजकीय प्रभुत्व गाजविण्याची दुर्दम्य आकांक्षा, हे पाश्चात्यांचे कांहीं स्वभावविशेष म्हणून सांगतां येतील. भारतीयांची नैतिक मूल्यांवरील असीम श्रद्धा व ऐहिक जगांतील सुखाबद्दलची त्यांची सर्वसामान्य बेफिकीर वृत्ति यामुळें राजकीय क्षेत्रांत त्यांच्यावर भ्याडपणाचा व निष्क्रियतेचा आरोप केला जातो. परंतु खरें पाहिल्यास या मनोवृत्तीमुळेंच भारतीय स्त्रिया इतक्या संकटास तोंड देऊनहि शांततेच्या प्रमुख पुरस्कर्त्या ठरल्या आहेत.

भारत हा एक गतिशून्य स्थित्यात्मक, अप्रगत देश म्हणून ओळखला जातो. तरीहि इतर सर्व देशांप्रमाणें या देशांतहि गेल्या एक-दोन शतकांत अनेक परिवर्तनें झालीं आहेत. आपल्या मागच्या पिढ्या श्रीमंत नसल्या तरी त्यांना जरूर तेवढे आर्थिक स्वास्थ्य लाभूं शकलें. पण आजची अर्थव्यवस्था इतकी निकृष्ट झाली आहे कीं पोट भरण्यासाठीं स्त्रिया व पुरुष दोघांनाहि आपल्या सर्व शक्ति वेंचाव्या लागत आहेत. अर्थातच इतर सामाजिक मूल्यांवरहि या आर्थिक अव्यवस्थेचा गंभीर परिणाम घडून आलेला दिसतो. कांहीं अपवादात्मक पुराणमतवादी कुटुंबें सोडल्यास सर्वसामान्य शिक्षित स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीनें अर्थार्जनासाठीं घराबाहेर पडलेल्या दिसतात. भुकी जनतेच्या आरोळ्यातून स्वातंत्र्ययुद्धाचा उगम झाला व हिंद व पाकिस्तान यांच्या फाळणीनें या स्वातंत्र्यसमरास अखेर गालबोट लावलें. मिळालेल्याचा आनंद मानावा कीं देशाचे कृत्रिम रीतीनें तुकडे तोडले गेल्याचें दुःख करावें हेंच लोकांना कळेनासें झालें. उघडेंनागडें दारिद्र्य निर्लज्जपणानें सर्वकडे वावरूं लागलें. ज्या कोमलांगी स्त्रियांचें नखहि इतरांना दिसूं

नये, त्या रस्त्यावरून आजूबाजूच्या लोकांची उपेक्षा व टीका सहन करीत नोकरीसाठीं कित्येक मैल रखडत जाऊं लागल्या. समाजाची पूर्वापार चालत आलेली संकोचाची, लज्जेची व मर्यादेची घडी पार विस्कटली आणि पन्नास वर्षांच्या स्त्रीविमोचनानें जें साधलें नाहीं ते दहा वर्षांच्या दुष्काळ व आर्थिक चणचणीनें साधलें. स्त्रिया व पुरुष यांनीं एकमेकांशीं मोकळेपणानें बोलण्याचालण्याबद्दल आतां कोणीहि टीका करीत नाहीं.

स्वातंत्र्यानंतरच्या काळांत जे सामाजिक बदल घडून आले ते दक्षिणेपेक्षां उत्तरेकडे अधिक क्रान्तिकारक ठरले. मुसल्मानी साम्राज्याचा प्रभाव उत्तर भारतावर अनेक वर्षें होता. त्यामुळें उत्तरेंत पडदापद्धति पूर्णपणें रुजली होती. दक्षिणेकडे मुसल्मानी राज्यकर्त्यांच्या कल्पनांना कधींच फारसा थारा न मिळाल्यामुळें तिकडील स्त्रिया पूर्वींपासूनच अधिक मोकळेपणानें समाजांत वावरत. गेल्या १५–२० वर्षांत उत्तरेकडील पडदापद्धति झपाट्यानें नाहींशी होत आहे. इ. स. १९२९ सालीं पास झालेल्या शारदा कायद्यानें चौदा वर्षांखालील मुलींचें विवाह सर्रास होणें तरी मुष्किलीचें झालें. विवाहाचें वय जसजसें पुढें ढकललें गेलें तसतशा मुलींच्या प्राथमिक व दुय्यम शिक्षणांच्या शाळा अधिक लोकप्रिय होऊं लागल्या व उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींची संख्याहि हळूहळू वाढूं लागली.

एक गोष्ट मात्र खरी कीं निव्वळ कायदे करून स्त्रियांची स्थिति सुधारणार नाहीं. त्यांना स्वतःलाच त्यांच्या सुधारणेची, मानाची व जबाबदारीची जाणीव व्हावयास हवी. इ. स. १९०४ मध्यें सिस्टर निवेदिता यांनीं लिहिलेल्या " Web of Indian Life " या पुस्तकांत भारतीय स्त्रियांवर असा शेरा मारला आहे कीं, एकदां सैपाकघरांतील काम उरकलें कीं चार दोन शेजारणी जमवून गप्पा मारण्याखेरीज स्त्रियांना कांहींच उद्योग नसतो. कांहीं जणी प्रार्थनेंत कालक्रमणा करतात. एका दृष्टीनें आपलें आर्थिक संकट हें उपकारकच ठरलें असें म्हणावयास हवें. कारण गरजेमुळें का होईना स्त्रियांना श्रमाचें मोल समजूं लागलें. आवडीचें शिक्षण घेण्यासाठीं व त्यानंतर व्यवसाय निवडण्यासाठीं सरकारनें समान संधि स्त्रियांना उपलब्ध करून दिल्या. आज वैद्यक, कायदा, स्थापत्य, राजकारण, व्यवस्थापन, वैयक्तिक चिटणिशी,

वगैरे क्षेत्रांतून स्त्रिया चमकूं लागल्या आहेत. कांहीं अतिशय कर्तृत्ववान् स्त्रियांनीं राज्यपालासारखी जबाबदारीची जागाहि भूषविली आहे. अनेक स्त्रिया उच्च शिक्षणासाठीं परदेशीं जात आहेत. अर्थात् या नामवंत स्त्रिया अजून नियमापेक्षां अपवादाच्याच सदरांत पडतात. शेंकडों सामान्य स्त्रिया आजहि फक्त ' चूल व मूल ' याच जगांत वावरत आहेत. त्यांच्या तोंडावरील कापडाचा बुरखा निघाला तरी अज्ञानाचा बुरखा कायम आहे. विशेषतः पंजाब व बंगालमध्यें हजारों निर्वासित स्त्रिया अशा दिसतात कीं त्यांनीं कोणत्याहि व्यवसायाचें पद्धतशीर शिक्षण घेतलेलें नसल्यानें शिवण व भरतकाम, घरकाम, हॉटेलांतील हुजऱ्या किंवा कांहीं किरकोळ पदार्थांची विक्री करीत त्यांना दारोदार हिंडावें लागत आहे. येवढें करूनहि पोटापुरते पैसे मिळण्याची मुष्किलच ! देशांत सदासर्वकाळ मजूर व कामगारांचा एक गरीब वर्ग असा असतो कीं त्यांच्या स्त्रियांना शेतावर, कारखान्यांत अगर खाणींवर पुरुषांच्या बरोबरीनें काबाडकष्ट करूनच गुजराण करावी लागते. पण पिढ्यान्‌पिढ्या ह्याच निकृष्ट परिस्थितींत राहिल्यानें सुखी भूतकाळाचा विषाद अगर भविष्यकाळाबद्दल अपेक्षा या दोन्हींहि भावनांनीं त्यांना दुःख होत नाहीं. मध्यमवर्गाची आजची आर्थिक दैना फारच अनुकंपनीय आहे. स्वातंत्र्य मिळेपर्यंत हा वर्ग खाऊनपिऊन सुखी होता. त्यामुळें आजची ओढाताण त्यांना अधिकच जाचक होत आहे.

गेल्या पिढींतील मध्यमवर्गीय स्त्री गृहकृत्यांत दक्ष, सासूसासऱ्यांच्या आज्ञेंत वागणारी, पतिसेवेंत तत्पर आणि मुलांच्या संगोपनांत व कर्तव्यांत नेहमीं चूर असायची. देवधर्म, व्रतवैकल्यें व तुळशीची पूजा हाहि तिच्या दिनक्रमांतील एक महत्त्वाचा भाग असे. लेखन-वाचनाचा तिला फारसा संपर्क नसे. वाचलेच तर धार्मिक ग्रंथ व लिहिलाच तर जमाखर्च ! शतकानुशतकें तिच्या मनाची ठेवणच अशी घडलेली कीं पतीच्या सुखदुःखाशीं समरस व्हावें, प्रेमळपणानें सर्वांचें हवें नको पहावें, देवाची भक्ति करावी व नियतीवर सर्व आयुष्याचा भार टाकून स्वस्थ चित्तानें कालक्रमणा करावी. घराबाहेरच्या जगांत पाऊल घालण्याची कल्पनाहि तिला कधीं शिवली नाहीं. घराबाहेर पडून नोकरीधंदा करण्यापेक्षां तिनें मरणहि पत्करलें असतें.

पण काळाची कलाटणी इतकी जोरदार होती कीं तींत सर्व जीवनमूल्यें वाहून गेलीं. स्त्रियांच्यांत घडून आलेला सध्यांचा बदल हा बऱ्याच अंशीं

परिस्थितीनें त्यांच्यावर लादला गेला आहे व त्यामुळें आजची सुधारणा भक्कम पायावर उभारलेली आहे असें म्हणतां येत नाहीं. आज अनेक अर्धशिक्षित स्त्रिया रोजंदारीवर व्यवसाय करीत आहेत. त्यांना पुन्हां जुन्या पद्धतीच्या गृहजीवनांत जाण्याची सतत ओढ वाटते. पण ज्या समाधानवृत्तीनें त्या पूर्वी परतंत्र जीवन जगल्या तें समाधान, पुन्हां तशीच परिस्थिति निर्माण झाली तरी त्यांना लाभणार नाहीं. कारण त्यांनीं आतां अर्थार्जनाची चव चाखली आहे. जोंपर्यंत स्त्रिया अन्नवस्त्रासाठीं पुरुषांवर अवलंबून आहेत व जोंपर्यंत घर-कामाचा अंतर्भाव अर्थोत्पादक कामांच्या यादींत केला जात नाहीं तोंपर्यंत खऱ्या अर्थानें स्त्रिया बंधमुक्त झाल्या असें म्हणतां येणार नाहीं. स्त्रियांनीं मानानें जगावें व त्यांना समाजांत स्वतंत्र स्थान असावें अशी प्रामाणिक इच्छा बाळगणाऱ्यांनीं स्त्रियांना असें शिक्षण दिलें पाहिजे कीं त्यायोगें त्यांना स्वतंत्र बौद्धिक जीवन लाभेल, वेळप्रसंगीं त्या स्वतःच्या पायांवर उभ्या राहूं शकतील व त्यांच्या हक्कांची त्यांना सतत जाणीव राहील. आज भारतांत पुरुषांनाहि मोफत प्राथमिक शिक्षण मिळण्याची व्यवस्था नाहीं, मग स्त्रियांच्या शिक्षणाची काय अवस्था असेल त्याची कल्पनाच केलेली बरी !

स्त्रियांच्या आर्थिक व शैक्षणिक स्थितीचा विचार करतांना भारतीय कायद्यांतील स्त्रियांच्या भूमिकेचा विचार करणें आवश्यक आहे. निव्वळ भविष्य-काळांतील अन्नवस्त्राच्या तरतुदीसाठीं तरी लग्न करणें हा एकच मार्ग आज सामान्य स्त्रियांपुढें आहे. लग्न केल्यावर हा प्रश्न तरी कायमचा समाधानकारक-रीतीनें सुटतो का, याचें उत्तर हमखास होकारार्थी देतां येत नाहीं. कारण कायद्यानें पुरुष पुनर्विवाह करूं शकतो व नंतरहि पहिली पत्नी जर त्याच्या घरीं राहिली तरच तिला अन्नवस्त्र देण्यास पति बांधलेला राहतो. कुटुंबांतील सर्व चीजवस्त व मुलांची मालकीहि पतीकडेच जाते. फक्त ‘ स्त्रीधन ’ या सदरांत येणाऱ्या वस्तूंची पत्नी मालकीण राहते. पति पत्नीस घरांतून घालवून देऊं शकतो. पण कितीहि अन्याय झाला तरी पत्नी विवाहविच्छेद करूं शकत नाहीं. सामान्यतः पत्नीबद्दल पतीच्या मनांत प्रेम व आदर याच भावना असतात. घराचीं सर्व सूत्रें पत्नीच्या हातीं असतात. पण दुर्दैवानें जेथें पति असमंजस असेल तेथें मात्र पत्नीला कायद्याचा आधार घेऊन कांहींच उपाययोजना आज करतां येत

नाहीं. आजकाल असे दिवस आले आहेत कीं एक पत्नी व मुलें यांच्या पोषणाचा भारहि कुटुंबप्रमुखास झेपत नाहीं. त्यामुळें द्विभार्यापद्धति दृष्टरींच दाखल झालेली आहे. पण मुद्दा येवढाच कीं जर पुरुष बेजबाबदारपणें वागला तर हिंदु विवाहाचा कायदा स्त्रीला पुरेसें संरक्षण देऊं शकत नाहीं.

भारत हा एकविध देश नाहीं. अनेक भाषांचे व वंशांचे लोक या ठिकाणीं स्थायिक झालेले आहेत. पायजमा घालणाऱ्या पुरुषी थाटाच्या शीख स्त्रीत व जुन्या पद्धतीची साडी परिधान करणाऱ्या विनम्र बंगाली तरुणींत बाह्यदर्शनी काडीचें साम्य आढळणार नाहीं. गोऱ्यापान, निळ्या डोळ्यांच्या, नाजूक काश्मिरी सुंदरीची कृष्णवर्णीय मद्रासी स्त्रीशीं तुलना करतां येणार नाहीं. या सर्वांच्यांत आर्थिक परिस्थितीपासून तों आहारापर्यंत सर्व बाबतींत भिन्नता दिसून येते. असें असलें तरी या सर्व भिन्न भिन्न समाजांना एकाच वैदिक संस्कृतीनें एकत्र आणलें आहे. अनासक्तियोग, भक्ति, सेवा, कर्तव्य वगैरे गुण प्रत्येक भारतीय स्त्रीच्या रक्तांत अनादि कालापासून मुरलेले आहेत. मग ती स्त्री कोणतीहि भाषा बोलो किंवा कोणताहि वेष परिधान करो ! दक्षिणेकडे व उत्तरेकडील डोंगराळ भागांत मातृप्रधान पद्धतीच्या कांहीं जमाती आहेत. पण त्या अगदीं किरकोळ बोटावर मोजण्याइतक्या. भारतांतील बहुसंख्य स्त्रियांनीं मातृपद व पत्नीपद या स्त्रीच्या नैसर्गिक भूमिका म्हणून मान्य केलेल्या आहेत आणि यांतच त्यांच्या कर्तुत्वपणाचें व तेजस्वितेचेंहि बीज सांठविलेलें आहे.

### वैवाहिक दृष्टिकोन

विवाह म्हणजे व्यक्तिविकासाच्या मार्गातील एक धोंड असा एक गैरसमज रूढ आहे. पण ह्याचें मूळ मानवी मनोरचनेच्या व समाजधारणेसंबंधींच्या संपूर्ण अज्ञानांत आहे. खरा सुशिक्षित आणि समंजस मनुष्य ' विवाह ' ही व्यक्तिविकासाला एक अत्यंत आवश्यक व अपरिहार्य घटना आहे असें मानतो. विवाहामुळें व्यक्तीच्या सर्व प्रवृत्तींचें उदात्तीकरण होऊन तिला स्थैर्य लाभतें आणि कुटुंबाच्या आधारानें ती आपलें जीवन पूर्णपणें यशस्वी करूं शकते. हें सत्य जगातील सर्व समाजांनीं आज निर्विवाद मान्य केलेलें आहे. स्त्रीचें पारतंत्र्य पित्यापासून सुरू होतें. विवाहानंतर ती पतीच्या अधीन

होते व वार्धक्यावस्थेंत तिच्यावर मुलाच्या वर्चस्वाखालीं राहण्याचा प्रसंग येतो असें म्हणण्याची एक पूर्वापार पद्धत आहे. पण खरें पाहतां विवाहानंतर तिला जीवनाचा जोडीदार मिळतो व त्याच्या बरोबरीनें ती संसारांतील सर्व जबाबदाऱ्या पार पाडून स्वतःचें व पतीचें जीवनहि फुलवूं शकते. पतिपत्नी उभयता एकमेकांच्या मदतीनें कुटुंबाचेंच नव्हे तर समाजाचें व देशाचें ऋणहि उत्कृष्ट रीतीनें फेडूं शकतात. पाश्चात्यांच्या मतें वरील भारतीय विचार स्त्रियांच्या दास्यवृत्तीचे निदर्शक आहेत. पण ज्या पाश्चात्य स्त्रिया पिढ्यानुपिढ्या स्त्रियांच्या हक्कांसाठीं व बंधमुक्ततेसाठीं झगडल्या त्याच देशांतील तरुण मुलींत आज विवाहासाठीं तीव्र झगडा चाललेला दिसून येतो. युरोपियन देशांतील नियतकालिकांमधील शिंपी, औषधविक्रेते व सौंदर्यप्रसाधनें विकणाऱ्यांच्या जाहिरातींवर नुसती धावती नजर टाकली तरी त्यांत त्यांचे कपडे व प्रसाधनें वापरल्यास स्त्रिया पुरुषांवर हमखास मोहिनी कशी टाकतील व त्यांचें लग्न जमण्याची शक्यता निश्चित कशी वाढेल यासंबंधींची भडक व हिडीस वर्णनें आढळतील. तुलनेनें पाहिल्यास भारतीय स्त्रीचा विवाहविषयक दृष्टिकोन कितीतरी नैसर्गिक, स्वाभाविक व उदात्त वाटतो. आजहि हिंदु मुलगी विवाह म्हणजे जीवनांतील एक निराशाजनक घटना अगर स्वप्रभुत्व प्रस्थापनाचा एक मार्ग असें मानीत नाहीं, तर ती एक पूर्ण जीवनाची नैसर्गिक वाटचाल आहे असें ती मानते. त्यागानेंच ती आपलें जीवन कुटुंबांत फुलविते. पाश्चात्यांप्रमाणें विवाहानें एका पुरुषाशीं फक्त नातें जडतें असें ती मानीत नाहीं, तर त्याच्या कुटुंबाचा ती एक अविभाज्य घटक बनते. त्या सर्वांचें सुख तेंच तिचें समाधान. पतीचे आईवडील व भावंडेंच नव्हेत तर इतर दूरच्या नातेवाईकांशींहि कर्तव्याच्या नाजूक धाग्यानें तिचें जीवन बांधलें जातें. या भावनेनें तिच्या वैयक्तिक सुखाच्या कल्पनांना व इच्छा-आकांक्षांना आपोआपच मुरड पडते. ती स्वतःच आपल्यावर शिस्तीचीं अनेक बंधनें घालून घेते. वृद्ध व दुर्बल आईवडिलांना ज्यांत स्थान नाहीं व अजाण भावंडांना ज्या घरांत आधार नाहीं अशा पाश्चात्य कुटुंबाची कल्पना तिला हीन व स्वार्थी वाटते. आजची भारतीय स्त्री पतीच्या कुटुंबाची गुलाम नाहीं तर सर्व कुटुंबाची पतीबरोबर चिंता वाहणारी व हित पाहणारी एक जबाबदार व्यक्ति असते. स्वयंपाक करून सर्वांना ती

प्रेमानें जेऊं घालील, सर्वांचे कपडे शिवील, मुलांचें संगोपन करील व सर्वांना शिकवीलहि ! अशा प्रकारचीं वैवाहिक कर्तव्यें करतांना वैफल्याची भावना नसते; तर उलट आपण आपल्या पतीवर असलेल्या जबाबदाऱ्या पार पाडण्यांत बरोबरीनें मदत करीत आहों ही भावना त्यांला समाधान प्राप्त करून देते.

स्त्रियांना वैफल्य येतें तें प्रामुख्यानें त्यांच्या कर्तृत्वास वाव न मिळाल्यामुळें. आम्ही यापूर्वीच्या विवेचनांत हें सांगितलेंच आहे कीं, मध्यमवर्गाची आर्थिक परिस्थिति अतिशय बिकट झाल्यामुळें स्त्रियांना अर्थार्जन करण्यासाठीं सक्तीनें घराबाहेर पडावें लागत आहे. ज्यांना शतकानुशतकें फक्त घरकाम करण्याचेंच शिक्षण मिळालें त्या स्त्रियांना बाहेरचे व्यवसाय अंगवळणीं पडणें कठीण जातें. मध्यमवयाच्या, प्रौढ, अशिक्षित स्त्रियांना कामधंदा मिळवून देऊन आर्थिक स्वास्थ्य निर्माण करणें किती अवघड होऊन बसलें आहे याची कल्पना आजच्या प्रत्येक सामाजिक कार्यकर्त्यास येत आहे.

### शिक्षणकार्य

यांतून मार्ग एकच. विवाहाची जबाबदारी घेण्यापूर्वी प्रत्येक मुलीला असें शिक्षण मिळालें पाहिजे कीं, कोणत्याहि परिस्थितींत ती आर्थिक दृष्ट्या स्वतःच्या पायावर उभी राहूं शकेल. सर्वसामान्य लोकमताचा या विचारास आज विरोध नाहीं. कांहीं पालकांचेंच मतपरिवर्तन घडवून आणणें आवश्यक आहे.

स्त्रियांच्या शिक्षणाचा खोलवर विचार केल्यास आजहि असें दिसून येतें कीं, भारतीय स्त्रीच्या जीवनाभोंवतीं अनेक जुलमी व अन्याय्य कल्पनांचें कुंपण पडलेलें आहे. सुदैवानें शहरांतील लोक आतां मुलींना शक्य तेवढें शिक्षण देऊं लागले आहेत. मध्यमवर्गात आर्थिक ओढाताणीमुळेंच ही सुधारणा घडून आली आहे. तरीसुद्धां शहरांतील गरीब व त्याचप्रमाणें पुराणमतवादी लोकांत अशिक्षित मुलींचें प्रमाण आढळतें. शालेय अभ्यासक्रमांत मुलें व मुली हा फरक प्रायः केला जात नाहीं. खेड्याकडे नजर टाकल्यास मुलींच्या प्राथमिक शाळाहि तुरळक दिसतात. मुलगी सुमारें तेरा-चौदा वर्षांची झाली

कीं पालक तिच्या लग्नाची खटपट जोरानें सुरू करतात. प्रत्यक्ष विवाह होई-पर्यंत मुली सुमारें सोळा-सतरा वर्षांची होते.

हुंड्याची अनिष्ट पद्धत अजूनहि मूळ धरून आहे. आंतरजातीय विवाह क्वचितच होतात. मुलें व मुली स्वतः आपले जोडीदार निवडूं लागेपर्यंत ही परिस्थिति अशीच राहणार. मात्र मुलांना व मुलींना आयुष्याचा जोडीदार निवडण्याची पात्रता येण्यासाठींसुद्धां शिक्षणाची गरज आहे. स्वतःच निवड करण्याची पद्धति सर्रास रूढ असूनहि आज पाश्चात्त्य देशांत अयशस्वी विवाहांचें, अप्रामाणिकपणाचें व घटस्फोटांचें जें प्रमाण आढळून येतें त्यामुळें या प्रकारच्या विवाहपद्धतीबद्दलहि गंभीर साशंकता निर्माण झाली आहे.

या सर्वांचा निष्कर्ष एकत्व व तो हा कीं, भारतीय स्त्रीनें भारतीय संस्कृतीच्या सांच्यांतच आपल्या जीवनाचें साफल्य शोधलें पाहिजे. कांहीं भारतीय पाश्चात्त्यांचें अनुकरण करण्यांत भूषण मानीत असले तरी विचारवंतांना असें निश्चित वाटूं लागलें आहे कीं जीवनाचें सौंदर्य बाह्यात्कारी सुधारणेंत नाहीं तर आंतरिक मूल्यांत आहे. जगांतील सर्व ज्ञान जरी भारतीय स्त्रीनें आत्मसात् केलें तरी ती मनानें व वृत्तीनें भारतीयच रहावी. अन्याय्य रूढींच्या शृंखला तिनें तोडून टाकाव्यात, प्रतिष्ठेच्या खोट्या कल्पना झुगारून देऊन स्वतंत्र व्यक्तिमत्वाचा विकास करावा. पण निव्वळ अंधानुकरणानें खरा व्यक्तिविकास घडून येणार नाहीं हेंहि तिनें ओळखावें. भारतीय समाजाची उज्ज्वल परंपरा कायम राखून स्त्रीनें ज्ञानार्जन करावें. विद्वत्ता आली तरी गर्व न यावा, शौर्याबरोबरच सौजन्य यावें आणि स्वतंत्र वृत्तींत सेवाभाव असावा. भारतीय स्त्री म्हणजे संस्कृतीचें चालतें-बोलतें प्रतीक आहे हें तिनें आपल्या वेशभूषेनें व वर्तनानें सर्व जगास दाखवून द्यावें. भारतीयत्व न सोडतां ज्ञानसंग्रह करण्यांतच आमच्या स्त्रियांच्या जीवनाचें साफल्य आहे.

मध्यमवर्गांत मुलीच्या लग्नाचा व हुंड्याचा खर्च झेपण्याचें सामर्थ्य नसल्यानें मुलीच्या जन्मानें आईवडील थोडे कष्टी होतात असा एक समज आहे. परंतु मुलीबद्दल प्रेमाचा अभाव हें मातापित्यांच्या दुःखाचें खरें कारण नसून, तिच्या सुखासाठीं जरूर तो पैसा उभा करण्याची असमर्थता हें त्यांच्या दुःखाचें खरें कारण असतें. शिकलेली, अविवाहित आणि मिळवती मुलगी हें

गेल्या कांहीं वर्षांत कुटुंबाचें एक आकर्षण झालेलें आहे. स्वतः अविवाहित राहून वृद्ध मातापित्यांना व कुटुंबाला आधार देणाऱ्या स्त्रिया आतां समाजांत दिसूं लागल्या आहेत. अशा त्यागी स्त्रियांनीं कितीतरी गरीब कुटुंबांच्या सुखाची उभारणी आज केली आहे.

अविवाहितच नव्हे तर विवाहित स्त्रियांनाहि आज कुटुंबाची आर्थिक जबाबदारी उचलावी लागत आहे. पतिपत्नी उभयता मिळून वैद्यक व्यवसाय करतांना दिसतात. शिक्षकाची नोकरीहि संसार संभाळून कित्येक स्त्री-पुरुष करतांना आढळतात. परिचारिकेच्या व्यवसायांतहि अनेक विवाहित स्त्रिया दिसतात. या व्यवसायाकडे पाहण्याची समाजाची दृष्टि अजूनहि तितकीशी चांगली नाहीं. परंतु या अभ्यासक्रमासाठीं जरूर असणारी शैक्षणिक पात्रता वाढविल्यानंतर जनतेच्या विरोधाची धार कमी कमी होत चालली. वास्तविक पाहतां संसार सांभाळून करतां येण्यासारखा हा एक उत्कृष्ट व्यवसाय आहे. प्रत्येक सरकारी रुग्णालयास एकेक परिचारिका-शिक्षण-केन्द्र जोडलेलें असतें. सर्व परीक्षा सरकारमार्फतच घेतल्या जातात. देशांत व परदेशांत शिक्षण घेण्यासाठीं उत्तेजनार्थ शिष्यवृत्त्याहि दिल्या जातात.

## पुनर्रचना

गेल्या कांहीं वर्षांत भारतीय समाजांत अनेक बदल घडून येत आहेत. आहाराच्या बाबतींतील जुन्या रूढि सैल झाल्या आहेत. शिकणाऱ्या किंवा नोकरी करणाऱ्या स्त्रियांना पूर्वींच्या अनेक संवयी बदलणें भागच पडत आहे. बदलत्या कल्पनांशीं तडजोड करणाऱ्या आधुनिक स्त्रिया इतिहास-प्रसिद्ध स्त्रियांच्या जीवनादर्शापासून दूर जात आहेत असें म्हणणें गैर ठरेल. पेहराव, आहार व इतर बाह्य गोष्टी माणसास परिस्थितीनुसार बदलाव्या लागतात. यावरून व्यक्तीच्या सांस्कृतिक घडणीबद्दल मत बनविणें गैर ठरेल. अनेक शतकें या बाह्य साधनांना अवास्तव महत्त्व दिलें गेलें. हिंदु धर्मानें सैंपाकघरापुरतें मर्यादित राहण्याच्या कल्पनेचा विवेकानंदासारख्यांनीं तीव्र निषेध केला. समाजाच्या आर्थिक हलाखीमुळें स्त्रियांना शिक्षण व अर्थार्जनाची संधि मिळाली हा एक फायदाच झाला असें म्हणतां येईल.

आपलें भारतीयत्व आपल्या वेषांत अगर आहारांत नाहीं तर तें आपल्या विशेष गुणांत आहे. प्रामाणिकपणा, साधेपणा व सहृदयता हीं भारतीयत्वाचीं खरीं प्रतीकें आहेत. आजच्या जीवनकलहांत जर हीं जीवनमूल्यें आपण गमाविलीं तर मात्र ती फार दुर्दैवाची गोष्ट ठरेल. अनेक शतकें परकीयांचा राजकीय अंमल येथें चालूनहि भारतीय जीवनाचा घाट बदलला नाहीं. आमच्या स्त्रियांनीं परकीय सत्तेपासून जे धडे घेतले ते पचवितांना त्यांच्या मानसिक धैर्याची व सहनशीलतेची भरपूर परीक्षा झाली. त्यामुळेंच भारतीय संस्कृति टिकविण्यास सर्वतोपरी मदत झाली असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं.

आतांपर्यंत भारतीय मुलींचें जीवन अगदीं ठराविक ठशाचें होतें. थोडें घरकाम करावें, थोडेफार शिकावें, हिंडावें, फिरावें आणि वेतावाताचें सौंदर्यप्रसाधन करावें म्हणजे संपलें. मुलांचा स्नेहसंबंध व यौवनांतील कामविषयक गुंतागुंत निर्माण होण्यापूर्वीच बहुतेक मुलींचे विवाह होत. पण गेल्या कांहीं वर्षांत ही परिस्थिति झपाट्यानें बदलत चालली आहे. मुलींच्या शिक्षणाचा फैलाव होऊं लागल्यानें विवाहाची मर्यादा वाढली. करमणुकीचीं वैचित्र्यपूर्ण साधनें उपलब्ध झालीं. स्वस्त सौंदर्यप्रसाधनांचा प्रसार अमर्याद झाल्यामुळें साध्या राहणीचें आकर्षण कमी झालें. आजच्या मुलींना या सर्व गोष्टी आवडूं लागल्या आहेत यांत अनैसर्गिक कांहीं नाहीं. फक्त प्रमाणाबाहेर करमणूक व प्रसाधनांचा वापर यांतील धोके गंभीर आहेत. या बाह्य मूल्यांनीं मुलींची मनोरचना विकृत होतां कामा नये व जीवनाच्या खऱ्या मूल्यांची अवहेलना होतां कामा नये.

खरें स्वातंत्र्य नकली सुखांत जीवन उधळून टाकण्यांत नाहीं. विवेकानें सुखाबरोबर जबाबदारी व कर्तव्यें अंगीकारण्यांत भूषण आहे. आधुनिकता जीवनाच्या हेतूला ग्रासून टाकूं शकणार नाहीं. "ह्या विशिष्ट ध्येयासाठीं मी जगलों किंवा अमुक ध्येयासाठीं मीं आपलें जीवन वाहिलें आहे" असें जो सांगूं शकतो तोच खऱ्या अर्थानें जीवन जगतो. असें जर झालें नाहीं तर जुन्या काळांतील स्त्रियांचें पारतंत्र्य, त्यांतील सहजता व उद्योगशीलता ह्या गोष्टी आजच्या सभासंमेलनें, अर्थशून्य वक्तृत्व आणि सुखासीन पेंद्रटपणा यापेक्षां कितीतरी पटीनें बऱ्या असें म्हणावें लागेल.

आधुनिकता किंवा अद्ययावतता म्हणजे कृत्रिमता नव्हे. भारतीयांच्या सामाजिक जीवनांत साधेपणास फार महत्त्व आहे. आम्ही सद्वर्तनाचे पुस्तकी नियम पाळीत नाहीं; तर दुसऱ्याच्या सुखासाठीं झीज सोसणें व त्याची सोय पाहणें यांत आमच्या सद्वर्तनाचें सारसर्वस्व सांठविलेलें असतें. हे वर्तनादर्श गमावून जर सुधारणा मिळवावयाची असेल तर या सुधारणेमुळें आमचें जीवन अधिक कंगाल होईल. दोन पिढ्यांपूर्वी गंगास्नानानें आमच्या स्त्रियांना जें उच्च मानसिक समाधान लाभत होतें तें आजच्या नवविवाहित तरुणींना लाभत नाहीं. पण गंगास्नानाऐवजीं ज्यानें असें समाधान लाभेल असें दुसरें कांहींच त्यांना शोधून काढतां आलेलें नाहीं. आमच्या समाजाचें गंभीर दुखणें हेंच आहे. जुनीं मूल्यें व जुन्या श्रद्धा गेल्या पण ही पोकळी नव्या मूल्यांनीं व श्रद्धांनीं भरली गेली नाहीं, आणि यामुळें आमच्या आजच्या जीवनाला एक प्रकारचें भकास स्वरूप आलें आहे. पाश्चात्त्यांची संस्कृति कोणत्याहि स्वरूपाची असो पण त्या समाजांनीं आपले आदर्श व ध्येयें निश्चित केलीं आहेत. आपल्यापुढेंहि पूर्वजांनीं आदर्श ठेवलेले आहेत, फक्त आज ते जरा पुसट झालेले आहेत. आजच्या भारतीय स्त्रीची येथेंच खरी परीक्षा होणार आहे. देशाच्या व समाजाच्या पुनर्रचनेंत आपला वांटा उचलून ती देशाचें बल, संरक्षण-सिद्धता व निर्माणशक्ति वाढविणार कीं समानतेच्या भ्रामक कल्पनांनीं भारून जाऊन, पुरुषांच्या कार्यांत वारवार अडथळे निर्माण करून, ती आपल्या शक्तीचा अपव्यय करणार हें पहावयाचें आहे.

सुदैवानें भारतांत नामवंत लेखिका, कलाकार, गायिका, तत्त्वज्ञ, राजकारणी, शास्त्रज्ञ व सामाजिक कार्यकर्त्या स्त्रिया पुष्कळ आहेत. बाल-गुन्हेगारांसाठीं असलेल्या न्यायालयांत न्यायाधिशाचें काम स्त्रिया करतात. याखेरीज प्रोबेशन ऑफिसर्स व तुरुंगाच्या अनौपचारिक सल्लागार म्हणून अनेक स्त्रिया सध्या काम करीत आहेत. सामाजिक आपत्तींतील वांटाहि स्त्रिया विनतक्रार उचलीत आहेत.

मध्यमवर्गातील पतित स्त्रियांची जबाबदारी समाज उचलीत नाहीं. पुराणकालांतील नीतितत्त्वांकडे बोट दाखवून अशा स्त्रियांचा अव्हेर केला जातो. कोणत्याहि समाजाचा दर्जा त्या समाजांत स्त्रियांना कसें वागविलें

ें यावरून ठरावा असें म्हणतात. स्त्रिया व पुरुष हे समान नीतितत्त्वांचें न करतात कीं नाहीं हाहि एक निकष समाजाचें श्रेष्ठत्व ठरविण्यासाठीं ला जातो. नीतितत्त्वांचें पालन करणें म्हणजे अनाथाश्रम काढून स्त्रियांची स्या लावणें नव्हे. आधुनिक भारतीय स्त्रीनें नीतीचे असे व्यावहारिक य निश्चित केले पाहिजेत कीं, त्यांत निरपराध स्त्रियांना भरपूर संरक्षण वें. स्वार्थ, असहिष्णुता, दगलबाजी व निर्दयता हे दुर्गुण अनैतिक वर्तना- कितीतरी अधिक गंभीर स्वरूपाचे आहेत. पण पृथ्वीच्या पाठीवरील ताहि समाज या गुन्ह्यांना कठोर शिक्षा ठोठावीत नाहीं. मानवी स्वभावां- हा विरोधाभास मोठा विचित्र वाटतो !

पुरुषांकडून मतदानाचा हक्क मिळविण्यासाठीं इंग्लिश स्त्रियांना दीर्घ- झगडा करावा लागला. सुदैवानें भारतीय स्त्रियांना हा हक्क आपोआप झाला; पण न मागतां झालेल्या लाभाची किंमत नेहमीं कमी ठरते ! हुना अशा लाभाचा दुरुपयोग होण्याचीच शक्यता अधिक असते. जुन्या ीं कांहीं स्त्रियांनीं राज्ञी व पालक या नात्यानें उत्कृष्ट रीतीनें राज्यकारभार ाचीं उदाहरणे भारताच्या इतिहासांत आहेत. आजहि अशा कुवतीच्या नसतील असे नाहीं. परंतु मध्यंतरीच्या काळांत भारताच्या राजकारणांत ना फारच थोडा वाव होता असें दिसतें. कर भरणें अगर इतर आर्थिक सांभाळणें येवढाच कौटुंबिक स्त्रीचा राज्यकारभाराशीं संबंध येई. ण कर जमा करतो याबद्दल आशियाई देश फारच उदासीन असतात ामुळें हे देश जिंकणें सोपें असतें " असे उद्गार एका ब्रिटिश विचार- नमूद करून ठेवले आहेत. ही वस्तुस्थिति आज मात्र मुळींच अस्तित्वांत कारण आशियांतील सर्व देश व त्यांतील स्त्रियाहि राजकीय हक्कांबाबत य जागरूक झालेली आहेत. भारतांत अनेक देशभक्त व क्रांतिकारक झाल्या. त्यांपैकीं कांहींनीं देशासाठीं बलिदानहि केलें. स्त्री म्हणून डून मिळणारे विशेष हक्क नाकारून आजच्या महिलांनीं पुरुषांच्या नें जीवनाची जबाबदारी उचलण्यास सिद्ध झालें पाहिजे.

भारतीय स्त्री जात्या सैनिकी बाण्याची नव्हे हें मात्र कबूल केलें . हिंसा आणि नाश यांचा तिला मनापासून तिटकारा वाटतो. युद्धाची

कल्पनाहि तिच्या अंगावर शहारे आणते. पण याचा अर्थ असा नव्हे कीं, तिच्यावर युद्धप्रसंग आल्यावर ती पाठ फिरवील. हिंदी स्त्रियांचा स्वभाव मृदु परंतु निश्चयी व कणखर म्हणूनच कोणतीहि सामाजिक सुधारणादेखील येथें झराझर वाटचाल करूं शकत नाहीं. चाळीस वर्षांपूर्वीच्या कित्येक माता मुलींना सांगत कीं शिकणाऱ्या मुलींना वैधव्य प्राप्त होतें व त्या शीलभ्रष्ट होतात. आजहि शिक्षणाकडे साशंकतेनें बघणाऱ्या कांहीं आजीबाई आहेत ! पण मानसिक जागृतीमुळें निर्माण होणाऱ्या सुधारणेच्या लाटेस कोणीहि थोपवून धरूं शकत नाहीं. आज भारतांतील स्त्रियांचीं सर्व कॉलेजें भरलेलीं असून आणखी नवीन महाविद्यालयांसाठीं सतत वाढती मागणी आहे. या जागृती-मागील हेतु मात्र अनिष्ट कल्पनांचें उच्चाटन व इष्ट मूल्यांचें जतन हाच असावयास हवा. दुर्गादेवीच्या दहा हातांत दाखविलीं जाणारीं दहा शस्त्रें सज्जनांच्या नाशासाठीं नसून शांतता व भरभराट या दोहोंच्या शत्रूंचें निर्दालना-साठीं आहेत. सर्व परिवर्तनाचें अंतिम साध्य भारतीयत्व टिकविणें व शांतता-प्रिय मार्गानें सहजीवन जगणें हेंच असावयास हवें.

भारतीय समाज स्थितिप्रिय आहे असा एक अपसमज रूढ आहे. *आतांपर्यंत भारतीय स्त्रियांनीं कालाबरोबर* स्वतःच्या जीवनांत अनेक बदल घडवून आणले आहेत. सुदैवानें आमच्या स्त्रिया दरवर्षी बाह्य वेषभूषेंत फारसे महत्त्वाचे फेरबदल करतांना दिसत नाहींत. पूर्वीच्या स्त्रियांपेक्षा आजच्या स्त्रिया कामाला बाहेर पडतांना सुटसुटीत असाच पोषाख करतात. पूर्वीप्रमाणें आतां त्या डोक्यापासून पायापर्यंत शाल पांघरून बाहेर पडत नाहींत. पाश्चात्य उपयुक्त वर्तन-प्रकारांचा त्यांनीं अंगिकार केला आहे. साडीचा पेहराव चुटचुटीत हालचालींना अनुकूल असाच आहे. पादत्राणांचे उपयुक्त प्रकार आमच्यांत रूढ झाले आहेत. डोक्यावरून पदर घेण्याची प्रद्धति नाहींशी झाली आहे.

इतके फरक करूनहि तिनें पोषाखांतील खास भारतीयत्व गमावलेले नाहीं. धूम्रपान व नृत्य ह्या दोन्ही पाश्चात्य प्रकारांचें आकर्षण आमच्या स्त्रिया अजूनहि दाखवीत नाहींत. अर्थात् कांहीं अपवाद सोडून ! कदाचित् हे दोन्ही वर्तनप्रकार फारसे गैर नसतील. पण आमच्या सदभिरुचीस ते

फारसे मानवंत नाहींत येवढें खरें. आमच्या समाजांतील विडा खाण्याची पद्धतहि आधुनिक स्त्रियांत फारशी प्रिय नाहीं. दांत खराब करणारी ही पद्धत बंद होत आहे ही एकपरी आनंदाचीच गोष्ट म्हटली पाहिजे.

भारतीय स्त्रिया अजूनहि कांहीं बाबतींत पाहिजे तेवढें लक्ष घालीत नाहींत. उदाहरणार्थ व्यायाम व खेळ. मुलींच्या शाळांतून व भगिनीमंडळांतून खेळांना प्रोत्साहन मिळतें, पण याहूनहि या शाखेंत बरीच सुधारणा करणें शक्य आहे. कित्येक स्त्रियांना रोज व्यायाम घेण्यास अगर खेळण्यास सवड मिळत नाहीं हेंहि खरें आहे. प्रत्येक स्त्रीनें सुदृढ प्रकृतीसाठीं खेळांचें व व्यायामाचें महत्त्व मान्य केलें आहे.

स्त्रियांचें स्वावलंबन बऱ्याच प्रमाणांत वाढलें आहे. बाजारहाट करणें, धान्य आणणें वगैरे गोष्टी पुरुषांच्या मदतीशिवाय हल्लीं स्त्रिया करूं शकतात. एकेकट्या स्त्रिया शहरांत व खेड्यांत वावरतांना दिसतात. लांबलांबचे प्रवासहि त्या एकट्या करूं शकतात. सारांश, दैनंदिन जीवन जगण्यास जरूर तें धैर्य भारतीय स्त्रींत भरपूर आहे.

जो देश शास्त्र, कला व तत्त्वज्ञान या क्षेत्रांत जगांतील इतर देशांना कित्येक शतकें मार्ग सारीत होता त्या देशांत स्त्रिया व पुरुष यांच्या सांस्कृतिक दर्जांत फरक मानला जावा ही एक आश्चर्यकारक गोष्ट आहे. स्त्रियांनीं आपला शैक्षणिक दर्जा वाढविणें हा एकच उपाय हा अन्याय दूर करूं शकेल ही गोष्ट आम्ही यापूर्वींच स्पष्ट केली आहे. सध्याच्या निकृष्ट अर्थव्यवस्थेनें स्त्रीशिक्षणाचा फैलाव होण्यास एकप्रकारें मदतच कशी केली आहे हेंहि आम्हीं सविस्तर रीतीनें यापूर्वीं सांगितलें आहे. फक्त पत्नी म्हणून नव्हे तर समाजाचा एक स्वतंत्र घटक म्हणून स्त्रीचा कायदेशीर दर्जा कशा-प्रकारचा आहे याचाहि विचार करणें अगत्याचें आहे. चाळीस वर्षांपूर्वींच्या तुलनेनें पाहिल्यास आजची स्त्री बऱ्याच अंशीं स्वतंत्र जीवन जगूं शकते हें खरें, पण ज्या स्त्रीस भाऊ आहेत अशा स्त्रीला वडिलांच्या संपत्तीपैकीं एक कप-र्दिकहि मिळण्याची तरतूद कायद्यानें केलेली नाहीं.

इ. स. १९३७ नंतर हिंदी विधवा स्त्रियांची या दृष्टीनें परिस्थिति वरीच सुधारली. पतिनिधनानंतर पत्नीस संपत्तीचा मुलाबरोबरीनें हिस्सा मिळतो. ज्या स्त्रीचा सासरा पतिनिधनानंतर हयात असतो, तिचा कायदेशीर दर्जाहि हल्लीं खूप समाधानकारक झालेला आहे. आजचा मुख्य प्रश्न हा आहे कीं मुलगी विवाहित असो अगर अविवाहित असो, तिला मुलाप्रमाणेंच वडिलार्जित संपत्तींत हिस्सा मिळावा कीं नाहीं? अर्थात् अविवाहित मुलीला वडिलांच्या संपत्तींतील हिस्सा मिळावाच. तिनें लग्न केल्यास ह्या हिस्स्याची गरज तिला भासणार नाहीं. पण अविवाहित असेतोंपर्यंत या संपत्तीचा उपभोग तिला घेतां यावा. मुलीचा हिस्सा मुलाच्या हिस्स्याच्या बरोबरीनें असण्याचें कारण नाहीं. कारण तिच्यावर कौटुंबिक जबाबदाऱ्या नसतात. भारतांतील मुसल्मान व ख्रिश्चन समाजांत मुलीला वडिलांच्या संपत्तींतील हिस्सा मिळण्याबाबत नियम आहेत. परंतु जगांतील अनेक देशांत मुलीला चोळीबांगडी व हुंडा यांच्या तरतुदीपलीकडे वडिलांच्या संपत्तींतून कांहींहि मिळत नाहीं. भारतांत तर या प्रश्नाचें स्वरूप अधिक गंभीर दिसतें. कारण आमच्या स्त्रियांना स्वतःच्या पायावर उभे राहण्याची फारशी कुवत नसते. शिक्षणानें स्त्रिया आर्थिकदृष्ट्या स्वतंत्र होतील पण कायद्याचा प्रश्न तसाच राहील. माणुसकीच्या दृष्टीनें अविवाहित मुलीस वडिलांच्या संपत्तींत हिस्सा मिळालाच पाहिजे. विवाहित स्त्रियांच्या पतींना वडिलांच्या संपत्तींतील वांटा मिळतो म्हणून त्यांचा विचार केला नाहीं तरी चालेल.

विवाहविच्छेदाचा प्रश्नहि भारतीय समाजानें सोडविणें आवश्यक आहे. ज्या ठिकाणीं वैवाहिक जीवन जगणें पति-पत्नीस अशक्य होईल त्या ठिकाणीं त्या जीवनाचा शेवट करण्याचा कांहींतरी मार्ग कायद्यानें उपलब्ध करून द्यावयास हवा. मात्र घटस्फोटास दिलीं जाणारीं कारणें अतिशय गंभीर स्वरूपाचीं असावींत. कारण लहानसहान कारणांनीं वैवाहिक जबाबदारी झुगारून देण्याची वृत्ति समाजांत कधींच बळावतां कामा नये. आज रजिस्टर पद्धतीनें विवाह केलेल्यांनाच घटस्फोट घेतां येतो आणि तोहि फसवणूक किंवा निर्दयतेच्या कारणावरूनच. विवाह म्हणजे देवाब्राह्मणांसमक्ष जोडली गेलेली जन्माची गांठ अशी समजूत असल्यानें भारतीय लोकांत रजिस्टर विवाहपद्धति फारशी लोकप्रिय झालेली नाहीं.

बहुपतित्व व बहुपत्नीकत्व ह्या दोन्ही विवाहपद्धति त्याज्य मानण्याकडेच समाजाची सर्वसामान्य प्रवृत्ति आहे. बहुपतित्व कायद्यानें अमान्य केलें आहे. ही रूढि पूर्वीसुद्धां समाजांत अगदीं थोड्या प्रमाणांतच दिसून येई.

शिक्षित तरुण-तरुणींच्या वाढत्या प्रमाणाबरोबर आंतर-जातीय विवाहांचा प्रश्नहि गंभीरपणें पुढें येऊं लागला आहे. १८७२ च्या कायद्यानें व नंतर झालेल्या गौर कायद्यानें आंतरजातीय विवाहासंबंधींचा प्रश्न निकालांत काढला. यासंबंधीं सामान्य लोकांचें मत असें दिसतें कीं, रजिस्ट्रेशनची सक्ती न करतां हिंदु कायद्यानें आंतरजातीय विवाह मान्य करावेत.

नुसते कायदे करून खऱ्या सुधारणा कधीं अमलांत येत नाहींत. सुमारें शंभर वर्षांपूर्वी पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर यांनीं विधवा-विवाहाला वैदिक वाङ्मयाचा कसा आधार मिळतो हें सिद्ध केलें. परंतु आजहि फारच थोड्या विधवा पुनर्विवाह करतात. अगदीं अल्पवयीन विधवांनासुद्धां पतिनिधनानंतर आपल्या जीवनांत कांहीं अर्थ राहिला नाहीं असें वाटूं लागतें. श्वेतवस्त्र परिधान करून उपासतापास करीत राहावें, कोणत्याहि शुभसमारंभांत भाग घेऊं नये, अशी त्यांची वृत्ति बनते. शिकून व्यवसायांत पडून विधवांना स्वतःचें आयुष्य पुन्हां फुलविण्याची शक्यता आजहि आमच्या समाजांत फार कमी आहे. जेव्हां समाजांत आर्थिक सुस्थिति नांदत होती तेव्हांसुद्धां विधवा स्त्री म्हणजे समाजाचा निरुपयोगी घटक असेंच समजलें जाई. पित्याच्या किंवा श्वशुराच्या घरांतील विनावेतन कामकरी यापेक्षा तिच्या जीवनास अधिक अर्थ नसे. विधवांना जुन्या काळीं ज्या कडक बंधनांत रहावें लागे तीं बंधनें आज बऱ्याच प्रमाणांत शिथिल झालेलीं आहेत हें खरें. मुलींच्या विवाहाची मर्यादाच चौदा वर्षांवर गेल्यानें बालविधवांचा प्रश्न आपोआपच संपुष्टात आला. वैधव्य प्राप्त झालेल्या मुलीस कांहीं पालक आज शिक्षण देण्यास पुढें येतात. पण त्यांना कांहींहि न शिकविणारे पालक अजूनहि शेंकडों आहेत. समाजावर आलेल्या आर्थिक विपत्तीमुळें विधवा स्त्रियांचाहि एकप्रकारें फायदा झाला. त्यांना आपोआपच शिकण्याची व व्यवसायांत शिरण्याची संधि मिळाली. सर्व विधवांनी पुनर्विवाह केलेच पाहिजेत असें नाहीं. पण त्यांना शिक्षण मिळालें पाहिजे व कोणत्याहि आवडत्या व्यवसायात शिरून प्रतिष्ठित नागरिक

म्हणून जगण्याची संधि प्रत्येक विधवा स्त्रीस मिळालीच पाहिजे. उपयुक्त शिक्षण व व्यवसाय हा विधवांचा प्रश्न समाधानकारक रीतीनें सोडविण्याचा एकच मार्ग आहे.

## उपसंहार

आधुनिक काळांतील भारतीय स्त्रियांच्या जीवनक्रमाचा जो आढावा या प्रकरणांत घेतला त्यांतून हाच निष्कर्ष निघतो कीं, स्त्रियांचा दर्जा समाधानकारक होण्यासाठीं प्रथम जीवनाचीं मूल्यें नक्की झालीं पाहिजेत. व्यक्ति-जीवनाचा दर्जा निश्चित झाला पाहिजे. राजकीय पराधीनतेपेक्षां मानासिक पराधीनता अधिक धोक्याची असते व ती घालविणें फार अवघड जाते. स्त्रियांना आपल्या दर्जाची व उपयुक्ततेची जाणीव प्रथम झाली पाहिजे. जी विवाहित स्त्री पुरुषांसाठीं प्रेमळ निवारा निर्माण करते व राष्ट्राच्या भावी पिढीचें संगोपन करते तिच्या कार्याची योग्यता कोणत्याहि इतर व्यवसायाहून कमी नसते. पण स्त्रीला याची पुरेशी जाणीव नसते.

विवाह ही स्त्रीच्या जीवनांतील अतिशय विलोभनीय अशी घटना आहे हें मान्य केलें तरी प्रत्येक स्त्रीचा विवाह होईलच अगर प्रत्येक स्त्री विवाह करीलच असें नाहीं. विवाहाची ठराविक चाकोरी सोडून जिला आपल्या आयुष्याचें सार्थक एखाद्या विशेष ध्येयानुसार करण्याची इच्छा असेल तिला त्या मार्गानें समाजसेवा करण्याची मोकळीक हवी.

आज खरी वस्तुस्थिति अशी आहे कीं, जीवनांतील सौंदर्यापेक्षां आणि सात्त्विकतेपेक्षां जीवनाची बीभत्स बाजूच मनुष्य अधिक पाहातो. याचा परिणाम हीन अभिरुचीच्या कलानिर्मितींत होऊन जीवनाला जणूं कांहीं उदात्त हेतुच नाहीं असा आभास निर्माण केला जातो. ज्या भारत देशानें प्रगतीचें अत्युच्च शिखर गांठलें होतें व तितक्याच धैर्यानें अनेक विपत्तींना तोंड दिलें होतें त्यानें तरी आपल्या स्त्रियांचें मूल्य जाणलें पाहिजे. निद्रेंतून जागा झालेला माणूस उजेडाची अपेक्षा करतो, अंधाराची करीत नाहीं. इतर देशांतील स्त्रीवर्ग स्वतःच्या जीवनाबद्दल जागृत झाला आहे. भारतीय स्त्रीलाहि या जागृतीचा फायदा मिळावा.

भारतीय संस्कृतींत प्रत्येक गृहस्वामिनीस 'माता' हेंच अभिधान प्राप्त होतें, आणि प्रत्येक अपरिचित मनुष्य स्त्रीस 'माता' म्हणूनच संबोधतो. सरस्वती अगर लक्ष्मी यांच्या मूर्तींत मातृत्वच साकार झालेलें आढळतें. आमच्यांत अशी एक म्हण आहे कीं, हिंदी मनुष्य मोठा केव्हां होतो? त्याचे केस पिकतील तेव्हां नव्हे, तर त्याची आई मरेल तेव्हां. प्रवासास निघण्यापूर्वी व प्रवासाहून परत आल्यावर आईला अभिवादन करण्याचा प्रघात आमच्या समाजांत पूर्वापार चालत आलेला आहे. मातेचें महत्त्व ती शरीरसंगोपन करते म्हणून आहे असें नव्हे, तर मातृत्वांत सामावलेल्या निष्काम प्रेम व त्याग या गुणांमुळें मातेला महत्त्व प्राप्त झालें आहे. या आदराच्या भावनेस नैसर्गिक कर्तव्यानुसार करावी लागणारी गर्भधारणा हें कारण फार गौण आहे. मातृत्वाच्या अभिधानास लायक ठरणारी स्त्री पवित्र, एकनिष्ठ व त्यागी असावी अशी अपेक्षा असते. या गुणांना सौंदर्याचें एक स्वतंत्र आवेष्टन आहे. भारतीय स्त्री या गुणांनीं प्राप्त होणाऱ्या सौंदर्यापुढें इतर कोणत्याहि प्रकारच्या सौंदर्याची किंमत अधिक मानीत नाहीं.

जगांतील निरनिराळ्या समाजांत निर्माण होणाऱ्या आदर्श संस्थांतच त्यांच्या नाशाचीं बीजेंहि दुर्दैवानें सांठविलेलीं असतात. याला भारतीय मातृसंस्थाहि अपवाद नाहीं. आदर्शाच्या मार्गे धांवणाऱ्या भारतीय स्त्रियांनीं आपल्या शारीरिक सौंदर्याची व सुदृढतेची पर्वा केली नाहीं. त्यांच्या अपत्यप्रेमांतील फणखरपणा कमी झाल्यानें मुलांचें अहित होण्याची शक्यता निर्माण झाली. मातेच्या प्रेमाचें अधिष्ठान कमकुवत बनलें. नशिबानें जी शरीराची व चेहऱ्याची देणगी दिलेली असेल ती सांभाळणें, तिच्या जोपासनेसाठीं आटोकाट प्रयत्न करणें हें बालसंगोपनाइतकेंच महत्त्वाचें कर्तव्य आहे याची जाणीव आमच्या स्त्रियांना व्हावयास हवी.

अव्यवस्थित मातांचीं मुलें अव्यवस्थितच होतील, अशक्त मातांचीं मुलें अशक्त राहतील व आराम करणाऱ्या आळशी मातांचीं मुलेंहि सुखवस्तु व चैनी होतील. दुसऱ्यांचा सहानुभूतिपूर्वक विचार करणें व येईल त्या परिस्थितीशीं समाधानानें तडजोड करणें ह्या गोष्टी मुलांना लहान वयांतच शिकवावयास हव्यात. आईच्या मदतीशिवाय स्वतंत्र विचारानें कांहीं गोष्टी करून चुका

झाल्यास त्यांचे परिणाम भोगणें हें आईनेंच शिकवावें लागतें. मानवजातीच्या कल्याणासाठीं उत्तम नागरिक—स्त्रिया व पुरुष—ज्यांना निर्माण करावयाचे आहेत त्यांची स्वतःची वृत्ति फार कणखर असावयास पाहिजे. भारतीय मातांकडून प्रेमापेक्षांहि या कणखर वृत्तीची अधिक अपेक्षा आहे.

भारतीय समाजानें कांहीं सामाजिक गुणांकडे आतांपर्यंत फार दुर्लक्ष केलें आहे. पृथ्वीतलावर निर्माण झालेल्या प्रत्येक स्त्री-पुरुषास स्वाभिमानानें जगण्याचा अधिकार आहे आणि असें जीवन जगण्याची संधि प्रत्येकास मिळालीच पाहिजे. ज्ञानार्जन, भावना व विचारांचें नियंत्रण, उद्योगशीलता, तत्त्वनिष्ठा, सेवावृत्ति व क्षमाशीलता हे गुण महत्त्वाचे हें खरें, पण त्याबरोबर स्वच्छता, वक्तशीरपणा, तडजोडवृत्ति व मोकळ्या मनानें देवाणघेवाण करण्याची तयारी हेहि गुण कमी मोलाचे मानतां कामा नयेत.

पुनर्जन्माच्या सिद्धान्तावर भारतीय स्त्रियांची असीम श्रद्धा आहे. या सिद्धान्तावर आजपर्यंत खूप चर्चा झालेली आहे. पण एकसारखा पुनर्जन्माचा विचार न करतां ऐहिक जीवन सफल करणें, सुदैवानें ज्या चांगल्या गोष्टी मिळालेल्या असतील त्यांचा कृतज्ञतापूर्वक आस्वाद घेणें व कर्तव्याचा आनंद लुटणें, हेंहि आपण केलें पाहिजे. जगांतील सर्व दुःख नाहींसें करण्यास आपण असमर्थ आहोंत हें लक्षांत घेऊनहि, आपल्या आसपास जे दुःखपीडित आहेत त्यांचा दुःखभार हलका करणें ही गोष्ट स्त्रियांच्या आवाक्यांतील आहे. असत्य व क्रौर्य दूर ठेवून कणखर प्रेमाचे आदर्श निर्माण करणें हेंच भारतीय स्त्रीजीवनाचें वैशिष्ट्य आहे.

---

# प्रकरण ६ वें

## वैदिक कालांतील महिला

### प्रास्ताविक

वैदिक कालांतील वाङ्मयावद्दल आज उपलब्ध असलेली माहिती अगदीं त्रोटक स्वरूपाची आहे. वैदिक कालांतील कांहीं स्त्रियांनीं मोठमोठ्या लढायांत भाग घेतल्याचे उल्लेख सांपडतात, पण त्यांना त्या वेळच्या राजकीय जीवनांत मानाचें स्थान होतें असें दिसत नाहीं. मैत्रायणी संहितेंत (४·७·४) असें म्हटलें आहे कीं राज्यसभांना फक्त पुरुष हजर असत. उपनिषद्-कालांत समाजाच्या बौद्धिक जीवनांत स्त्रिया सहभागी होत असत असें याज्ञ-वल्क्याच्या तत्वज्ञ पत्नीवरून दिसून येतें. गार्गी व याज्ञवल्क्य यांच्या संवादा-वरूनहि स्त्रियांच्या विद्वत्तेची व अध्ययनाची कल्पना करतां येते. परंतु हीं उदाहरणें अपवादात्मक असण्याचाहि संभव आहे. ब्राह्मणवाङ्मयाच्या काला-पासून स्त्रियांचा दर्जा कमी होत गेल्याचें निश्चितपणें सांगतां येतें. पुरुषाच्या बरोबरीनें स्त्रीला यज्ञकर्माचा अधिकार असे हें खरें असलें तरी स्वतंत्ररीतीनें तिनें यज्ञयाग करण्यासंबंधीं बरेच निर्बंध असत. गृहजीवनांत स्त्रीचा दर्जा समाधानकारक होता तरी पण पतीच्या इच्छेविरुद्ध ती जाऊं शकत नसे असेंहि दिसतें. शतपथ ब्राह्मणांत (१·९;२·१२;१०·५;२·९) असें सांगितलें आहे कीं, पतीचें भोजन झाल्यावरच पत्नीनें अन्नग्रहण करावें. कात्यायन-श्रौत-सूत्रांत (१·१·७) असें म्हटलें आहे कीं "स्त्री व पुरुष असा भेद श्रुति करीत नाहींत" तरी शतपथ ब्राह्मणांत (४ ४·२·१३) सांगितलें आहे कीं स्त्रियांची इतर वस्तूंवर मालकी नसते इतकेंच नव्हे तर स्वतःवरहि त्यांचा हक्क नसतो. विवाहाचें बंधन अतिशय दृढ असे. बहुपत्नीकत्वाची चाल सर्रास रूढ होती. स्त्रियांनीं मात्र आपलें वैवाहिक जीवन कसेंहि असलें तरी त्याच्याशीं एकनिष्ठ राहिलें पाहिजे असा दंडक असे. पावित्र्याचा आणि चारित्र्याचा मक्ता स्त्रीवर्गा-कडेच जणूं देऊन टाकलेला होता. हें सर्व पाहिलें म्हणजे पत्नीचा कौटुंबिक

दर्जा आदर्शाला कितपत धरून होता याची शंका वाटूं लागते. स्त्रीचें कार्यक्षेत्र प्रामुख्यानें घरापुरतें मर्यादित असून तेथें तिची सत्ता अबाधितपणें नांदत होती असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं ( तै. सं. ६·२·१·१ व श. ब्रा. ५·२·१·१० ).

ऋग्वेद-कालांत स्त्रियांनीं स्वातंत्र्य व समता यांचा बराच उपभोग घेतला असावा असें दिसतें. अनेक विदुषी स्त्रियांनीं तत्त्वज्ञानपर लिखाण केलें व त्याची इंडो-आर्यन संस्कृतीनें जोपासना केली. ऋग्वेद-वाङ्मयावर प्राचीन कालांत लिहिलेल्या अनुक्रमणी किंवा शौनकाचा बृहद्-देवता हा ग्रंथ वगैरे लिखाणांत स्त्रियांनीं रचलेल्या एक अगर अनेक ऋचांचे उल्लेख आढळतात. कांहीं आधुनिक पंडित या लेखिकांबद्दल साशंक असले तरी खात्रीलायक पुराव्यानें ते आपलें म्हणणें सिद्ध करूं शकत नाहींत.

## ऋग्वेदकालीन सिद्ध स्त्रिया

ऋग्वेदांत सत्तावीस सिद्ध स्त्रियांचीं नांवें आलीं आहेत. यापैकीं अदिति, जुहू, इन्द्राणी, समा, उर्वशी, रात्री व सूर्या या पुराणकालीन देवता मानलेल्या आहेत; तर श्री, मेधा, दक्षिणा आणि श्रद्धा या महिला अमूर्त कल्पनांना मूर्तरूप दिल्यामुळें निर्माण झालेल्या असाव्यात. ह्या सर्व वगळल्यानंतर राहिलेल्या तत्त्वज्ञ स्त्रियांनींच वेदांतील ऋचा रचलेल्या असाव्यात असा निष्कर्ष निघतो. यांचीं नांवें विश्ववारा, अपाला, घोषा, गोधा ( वसुक्राची पत्नी ), अगस्त्याची भगिनी लोपामुद्रा, शश्वती आणि रोमशा अशीं आहेत. वाच् ही आणखी एक ब्रह्मवादिनी स्त्री म्हणून सांगतां येईल. परंतु याबद्दल विद्वानांत एकमत नाहीं. ब्रह्मवादिनी या शब्दानें तत्त्वज्ञ अगर चिंतनशील हाच नेमका बोध होतो असें नाहीं. कारण ऋचांचा विषय देवांची आराधना व प्रार्थना असाच आहे. पुढील कालांत तत्त्वज्ञानांत जे विषय आले त्यांचें ज्ञान ब्रह्मवादिनी या शब्दांत अभिप्रेत दिसत नाहीं. उपासना व भक्ति ह्या दोन गुणांचा बोध मात्र ब्रह्मवादिनी या शब्दानें निश्चित होतो. ऋग्वेद-वाङ्मयातील ' ब्रह्म ' शब्दांत विश्वनिर्माती शक्ति असाच अर्थ प्रामुख्यानें व्यक्त होतो. तो एक भक्तीचा व उपासनेचा विषय आहे.

वाच् :— ऋग्वेदांतील दहाव्या मंडलांत १२५ वी ऋचा वाच् या देवतेसंबंधीं आहे. यालाच देवीसूक्त असेंहि संबोधिलें जातें. शरदृऋतूंतील देवीपूजनांत या सूक्ताचा प्रामुख्यानें उपयोग करतात. शक्तिपंथीयांचा ' देवी ' उपासनेचा मुख्य आधार म्हणूनहि या सूक्तास महत्त्व आहे. परंतु नंतरच्या वाङ्मयांत वेगळीच माहिती दिलेली दिसते. वाच् या अंभृणी ऋषींच्या कन्येनें रचलेलें हें सूक्त आहे अशा रीतीचा हा वृत्तान्त आहे. या सूक्तांत वाच् ह्या सिद्ध स्त्रीनें विश्वनिर्मात्या शक्तीशीं स्वतःची एकरूपता कल्पिली असल्यानें वाच् नांवाची स्त्री खरोखरी झाली नसावी, शब्दरूप देवतेची ती एक कविकल्पना असावी, असेंहि कांहींचें म्हणणें आहे. कालांतरानें सरस्वतीशीं या देवतेचें एकीकरण करण्यांत आलें. विश्वनिर्माती शक्ति म्हणजे ' वाच् ' असेंहि कांहींचें मत आहे. या मतमतांतरानुसार मूळ सूक्ताचे अनेक अर्थ आज उपलब्ध झालेले आहेत. परंतु जुन्या वैदिक वाङ्मयांतील उल्लेखानुसार ' वाच् ' ही एक महान् तत्त्वज्ञ स्त्री असून तिला सिद्धावस्थेत स्फुरलेली कल्पनाच देवीसूक्तांत नमूद केलेली आहे. या सूक्ताचा आशय खालीलप्रमाणें आहे—

" रुद्र, वसु, आदित्य आणि इतर सर्व देवांच्या बरोबर मी आहें. मित्र आणि वरुण, इन्द्र आणि अग्नि व अश्विनीकुमार या सर्वांना माझाच आधार आहे. त्वष्टृ, पूषन् व भग हे माझ्याशीं एकरूप आहेत. मला सोमरस अर्पण करणाऱ्यास मी संपत्ति प्राप्त करून देते. मी समृद्धिदात्री आहे. मानवाला माझें ज्ञान प्रथम झालें. नंतर त्यानें अनेक देवांचीं मंदिरें उभारलीं. या सर्व देवरूपांत मीच भरून राहिलेली आहें. ज्या ज्या वस्तु माझ्या आश्रयानें राहतात, बघतात, श्वासोच्छ्वास करतात, खातात, पितात व श्रवण करतात त्या सर्वांत माझा वास असतो. याची त्यांना मात्र जाणीव नसते. हे सुज्ञ माणसा, हें सत्य तूं जाणून घे. " ... " देवांना व मानवांना प्रिय असणारें हें सत्य मी स्वतः कथन करीत आहें. जे मला आवडतात त्यांना मी बलशाली बनवितें. मी त्यांना ब्रह्मा, ऋषि अगर द्रष्टा हीं पदें प्राप्त करून देतें. रुद्राचें धनुष्य सज्ज करून त्याच्याकडून मी अश्रद्धांचा नाश करवितें. पृथ्वी व स्वर्ग दोहींकडे माझा वास आहे. मानवामानवांत स्पर्धा मीच निर्माण करतें. सर्व उत्पत्तीच्या बुडाशीं मीच आहें. समुद्राचा मध्य हें माझें उगमस्थान असून तेथून निघाल्यानंतर मी सर्व विश्व व्यापतें. माझ्या प्रभावानें जग उजळतें. वायू-

समवेत मी सर्वकडे हिंडतें. याप्रमाणें माझ्या प्रभावानें सर्व आसमंत भरून जातें."

ऋग्वेद-कालांत अनेक देवतांची सुख-समृद्धीसाठीं आराधना केलेली प्रामुख्यानें आढळते. असें असतांना या सूक्तांत सृष्टींत भरून राहिलेल्या एक आत्मतत्त्वाचें जें वर्णन आलेलें आहे तें वाचून मन आश्चर्यचकित होतें. परंतु सृष्टि परमेश्वरस्वरूप आहे अशा अर्थाची हिरण्यगर्भ-पुरुषसूक्तें वाचलीं म्हणजे देवीसूक्तांतील कल्पना इतकीशी आश्चर्यकारक वाटत नाहीं. अनेकांतून एक तत्त्व शोधण्याची कल्पना मनुष्यमात्रांत नैसर्गिक असते. देवीसूक्तांत बुद्धिनिष्ठ व तर्कशुद्ध तत्त्वज्ञानाचा आविष्कार नसला तरी त्यांतील भावनेची उदात्तता नेत्रदीपक आहे. शब्दालाच वाचा फुटण्याची ही कल्पना दिव्य स्फूर्तीची साक्ष पटविते. अशा स्फूर्तीची कल्पना इतर धर्मांतहि आहे. देवीसूक्तांतील कल्पनेचा विस्तार करून विश्वव्यापक तत्त्वज्ञानाची उभारणी करणें अशक्य नाहीं. शक्तिपंथानें याच सूक्ताच्या आधारानें आपलें तत्त्वज्ञान मांडलें यांत कांहींच आश्चर्य नाहीं. देवीसूक्ताची कर्त्री कोणीहि असो, ती महान् तत्त्वज्ञवृत्तीची महिला असली पाहिजे यांत शंका नाहीं.

**विश्ववारा** :— इतर नऊ स्त्रियांच्या ऋचा जरी फारशा तत्त्वप्रधान नसल्या तरी त्यांत भारतीय स्त्रीचें गृहजीवन व तिचें अंतरंग हुबेहूब प्रतिबिंबित झालें आहे. तिच्या सुखदुःखांचे पडसाद तिच्या या काव्यमय रचनेंत उमटले आहेत. यासाठीं या रचना थोड्या असल्या तरी त्यांचें ऐतिहासिक महत्त्व फार मोठें आहे. विश्ववारा ही अत्रिकुलांतील महिला. हिनें रचलेल्या सहा कवितांचें एक सूक्त अत्रिऋषींच्या कौटुंबिक ग्रंथांत आढळतें. ही नवविवाहित अंगना प्रातःकालीं पूर्वाभिमुख अग्नीसमोर उभी राहून त्या नारायणास अभिवादन करते व तिचें वैवाहिक जीवन सुखपूर्ण व्हावें म्हणून मनोभावें प्रार्थना करते असा या सूक्ताचा विषय आहे. या सूक्तांतील कांहीं भाग खालीं देत आहों.

" प्रातःकाल झालेला आहे. अग्नीनें आपल्या तेजस्वी ज्वालांनीं सर्व आसमंत उजळून टाकलेलें आहे. पळीभर तूप व आहुति हातांत घेऊन देवाची स्तुति करीत विश्ववारा प्रसन्न चित्तानें पूर्वाभिमुख अग्नीस सामोरी होत आहे."

"हे अग्निनारायणा, तूं अमरत्वाचें दैवत आहेस. तुझ्या भक्तांचा पाठी-

राखा होऊन तूं त्यांना सुखी व संपन्न करतोस. तुझा पूजक संपत्ति व सुख-साधनें तुझ्या पायांवर वाहून आदरातिथ्यानें तुझें स्वागत करतो."

"हे अग्निदेवा, आमच्या सुखसमृद्धीच्या आड येणाऱ्या शत्रूंचा तूं नाश कर. तुझ्या कृपेनें प्राप्त होणारी संपन्नता सर्वांगपरिपूर्ण असावी. आमचें वैवाहिक जीवन संयमपूर्ण असावें. आमच्या शत्रूंवर तुझें प्रभुत्व चालावें."

वरील ऋचांवरून असें दिसतें कीं, या ऋचा विश्ववारानें रचल्या व त्यांत उल्लेखिलेला अग्नियज्ञहि तिनें स्वतःच केला. ब्राह्मणकालांत यज्ञ करण्याचा स्त्रियांचा हा अधिकार हिरावून घेतला गेला.

**अपाला** :– अपालाच्या नांवावर असलेलें ८·९१ हें सूक्त सत्य व कल्पना-मिश्रित आहे. विश्ववारेप्रमाणेंच अपाला अग्निकुलोत्पन्ना व विवाहित असली तरी फारशी भाग्यवती नव्हती. तिला झालेल्या त्वचारोगामुळें पतीनें तिचा त्याग केला होता. अशा रोगपीडित अवस्थेंत तिला इंद्र कसा भेटला व त्यानें तिची रोगांतून कशी मुक्तता केली हें तिनें रचलेल्या सूक्तांत सांगितलें आहे. हें सूक्त अत्रि-कुटुंब ग्रंथांत नाहीं, पण ऋग्वेदाच्या आठव्या विभागांत दिलेलें आहे. सोमरस इंद्राला फार प्रिय आहे हें अपालेस माहीत होतें. एकदां पाण्याला जात असतांना वाटेंत तिला सोमवनस्पति दिसली. तिनें ती खुडून दांतांनीं सोमरस पिळून इंद्रासाठीं रस तयार केला. दातांनीं सोमरस पिळतांना जो आवाज झाला तो इंद्रानें ऐकला. सोमरस पिळताना ज्या दगडांचा उपयोग करतात त्यांचाच आवाज येत असावा असें वाटून इंद्र तेथें आला व अपालेच्या ओठांतून बाहेर येणाऱ्या सोमरसाचें त्यानें प्राशन केलें. तृप्त होऊन इंद्रानें तिला तीन वर दिले. या वरांनीं तिच्या पित्याच्या शेतांत उत्कृष्ट पीक आलें. पित्याच्या डोक्यावर व तिच्या अंगावर केस आले. अपालेस स्वतःच्या रथाच्या पोकळींतून तीन वेळां जावयास सांगून तिला इंद्रानें रोगमुक्त केलें. या घटनेचा उल्लेख करून पुढें बृहद्-देवतेंत देव मानवी स्त्रीवर लुब्ध झाल्याची हकीकत दिली आहे.

अपालेच्या सूक्तांतील कांहीं भाग पुढें देत आहों :—

"पाण्याला निघालेल्या एका युवतीनें वाटेंत सोमवनस्पति उगवलेली

पाहिली. घरीं परततांना ती स्वतःशींच म्हणाली, " इंद्रासाठीं-शक्रासाठीं मी तुझा रस काढतें. "

" तो हा समर्थ असणारा तूं आपलें तेज प्रगट करीत ( सोम पिण्या-करितां ) घरोघर जातोस. म्हणून येथेंहि लाह्या, करंभ, पुरोडाश आणि स्तोत्रें यासहित हा सोम तूं पी. "

" तूं कसा आहेस हें अजून आम्हांस माहीत नाहीं. पण तूं आलास तर आम्हांला तुझ्या स्वरूपाची ओळख पटेल. हे सोमा, इंद्रासाठीं तूं हळू हळू पाझरत रहा. "

" आमचें बल व संपत्ति इंद्रदेवानें अनेक पतींनीं वाढवावी. पतींनीं द्वेष केल्यामुळें असहायपणें वावरणाऱ्या आम्हां स्त्रियांचा इंद्रदेवानें स्वीकार करावा. "

" हे इंद्रा, तीन ठिकाणचें दुर्भिक्ष जाऊन तेथें समृद्धता यावी, पित्याच्या मस्तकावर ( केस वाढावेत ), त्याच्या शेतांत ( धान्य उगवावें ) व माझ्या अवयवांवर ( लव यावी. ) "

" रथाच्या आणि गाडीच्या भोंकांतून व जूंमधील पोकळींतून तीन वेळां आरपार घालवून, हे शतक्रतु इंद्रा, तूंच अपालेची अंगकांति सूर्याप्रमाणें तेजस्वी केलीस. "

घोषाः— ऋग्वेदांतील दहाव्या मंडलांत ३९ व ४० हीं दोन सूक्तें घोषेनें रचलेलीं आहेत. प्रत्येक सूक्तांत १४ आंकडे आहेत. इतर सर्व कवि-यित्रींपेक्षां घोषेची रचना अधिक आहे. अश्विनांच्या स्तुतिपर अनेक सूक्तें रच-णाऱ्या दीर्घतमस् व कक्षिवत् या साधुपुरुषांच्या कुलांत घोषेचा जन्म झाला. पण येवढ्या नामवंत कुलांत जन्म घेऊनहि घोषेचा विवाह होऊं शकला नाहीं. कारण तिच्या सर्व अंगावर पांढरी रक्तपिती झालेली होती. तिच्या घराण्यांत चालत आलेल्या प्रथेनुसार तिनेंहि अश्विनीकुमारांची या सूक्तांच्या द्वारें आराधना केली व त्यांनीं प्रसन्न होऊन तिला रोगमुक्त केलें अशी कथा सांगतात. यानंतर तिचा विवाह झाला असावा. कारण दहाव्या मंडलांतील ४१ वें सूक्त घोषेच्या मुलानें ( सुहस्त्यानें ) रचलें आहे असें समजतात. घोषेनें

रचलेल्या दोन सूक्तांपैकीं पहिल्यांत अश्विनीकुमारांनीं अनेक अंध व रोगग्रस्तांना कसें बरें केलें त्याची हकीकत आहे. दुसऱ्या सूक्तांत घोषेनें स्वतःसंबंधींच प्रामुख्यानें उल्लेख केलेला आहे. सर्व सूक्ताचें भाषांतर विस्तारभयामुळें देतां येणार नाहीं. फक्त ज्या भागांत घोषा आपल्या सुखमय वैवाहिक जीवनाबद्दलच्या अपेक्षा व्यक्त करते तेवढाच भाग खालीं देत आहों. .

" या कुमारिकेकडे एखादा विवाहेच्छु तरुण येऊं दे. त्याच्या स्वागतासाठीं पर्जन्यवृष्टि होऊं दे. वेलींची पखरण होऊं दे. उतरणीवरून पाण्याचे प्रवाह वाहूं देत. त्याला जिंकण्यासाठीं नव्हे, तर त्याच्या स्वागतासाठीं विवाहविधींची सिद्धता होऊं दे. "

" जे पुरुष आयुष्यांत दुःखी असतात, जे धर्माचरणासाठीं यज्ञयागांत स्त्रियांना अर्धा वांटा देतात, त्यांच्या बाहुपाशांत सुखी होणाऱ्या स्त्रिया आपल्या पतींना आलिंगनसुख देऊन त्यांच्यासाठीं संतति निर्माण करतात. "

" या सुखाची ओढ आम्ही समजूं शकत नाहीं. ( हे अश्विनीकुमारांनो, ) पतिसान्निध्याचा हा आनंद आम्हांला समजावून सांगा. अविवाहित तरुण लोक स्त्रियांभोंवतीं रुंजी कां घालीत राहतात हें जाणण्याची व या सुखाचा आस्वाद घेण्याची आमची इच्छा पूर्ण करा. प्रेमळ, सुदृढ व तेजस्वी पुरुषांच्या पत्नी म्हणून त्यांच्या गृहांत आम्ही नांदावें अशी आमची तीव्र इच्छा आहे. "

" हे संपन्न कुमारांनो, तुमच्या शुभेच्छा आम्हांला मिळोत. आमच्या हृदयांतील अकांक्षांना योग्य नियंत्रण घालून तुम्ही उभयतांनीं आमच्या संरक्षक देवता व्हावें. संपन्न स्थितींत राहून आम्ही आमच्या पतीच्या प्रेमास पात्र व्हावें. "

" हे कुमारांनो, माझ्या पतीला संपन्न करा. माझ्या पोटीं येणारा पुत्र तुमचा भक्त होवो. माझ्या ( वैवाहिक सौख्याच्या ) वाटेंत उभ्या असलेल्या संकटांचा परिहार होवो. "

### इतर अध्यात्मवादी स्त्रिया

मागें उल्लेखिलेल्यांपैकीं उरलेल्या सहा स्त्रियांच्या नांवें सबंध सूक्त नाहीं पण त्यांतील कांहीं रचना आहे. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांतील

१३४ व्या सूक्तांतील पांच आंकडे व सहाव्या आंकड्याचा कांहीं भाग मांधात्रि या कवयित्रीनें रचलेला आहे. उरलेली रचना गोधाच्या नांवें इतिहासकारांनीं टाकलेली आहे. या काव्यरचनेंत इंद्राच्या व विश्वे-देवांच्या स्तुतीखेरीज विशेष असें कांहीं नाहीं. २८ व्या सूक्तांतील पहिल्या आंकड्याची रचना वसुक्राच्या पत्नीनें केली आहे असें समजण्यांत येतें. यांत इंद्राची स्तुति आहे. दहाव्या मंडलांतील २७ वें सूक्त व २८ व्याचा उरलेला भाग वसुक्रानेंच रचलेला आहे (ऐतरेय १·२·२ शांखायन १·३). अगस्त्य ऋषींच्या बहिणीनें दहाव्या मंडलांतील ६० व्या सूक्तांतील एक आंकडा रचलेला आहे असा उल्लेख सांपडतो (१०—६०—६). इतर आंकडे तिच्या पुत्रांनीं रचले आहेत अशी कल्पना आहे. अगस्त्यांच्या भगिनीच्या या रचनेंत तिनें इक्ष्वाकु कुलांतील असमाति राजाला त्यानें केलेल्या अन्यायाचा जाब विचारला आहे. तिचे पुत्र या राजाकडे पौरोहित्य करीत होते. परंतु राजानें त्यांना काढून टाकलें व नवीन नेमलेल्या पुरोहितांनीं तिच्या एका पुत्राचा वध केला होता (बृहद्-देवता ७·८४ ते १०२). ती म्हणते,

" हे राजा, अगस्त्याच्या भाच्यांच्या रक्षणासाठीं तूं आपल्या रथाला तांबडे घोडे जोडून सज्ज कर. "

ऋग्वेदांत योध्या स्त्रियांचे व क्रीडापटु स्त्रियांचेहि उल्लेख आढळतात. पहिल्या मंडलांत खेलासमवेत युद्ध करीत असतांना विश्पलाचा पाय तोडला गेल्याचा वृत्तान्त आला आहे (१·११६·१५). अश्विनीकुमारांनीं लगेच त्या जागीं लोखंडी पाय बसविला. दहाव्या मंडलांत मुद्गल राजानें आपल्या रथ चालविणाऱ्या मुद्गलानीं राणीच्या मदतीनें लढाई (कदाचित् रथांची शर्यत असावी) जिंकल्याची गोष्ट दिली आहे (१०·१०२). यांपैकीं कोणत्याहि स्त्रीनें सूक्तरचना मात्र केलेली नाहीं.

कांहींशा वेगळ्या पद्धतीची काव्यरचना लोपामुद्रा, शश्वती व रोमशा यांनीं केलेली आढळते. त्यांच्या काव्यांत भावनाविष्कारावावत कमालीचा मोकळेपणा आढळून येतो. या उत्स्फूर्त काव्यांत पतीच्या आलिंगनसुखाची तीव्र अपेक्षा व त्यासाठीं झुरणाऱ्या पत्नीचें वर्णन केलेलें आहे. अगस्त्याची

पत्नी लोपामुद्रा ही पहिल्या मंडलांतील १७९ व्या सूक्तांतील पहिल्या दोन काव्यांची (आंकड्यांची) कर्त्री आहे. पतींचें व तिचें प्रेमविषयक संभाषण दिलेलें आहे. यांत पतीच्या विरक्त वृत्तीमुळें तिचा कोंडमारा झालेला आहे. तिच्या एकनिष्ठ व प्रदीर्घ सेवेच्या बदलांत ती त्याच्या प्रेमाची व सहवासाची अपेक्षा करीत आहे. लोपामुद्रेच्या काव्याचा आशय असा आहे :—

"गेली कित्येक वर्षें मी सकाळ-संध्याकाळ रात्रंदिवस आपली सेवा करीत आहें. या सेवेंत मला वृद्धावस्था प्राप्त झाल्यानें माझें सौंदर्य नष्ट होऊन गेलें आहे. आतां तरी पतीनें माझ्याकडे आदरानें व सहानुभूतीनें पहावें व मला सहवाससुख द्यावें."

सत्याच्या शोधार्थ अहोरात्र तपश्चर्या करून प्राचीन ऋषींना सिद्धावस्था प्राप्त झाली. प्रत्यक्ष परमेश्वराशीं ते तत्त्वचर्चा करूं शकले. निसर्गनियमानुसार त्यांना मुलेंहि झालीं. पण त्यांच्या तपस्वी जीवनांत कधीं खंड पडला नाहीं. अशा तऱ्हेच्या तपस्यांनीं आपल्या स्त्रियांना सहवाससुखहि दिलें.

अगस्त्यांनीं ऐहिक व पारमार्थिक दोन्ही बाजू व्यवस्थित सांभाळल्या होत्या असें दिसतें.

शश्वतीला 'नारी' (आदर्श स्त्री) ही संज्ञा दिलेली दिसते. पहिल्या मंडलांतील १७९.६ या तिनें रचलेल्या विभागांत तिच्या पतींचें (असंग प्लायोगी) गेलेलें पौरुषत्व परत आल्याबद्दल आनंद व्यक्त केलेला आहे.

बृहद्-देवतामध्यें ज्या रोमशेचा उल्लेख केलेला आहे ती भावयव्य राजाची पत्नी. तिला पूर्ण यौवन प्राप्त झाल्यानंतर ती उत्साहानें व आत्मविश्वासानें पतीला भोग घेण्याची सूचना करते असा पहिल्या मंडलांतील १२६.७ या काव्याचा आशय आहे.

स्त्रीसुलभ भावनाचा आविष्कार मोकळेपणानें करणाऱ्या या काव्यांचा समावेश आमच्या प्राचीन धर्मवाङ्मयांत केलेला आहे ही गोष्ट विशेष उल्लेखनीय वाटते.

### उपनिषद्-कालांतील (द्रष्ट्या) महिला

**मैत्रेयी** :— धर्मविषयक चर्चेनें भरलेल्या समृद्ध ब्राह्मण-वाङ्मयांत कोठेंहि स्त्रियांचा उल्लेख नाहीं. पण उपनिषद्-कालांत मात्र दोन विदुषी

चमकलेल्या दिसतात. यांपैकीं गार्गीनें ( वचक्नूची कन्या ) प्रसिद्ध तत्त्व. याज्ञवल्क्याशींहि तत्त्वचर्चा केलेली आढळते. दुर्दैवानें या स्त्रियांबद्दल बृहदारण्यक उपनिषदांत जो ओझरता उल्लेख आलेला आहे त्यापेक्षां अधिक माहिती उपलब्ध झालेली नाही. परंतु येवढ्यावरूनसुद्धां त्यांची आध्यात्मिक पातळी किती उच्च होती हें दिसून येतें. सर्व प्रपंचाची व्यवस्था व वांटणी आपल्या दोन स्त्रिया मैत्रेयी व कात्यायनी यांच्यांत करून परमार्थसाधनेसाठीं जाण्याच्या तयारींत याज्ञवल्क्य असतांना मैत्रेयीनें त्याला विचारलें, " सर्व जगांतील संपत्तीची जरी मी मालकीण बनलें तरी मी अमर होईन का ? " अर्थातच याला याज्ञवल्क्यानें नकारात्मक उत्तर दिलें. " मग ही संपत्ति घेऊन मी काय करूं ? " असें म्हणून तिनें " अमरत्व प्राप्त करून देणारें ज्ञान मला द्या " अशी पतीस विनंती केली. याज्ञवल्क्यांनीं आनंदानें पत्नीस जवळ बसवून तिला ब्रह्मज्ञान सांगितलें व चिंतनाचा मार्ग दाखविला. 'ब्रह्म' शब्दानें व्यक्त होणाऱ्या परमतत्त्वाचें ज्ञान हेंच सर्व उपनिषदांचें सार आहे.

**गार्गी** :— गार्गीचें अध्ययन बरेंच झालेलें असावें. तिनें याज्ञवल्क्याशीं केलेल्या चर्चेत त्यांना विश्वनिर्मितीचें स्पष्टीकरण करण्यास सांगितलें. तिच्या संशोधक बुद्धिमत्तेची कल्पना आल्यानंतर याज्ञवल्क्यहि थोडे गोंधळले आणि तिला म्हणाले, " खरा तत्त्वजिज्ञासु फार चर्चा करीत नाहीं. कारण नुसत्या शब्दच्छलानें परमतत्त्वाचें आकलन होणें शक्य नाहीं. ". यानंतर पुन्हां तत्त्वज्ञांच्या जाहीर चर्चेत, शत्रूला निश्चित जिंकील असे बाण धनुष्यावर सज्ज करून येणाऱ्या शूर राजपुत्राप्रमाणें, निर्भय मनानें पुढें येऊन याज्ञवल्क्यास गार्गीनें दोन प्रश्न विचारले; व त्यांचीं समाधानकारक उत्तरें मिळतांच जाहीर रीतीनें स्वतःचा पराभव मान्य करून याज्ञवल्क्यास सर्वांनीं मुक्तकंठानें आर्जिक्यपद द्यावें अशी शिफारस तिनें केली. ब्रह्माचें वर्णन याज्ञवल्क्याइतकें यथोचित कोणीहि करूं शकणार नाहीं या गार्गीच्या प्रशस्तिपत्रकानंतरच याज्ञवल्क्यांना आर्जिक्यपद मिळालें. यावरून गार्गीचाहि तत्त्वज्ञानक्षेत्रांतील अधिकार लक्षांत येईल.

# प्रकरण ७ वें

## रामायणकालीन थोर स्त्रिया

तप आणि स्वाध्याय या दोन गुणांनीं मंडित अशा सुप्रसिद्ध नारद-मुनींच्या वर्णनानें वाल्मीकि रामायणाची सुरुवात झाली आहे. नारद वाल्मीकींना भेटावयास आले असतांना तत्कालीन मानवांत सर्वगुणसंपन्न व आदर्श विभूति कोण असा प्रश्न वाल्मीकींनीं नारदास केला. तेव्हां नारदांनीं श्रीरामचंद्राचा इतिहास त्यांना सांगितला. नारदमुनि गेल्यानंतर ब्रह्मदेवानें वाल्मीकींना भेट देऊन श्रीरामकथा निरूपण करण्याची त्यांना सूचना केली. श्रीरामचरित्राचा जो भाग अज्ञात होता तोहि सर्व त्यांना योगबलानें समजेल असें आश्वासन ब्रह्मदेवानें दिल्यानंतर वाल्मीकींनीं आपल्या मनश्चक्षूंसमोर सर्व घटना प्रत्यक्ष पाहिल्या व नंतर रामायण लिहिलें.

रामायणाचा नायक या दृष्टीनें ही सर्व कथा रामाच्या जीवनाभोंवतींच गुंफली जावी हें साहजिक आहे. या कथेंतील इतर सर्व ऋषि, मुनि, देव व स्त्रिया यांचा उपयोग रामचरित्र अधिक उठावदार करण्यापुरताच लेखकानें केलेला आहे. माता, भगिनी, कन्या व पत्नी या अनेक नात्यांनीं निर-निराळ्या स्त्रियांच्या व्यक्तिरेखा रामायणात आल्या आहेत. कांहीं स्त्रिया रामाच्या जवळच्या नातेवाईक आहेत व कांहीं त्याच्या दूरच्या परिवारातील आहेत. सामाजिकदृष्ट्या कांहीं अगदीं सामान्य स्त्रियाहि रामायणांत आहेत. रामाची पत्नी सीता हिची व्यक्तिरेखा सर्वगुणसंपन्न व म्हणून अतिशय सरस उतरली आहे. याचें उदाहरण म्हणून सीतेच्या संशोधनार्थ गेलेल्या हनुमानाच्या उद्गारांचें देतां येईल. एके ठिकाणीं हनुमानानें अलंकारांनीं मंडित अशी सौंदर्यवती मंदोदरी निद्रावस्थेंत पाहिली. क्षणभर त्याला वाटलें, " ही सीता तर नसेल ! " पण लगेच पुन्हां त्यानें विचार केला, " पति जवळ नसतांना साध्वी सीता अलंकार कसे वापरील ? तिचा चेहरा इतका टव-

चमकलेल्या दिसतात. यांपैकीं गार्गीनें ( वचक्नूची कन्या ) प्रसिद्ध तत्त्वज्ञ याज्ञवल्क्याशींहि तत्त्वचर्चा केलेली आढळते. दुर्दैवानें या स्त्रियांबद्दल बृहदारण्यक उपनिषदांत जो ओझरता उल्लेख आलेला आहे त्यापेक्षां अधिक माहिती उपलब्ध झालेली नाहीं. परंतु येवढ्यावरूनमुद्धां त्यांची आध्यात्मिक पातळी किती उच्च होती हें दिसून येतें. सर्व प्रपंचाची व्यवस्था व वांटणी आपल्या दोन स्त्रिया मैत्रेयी व कात्यायनी यांच्यांत करून परमार्थसाधनेसाठीं जाण्याच्या तयारींत याज्ञवल्क्य असतांना मैत्रेयीनें त्याला विचारलें, " सर्व जगांतील संपत्तीची जरी मी मालकीण बनलें तरी मी अमर होईन का ? " अर्थातच याला याज्ञवल्क्यानें नकारात्मक उत्तर दिलें. " मग ही संपत्ति घेऊन मी काय करूं ? " असें म्हणून तिनें " अमरत्व प्राप्त करून देणारें ज्ञान मला द्या " अशी पतीस विनंती केली. याज्ञवल्क्यांनीं आनंदानें पत्नीस जवळ बसवून तिला ब्रह्मज्ञान सांगितलें व चिंतनाचा मार्ग दाखविला. 'ब्रह्म' शब्दानें व्यक्त होणाऱ्या परमतत्त्वाचें ज्ञान हेंच सर्व उपनिषदांचें सार आहे.

**गार्गी** :— गार्गीचें अध्ययन बरेंच झालेलें असावें. तिनें याज्ञवल्क्याशीं केलेल्या चर्चेत त्यांना विश्वनिर्मितीचें स्पष्टीकरण करण्यास सांगितलें. तिच्या संशोधक बुद्धिमत्तेची कल्पना आल्यानंतर याज्ञवल्क्यहि थोडे गोंधळले आणि तिला म्हणाले, " खरा तत्त्वजिज्ञासु फार चर्चा करीत नाहीं. कारण नुसत्या शब्दच्छलानें परमतत्त्वाचें आकलन होणें शक्य नाहीं. ". यानंतर पुन्हां तत्त्वज्ञांच्या जाहीर चर्चेत, शत्रूला निश्चित जिंकील असे बाण धनुष्यावर सज्ज करून येणाऱ्या शूर राजपुत्राप्रमाणें, निर्भय मनानें पुढें येऊन याज्ञवल्क्यास गार्गीनें दोन प्रश्न विचारले; व त्यांचीं समाधानकारक उत्तरें मिळतांच जाहीर रीतीनें स्वतःचा पराभव मान्य करून याज्ञवल्क्यास सर्वांनीं मुकाट्यानें आजिंक्यपद द्यावें अशी शिफारस तिनें केली. ब्रह्माचें वर्णन याज्ञवल्क्याइतकें यथोचित कोणीहि करूं शकणार नाहीं या गार्गीच्या प्रशस्तिपत्रकानंतरच याज्ञवल्क्यांना अजिंक्यपद मिळालें. यावरून गार्गीचाहि तत्त्वज्ञानक्षेत्रांतील अधिकार लक्षांत येईल.

# प्रकरण ७ वें

## रामायणकालीन थोर स्त्रिया

तप आणि स्वाध्याय या दोन गुणांनीं मंडित अशा सुप्रसिद्ध नारद-मुनींच्या वर्णनानें वाल्मीकि रामायणाची सुरुवात झाली आहे. नारद वाल्मीकींना भेटावयास आले असतांना तत्कालीन मानवांत सर्वगुणसंपन्न व आदर्श विभूति कोण असा प्रश्न वाल्मीकींनीं नारदास केला. तेव्हां नारदांनीं श्रीरामचंद्राचा इतिहास त्यांना सांगितला. नारदमुनि गेल्यानंतर ब्रह्मयानें वाल्मीकींना भेट देऊन श्रीरामकथा निरूपण करण्याची त्यांना सूचना केली. श्रीरामचरित्राचा जो भाग अज्ञात होता तोहि सर्व त्यांना योगबलानें समजेल असें आश्वासन ब्रह्मयानें दिल्यानंतर वाल्मीकींनीं आपल्या मनश्चक्षूंसमोर सर्व घटना प्रत्यक्ष पाहिल्या व नंतर रामायण लिहिलें.

रामायणाचा नायक या दृष्टीनें ही सर्व कथा रामाच्या जीवनाभोंवतींच गुंफली जावी हें साहजिक आहे. या कथेंतील इतर सर्व ऋषि, मुनि, देव व स्त्रिया यांचा उपयोग रामचरित्र अधिक उठावदार करण्यापुरताच लेखकानें केलेला आहे. माता, भगिनी, कन्या व पत्नी या अनेक नात्यांनीं निर-निराळ्या स्त्रियांच्या व्यक्तिरेखा रामायणात आल्या आहेत. कांहीं स्त्रिया रामाच्या जवळच्या नातेवाईक आहेत व कांहीं त्याच्या दूरच्या परिवारातील आहेत. सामाजिकदृष्ट्या कांहीं अगदीं सामान्य स्त्रियाहि रामायणांत आहेत. रामाची पत्नी सीता हिची व्यक्तिरेखा सर्वगुणसंपन्न व म्हणून अतिशय सरस उतरली आहे. याचें उदाहरण म्हणून सीतेच्या सशोधनार्थ गेलेल्या हनुमानाच्या उद्गारांचें देतां येईल. एके ठिकाणीं हनुमानानें अलंकारांनीं मंडित अशी सौंदर्यवती मंदोदरी निद्रावस्थेंत पाहिली. क्षणभर त्याला वाटलें, " ही सीता तर नसेल ! " पण लगेच पुन्हां त्यानें विचार केला, " पति जवळ नसतांना साध्वी सीता अलंकार कसे वापरील ? तिचा चेहरा इतका टव-

टवीत कसा दिसेल ? आणि तिला इतकी शांत झोंप तरी कशी येईल ? ”
मारुतीच्या या विचारमालिकेंत सीतेची रामाचरील निष्ठा व प्रेम व्यक्त होतें.

वाल्मीकीनें वर्णिलेल्या महिलांत दोन प्रकार आढळतात. अनसूयेसारख्या संसारत्याग करून तपश्चर्येसाठीं वनवास पत्करणाऱ्या ब्रह्मवादिनी स्त्रिया पहिल्या प्रकारांत येतात. शबरी आणि स्वयंप्रभा यांचा समावेश याच वर्गांत करावा लागेल. एकान्तवासांत रहात असतांना आपल्या सान्निध्यांत येणाऱ्या सर्वांना त्यांनीं आपल्या गुणपरिमलानें सुखी केलें. रामायणांत अहल्येचें वर्णन अधिक सविस्तर दिलें आहे. तिचें पूर्वायुष्य, अधःपात व पुन्हां उद्धारापर्यंत तिनें भोगलेल्या कष्टाच्याद्वारा स्त्रीजीवनविषयक अनेक कल्पनांचा उलगडा करून लेखकानें आदर्श स्त्रीजीवनाचें चित्र उभें केलें आहे.

दुसरा वर्ग संसारांत राहून आपल्या शुद्ध चारित्र्यानें व कर्तव्य-निष्ठेनें स्त्रीजीवनाचे आदर्श निर्माण करणाऱ्या स्त्रियांचा. या वर्गांत लंकेंतील मंदोदरी, सरमा आणि त्रिजटा; किष्किंधानगरींतील तारा; अयोध्यावासी दशरथाच्या तिन्ही राण्या व सीता या सर्वांचा समावेश होतो. या सर्व स्त्रियांच्या जीवनांत अनेक यक्षप्रश्न उद्भवले. दैववशात् प्राप्त झालेल्या परि-स्थितींत त्या सामान्य माणसांप्रमाणेंच सुखी अगर दुःखी झाल्या. सारांश, त्यांचें थोरपण त्यांच्या असामान्य जीवनांत नाहीं तर त्यांच्या धैर्यांत, सत्य-प्रियतेंत, निष्ठेंत, सहनशीलतेंत व श्रद्धेंत सांठविलेलें आहे.

“ महान् पर्वत ज्याप्रमाणें झंझावातांतहि स्थिर राहतात त्याप्रमाणें थोर माणसें कितीहि संकटें आलीं तरी आपली शांतता भंग पावूं देत नाहींत ” या लक्ष्मणाच्या उद्गारांत तत्कालीन थोर व्यक्तींच्या जीवनाचा आदर्शच सूचित केलेला आहे. कौसल्या काय, ऊर्मिला काय किंवा सीता काय, सर्वांच्या आयुष्यात मोठमोठीं संकटें आलीं व सुरुवातीला त्या सर्व-सामान्य स्त्रियांप्रमाणेंच घाबरल्या, गोंधळल्या व दुःखी झाल्या. पण कालांत-रानें प्रत्येकीनें या संकटांतून जी आदर्श वृत्ति निर्माण केली व जीवनाला निष्ठापूर्वक जी कलाटणी दिली तिला इतिहासांत तोड नाहीं. या असामान्य ध्येयनिष्ठेंत सर्व रामायणकालीन स्त्रियांचें थोरपण आढळून येतें.

### ब्रह्मवादिनी स्त्रिया

**अनसूया :—** रामायणाच्या प्रारंभीं स्वतः वाल्मीकीनें तप आणि

स्वाध्याय यांची जी महती गाइली आहे, त्याच सद्गुणांची मूर्तिमंत प्रतिमा असा अनसूयेचा यथार्थतेनें गौरवपूर्ण उल्लेख करतां येईल. रामायणांत वर्णिलेली अनसूया वृद्ध झालेली आहे. तिच्या सर्वांगावर सुरकुत्या आहेत, गात्रें शिथिल झालेलीं आहेत व केस पिकलेले आहेत. कर्दलीपत्र जसें वाऱ्याच्या झुळकीनेंहि हाल्तें तशी अनसूया वार्धक्यामुळें थरथरते. अनसूया व सीता यांची भेट ही रामायणांतील एक अविस्मरणीय घटना आहे. दोघीहि साध्वी पतिपरायण ! अत्रिमुनींचें जीवन निवृत्त व तपस्वी तर रामापुढें अफाट विस्ताराच्या भूप्रदेशाची शासनव्यवस्था. वयोमानाप्रमाणें अनसूया व सीता यांच्या अनुभवांत व दृष्टिकोनांतहि फरक आहे. अनसूया पतीबरोबरीनें खडतर पुरश्चरण करून इतरांना आपल्या पुण्याईचें फळ प्राप्त करून देत असते. अत्रिमुनि स्वतः अशी हकीकत सांगतात कीं, एकदां फार मोठा दुष्काळ पडला होता. माणसें भुकेनें व्याकूळ झालीं होतीं. अनसूयेनें त्या वेळीं आपल्या तपाच्या सामर्थ्यानें फळें व कंदमुळें निर्माण केलीं व गंगेचा प्रवाह आपल्या आश्रमाजवळून नेऊन लोकांसाठीं पाण्याची व्यवस्था केली. खडतर, व्रतस्थ जीवन व श्रद्धा हा अनसूयेच्या स्वभावाचा स्थायिभाव आहे असें म्हणतां येईल.

सीता भेटल्यानंतर पतिव्रताधर्मावर अनसूया एक निवेदन करते. ' महद्भाग्यानें तुला सद्गुण लाभले आहेत ' असें सीतेला सांगून स्वच्छंदी व दुर्गुणी स्त्रिया कशा वागतात याचें वर्णन अनसूया करते. वास्तविक पाहतां सीतेला नवीन घेण्यासारखें असें कांहीहि अनसूयेच्या निवेदनात नव्हतें. परंतु तपस्विनी वृद्धेच्या शब्दांचा योग्य तो आदर करून सीता म्हणते, " आपला उपदेश अतिशय मूल्यवान् व शिरोधार्य आहे. आपण म्हणतां त्याप्रमाणें पति हाच पत्नीचा खरा आध्यात्मिक गुरु असतो. माझ्या सासूबाईंनीं वनांत जाण्यास निघण्यापूर्वीं व आईनें अग्निसमक्ष केलेला उपदेश माझ्या मनावर कायम ठसलेला आहे. ' स्त्रीची तपश्चर्या म्हणजे पतीची सेवा ' असें माझे नातेवाईकहि आजपर्यंत मला सांगत आले आहेत. सावित्रीला पतिसेवेमुळें स्वर्गांत जें मानाचें स्थान मिळालें तेंच अत्रिमुनींच्या सेवेनें आपणहि इहलोकीं मिळविलेलें आहे." सीतेचे उद्गार ऐकून अनसूया आनंदित होते व स्वतःच्या तपःसामर्थ्यानें सीतेला आशीर्वाद देण्याची इच्छा दर्शविते. नम्रता-

पूर्वक सीता म्हणते, " वांछित तें सर्व मला मिळालेंच आहे. " यावर अनसूया कधींहि न सुकणारी एक पुष्पमाला आणि इतर कांहीं अलंकार देऊन व चंदनावलेपन करून सीतेचा गौरव करते. " या चंदनाच्या सुवासामुळें लक्ष्मीच्या विष्णूप्रमाणें तुझा पतीहि आनंदित होईल " असें अनसूया म्हणते व नंतर रामचंद्रानें शिवधनूचा कसा भंग केला ह्याबद्दलची रोमांचकारी कथा सीतेस सांगते. कथा संपते व दिवसहि मावळतो. मावळत्या सूर्याचें, घरट्याकडे परतणाऱ्या पक्षांचें व पाणी घेऊन पर्णकुटीकडे वळणाऱ्या ऋषिवृंदांचें अनसूया काव्यमय वर्णन करते. शेवटीं भेट म्हणून दिलेले अलंकार घालून रामाकडे जावें अशी आग्रहाची सूचना सीतेला करून राम, लक्ष्मण व सीता यांना अनसूया प्रेमानें निरोप देते.

शबरी :– अनसूयेची थोरवी अखंड पतिसेवेंत दिसून येते तर शबरीचें मोठेपण अहोरात्र केलेल्या गुरुसेवेंत दिसून येतें. तिचे गुरु हे मातंग ऋषींचे शिष्य. मातंग मुनींसाठीं फळें व कंदमुळें जमवतांना खालीं पडलेल्या घर्मबिंदूंचे पुष्पालंकार बनले असें मातंगशिष्यांचें तपोबल विलक्षण होतें. यावरून त्यांच्या शब्दांत केवढें सामर्थ्य सांठविलेलें असेल याची कल्पना करता येईल. " राम तुझ्या आश्रमांत येऊन तुला दर्शन देतील " असें मातंगशिष्यांनीं शबरीला आश्वासन दिलें होतें. त्याप्रमाणें फळें व कंदमुळें जमवून शबरी मोठ्या औत्सुक्यानें रामाची मार्गप्रतीक्षा करूं लागली. रामचंद्र आले. शबरीनें त्यांच्या पायांवर लोटांगण घातलें. सर्व तपांचें श्रेय मिळाल्याचा आनंद तिला मिळाला. रामचंद्रांनीं तिची विचारपूस केली. कृतज्ञतेनें शबरीनें उत्तर दिलें, " आजपर्यंतच्या तपश्चर्येचें फल आपल्या दर्शनानें मला लाभलें आहे. सर्व स्वर्गीय पुण्यवंतांत आपल्याला अग्रस्थान आहे. आपली पूजा केल्यास मलाहि देवलोकांत स्थान प्राप्त होईल. " असें म्हणून जमा केलेलीं कंदमुळें तिनें रामचंद्रांना अर्पण केलीं व विधिपूर्वक रामासमक्ष अग्निप्रवेश केला. याप्रमाणें दिव्य करून शबरीनें आपल्या गुरु-प्रमाणेंच देवलोकीं अटळपद प्राप्त करून घेतलें. थोर घराण्यांतील स्त्रियांशीं दिसून येणाऱ्या विरोधानें शबरीचें व्यक्तिचित्र अधिकच उठावदार झालें आहे. मातंगशिष्यांच्या मनोभावें केलेल्या सेवेनें तिनें मुक्ति मिळविली. साधेपणा, श्रद्धा, अचूक अंतर्दृष्टि व मनःसंयम या गुणांनीं शबरीच्या चरित्रांत

असामान्यता आली आहे. मुक्तीसाठीं अनुवंश, धार्मिक विधि, अध्ययन किंवा लिंगभेद यापेक्षां श्रद्धा व सेवा हेच गुण अधिक महत्त्वाचे आहेत ही गोष्ट शबरीच्या जीवनावरून रामायणकारांना सिद्ध करावयाची आहे.

स्वयंप्रभा :– या साध्वीचा रामचंद्राशीं प्रत्यक्ष संबंध आला नाहीं. परंतु तिनें हनुमान् व त्याच्या दोस्तांना मदत करून रामकार्याला अप्रत्यक्षपणें हातभार लावला. हनुमान् व इतर वानर प्रवासांत थकले होते. सर्वांनीं एक विस्तीर्ण गुहा पाहून तींत प्रवेश केला. तेथें सुवर्णाचे वृक्ष होते, हिरेजडित बैठका होत्या व आकर्षक निवासस्थानें होतीं. थोडें पुढें गेल्यावर सर्वांना एक तेजस्विनी वृद्धा दिसली. तिनें कृष्णाजिन परिधान केलें होतें. "ती कोण, तेथील ऐश्वर्य तिनें स्वतःच्या तपःसामर्थ्यानें निर्माण केलें का" वगैरे चौकशी हनुमानानें केली. स्वयंप्रभेनें सांगितलें, "हें सर्व मयानें निर्माण केलेलें आहे. दीर्घकाल तप करून त्यानें ही निर्माण-शक्ति प्राप्त करून घेतली. कालांतरानें त्याला हेमा नांवाच्या अप्सरेची अभिलाषा उत्पन्न झाली. इंद्राला त्याचा राग येऊन त्यानें त्याला मारलें. ब्रह्मयाला हेमाची कींव येऊन त्यानें तिच्यासाठीं तें अरण्य व ती सुंदर गुहा देऊं केली." हनुमान् व त्याचे वानरमित्र गुहेंत आले त्या वेळीं हेमा बाहेर गेली होती व तिची मैत्रीण स्वयंप्रभा गुहेचें रक्षण करीत होती. हनुमान् व त्याची वानरसेना खूप भुकेलेली आहे हें जाणून तिनें त्यांना यथेच्छ फलाहार करण्याची विनंती केली. पोट भरल्यावरोबर सर्वांनीं त्वकर जाण्याची इच्छा दर्शविली. परंतु स्वयंप्रभेनें सांगितलें कीं, "या गुहेंतून कोणींहि जिवंत बाहेर जाऊ शकत नाहीं. परंतु तुम्हा सर्वांना मी आपल्या सामर्थ्यानें सुखरूप समुद्रकिनारीं नेऊन सोडतें." क्षणार्धातच ती सर्व सेना समुद्रापाशीं आली. सर्वांना रामकार्यात शुभ चिंतून स्वयंप्रभा गुहेकडे परतली. इतक्या ऐश्वर्यात असूनहि स्वयंप्रभा व्रतस्थ वृत्तीनें राही व मैत्रिणीच्या उपयोगी पडे यांतच तिचे असामान्यत्व दिसून येतें. मेरुसावर्णीची ही कन्या अतिशय आतिथ्यशील होती. परोपकार हेंच तिच्या आयुष्याचें ब्रीदवाक्य होतें. स्वतःसाठीं तिनें कोणाकडूनहि कसलीच अपेक्षा केली नाहीं.

अहल्या :– अहल्या ही वनवासी तपस्विनींपैकीं शेवटची उल्लेखनीय महिला. वासनांना जिंकूं इच्छिणाऱ्या मुमुक्षूंत अहल्येचा क्रमांक खूप वर

लागेल. तिच्या जीवनसरणीवरून असें दिसून येईल कीं, स्वतःला जिंकून सिद्धावस्था प्राप्त करून घेणें, हें फार परिश्रमाचें व टप्प्याटप्प्यानें साध्य होणारें ध्येय आहे.

' हल ' म्हणजे कुरूपता. अहल्येंत सौंदर्यानें पूर्णत्व गांठलें होतें म्हणून ब्रह्मयानें तिचें अहल्या असें नांव ठेवलें होतें. ती ल्हान असतांनाच त्यानें तिला गौतममुनींच्या स्वाधीन केलें. अहल्या अप्रतिम सुंदर असूनहि गौतमांनीं तिजकडे कधींहि पापी दृष्टीनें पाहिलें नाहीं. त्यामुळें तारुण्यांतहि अहल्येचा पवित्र जीवनप्रवाह संथपणें वहात राहिला. ब्रह्मयानें गौतममुनीशीं कालांतरानें अहल्येचा विवाह घडवून आणला. विवाहानंतरहि गौतम व अहल्या पूर्वीप्रमाणें व्रतस्थ रहात. आध्यात्मिक दृष्टीनें अहल्या फारशी परिपक्व झालेली नव्हती. त्यांतच तारुण्यसुलभ वासना अधूनमधून उसळी मारीत. याचा फायदा घेउन इंद्रानें गौतमाच्या गैरहजेरींत त्याचें रूप घेऊन तिजकडे येऊन तिला भ्रष्ट केलें.

पर्णकुटींत परत आल्यानंतर गौतमास हा प्रकार अर्थातच समजला. पुरश्चरणानें ज्यांचें मनोबल वाढलेलें असतें त्यांचा राग शापास कारणीभूत होतो. अहल्येच्या स्खलनशीलतेमुळें कोपायमान झालेल्या गौतमानें तिला भयंकर शाप दिला. " जगांत तुझें सौंदर्य यापुढें अद्वितीय राहणार नाहीं. एक हजार वर्षें शिलारूपांत हवेवर तुला जीवन कंठावें लागेल. त्यानंतर रामचंद्र ज्या वेळीं या अरण्यांत प्रवेश करतील तेव्हां त्यांच्या चरणस्पर्शानें तुझा उद्धार होईल. " क्षणार्धात गौतमांची शापवाणी खरी झाली. शिलारूप अहल्या पश्चात्तापदग्ध जीवन जगूं लागली. रामचंद्र तेथें येऊन त्यांच्या चरणांनीं त्या शीलेला स्पर्श करताच अहल्या दिसूं लागली. तिच्या तपाच्या तेजानें राम-लक्ष्मण स्तिमित झाले व तिचे पाय धरण्यास पुढें वांकले. गौतमांच्या शब्दांची आठवण होऊन अहल्येनें स्वतःच तत्परतेनें रामचंद्रांच्या पायांवर डोकें ठेवलें. अहल्या आता शापमुक्त झालेली होती. रामचंद्रांनीं तिला परत गौतमांच्या स्वाधीन केलें.

विश्वामित्रानें जनकराजाच्या दरबारांत जेव्हां ही सर्व हकीकत निवेदन केली तेव्हां अहल्येचा पुत्र शतानंद अधीरतेनें म्हणाला, " पुर-

श्वरणांत वृद्ध झालेल्या माझ्या मान्यवर मातेनें रामाचें उचित प्रकारें आतिथ्य केलें का ? " रामचंद्र तिजवर प्रसन्न झाले का ? " यावर " सर्व कांहीं यथास्थित होऊन भृगूंनीं ज्याप्रमाणें रेणुकेचा स्वीकार केला त्याप्रमाणें अहल्येचा पुन्हां गौतमांनीं अंगीकार केला आहे " असें विश्वामित्रांनीं उत्तर दिलें.

### लंकावासी महिला

**सरमा :–** लंकेंतील सीतेचें वास्तव्य सह्य होण्यास ज्यांनीं ज्यांनीं मदत केली त्यांपैकीं बिभीषण-पत्नी सरमा ही प्रमुख होय. राम-रावणांचें युद्ध सुरू होण्यापूर्वीं रावणानें रामचंद्राचें मायावी मस्तक सीतेकडे पाठवून देऊन रामाचा वध झाल्याचा भास निर्माण केला. क्षणभर सीतेला हें खरेंच वाटलें व दुःखातिशयानें तिला मूर्च्छा आली. आणखी कांहीं कुकल्पना रचून सीतेला छळण्यास रावणास अधिक अवधि नव्हता. कारण रामाशीं सुरू होणाऱ्या युद्धाच्या योजनांची चर्चा सेनाधिकाऱ्यांशीं तांतडीनें करण्यासाठीं त्याला जाणें प्राप्त होतें. सीतेच्या निवासस्थानांतून रावण निघून गेल्या-बरोबर सरमा तिजजवळ आली. सीतेचें रक्षण करण्यासाठीं रावणानेंच सरमेची योजना केली होती. सीतेजवळ येऊन सरमा प्रेमळपणें तिला म्हणाली, " हा सगळा भास आहे, सत्य नव्हे. तुझ्या जीवनातील शुभ दिवस आतां समीप आला आहे. लक्ष्मी तुझी मार्गप्रतीक्षा करीत आहे. रामाच्या सैन्याचा तळ दक्षिण समुद्रकिनारीं येऊन पडला आहे. थोड्याच अवधींत आपल्या अफाट बाहुबलानें रामचंद्र रावणाचा पराभव करतील. रामाच्या सैन्यास कसें तोंड द्यावें याचा विचार करण्यासाठींच रावण घाई-घाईनें गेला आहे " असें सांगून आकाशमार्गानें रामाकडे जाऊन सीतेचा निरोप पोंचविण्याची तयारीहि सरमा दाखविते. सीता सरमेस अशी कामगिरी सांगण्यास नम्रतापूर्वक विरोध दर्शविते. परंतु रावणाचा उद्देश सीतेला रामाकडे परत पाठविण्याचा आहे कीं नाहीं याची चौकशी करण्याची मात्र ती सरमेस विनंती करते. सरमा लगेच जाऊन अशी बातमी आणते कीं " मातेनें व इतर अनेकांनीं सीतेस सोडण्याची परोपरीनें केलेली सूचना मानण्याच्या मनःस्थितींत रावण नाहीं. " रावणाचा पराभव करणें कठीण असलें तरी

रामास तें अशक्य मुळींच नाहीं, लवकरच तुझी सुटका होऊन तूं अयोध्येस जाशील " अशी खात्री सरमा पुन्हां व्यक्त करते.

त्रिजटा :– लंकेंतील वास्तव्यांत सीतेस साहाय्य करणारी दुसरी राक्षसी त्रिजटा. रावणाच्या सूचनेनुसार अनेक राक्षसी सीतेला धाक दाखवून व त्रास देऊन रामापासून तिचें मन परावृत्त करून तिला रावणानुकूल करण्याचा प्रयत्न करीत. रावणानें पाठविलेलीं उंची वस्त्रें वापरून, अलंकार परिधान करून, सुगंधी द्रव्यावलेपन करून; दासदासींच्या मेळाव्यांत रावणाचें मनोरंजन सीतेनें करावें म्हणून त्या सारखें तिला सांगत. परंतु सीतेनें त्या सर्व सूचना धुडकावल्या कीं त्या आपल्या स्वभावानुसार तिला फाडून खाण्याची सतत धमकी देत.

या सर्व प्रकारांचा अतिरेक झालेला पाहून वृद्ध त्रिजटेनें सर्व राक्षसींना स्वत:चें एक भयंकर स्वप्न कथन केलें. या स्वप्नांत श्वेत वस्त्र परिधान केलेले राम-लक्ष्मण सीतेसमवेत देवांच्या रथांत बसून उत्तरेकडे जात असल्याचें व मुंडण केलेला, सर्वांगावर तेल ओतलेला रावण मद्य पीत एका छोट्या रथांतून घाईघाईनें दक्षिणेस जात असलेला ती पाहते. सीतेला यापुढें कोणीहि त्रास देऊं नये व तिची मन:पूर्वक क्षमायाचना करावी असेंहि त्रिजटा सर्वांना सांगते. रामाच्या रूपानें सर्व राक्षस-सृष्टीवर महाभयंकर संकट आल्याचें ती ओळखते व त्यांतून स्वत:चा बचाव करावयाचा असल्यास सीतेची मर्जी संपादन करण्यास सर्व राक्षसींना ती उपदेश करते. रामाचें यश सूचित करणाऱ्या कांहीं घटनाहि ती पहाते. तिचें भविष्य खरें ठरतें. इतर राक्षसी सीतेशीं अधिक सौजन्यानें वागूं लागतात. सीता त्रिजटेस म्हणते, " तुझी वाणी खरी ठरल्यास खरोखरच मी तुम्हा सर्वांचें रक्षण करीन. "

युद्ध सुरु झाल्यानंतर एकदां इन्द्रजिताच्या बाणांनीं राम व लक्ष्मण दोघेहि घायाळ होतात. तें दृश्य प्रत्यक्ष पाहण्यासाठीं सीतेला रावण मुद्दाम पुष्पक-विमानांतून रणक्षेत्रावर पाठवितो. पतीचा अंत झालेला पाहून असहायपणें तरी सीता आपली करुणा भाकेल अशी रावणाची कल्पना असते. पण सीतेबरोबर पुष्पक विमानांतून जाऊन आलेली त्रिजटा तिला सांगते, " राम व लक्ष्मण बाणांच्या माऱ्यानें फक्त बेशुद्ध झाले असावेत. तूं मुळींच काळजी

करूं नकोस. माझें भाकीत खोटें ठरणार नाहीं. कारण मी तुला कधींच असत्य सांगितलेलें नाहीं."

बिभीषणाला अमरत्वाचा वर देतांना ब्रह्मयानें असे उद्गार काढले होते कीं, "राक्षसकुळांत जन्माला येऊनहि तुझी वृत्ति अतिशय सात्त्विक आहे." ही सात्त्विक वृत्ति राक्षसजाति असूनहि त्रिजटा व सरमांतहि दिसून येते.

**मंदोदरी** :— ही रावणाची पट्टराणी स्वभावानें अतिशय सरळ व शुद्ध होती. रावणाची विचारसरणी तिला नेहमीं अप्रिय असल्यामुळें, कर्तव्या-कर्तव्याचा तीव्र झगडा तिच्या मनांत सतत चालू असे. मंदोदरी मयाची कन्या. ती उपवर झाल्यावर मय तिच्यासाठीं योग्य वराचें संशोधन करूं लागला. रावणाच्या आजोबाबद्दल मयाला अतिशय आदर असल्यानें त्यानें रावणाशीं मंदोदरीचा विवाह निश्चित केला. विवाहसमयीं मय रावणाला स्वतःच्या तपःसामर्थ्यावर मिळविलेली एक अजिंक्य शक्ति देतो. या शक्तीच्या साहाय्यानेंच रावण लक्ष्मणाला बेशुद्ध पाडतो. रामायणांत मंदोदरी दोन महत्त्वाच्या प्रसंगीं वाचकांसमोर येते व प्रत्येक वेळीं ती एक अतिशय गुणवती व तेजस्वी सम्राज्ञी असल्याची वाचकांची खात्री पटते. तिच्याकडे पाहून हनुमानाला सीतेचा भास होतो. यावरून सीतेशीं तिचें किती साम्य होतें हें दिसून येतें. रावणावरील तिच्या भक्तीचें स्पष्टीकरण दोन तऱ्हेनें करतां येईल. पतिव्रतेचा धर्म म्हणून रावणावर ती प्रेम करी व दुसरें कारण म्हणजे रावणाचें असामान्य व आकर्षक व्यक्तिमत्त्व अनेक स्त्रियांचें मन वेधून घेई. हनुमान व राम ह्या त्याच्या शत्रूंवरहि त्यानें आपल्या व्यक्तिमत्त्वाची प्रथमदर्शनीं छाप पाडली. रावणाला पहिल्यांदा पाहिल्याबरोबर "वा! किती भव्य व रुबाबदार राजा हा!" असे उद्गार हनुमानाच्या तोंडून नकळतच बाहेर पडले. "जर हा वृत्तीनें सात्त्विक असता तर देवगंधर्वांचा रक्षणकर्ता होण्याचा मान यालाच मिळाला असता" असाहि विचार त्याच्या मनांत डोकावून गेला. "भर दुपारच्या सूर्याप्रमाणें रणक्षेत्रावर तेजानें तळपणाऱ्या या योद्धयाकडे दृष्टि स्थिरावून पाहणेंच अशक्य" असे उद्गार रामहि काढतो.

रावणाला सीतेची अभिलाषा वाटूं लागल्यानंतर मंदोदरीचें महत्त्व थोडें कमी होतें. परंतु ती सीतेचा द्वेष अगर हेवा करीत नाहीं. रावणाच्या

मृत्यूनंतर ती एकदांच उघडपणें सीतेशीं स्वतःची तुलना करते. " सीतेहून सुंदर अशा कितीतरी स्त्रिया आपल्या अंतःपुरांत होत्या, पण आपण त्यांची कदर केली नाहीं ! जन्मानें, सौंदर्यानें व गुणांनीं सीता माझी बरोबरी कधींच करूं शकणार नाहीं. पण हेंहि आपल्या ध्यानीं राहिलें नाहीं. कारणाशिवाय मृत्यु येत नाहीं. आपल्या मृत्यूला सर्वस्वीं सीताच कारणीभूत झाली आहे." अशा रीतीनें स्वतःची सीतेशीं तुलना करून मंदोदरी पुढें म्हणते, " पतिव्रतेचे मूल्यवान् अश्रु धरणीवर पडले कीं त्याची फार मोठी किंमत तिच्या छळवाद्यास द्यावी लागते हा निसर्गाचा नियमच आपल्या मृत्यूनें सिद्ध झाला. आपल्या अंध क्रोधानें व परस्त्री-अभिलाषेमुळें सर्व राक्षसकुळाचा संहार झाला."

मंदोदरीच्या असामान्य व थोर दर्जाची तिला पूर्ण जाणीव होती. तिचा पिता दानवांचा राजा होता. तिचा पति राक्षसांचा सम्राट् होता व तिच्या पुत्रानें इंद्राचाहि पराभव केलेला होता. असे अजिंक्य पुरुषश्रेष्ठ तिच्या पाठीशीं उभे असल्यामुळें ती निर्भय होती. पण रावणाच्या पराभवानें तिचा सर्व अभिमान गळून गेला होता. सीतेवर पापी नजर ठेवून रामाशीं शत्रुत्व निर्माण न करण्याचा सल्ला तिनें अनेकदां रावणास दिला होता. पण त्याकडे त्यानें जें दुर्लक्ष केलें त्याचें फळ सर्वांनाच भोगावें लागलें.

सीतेच्या सहवासांत आल्यानंतर तिला तिच्या आदरणीय व्यक्तिमत्त्वाचें खरें दर्शन घडलें. रावणवधानंतरच्या विलापांत मंदोदरी म्हणते, " जी साध्वी अरुंधती व रोहिणी यापेक्षांहि थोर आणि तेजस्वी आहे तिच्यावर पापी नजर टाकल्यानें आपलें कुळ व संपत्ति भस्मसात् झाली. सत्य, न्याय व सौंदर्य हे प्रिय असलेल्या विष्णूनें मानवरूप घेऊन व सर्व देवगंधर्वांनीं वानररूपें घेऊन पृथ्वीवर वास करीत असलेल्या पापाचा नाश करण्याची योजना दैवानेंच आंखली असावी. "

ध्यान, धारणा, साधना व वेदाध्ययन या सर्वांत रावणाची प्रगति स्पृहणीय होती. पण अनेकांची हत्या करून, अनेकांच्या तपश्चर्येंत अडथळे आणून व इतरहि अनेक अमानुष कृत्यें करून त्यानें पापाची साधनाहि फार मोठ्या प्रमाणावर केली होती. अशा माणसाशीं विवाह केल्यामुळें प्राप्त झालेल्या सर्व प्रसंगास मंदोदरीनें धैर्यानें तोंड दिलें.

## किष्किंधावासी महिला

तारा :– सीता रामचंद्राकडे परत जावी यासाठीं मंदोदरीनें जशी खटपट केली त्याचप्रमाणें सुग्रीव व रुमा यांच्या पुनर्मीलनासाठीं तारा अहर्निश झटली. दोघीहि या प्रयत्नांत अपयशी ठरल्या. कारण रावण व वाली हे सारखेच दुराग्रही होते. वाली रावणाप्रमाणेंच शूर व बलाढ्य होता. रावणानें ज्याप्रमाणें कपटव्यूह रचून सीतेला पळविलें तशाच प्रकारच्या कारस्थानें आपल्या भावाची पत्नी आपल्याला अनुकूल व्हावी म्हणून वालीनें रचली.

तारेच्या जीवनांतील कांहीं घटना मानवी नीतिधर्माशीं विसंगत भासतात. उदाहरणार्थ, वालीच्या मृत्यूची बातमी ऐकल्यानंतर ती सुग्रीवाशीं पत्नीचें नातें जोडते. पण वाली जिवंत आहे अशी खात्री पटल्यावर पुन्हां वालीवर पति या नात्यानें प्रेम करते. सुग्रीवाचा या सर्व प्रकरणीं कांहींच दोष नसल्यानें भावाला तो आपलें निर्दोषत्व पटवून देतो. सुग्रीवास परागंदा व्हावयास लावून त्याची पत्नी रुमा हिजवर वाली पापी नजर ठेवतो. वाली व सुग्रीव यांच्यांत प्रत्यक्ष युद्ध होण्याची वेळ आली, त्या वेळीं बंधूचा वध करण्यांत वालीचें कसें नुकसान होणार आहे याचीहि कल्पना तारा त्याला देते. तिचा मुद्दा पटून सुग्रीवाचा फक्त पराभव करून त्याला जीवदान देण्याचें वाली मान्य करतो. वाली युद्धास निघण्यापूर्वीं तारा ' स्वस्त्ययन ' मंत्राचें विधियुक्त पठण करून त्याच्या यशासाठीं प्रार्थना करते.

तारा अतिशय धीराची व बेडर वृत्तीची होती. युद्धांत रामाला मदत करण्याचें सोडून जेव्हां वानर पळून जाऊं लागले, तेव्हां तिनें त्यांना कडक शब्दांत समज दिली. तारेच्या गुणांची वालीला पूर्ण जाणीव होती. म्हणूनच मरणसमयीं सुग्रीवास उपदेश करतांना तारेचा सल्ला नेहमीं किती उपयुक्त ठरेल याची त्यानें भावाला कल्पना दिली.

वाली शेवटचे क्षण मोजीत मृत्युशय्येवर पडलेला होता. शोकाकुल तारेला उद्देशून हनुमान् म्हणाला, " शोक आवर. तुझ्या पुत्राला ( अंगदाला ) राज्यावर बसवून वानरसेनेच्या साहाय्यानें तूं देशाचें रक्षण सहज करूं शकशील. " पण तारेला हा विचार पटला नाहीं. सुग्रीवानेंच वालीनंतर राज्याची

जबाबदारी घ्यावी असें स्पष्ट मत तिनें प्रगट केलें. वालीनें हें ऐकून सुग्रीवाला जवळ बोलाविलें व अंगदाला युवराजपद देऊन स्वत: राज्यपद घेण्याची सूचना केली. वालीचें हें औदार्य पाहून क्षणभर सुग्रीव स्तिमित झाला. रामचंद्रांच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. तारेनें रामचंद्रांचे पाय धरले." ज्या बाणानें वालीला मृत्यु आला त्याच बाणानें मलाहि पतिसमवेत यमसदनाला धाडा म्हणजे त्यांची आणि माझी ताटातूट होणार नाहीं " अशी प्रभूपाशीं तिनें मागणी केली. परंतु " राजकारणी पुरुषांच्या स्त्रियांवर राज्याच्या रक्षणाची जबाबदारी पडते तेव्हां त्यांनीं सहगमन करूं नये " असा रामचंद्रांनीं तिला उपदेश केला तेव्हां तारा शांत झाली.

रामायणांतील तारेचें व्यक्तिचित्र एका धुरंधर राजकारणी स्त्रीचें आहे. कोणत्याहि अडचणींतून मार्ग काढतांना तिचा सल्ला अतिशय मूल्यवान् ठरे. वालीच्या मृत्यूनंतर सुग्रीव गादीवर आला व कांहीं काळ रामाज्ञेचा त्यास विसर पडून तो ख्यालीखुशालींत दंग राहिला. एके दिवशीं लक्ष्मण सुग्रीवाची कानउघाडणी करण्यासाठीं तेथें आला. लक्ष्मणाचा संताप पाहून सुग्रीव घाबरला. त्याचें सान्त्वन करण्यासाठीं तारा पुढें झाली. लक्ष्मणाचें सर्व वाक्ताडन शांतपणें सहन करून नंतर ती त्याला म्हणाली, " सुग्रीवानें दीर्घ काळ दु:ख भोगलें होतें व त्यामुळें राज्याभिषेकानंतर कांहीं काळ सुखोपभोग घेण्याची त्याला झालेली इच्छा नैसर्गिक नाहीं का ? येवढा मोठा तपस्वी विश्वामित्र ! पण घृताचीच्या सहवासांत तोहि आपली व्रतस्थ वृत्ति विसरला ! मग सुग्रीव तर एक सामान्य राजा. त्याला दोष कसा देतां येईल ? तुम्ही मुळींच काळजी करूं नका. आम्ही सर्व सैन्याची जमवाजमव पूर्ण केली आहे. रावणाच्या मायावी युक्त्याप्रयुक्त्यांशीं परिचित असल्यामुळें सुग्रीवाची व त्याच्या सैन्याची रामाला खूपच मदत होईल. आपण म्हणाल त्या क्षणीं युद्धावर निघण्याची आमची सिद्धता आहे. " तारेचें हें भाषण ऐकून लक्ष्मण मनांत वरमला व त्यानें सुग्रीवाची क्षमा मागितली. तारेची बुद्धिमत्ता, वाक्चातुर्य, समयसूचकता, व योजकत्व अप्रतिम होतें. अशा स्त्रीचा कोणत्या पतीला व कोणत्या देशाला अभिमान वाटणार नाहीं ? रामाच्या राज्याभिषेकप्रसंगीं सीतेच्या विनंतीवरून तारा किष्किंधेंतील इतर स्त्रियांसमवेत पुष्पक विमानांतून अयोध्येस गेली होती. हा तिच्या जीवनांतील अतिशय सुखाचा व आनंदाचा काल असावा.

### अयोध्येंतील महिला

आतां अयोध्येंतील तीन नामवंत महिलांकडे वळूं. या सर्व राजा दशरथाच्या राण्या व प्रभु रामचंद्रांच्या माता होत्या. यांच्या आयुष्याच्या उत्तरार्धाबद्दल वाल्मीकींनीं फारच त्रोटक माहिती दिली आहे. मुलांनातवंडांच्या सहवासांत कौसल्येनें व व्रतदानांत कैकेयीनें उर्वरित आयुष्य वेंचून या दोघींनीं इहलोकची यात्रा संपविली येवढाच उल्लेख आढळतो. या सर्वांच्या पूर्वायुष्याबद्दल मात्र लेखकानें सविस्तर वृत्तांत दिला आहे. दशरथाची ओढ इतर राण्यांपेक्षां कैकेयीकडे थोडी अधिक होती व त्यामुळें अनेक वेळां कैकेयीकडून कौसल्येचा व सुमित्रेचा अपमान होई. रामाला राज्याभिषेक करण्याचा राजाचा मानस मंथरेला समजतांच ती कैकेयीला म्हणाली, " आजपर्यंत राजाच्या अनुग्रहाचा फायदा घेऊन तूं कौसल्येचा अनेक वेळां अवमान केला आहेस. राम गादीवर आल्यावर कौसल्या भरताचा वेळोवेळीं पाणउतारा करून या गोष्टीचा सूड घेतल्याखेरीज राहणार नाहीं." या बारीकसारीक तंट्याबखेड्यांचा कुटुंबाच्या सुखशांतीवर मात्र फारसा गंभीर परिणाम होत नसे असें दिसतें. निपुत्रिकत्वाचें दुर्भाग्य तिघींच्याहि वांट्णीस आलें असल्यानें यावावत तरी त्या समदुःखी होत्या. त्यामुळें संतानप्राप्तीसाठीं ऋष्यशृंगाच्या आधिपत्याखालीं जेव्हां यज्ञास सुरुवात झाली तेव्हां तिन्ही राण्यांनीं उत्साहानें त्यांत भाग घेतला. ज्येष्ठ राणी या नात्यानें कौसल्येनें सर्व प्राथमिक विधि पार पाडले. यज्ञसमाप्तीनंतर अग्निनारायणानें प्रसन्न होऊन जें पायसदान केलें त्याचा स्वीकार करून दशरथानें प्रथम त्याचा कांहीं भाग कौसल्येस, नतर एक-चतुर्थांश भाग सुमित्रेस व शेवटीं कांहीं भाग कैकेयीस देऊन उरलेला थोडा भाग पुन्हा सुमित्रेस दिला. तिन्ही राण्यांनीं मोठ्या भक्तिभावानें या प्रसादाचें ग्रहण केलें.

या प्रसंगानंतर या राजगृहात सर्वत्र आनंदीआनंद नांदूं लागला. विवाह करून जनकाच्या दरबारांतून चौघे पुत्र परतल्यानंतर या तिन्ही मातांनीं आपल्या नव्या सुनांचें मोठ्या थाटामाटानें स्वागत केलें. अनेक यज्ञयाग व धार्मिक विधि करून आनंदोत्सव साजरा केला. रामाला राज्याभिषेक करण्याची बातमी प्रथम जेव्हां कैकेयीस समजते तेव्हा ती त्या कल्पनेचें स्वागतच करते असें वाल्मीकी सांगतात. रामाला राज्य मिळण्याची बातमी

आणल्याबद्दल एक मूल्यवान् अलंकार ती मंथरेस देते. " राम व भरत हे दोघे मला सारखेच प्रिय असल्यानें रामाला राज्यावर बसविण्याची कल्पना मला आनंददायक वाटते " असेहि उद्‌गार कैकेयी काढते. तिच्या मनांत रामाबद्दल गैरसमज निर्माण करण्याचे मंथरेचे सर्व प्रयत्न सुरुवातीस निष्फळ होतात. उलट रामाच्या अंगीं असलेल्या अनेक गुणांचा उल्लेख करून ती मंथरेला गप्प करते. भरताहून रामावर कैकेयी अधिक प्रेम करते व राम आपल्यावर कौसल्येपेक्षां अधिक प्रेम करतो अशी तिची खात्री असते. शिवाय राम सर्व भावांवर जिवापाड लोभ करीत असल्यानें कैकेयीला असें वाटे कीं राम जरी औपचारिकदृष्ट्या गादीवर बसला तरी राज्यपदाची जबाबदारी व अधिकार तो सर्वांना सारखाच देणार.

पण दैवगतीचीं चक्रें उलट फिरूं लागलीं. कैकेयीच्या मनांत खोल दडलेला सापत्नभाव व मत्सर मंथरेनें जागा केला व कैकेयीच्या स्वतःच्या कल्पनेबाहेर या दुष्ट भावनांनीं आपले मनोरथ पूर्ण करून घेतले. दशरथाच्या राण्या असामान्य नसल्या तरी सर्वच पुत्र मात्र असामान्य होते. त्यांच्या मनांत एकमेकांविषयीं केव्हांच अनादर अगर गैरसमज निर्माण होऊं शकला नाहीं. कैकेयीनें दशरथाजवळ धरलेला हट्ट, राम, लक्ष्मण व सीता यांचा वनवास, दुःखातिशयानें दशरथाचा झालेला अंत, कैकेयीस सहन करावी लागलेली लोकनिंदा व निर्भर्त्सना, अशा एकामागोमाग आलेल्या संकटपरंपरेनें या कुटुंबांतील सर्वांच्या मनोवृत्ति तळापासून ढवळून निघाल्या. कौसल्या, सुमित्रा व कैकेयी यांच्या जीवनांत या घटनांनीं केवढें परिवर्तन घडवून आणलें तें यथावकाश वाचकांना समजेलच.

कैकेयी :– बुद्धिमत्ता व योजकता हे गुण तारेप्रमाणें कैकेयींतहि प्रकर्षानें दिसून येत. दशरथानें दिलेल्या वराची हकीकत तिच्याकडूनच मंथरेला कळली. असुरांच्या विरुद्ध चाललेल्या युद्धांत देवांना मदत करण्यासाठीं जेव्हां दशरथ गेला होता तेव्हां कैकेयीला त्यानें आपल्याबरोबर नेलें होतें. युद्ध चालू असतांना एकदां दशरथ जखमी होऊन बेशुद्ध झाला. प्रसंगावधान राखून कैकेयीनें त्याचा रथ युद्धभूमीवरून बाजूला घेतला व त्याला सावध केलें. ह्या चातुर्यावर खूष होऊन दशरथानें तिला दोन वर दिले. पण वर मागण्यासारखी परिस्थिति पुढें कधीं न आल्यानें ते तसेच राहिले होते. मंथरेनें रामाच्या

राज्याभिषेकप्रसंगीं या वरांचा उपयोग करून कैकेयीनें आपलें हितरक्षण करावें अशी योजना महत्प्रयासानें तिच्याकडून मान्य करून घेतली.

मंथरेच्या दुष्ट बुद्धीचा क्षणभर विजय झाला. कैकेयीनें दशरथाकडे दोन गोष्टींची मागणी केली. एका वरानुसार रामानें तावडतोब वनवास पत्करावा व दुसऱ्या वरानुसार युवराजपदाचीं वस्त्रें भरताच्या अंगावर पडावींत. दशरथाचा नाइलाज झाला. कैकेयीच्या इच्छेनुसार रामानें जाण्याचा निश्चय केला. दशरथाला पुत्रवियोगाची कल्पना सहन न होऊन त्याचा अंत झाला. सर्व राण्यांना वैधव्य आलें. इतकें करूनहि भरताला राज्यपद मिळाल्याचें सुखसुद्धां कैकेयीस पाहतां आलें नाहीं. कारण भरतासारख्या सुस्वभावी मुलाला रामाच्या वियोगाची कल्पनाहि सहन झाली नाहीं. कैकेयी आपली जन्मदात्री आई आहे हें सुद्धां तो क्षणभर विसरला व तिच्या दुष्ट बुद्धीचा अत्यंत तीव्र शब्दांत निषेध करून रामाला परत आणण्यासाठीं तोहि वनांत निघून गेला.

वरांची मागणी करतांना कैकेयीच्या मनांत कलीनें प्रवेश केला होता. सदसद्विवेकास ती पारखी झालेली होती. क्रोध, मोह, मद आणि मत्सर या भयानक सर्पांनीं तिला जणूं घट्ट जखडून टाकलें होतें. तिच्या सद्गुणांची स्तुति करून तर कांहीं वेळां धाकदपटशा दाखवून, कांहीं वेळां परिणामांचें भीषण चित्र तिच्यापुढें रंगवून तर कांहीं वेळां तिजपुढें दीन होऊन दशरथानें तिचें मतपरिवर्तन करण्याचा केलेला सर्व प्रयत्न निष्फळ ठरला. कैकेयीचा हट्ट कायम राहिला व त्याचा जो व्हायचा तोच परिणाम झाला.

संपत्ति व अधिकार दोहोंची धुंदी कैकेयीच्या डोळ्यांवर चढली होती. रामालाहि तिनें अशींच दुरुत्तरें केलीं. "जडजवाहिर व इतर सर्व दृष्टीनें संपन्न असलेलें कोसल देशाचें राज्य भरतालाच मिळालें पाहिजे" असें रामाला तिनें बजावलें. भरताकडे राज्याचा सर्वाधिकार सुपूर्त करण्यास राम केव्हांहि तयार होता. पण त्यासाठीं त्यानें वनवास पत्करून पित्याच्या मृत्यूस कारणीभूत व्हावें याचें त्याला दुःख होत होतें. कोणताच सुविचार करण्याच्या मनःस्थितींत कैकेयी त्या वेळीं नसल्यानें रामाच्या विनवणीचा कांहीं उपयोग झाला नाहीं. उलट रामाला ती म्हणाली, "तूं नगरांतून जाईपर्यंत तुझे पिताजी स्नान अगर अन्नग्रहण करणार नाहींत, तेव्हां तूं शक्य

तितक्या लवकर जावेंस हें बरें. " यावर रामानें दिलेल्या उत्तरांत त्याचे अनेक लोकोत्तर गुण प्रकट होतात. तो म्हणतो, " ऐहिक सुखासाठीं क्षणभरहि जगण्याची माझी इच्छा नाहीं. श्रेष्ठ जीवनमूल्यांची जोपासना मी महान् ऋषिमुनींप्रमाणेंच करूं इच्छितों. माझ्या देहत्यागानें पित्याची एखादी व्हानशी इच्छा जरी मला पूर्ण करतां आली तर मी क्षणाचाहि विचार न करतां मरणाकडे धाव घेईन. " पण दुर्भाग्य असें कीं, स्वार्थांधतेमुळें स्वतःच्या पतीच्या हिताचा विचारहि कैकेयी करूं शकली नाहीं.

अमात्य सुमंत्रानें व कुलगुरु वसिष्ठानें कैकेयीला तिची चूक समजाविण्याचा व तिची कानउघाडणी करण्याचा पुष्कळ प्रयत्न करून पाहिला. विशेषतः सीतेनेंहि रामाप्रमाणें वल्कलें परिधान करूनच वनांत गेलें पाहिजे ह्या कैकेयीच्या हट्टाचा तर वसिष्ठास फारच संताप आला. दशरथानें वैतागून आपला मुक्काम कौसल्येच्या महालांत हलविला. थोड्याच वेळांत तेथें त्याचें देहावसान झालें.

भरताच्या आगमनानंतर मात्र तिचा नूर पालटला. राज्याभिषेक करून घेण्यास त्यानें दिलेला स्पष्ट नकार, रामाबद्दल त्यानें व्यक्त केलेली निष्ठा व रामाला परत अयोध्येस बोलावून आणण्याचा त्यानें प्रगट केलेला निर्धार, या सर्वांचा कैकेयीवर गंभीर परिणाम झाला. भरताचे वाग्बाण मुकाट्यानें सहन करून रामाला आणण्यासाठीं निघालेल्या मंडळींत कैकेयी सामील झाली.

रामभेटींत भरतानें त्याला स्पष्टपणें सांगितलें, " माझ्या आईचें वर्तन मला अत्यंत निंच वाटतें. आईला योग्य शासन केल्यास हत्येचें पाप घडेल म्हणूनच मी गप्प राहिलों आहें." यावर रामानें दिलेल्या उत्तरांत त्याची असामान्य विचारसरणी प्रगट झाली आहे. राम म्हणतो, " भरता, तुझ्याबद्दलच्या प्रेमामुळें व ऐहिक सुखाच्या लोभानें तुझ्या मातेच्या हातून जें घडलें त्याबद्दल तिच्यावर रागावूं नकोस. कोणताहि सुपुत्र आपल्या मातेशीं जसा वागेल तसाच तूंहि यापुढें कैकेयीशीं वाग. " भरतास शेवटीं निरोप देतांनाहि पुन्हां राम बजावतो, " कैकेयीला सांभाळ, तिच्यावर राग न धरण्याची माझी व सीतेची ही आज्ञा तूं पाळलीच पाहिजेस. " रामाच्या या उदार भावनांचा कैकेयीवर फार परिणाम झाला व पुढें उभ्या आयुष्यभर ती कौसल्येच्या आज्ञेंत स्वखुशीनें राहिली.

**कौसल्या :–** ' पतिनिष्ठा ' हा कौसल्येच्या वृत्तींतील स्थायिभाव होता. शेवटच्या क्षणापर्यंत स्वतःचें दुःख बाजूला ठेवून तिनें दशरथाची सेवा केली. कैकेयीच्या व कौसल्येच्या स्वभावांतील यासंबंधीचा विरोध स्पष्ट दिसून येतो. रामानें वनांत जाण्याचा निर्णय जाहीर केल्यानंतर कौसल्येची प्रतिक्रिया तीन प्रकारांनीं व्यक्त झाली. एकदां तिला वाटलें कीं राजाज्ञेविरुद्ध जाऊन रामाला अयोध्येंत राहण्याचा आग्रह करावा. रामानें आपला निश्चय न बदलल्यास आपण त्याच्याबरोबर वनांत जावें असेंहि तिला वाटलें. रामाच्या मागें आपल्या सवती आपला अवमान करतील अशी भीति तिच्या मनांत उत्पन्न झाली.

कौसल्येची बाजू घेऊन रागाच्या भरांत दशरथाला ठार करण्यास लक्ष्मण तयार झालेला पाहून कौसल्येनें रामाला हांक मारून लक्ष्मणाची समजूत घालण्याची त्याला सूचना केली. राम वनांत गेल्यास आपण आमरण उपवास करावा असेंहि तिच्या मनांत येऊन गेलें. पण दशरथाचें दुःख लक्षांत घेऊन रामवियोगाच्या काळांत त्याची सेवा करणेंच किती अगत्याचें आहे हें रामानें तिला पटविल्यानंतर ती चटकन् त्याच्या विचारांशीं सहमत झाली.

कौसल्येचा बहुतेक सारा वेळ देवधर्म व यज्ञयाग यांत जाई. ऋष्यशृंगानें आरंभिलेल्या यज्ञांत कौसल्येनें बरेच विधि स्वतः पार पाडले होते. रामाला राज्याभिषेक होण्याच्या आदल्या रात्रीं कौसल्येनें आलोचन जागरण व ध्यान करून सकाळीं विष्णूची मनोभावें पूजा केली व रेशमी वस्त्र परिधान करून अग्नीला आहुति दिली. तिच्या चेहऱ्यावर त्या वेळीं साधनेनें प्राप्त झालेलें अलौकिक समाधान विलसत होतें. ज्या वेळीं कौसल्या या ध्यानधारणेंत व पूजेंत गर्क होती त्याच रात्रीं कैकेयी दशरथाला वाक्ताडनानें रात्रभर दुःखी करण्यांत आसुरी समाधान मानीत होती.

राम वनांत गेल्यानतर दशरथाचा मुक्काम कौसल्येच्या महालांत होता. दुःखातिरेकानें तिची अवस्था वेड्यासारखी झाल्यामुळें तिनें दशरथास दोष देऊन म्हटलें, " तुम्ही माझ्या व सर्व प्रजाजनांच्या दुःखावर आपला, आपल्या पत्नीचा व मुलाचा आनंद उभारलांत ! " हे तिचे उद्गार ऐकून दशरथाला अतिशय वाईट वाटलें. तो म्हणाला, " शत्रूशींहि कधीं कटु शब्दांत न बोल-

णारी तूं मला आज कां वरें असें बोलते आहेस ? माझ्या वेदनांची तुला कल्पना येत नाहीं का ? " तावडतोब कौसल्येला आपल्या बोलण्याचा पश्चात्ताप झाला व तिनें राजाची मनःपूर्वक क्षमायाचना केली. " दुःखांत माणसाचा विवेक, ज्ञान, सहनशीलता सर्वच नाहींसें होतें ! " असेहि उद्गार तिनें काढले.

रामायणांत राम-भरताच्या भेटीच्या प्रसंगानें बंधुप्रेमाचा एक अमर आदर्श निर्माण केला आहे. भरत रामाच्या पादुका सिंहासनावर ठेवण्यासाठीं मागून घेतो व विरक्त वृत्तीनें रामाच्या नांवानेंच राज्यकारभार चालवितो. यावरून त्या काळच्या राजकीय प्रथा कशा प्रकारच्या होत्या त्यांचीहि कल्पना येते.

**सुमित्राः**—ज्या घटनांनीं इतर सर्वांच्या मनांत महान् आंदोलनें निर्माण झालीं त्या घटनांत सुमित्रा अतिशय शांत राहूं शकली. यावरून तिचें धैर्य व मनोबल यांची कल्पना येते. राम व लक्ष्मण हे वनांत जाण्यापूर्वीं तिला वंदन करून तिचा निरोप घेण्यासाठीं गेले असतां ती लक्ष्मणास म्हणते, " रामाच्या सन्निध सांवलीप्रमाणें राहून त्याचें रक्षण कर. यापुढें रामाला पित्याप्रमाणें व सीतेला मातेप्रमाणें मानून तूं कालक्रमणा कर. " या उद्गारांतून सुमित्रेचा कौटुंबिक दृष्टिकोन व रामावरील तिचें नितांत प्रेम व्यक्त होतें. रामाच्या वियोगानें दुःखित झालेल्या कौसल्येचें सान्त्वन करतांना सुमित्रा तिला सांगते, " सत्याचा पुरस्कार करणाऱ्या तुझ्या असामान्य पुत्राचा तुला अभिमान वाटावयास हवा. सूर्यसुद्धां आपल्या किरणांनीं रामास दाह निर्माण करण्यास धजणार नाहीं. कारण राम सूर्याचा सूर्य, ईश्वराचा ईश्वर व शुभाचें शुभ आहे. कीर्तीची कीर्ति व क्षमेची क्षमाच रामाच्या स्वरूपांत व्यक्त झालेली आहे. योग्य वेळीं पुन्हां तुझा पुत्र अधिक तेजस्वी स्वरूपांत तुला भेटेल व तुझी पादसेवा करूं लागेल." सुमित्रेच्या या प्रेमळ व धीराच्या शब्दांनीं कौसल्या बरीच शांत झाली.

सुमित्रेचा धीरोदात्त स्वभाव दशरथास पूर्ण परिचित होता. यज्ञांत मिळालेल्या पायसाचे दोन भाग तिला देऊन त्यानें एकप्रकारें तिचा गुणगौरवच केला. कौसल्येशीं तुलना करतां तिचें दुःखहि मर्यादित स्वरूपाचें होतें. कारण लक्ष्मण रामाबरोबर गेला तरी शत्रुघ्न भरतापाशीं म्हणजेच तिच्यापाशीं राहणार होता पतिवियोगाच्या दुःखांत कौसल्या व कैकेयी तिच्या सहभागी होत्या.

सीता :– रामायणांतील इतर कोणत्याहि स्त्रीपेक्षां सीतेवर अधिक संकटें आलीं व या सर्व संकटांना तिनें धैर्यानें व कणखरपणानें तोंड दिलें. तिच्या सहनशीलतेस सर्व रामायणांत तोड नाहीं. रामाच्या प्रत्येक संकटांत स्वतःचा भाग तिनें एकनिष्ठेनें उचलला. सीतेचें मन दगडाचें होतें असें नव्हे. प्रत्येक संकटांत ती प्रथम घाबरली, गांगरली आणि दुःखी झाली. पण नंतर मात्र तिनें स्वतःस सांवरलें व कोणत्याहि असामान्य स्त्रीनें जी आदर्श प्रतिक्रिया अशा प्रसंगांत दिली असती तीच तिनें दिली. शेवटपर्यंत स्वतःच्या पावित्र्यास प्राणापलीकडे जपून तिनें आपल्या मातापित्यांच्या व पतीच्या दिगंत कीर्तींत मोलाची भर घातली.

क्षमा हा स्त्रीचा फार मोठा सद्गुण समजला जातो. सीतेच्या क्षमाशीलतेचा विचार करण्यापूर्वीं आणखी एका घटनेचा उल्लेख करणें उचित ठरेल. कुशध्वज ऋषीला निव्वळ वेदाध्ययनाच्या पुण्याईनें एक कन्या प्राप्त झाली. त्यानें तिचें नांव वेदवती ठेवलें. वेदवती वयांत आल्यानंतर पित्यानें तिचा विवाह विष्णूशीं करण्याचें योजिलें. विष्णूची अर्धांगी होण्याची पात्रता येण्यासाठीं वेदवतीनें कडक तपस्या सुरू केली. एकदां ती एकटीच धर्मकार्यमग्न असतां रावण तेथें आला. त्यानें तिला विचारलें, " उतार वयास शोभेल अशा संन्यस्त वृत्तीनें एवढी खडतर तपश्चर्या तूं कोणासाठीं करीत आहेस ? " तिनें उत्तर दिलें, " सर्व देवांचा राजा जो विष्णु, त्याची अर्धांगी होण्याचा माझा मानस आहे. ही योग्यता अंगीं येण्यासाठीं मीं तपश्चर्या आरंभिली आहे. तुझा दुष्ट हेतु मला समजला आहे. तूं येथून ताबडतोब निघून जा. " रावणाचें चित्त विकारवश झालें होतें. त्याला विवेक न राहून त्यानें वेदवतीचे केस पकडले. क्षणांत हाताचा शस्त्रासारखा उपयोग करून वेदवतीनें स्वतःचे केस तोडून टाकले. तरीहि तिला वाटलें, " असा अपवित्र देह देवाच्या चरणीं कसा अर्पण करणार ? " म्हणून तिनें अग्निप्रवेश केला. तत्पूर्वीं ती रावणास म्हणाली, " या दिव्यानंतर मी पुन्हां एखाद्या महान् पुरुषाची कन्या होईन व देवाचीच अर्धांगी होईन. " अग्निदिव्य करणारी ही वेदवती म्हणजेच जनककन्या सीता व तिचा पति राम हाच विष्णु.

तपश्चर्येनें प्राप्त झालेलें सामर्थ्य मृत्युहि हिरावून नेऊं शकत नाहीं. वेदवतीनें एका जन्मांत केलेलें तप तिला पुढील जन्मीं उपयोगी पडलें व ती

रामपत्नी झाली. हिमालयाच्या सान्निध्यांत केलेल्या खडतर तपश्चर्येमुळें तिची मन:शुद्धि झालेलीच होती. आतां फक्त रामसेवा करण्यापलीकडे तिला अधिक कांहीं तप करण्याची वास्तविक गरज उरलेली नव्हती. तरीसुद्धां त्या कालालॉ अनुसरून तिनें अनेक व्रतेंवैकल्यें मन:शुद्धीसाठीं चालू ठेवलेलीं होतीं.

पूर्वजन्मांत वेदवतीनें रावणाला शाप न देण्यांत जी वृत्ति प्रकट केली होती तीच पुढच्या जन्मांत सीतेनें रावणाबाबत ठेवली होती. ब्राह्मणवेषानें तो पर्णकुटींत भिक्षा मागण्यासाठीं गेला असतां अतिथि-सत्कारांत चूक होऊं नये म्हणून ती त्याच्याशीं बोलली. पण त्याचें खरें स्वरूप व हेतु लक्षांत आल्या-नंतरहि तिनें त्याच्याविषयीं सूडभावना केव्हांच दाखविली नाहीं. बळजवरीनें रावण तिला आकाशमार्गानें नेत असतां एका टेकडीवर वानर बसलेले तिनें पाहिले. लगेच त्यांच्याकडे तिनें कांहीं अलंकार व एक रेशमी वस्त्र फेकलें. हेतु हा कीं राम तिच्या शोधासाठीं त्या बाजूला आल्यास त्याला तिचा शोध कर-ण्यास मदत व्हावी.

रावणाच्या बंधनांत असतांना ती त्याच्याशीं मोजकें व स्पष्ट बोले. " पति घरांत नसतांना त्याच्या पत्नीस पळविण्यास तुला शरम कशी वाटली नाहीं ? अजूनहि तूं मला रामाकडे पोंचवून त्या पुरुषश्रेष्ठाची क्षमा माग. शरण आलेल्यांना राम केव्हांच शासन करीत नाहींत." एवढेच ती त्याला वारंवार सांगे. " या लंकानगरींत धर्मनिष्ठ कोणीच नाहीं का ? " अशी शंका तिला येई व रावणाला कोणीच कसा सदुपदेश करीत नाहीं याचें तिला आश्चर्य वाटे. " रामाचा कोप होऊन ते तुला शासन करण्यास सिद्ध झाले म्हणजे मात्र तुझें रक्षण कोणीहि करूं शकणार नाहीं " असें सीता त्यास पुन:पुन्हा बजावी. तिच्या अशा उद्‌गारांनीं रावण अतिशय संतापे. थोड्या कालांत ती त्यास वश न झाल्यास तिचे तुकडे तुकडे करून त्यांचें पक्वान्न करून खाण्याची धमकी तो तिला देई. पण अशा धमकीचा तिच्या मनावर कांहीं परिणाम होत नसे.

रामाशीं वागतांनासुद्धां सीतेचा स्वाभिमान जागजागीं प्रकट होतो. राम वनांत निघाल्यानतर त्यानें सीतेस असें सुचविलें कीं, तिनें व्रतस्थ वृत्तीनें सासूसासऱ्याची सेवा करीत अयोध्येंतच राहावें. हें ऐकतांच सीता फारच

अस्वस्थ झाली. तिनें रामाला सांगितलें, " आपणाला सोडून एक क्षणहि राहण्याची माझी तयारी नाहीं. सत्यवानाच्या अर्धांगीचा आदर्श माझ्या डोळ्यांसमोर आहे. वाटेल त्या परिस्थितींत आपल्यापाशींच राहण्याचा उपदेश मला माझ्या पित्यानें केला आहे व तोच मी पाळणार. वाहतः वीर पुरुषाचें भासणारें तुमचें हृदय स्त्रीसारखें भीरु तर नाहीं ना ! " तिचें हें भाषण ऐकून राम तिला म्हणाले, " तुझें रक्षण कोटेंहि करण्याचें सामर्थ्य माझ्यांत आहे. पण तुझी इच्छा समजावून घेण्यासाठींच मीं तुला येथें राहण्याची सूचना केली. माझ्याबरोबर वनांत येण्याचा तुझा निश्चय तुझ्या व माझ्या घराण्यांच्या कीर्तीला व परंपरेला साजेसाच आहे. " नंतर स्वतःजवळचीं सर्व मूल्यवान् वस्त्रें, इतर संपत्ति व दागदागिने ब्राह्मणांस व गरिबांस दान देण्याची आज्ञा रामचंद्रांनीं तिला दिली. आनंदानें सीतेनें सर्वांचें दान केलें.

मारिच्याचा-पाठलाग करण्यासाठीं राम पर्णकुटीपासून खूप दूर गेला. जातांना सीतेच्या रक्षणार्थ लक्ष्मणानें तेथेंच थांबावें अशी आज्ञा त्यानें दिली होती. पण रामासारखा आवाज काढून लक्ष्मणाला मदतीला बोलविणाऱ्या राक्षसांच्या मायावी क्लृप्तीस सीता बळी पडली. राम संकटांत आहे असें समजून त्याच्या मदतीसाठीं तिनें लक्ष्मणाला जाण्यास सांगितलें. लक्ष्मण तिला म्हणाला, " युद्धांत रामास कोणीहि जिंकूं शकणार नाहीं. खरास व त्याच्या अनेक राक्षसांस रामानें ठार केल्यामुळें चिडलेल्या राक्षसांनीं आपल्याला फसविण्यासाठीं ही युक्ति केलेली दिसते. मीं रामाच्या मदतीस जाण्याची मुळींच आवश्यकता नाहीं. उलट रामानें सांगून ठेवल्याप्रमाणें तुझ्या रक्षणासाठीं येथेंच थांबणें माझें कर्तव्य आहे. " या उत्तरानें सीतेची समजूत पटली नाहीं. राम संकटांत आहे या कल्पनेनें ती गांगरली. तिचा विवेक सुटला. लक्ष्मणाच्या हेतूचा विपर्यास करून ती चिडून त्याला म्हणाली, " भरताच्या सल्ल्यानें तूं हा डाव रचलेला आहेस. माझ्या अभिलाषेनें रामाच्या मृत्यूची इच्छा जर तूं करीत असलास तर मात्र मी तुला स्पष्ट बजावतें कीं, माझा लाभ तुला कधींच होणार नाहीं. रामचंद्रांना दगा झालेला कळतांच मी विष घेऊन अगर नदींत उडी टाकून स्वतःचा शेवट करीन. " सीतेच्या या अश्लाघ्य आरोपानें लक्ष्मणाचें हृदय विदीर्ण झालें. दुःखातिशयानें तो म्हणाला, " मला योग्य दिसलें तें मी स्पष्ट बोललों आणि तूं त्याचा असा विपर्यास

केल्यास ! धिक्कार असो तुला ! तुझ्या मनांतील विकल्पावरून तुझा शेवट जवळ आल्यासारखा दिसतो. मी जातों. वनांतील देवताच आतां तुझें रक्षण करोत. परत आल्यानंतर तूं सुखरूप दिसावीस एवढीच माझी इच्छा आहे. "

लक्ष्मणाचें भविष्य अक्षरशः खरें ठरलें. रावणाच्या रूपानें व वनवासांतून परत आल्यानंतर जननिंदेच्या रूपानें सीतेवर मोठीं संकटें आलीं. दुसऱ्या संकटानें तर रामाची व तिची कायमची ताटातूट केली. हनुमानाजवळ खूण म्हणून स्वतःचा अलंकार देण्यापूर्वी सीतेनें लक्ष्मणाचा विशेष गौरवपूर्वक उल्लेख केला. ती हनुमानाला म्हणाली, " लक्ष्मण हा एक महान् योद्धा, बुद्धिमान्, निर्भय व तेजस्वी पुरुष आहे. तो रामचंद्रांना पित्याच्या ठिकाणीं व मला मातेच्या ठिकाणीं मानतो. सुमित्रेला अभिमान वाटावा असा तो आदर्श सुपुत्र आहे. माझ्यापेक्षांहि रामचंद्रांना तो अधिक प्रिय आहे. त्याच्याकडे पाहूनच राम पितृयोगाचें दुःख सहन करूं शकले. त्याला सांग म्हणजे तो या यातनांतून मला सोडवील. " लक्ष्मणाच्या पूर्वी केलेल्या अपमानाची भरपाई करावी याच हेतूनें सीतेनें लक्ष्मणाची विशेष स्तुति हनुमानाजवळ केली असावी.

हनुमान भेटला तेव्हां सीता विलक्षण मनःस्थितींत होती. रावणाचें भक्ष्य होण्यापेक्षा स्वतःच्या लांबसडक केशपाशानें आत्महत्याच केलेली काय वाईट असा विचार तिच्या मनात पक्का होऊं लागला होता. इतक्यांत हनुमान तेथें आला. शेंकडों वानर तिच्या शोधार्थ वेपातर करून कसे हिंडत आहेत, तो स्वतः समुद्रावरून उड्डाण करून कसा आला वगैरे हकीकत त्यानें तिला सांगितली क्षणभर रावणच वानराच्या रूपानें पुन्हा आपल्याला छळण्यास आला कीं काय असें सीतेस वाटलें. पण तिचा गैरसमज लगेच दूर झाला. हनुमानाचें सहर्ष स्वागत करून तिनें त्यास रामचंद्राचें कुशल विचारलें, त्यांचा निरोप विचारला व आपला निरोप त्याच्याजवळ दिला.

सीतेच्या दुःखाचा तावडतोब परिहार करणारी एक कल्पना हनुमानास सुचली. तो तिला म्हणाला, " माझ्या खांद्यावर बसून येत असाल तर आपल्याला याक्षणीं मी रामाकडे घेऊन जातों. सीतेनें ही सूचना मान्य केली नाहीं. वास्तविक पाहतां ती आपल्या पावित्र्याच्या बलानें रावणाचा

नाश करूं शकली असती. पण असें केल्यानें रामाच्या बाणाची एक सुसंधि हिरावून घेतल्यासारखें झालें असतें. म्हणून लंकेतून गुपचुप पळून जाण्यापेक्षां रामानें रावणाचा पराभव करूनच आपणाला सोडवावें हें तिला अधिक संयुक्तिक वाटलें.

राम-रावण युद्ध झालें. रावणाचा वध झाला आणि सीतेचें एक स्वप्न साकार झालें. सुटकेचा निःश्वास टाकून पतिमीलनाचा सुखमय विचार ती करूं लागणार तोंच दुसरें एक संकट अनपेक्षितपणें तिजसमोर उभें राहिलें. रामाच्या भेटीसाठीं आतुर असलेली सीता समोर येतांच राम तिला म्हणाले, " रावणाचा वध करून मीं माझ्या घराण्याचा कलंक धुऊन काढला आहे. पण तुझा स्वीकार मला करतां येणार नाहीं. तूं वाटेल तिकडे जाऊं शकतेस. लक्ष्मण, बिभीषण अगर सुग्रीव यांपैकीं कोणाचाहि आश्रय तूं घेऊं शकतेस. "

रामाचे हे उद्गार ऐकून सीता दुःखानें स्तिमित झाली. तिनें ताबडतोब अग्निप्रवेश करण्याचा निश्चय केला. प्रदक्षिणा करण्यापूर्वी ती रामाला म्हणाली, " माझा देह परपुरुषाच्या हस्तस्पर्शानें विटाळला हें खरें आहे. पण माझें मन मात्र पवित्र आहे व त्या ठिकाणीं आपल्याखेरीज इतर कोणालाहि मीं स्थान दिलेलें नाहीं. " अग्नीकडे वळून ती पुन्हां म्हणाली, " अग्निनारायणा, माझ्या पावित्र्याविषयीं प्रत्यक्ष रामचंद्रांनीं संशय व्यक्त केला; तूं तरी माझ्या चारित्र्याची निष्कलंकता सिद्ध कर. " अग्नीनें सीतेची शुद्धि जाहीर केली. राम आनंदले व त्यांनीं सीतेचा स्वीकार केला. परंतु फार काल रामाच्या सान्निध्याचें सुख सीतेला लाभावयाचें नव्हतें. थोराचें जीवन वैयक्तिक सुखासाठीं नसून कर्तव्यनिष्ठेचे मोठमोठे जीवनादर्श निर्माण करण्यासाठींच असतें. विधिघटनेनुसार अयोध्येतील लोकनिंदा रामचंद्राच्या कानीं येतांच निव्वळ कर्तव्यपालनासाठीं रामानें पुन्हां तिचा त्याग करण्याचें ठरविलें. ही कटु कामगिरी पार पाडण्यासाठीं त्यानें लक्ष्मणाची योजना केली. वाल्मीकींच्या आश्रमाजवळ सीतेला सोडतांना लक्ष्मण दुःखानें तिला म्हणाला, " राजाचें जीवन निरपवाद असावें म्हणून तूं निष्कलंक असूनहि रामानें तुझा त्याग केला आहे. तूं मुळींच खेद करूं नकोस. वनात रमण्याचे तुझे डोहाळे पुरविण्याच्या मिषानें तुला येथपर्यंत आणावें अशी मला रामानेंच सूचना दिली होती. "

सीतेचा यावेळचा वनवास पूर्वीच्या वनवासापेक्षां फार वेगळ्या स्वरूपाचा होता. त्या वेळीं राम बरोबर होते. आतां ती एकटी होती. आत्मनाशाची कल्पनाहि तिला प्रत्यक्षांत आणतां येत नव्हती. कारण रामचंद्रांचा वंश तिच्या उदरांत वाढत होता. अशा कठीण परिस्थितींतहि लक्ष्मणाजवळ रामासाठीं दिलेल्या संदेशांत तिची कर्तव्यनिष्ठा, त्यागी वृत्ति व पतिप्रेम दिसून येतें. " रामाच्या कीर्तीला कमीपणा येऊं नये म्हणून मला जपलेंच पाहिजे. त्यांच्या हितासाठीं माझा जीवहि ओवाळून टाकणें हें माझें कर्तव्य आहे. " या तेजस्वी संदेशानें तिनें लक्ष्मणाची बोळवण केली.

बऱ्याच वर्षांनीं रामानें केलेल्या राजसूय यज्ञाच्या वेळीं लव-कुशांनीं यज्ञमंडपांत केलेल्या रामचरित्रगायनामुळें सीता जिवंत असल्याचें रामाला समजलें. वसिष्ठांनीं सीतेच्या शुद्धतेची ग्वाही दिली तरी सीतेनें पुन्हां प्रजेसमक्ष दिव्य करावें असा हट्ट रामानें धरला. सीतेची रामसान्निध्याचीच काय पण जगण्याची प्रेरणाहि निवली होती. लव-कुशांचा अंगीकार रामचंद्रांनीं केला होता. अयोध्येचा वंशदीप मावळण्याची भीति आतां राहिलेली नव्हती. सीता दिव्यास तयार झाली पण ती फक्त तिची निष्कलंकता सिद्ध करण्याकरितां. या दिव्यांत धरणीमातेनें आपल्या उदरांत तिला कायमचें स्थान द्यावें एवढीच विनंती तिनें केली व ती त्या मातेनें मान्यहि केली. या पुढील आयुष्यांत जेव्हां-जेव्हां रामचंद्र धर्मकार्य अगर इतर विधि करीत तेव्हांतेव्हां सीतेची सुवर्ण-प्रतिमा ते आपल्याजवळ ठेवीत. सीतेची निष्कलंक मूर्ति त्यांच्या हृदयावर कायमचीच कोरली गेली होती.

सीतेनें सुवर्णमृगासाठीं धरलेला हट्ट स्त्रीची नैसर्गिक सुखासीनता दाखवितो. पण या एकाच हट्टानें तिच्यावर जीं संकटें ओढविलीं त्यां सर्वांतून तिचें असामान्यत्व प्रकट झालें. तिच्या आयुष्याचें ध्येय एकच व तें म्हणजे पतीची कीर्ति व प्रतिष्ठा कायम राखणें. त्यासाठीं तिनें आपल्या जीविताची अक्षरशः कुर्बानी केली. रामाला आदर्श राजा व पति बनविण्यास तिनें आपल्या महान् त्यागानें एकमारखें साहाय्यच केलें.

रामायणांतील प्रमुख स्त्रियांचा परिचय करून देण्याचा प्रयत्न या प्रकरणांत केला आहे. या स्त्रियांच्या व्यक्तिरेखा काढतांना त्यांच्या जीवनां-

तील महत्त्वाचे प्रसंग व या प्रसंगीं त्यांची दिसून आलेली मानसिक आंदोलनें विचारांत घेतलीं आहेत. प्रत्येकीची मानसिक ठेवण, जीवनादर्श, वर्तनादर्श व जीवनमूल्यें अजमावणें हा प्रमुख उद्देश डोळ्यांपुढें ठेवून हीं व्यक्तिचित्रें रेखाटलीं आहेत. अर्थातच रामायणांतील घटनांची मांडणी या उद्देशानुसार करावी लागली आहे.

---

# प्रकरण ८ वें

## महाभारतांतील प्रमुख महिला

महाभारतानें भारताच्या सांस्कृतिक इतिहासांतील कांहीं अविस्मरणीय महिला निर्माण केल्या. स्त्रीजीवनाचे हे आदर्श गांधारी, कुंती, द्रौपदी, दमयन्ती, सीता व सावित्री यांच्या चरित्रांतून स्पष्ट झाले आहेत. एका विश्वव्यापी नैतिक कायद्यानें जगाचें नियंत्रण होतें ही श्रद्धा या प्रत्येकीच्या जीवनांतून प्रतीत होते. यालाच त्या धर्म अशी संज्ञा देतात. सर्वसामान्य माणसांच्या दृष्टीनें धर्म म्हणजे एक विशिष्ट विधिविधान आणि कांहीं रूढींचा समुच्चय. पण धर्माची ही कोती कल्पना महाभारतांतील एकाहि महिलेपुढें नव्हती. त्यांच्या धर्मकल्पनेंत सर्व जीवनाच्या नियंत्रणाची कल्पना आहे. व्यक्ति व समाजजीवनाला सदासर्वकाळ मार्गदर्शन करणारा कायदा व मानवी भावनांना मुरड घालणारी शक्ति म्हणजे धर्म असें कांहींसें त्यांच्या धर्माचें स्वरूप होतें. सर्व महाभारतात यान विश्वधर्माचें दर्शन वाचकाना होतें. आपल्या तेजस्वी परंपरेचें रक्षण करून आणि श्रद्धामय मनोवृत्ति निर्माण करून समाजांत बंधुभाव व सहकार्य स्थापन करणें हें महाभारतीय धर्माचें स्वरूप आहे. धर्माचें हें विशाल स्वरूप समजण्यासाठीं जीवनावर जी नितान्त श्रद्धा असावी लागते, जी सहनशीलता व तत्त्वनिष्ठा लागते ती दानवितांना महाभारतांतील एकहि स्त्री मार्गे पटली नाहीं. उलट भावनांना जिंकून विवेकानें जीवनाची घडण किती उदात्त होऊं शकते याचा आदर्शच प्रत्येकीनें घालून दिला. कुरु कुटुंबांत अत्यंत आणीबाणीची परिस्थिति निर्माण झाली असतां गांधारीनें दुर्योधनास स्पष्ट बजावलें, " जेथें सत्य तेथेंच जय. " या उद्गारांवरून तिचा जीवनादर्श किती उच्च होता याची कल्पना येते. कुमार्गाचा अवलंब करून कांहीं पुरुषांनीं महाभारतात स्वत:चें श्रेष्ठत्व स्थापण्याचा प्रयत्न केलेला आहे. पण या ग्रंथाचा संदेश हाच कीं अधर्मानें तत्कालीन सुखाची प्राप्ति झाली तरी तें टिकाऊ असूं शकत नाहीं. असत्याचा नाश हा सृष्टिनियमच आहे.

गांधारी :–सर्व महाभारतांत गांधारीचें जीवन अतिशय तेजस्वी व उदात्त आहे. नीतीवर तिची पूर्ण श्रद्धा होती. कोणतीहि गोष्ट करतांना तिच्या पाठीमागें वैयक्तिक स्वार्थ अगर लाभ आहे असें तिला दिसल्यास ती त्या गोष्टीचा तीव्र निषेध करीत असे. तिचें स्वतःचें जीवन, आचार व विचार पवित्र गंगोघासारखे होते. महाभारताचा प्रसिद्ध लेखक कृष्णद्वैपायन यानें या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत गांधारीच्या कर्तव्यनिष्ठेचा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे यावरूनच गांधारीची योग्यता सिद्ध होते.

हिंदुस्थानच्या वायव्येस असलेल्या गांधार देशाचा राजा सुबल याची कन्या गांधारी. कुरुवंशांतील युवराज धृतराष्ट्र याच्यासाठीं योग्य वधूच्या शोधांत त्याचा चुलता भीष्म असतांना अनेक ब्राह्मणांनीं त्याला सांगितलें कीं गांधारी ही अतिशय सद्गुणी मुलगी असून धृतराष्ट्राची पत्नी होण्यास तीच योग्य आहे. हें ऐकून भीष्मानें गांधारीस मागणी घातली. धृतराष्ट्र आंधळा असल्यानें त्याला आपली मुलगी द्यावी कीं नाहीं अशा विचारानें सुबल थोडा गोंधळला. पण कुरुवंशाची कीर्ति लक्षांत घेऊन शेवटीं त्यानें या विवाहास संमति दिली. आपला पति आंधळा आहे हें गांधारीला समजतांच तिनें आपले डोळे जन्मभर बांधण्याचा निश्चय केला व लगेच तो अंमलांत आणला. इतकी तिची पतीवर श्रद्धा होती.

गांधारीस एकूण शंभर पुत्र झाले. पण एकहि पुत्र तिच्यासारखा गुणी निपजला नाहीं. मुलाच्या दुष्ट प्रवृत्तीस, विशेषतः पांडवाबद्दलच्या त्याच्या द्वेषास आळा घालण्यासाठीं परोपरीनें तिनें आपल्या पतीस विनविलें. एकदां द्यूत खेळतांना युधिष्ठिर हरला. राज्य, संपत्ति, बंधु व पत्नीहि त्यानें गमाविली. हें ऐकून सर्व हस्तिनापुराला आनंद झाला. म्हाताऱ्या धृतराष्ट्रानेंहि मुलांबरोबर आनंदोत्सव केला. पण त्या दिवशीं सर्व हस्तिनापुरांत एकच व्यक्ति दुःखानें व्यथित झाली होती व ती म्हणजे गांधारी. पांडवांचा होत असलेला अन्याय्य छळ तिला पाहवेना. मुलाच्या चाळ्यांना आळा घालण्याची तिनें पतीस विनंती केली. थोडी मर्यादा ओलांडून कुरुवंशाला लांछन ठरलेल्या दुर्योधनाला राज्यांतून हाकलून देण्याची सूचनाहि तिनें धृतराष्ट्राला केली.

गांधारीच्या मातृप्रेमानें मुलांच्या दुर्गुणास कधींच उत्तेजन दिलें नाहीं.

उलट सर्व महाभारतांत तिचा आवाज मुलांना धर्म व नीतिपाठ देण्यासाठींच उठलेला दिसतो. पांडवांशीं शांततामय समझोता घडवून आणण्याचा सल्ला ती दुर्योधनाला वारंवार देई. कुरुक्षेत्रावर लढाई सुरू होण्याच्या आदल्या दिवशीं स्वतः श्रीकृष्ण तहाच्या अटी घेऊन आला असतां भर दरबारांत दुर्योधनानें त्याची कुचेष्टा केली. गांधारीस हें सहन झालें नाहीं. सर्व मीड व मर्यादा बाजूस टेवून ती दरबारांत आली व सर्वांसमक्ष दुर्योधनाची तिनें खूप कानउघडणी केली. " युद्धानें आजपर्यंत कोणतेच प्रश्न सुटलेले नाहींत. उलट एका युद्धांतून अनेक नवीन प्रश्न उत्पन्न होतात हें लक्षांत घेऊन शहाणपणानें तडजोड कर" असा स्पष्ट इशारा तिनें दुर्योधनास दिला.

मातेचा हा सल्ला मानण्याच्या मनःस्थितींत दुर्योधन नव्हता. कौरव-पांडवांचें युद्ध सुरू होऊन तें एकूण अठरा दिवस चाललें. प्रत्येक दिवशीं रणक्षेत्रावर जाण्यापूर्वीं दुर्योधन मातेकडे जाऊन तिच्या आशीर्वादाची याचना करी. पण प्रत्येक वेळीं गांधारी त्याला एकच सिद्धान्त ऐकवी, " जेथें सत्य आणि न्याय तेथेंच जय. "

युद्ध संपलें. गांधारीचे शंभर पुत्र रणांत धारातीर्थीं पडले. तिच्या सान्त्वनास श्रीकृष्ण आले असतां अश्वत्थाम्यापासून पांडवांचें रक्षण करावयास हवें हें स्मरून त्यांनीं घाईघाईनें तिचा निरोप घेतला. तिनेंहि, श्रीकृष्णानें तावडतोब जाऊन पांडवांची मुक्तता करावी असें सुचविलें. यावरून तिला पांडवांबद्दल किती आपुलकी होती हें सिद्ध होतें.

कुरुक्षेत्रावरील महायुद्धाबद्दल मात्र तिनें श्रीकृष्णास दोष दिला. ' सर्व यादवघराणें अनपेक्षित संकटांत नष्ट होईल ' असा शाप तिनें दिला. श्रीकृष्णास लवकरच कोणीतरी अज्ञात व्यक्ति ठार करील असेंहि भाकीत तिनें केलें. गांधारीची निष्ठा व सामर्थ्य यांची पूर्ण कल्पना असल्यानें श्रीकृष्णानें सहास्य मुद्रेनें तिचा शाप पदरात घेतला.

कुरुक्षेत्रावरील युद्ध संपल्यानंतर सोळा वर्षें धृतराष्ट्र व गांधारी यांनीं पांडवांच्या छत्राखालीं हस्तिनापुरीं वास्तव्य केलें. युधिष्ठिरानें व इतर पांडवांनीं जें प्रेम व जो आदर दाखविला त्यामुळें त्यांचें पुत्रनिधनाचें दुःख

बरेंच कमी झालें. सोळा वर्षानंतर या वृद्ध दंपतीनें हिमालयाची यात्रा करण्याचा बेत केला. कुंती, संजय व विदूर यांनीहि त्यांच्याबरोबर जाण्याचें ठरविलें. ही सर्व मंडळी निघण्यापूर्वी युधिष्ठिरानें मोठा दरबार भरविला. शेंकडों प्रजाजनांना त्या वेळीं डोळे बांधलेल्या गांधारीचें पतिसमवेत दर्शन झालें. धृतराष्ट्रामार्फत गांधारीनें तिच्या पुत्रांमुळें प्रजेला झालेल्या त्रासाबद्दल मन:पूर्वक दिलगिरी प्रदर्शित केली.

या सर्व वृद्ध मंडळींच्या प्रयाणाचा प्रसंग मोठा करुण होता. सर्वांत पुढें कुंती, तिच्या खांद्यावर हात टेवून गांधारी व गांधारीचा आधार घेऊन धृतराष्ट्र बाहेर पडतांच त्यांच्या दोन्ही बाजूंनीं विदुर व संजय चालूं लागले. वेशीपर्यंत शेंकडों प्रजाजन त्यांना निरोप देण्यासाठीं आले होते. सर्वांचीं अंत:करणें दु:खानें जड झालीं होतीं. महाद्वाराशीं येतांच सर्वांच्या रुदनानें वातावरण भरून गेलें. कुंती व गांधारी मात्र शांत होत्या. कांहीं वर्षे त्यांनीं हिमालयांत वास्तव्य केलें. ज्या भागांत ही मंडळी राहत होती तेथें एकदां अकस्मात् वणवा पेटला व त्यांत धृतराष्ट्र व गांधारी हीं जळून गेलीं. हाहि प्रसंग अविस्मरणीय आहे. वणवा पेटलेला समजतांच दूतरांनीं त्यांना बाहेर पडण्याची सूचना दिली. पण धृतराष्ट्र व गांधारी ह्या दोघांनींहि सुटकेस नकार दिला. पूर्ण विरक्त वृत्तीनें तीं दोघें एका जागीं बसलीं व शांत चित्तानें त्यांनीं स्वत:चें भस्म करून घेतलें. या शेवटच्या क्षणापर्यंत गांधारीचे डोळे बांधलेलेच होते.

गांधारीच्या जीवनात भारतीय स्त्रीजीवनाचे अनेक आदर्श अमर झालेले दिसतात. महाभारतकालापासून आजपर्यंत लाखो स्त्रियांनीं गांधारीच्या जीवनापासून त्यागाचे व कर्तव्याचे धडे घेतले असून स्फूर्ति मिळविली आहे.

**कुंती :–** महाभारतांतील कुंती म्हणजे त्याग, सहनशीलता व धैर्याची प्रतिमा. तिचें सासर व माहेर हीं दोन्हीं राजघराणीं. हस्तिनापूरच्या पंडु राजाची कुंती ही पत्नी. पूर्वायुष्यांत तिनें पतिसमवेत अरण्यवास पत्करून दीर्घकाळ त्या उभयतांनीं हिमालयांतील उत्तर परिपात्र या ठिकाणीं एका झोंपडींत वास्तव्य केलें. याच ठिकाणीं युधिष्ठिर, भीम व अर्जुन या तीन पुत्रांना तिनें जन्म दिला. अर्जुनाच्या जन्माच्या वेळीं तिच्या कानीं एक दिव्य भविष्यवाणी आली. अर्जुन हा इन्द्राप्रमाणें शूर व तेजस्वी होऊन कुटुंबाचें

सर्व गतवैभव तो परत मिळवील, हें या वाणीनें केलेलें भाकीत खरें ठरलें. पतीच्या निधनानंतर कुंती आपल्या या तीन पुत्रांना व नकुल व सहदेव या सावत्र मुलांना घेऊन हस्तिनापुरास आली. धृतराष्ट्राकडून कुंतीस फार छळ सहन करावा लागला. पण हा कष्टमय काल तिनें मोठ्या धैर्यानें कंठला. दुर्योधनाच्या दीर्घद्वेषी स्वभावामुळें वारणावतीस तिच्यावर मुलांसह अग्नीचें भक्ष्य होण्याची वेळ आली होती. पण सुदैवानें तीं सर्व या दिव्यांतून सुखरूप पार पडलीं. गंगापार होऊन वनांत अनेक हाल भोगल्यानंतर तीं सर्व पांचालाच्या आश्रयास आलीं. या ठिकाणीं अर्जुनाच्या धनुर्विद्येंतील कौशल्यामुळें त्याचा द्रौपदीशीं विवाह घडून आला. पांचालासारख्या महाबलाढ्य राजाशीं पांडवांचें नातें जुळल्यानें धृतराष्ट्रास आपल्या पुतण्यांबद्दलचा दृष्टिकोन बदलणें भाग पडलें. पांडवांसह कुंतीस हस्तिनापुरास आणण्यासाठीं धृतराष्ट्रानें विदुरास पांचालाकडे पाठविलें. मोठ्या गौरवानें सर्वांचा सन्मान करून पांडवांस कुरुराज्याचा अर्धा भाग देण्यांत आला. यमुनेच्या कांठीं इन्द्रप्रस्थ या ठिकाणीं राजधानीची योजना करण्यांत आली. कुंती आतां खऱ्याखुऱ्या अर्थानें राजमाता झाली. पण हें सुख फार काल लाभण्याचें तिच्या नशिबीं नव्हतें. द्यूत खेळून युधिष्ठिरानें सर्व राज्य गमावलें. कुंतीला या अनपेक्षित संकटानें मोठा धक्का बसला. पण दृढनिश्चयानें स्वतःस सांवरून तिनें द्रौपदीस धीर दिला. पांडवांच्या वनवासाच्या व अज्ञातवासाच्या काळांत कुंतीचें वास्तव्य विदुराच्या घरीं होतें.

तेरा वर्षें शिक्षा भोगल्यानंतर पांडव हस्तिनापुरीं परत आले व राज्याचा अर्धा हिस्सा त्यांनीं कौरवांकडे परत मागितला. दुर्योधनानें ही त्यांची न्याय्य मागणी धुडकावून लावल्यानें युद्ध करण्याखेरीज पांडवांस गत्यंतरच उरलें नाहीं. युद्धामुळें होणारी अपरिमित हानि टाळावी म्हणून श्रीकृष्ण स्वतः तहाच्या अटी घेऊन हस्तिनापुरीं गेला. दुर्योधनास भेटण्यापूर्वीं त्यानें कुंतीची भेट घेतली व तिचा सल्ला विचारला. कौरवांच्या दुष्टपणाचा कुंतीला विलक्षण उबग आला होता. विशेषतः प्राणापलीकडे प्रिय असलेल्या अशा द्रौपदीची विटंबना झाल्यामुळें तर ती फारच विह्वल झाली होती. कोणतीहि अपमानास्पद तडजोड मान्य न करण्याबद्दल कुन्तीनें श्रीकृष्णास बजाविलें.

दुःशासनानें भर दरबारांत द्रौपदीची जी संभावना केली तिचा फक्त एकट्या विदुरानें स्पष्ट निषेध केला व म्हणूनच त्याचा कुन्तीनें " एक महान् सत्पुरुष " असा गौरव केला. " नीतीचे आदर्श शुद्ध वर्तन व चारित्र्यानेंच निर्माण होतात, नुसत्या विद्येनें अगर संपत्तीनें निर्माण होत नाहींत " हा कुन्तीचा सिद्धान्त आजहि नीतिशास्त्राचा आदर्श म्हणून मानला जातो.

श्रीकृष्णाबरोबर कुन्तीनें पांडवांना कांहीं मोलाचे संदेश दिले. " तुझें धर्मग्रंथांचें अति अध्ययन राजधर्माच्या आचरणांत निरुपयोगी ठरलें आहे " हा संदेश तिनें धर्मराजासाठीं दिला. " स्वतःच्या सामर्थ्यानें अन्यायांचें परिमार्जन करण्याची व मातेचा मान राखण्याची वेळ आतां आलेली आहे. " असा निरोप तिनें भीम व अर्जुन याना पाठविला. " नुसतें सुखसंपत्तींत लोळण्यापेक्षां शूराचें स्वाभिमानी जीवन जगणें अधिक चांगलें " असा संदेश नकुल व सहदेव यांच्यासाठीं तिनें दिला. या सर्व संदेशांवरून तिचा युद्धविषयक सल्ला स्पष्ट होतो. कुन्तीनें या वेळीं श्रीकृष्णास सिंधुदेशाच्या विदुरा राणीची गोष्ट सांगितली. तिनें आपल्या मुलाला असाच तेजस्वी संदेश दिला होता. निस्तेज व कर्तृत्वशून्य जीवन दीर्घकाल जगण्यापेक्षां अल्पकाळच पण तेजस्वी जीवन जगण्याचा उपदेश विदुरेनें आपल्या मुलाला केला होता. यापुढें पांडवांनीं अपमानित जीवन न जगतां स्वाभिमानासाठीं झगडण्यास तयार व्हावें हा आशय विदुरेच्या उल्लेखानें कुंतीस व्यक्त करावयाचा होता.

एकाच प्रसंगीं कुंतीच्या मनाचा कमकुवतपणा दिसून येतो. कुरुक्षेत्रावरील युद्ध सुरू होण्याच्या आदल्या दिवशीं सर्व संकोच दूर सारुन ती कर्णाच्या भेटीस गेली. कर्ण व अर्जुन हे दोघेहि तिचेच पुत्र ! त्या दोघांच्या युद्धाच्या कल्पनेनेंच तिचें हृदय थरारून गेलें होतें. कर्णानें पांडवाची बाजू घ्यावी म्हणजे दुर्योधन युद्धाचा विचार सोडून सन्मान्य तडजोडीस तयार होईल व दोन्ही कुलें सुखानें नांदतील या विचारानें तिनें कर्णाची भेट घेण्याचें ठरविलें. पण जन्म झाल्याबरोबर दूर लोटणाऱ्या मातेचा कर्णानें धिक्कार केला व शेवटपर्यंत दुर्योधनाच्याच बाजूस राहण्याचा आपला निश्चय त्यानें कुंतीस सांगितला.

कुरुक्षेत्रावरील घनघोर युद्ध पार पडलें. अपरंपार मनुष्यहानि झाली.

सर्व कौरव धारातीर्थी पडले. या दुःखद घटनेनंतर सोळा वर्षे धृतराष्ट्र व गांधारी यांनीं पांडवांजवळच वास्तव्य केलें. नंतर जेव्हां धृतराष्ट्र गांधारीसह हिमाल्यांत जाण्यासाठीं निघाला तेव्हां कुंतीनेंहि त्यांच्याबरोबर निघण्याची तयारी केली ही गोष्ट खरोखरीच आश्चर्यकारक वाटते. दीर्घकाळ कष्ट भोगून मुलांच्या विजयानें पुन्हां तिला अखिल भारताचें राजवैभव प्राप्त झालें होतें. पण या वैभवाचा लोभ तिनें दाखविला नाहीं. ऐहिक सुखोपभोगांत न अडकतां विरक्त व तपस्वी जीवनाची जी ओढ कुंतीनें व्यक्त केली ती भारतीय तत्त्वचिंतक वृत्तीचीच द्योतक आहे.

अतिशय शांत मनानें तिनें हें अरण्यवासी जीवन कंठलें. या काळांत धृतराष्ट्र व गांधारी यांच्याबाबत कुंतीनें जी कर्तव्यनिष्ठा दाखविली ती अलौकिक होती. ज्या अरण्यात तीं सर्वजण राहत होतीं त्या अरण्यास एकदां एकाएकीं आग लागली. पण त्यांतून निसटण्याचा प्रयत्न न करतां धृतराष्ट्र व गांधारी यांच्यासमवेत कुंतीनें मरण पत्करलें.

द्रौपदी :—महाभारतात द्रौपदीची व्यक्तिरेखा अतिशय रेखीव उतरली असून महर्षि कृष्णद्वैपायनानें द्रौपदीच्या व्यक्तिमत्त्वाच्या वर्णनांत आपल्या कौशल्याची परिसीमा गांठली आहे. द्रौपदी सहनशील, भावनाप्रधान, अभिमानी व धैर्यशील आहे. तिच्यांत स्त्रीसुलभ मनोदौर्बल्यहि थोडेंफार आहे. तिचा जन्म सामान्य माणसाप्रमाणें झालेला नाहीं. पांचालदेशाचा राजा द्रुपद यज्ञ करीत असताना यज्ञकुंडातून ती प्रकट झाली. याच वेळीं अशी आकाशवाणी झाली कीं, " देवाना आनंद देणारीं अनेक कर्में द्रौपदी करील पण तिच्यामुळें कुरुवंशावर फार मोठें संकट गुदरेल. " ती अतुल सौंदर्यवती होती. नील कमळाप्रमाणें तिचा सुवास आसमंतात दरवळे. थोडक्यांत म्हणजे ती एक मानव-देहधारी देवताच होती. मनपसंत पति निवडण्याची संधि तिला मिळावी म्हणून द्रुपदानें स्वयंवर-सभा भरविली. यांत अर्जुनानें आपल्या धनुर्विद्येतील कौशल्यानें द्रौपदीला आकर्षित केलें आणि ती त्याची धर्मपत्नी झाली.

युधिष्ठिर इन्द्रप्रस्थास असतांना त्यानें राजसूय यज्ञ केला. देशोदेशींचे राजे या प्रसंगीं येऊन राजास शुभेच्छा देऊन गेले. सार्वभौम राजाची राणी या दृष्टीनें द्रौपदी गृहधर्म उत्तम रीतीनें पाळी. दुर्योधन स्वगृहीं परतल्यानंतर

समारंभांतील उणिवांबद्दल त्यानें धृतराष्ट्राजवळ खूप टीका कली. पण लहानापासून थोरापर्यंत सर्वांच्या जेवणखाणाची द्रौपदीनें केलेली चोख व्यवस्था पाहून त्यालाहि आनंद वाटला व त्याबद्दल त्यानें धृतराष्ट्राजवळ गौरवोद्गार काढले.

दीन व दरिद्री लोकांबद्दल द्रौपदीस विलक्षण सहानुभूति वाटे. पण सहानुभावाबरोबर इतरहि अनेक सद्गुण तिच्यांत होते. द्यूतांत युधिष्ठिरानें तिला पणास लाविली. युधिष्ठिर हरल्यानें दुःशासनाकडून भर सभेंत तिचा अपमान करण्यांत आला. प्रथम तिनें हताशपणें सर्व सभेकडे याविरुद्ध दाद मागितली. पण कौरवांना विरोध करण्यास एकहिजण पुढें होत नाहीं असें पाहतांच सर्वांची कठोर शब्दांत निर्भर्त्सना करून ती म्हणाली, " भारतांतील न्यायबुद्धिच नष्ट झालेली दिसते. नाहींतर राजघराण्यांतील साध्वीवर भर दरबारांत हात टाकलेला पाहून हस्तिनापुरातील सारे प्रजाजन गप्प कसे बसले आहेत ? " दुःशासनानें द्रौपदीची वेणी सोडली. तिचीं वस्त्रें अस्ताव्यस्त केलीं. शेवटीं असहाय द्रौपदीनें वडील मंडळींकडे साहाय्याची याचना केली; पण आश्चर्य असें कीं भीष्मसुद्धा द्रौपदीची बाजू घेण्यास पुढें झाला नाहीं. " या वेळीं धर्माधर्मांचा निर्णय मला करतां येत नाहीं " अशी लंगडी सबब त्यानें सांगितली. एकट्या विदुरानें निर्भयपणें पांडवांचा कडक शब्दांत निषेध केला. " द्रौपदीच्या अपमानाची भरपाई करून देतांना कौरवांना फार कठीण वेळ येईल " असा इशारा भीमानें याच वेळीं देऊन ठेवला.

पतिव्रता-धर्माचें पालन करण्यासाठीं द्रौपदीनें पांडवांबरोबर वनवास भोगला. पण या तेरा वर्षांच्या दीर्घ कालावधींत ती कौरवसभेंतील तिचा अवमान एक क्षणहि विसरली नाहीं. अधूनमधून ती पांडवांनाहि या घटनेचें स्मरण करून देई. एकदां श्रीकृष्ण वनांत त्या सर्वांच्या भेटीस गेला असतां द्रौपदीनें आपली मनोव्यथा त्याजजवळ बोलून दाखविली. श्रीकृष्णानें तिला धीर देऊन सांगितलें, " तूं मुळींच दुःखी होऊं नकोस. कौरवस्त्रियांवरहि हीच वेळ एके दिवशीं निश्चित येईल. तुझ्यावरील अन्यायाचें परिमार्जन पांडव नक्की करतील. " या सान्त्वनानें द्रौपदीचें कांहींसें समाधान झालें. पण तरी-

सुद्धां युधिष्ठिराबरोबर तिनें धर्मावर एकदां वादविवाद केला. युधिष्ठिरानें तिची अशी खात्री पटवून दिली कीं कितीहि संकटें आलीं तरी शेवटीं जेथें धर्म तेथेंच जय असतो. सद्धर्माचरण हें केव्हांहि निरर्थक होत नाहीं.

पांडवांचा वनवास संपत आला तेव्हां पुन्हां एकदां सत्यभामेसह श्रीकृष्ण पांडवांच्या भेटीस आला. वनवासाच्या कष्टास द्रौपदीनें धीरानें तोंड दिल्याबद्दल व पांचहि पांडवांचा विश्वास व प्रेम संपादन करूं शकल्याबद्दल सत्यभामेनें तिचें कौतुक केलें. द्रौपदीनें ही योग्यता कशी प्राप्त करून घेतली अशी पृच्छा सत्यभामेनें केली. यावर द्रौपदीनें गृहिणी धर्मासंबंधीं जें विवेचन केलें तें आजहि महाभारताचें एक महत्त्वाचें प्रकरण म्हणून मानलें जातें.

वनवासापेक्षांहि अज्ञातवासाचें विराटराजाकडे घालवावयाचें वर्ष सर्व पांडवांना व द्रौपदीस फार जड वाटलें. कारण या काळांत स्वतः गुप्त राहून निराळ्या वेषांत व निराळ्या नांवानें त्यांना कालक्रमणा करावयाची होती. त्यांनीं विराटाकडे पत्करलेले व्यवसायहि त्यांच्या दर्जाला मुळींच साजेसे नव्हते. विराटाकडे जाण्याच्या वेळीं युधिष्ठिराला सर्वांत अधिक दुःख झालें तें द्रौपदीसाठीं. तिच्यासारख्या सुकुमार राजकन्येनें व राणीनें कोणत्या रूपांत विराटाकडे राहावें हा त्याला प्रश्न पडला. पण " मी दासीची भूमिका वठवीन " असें सांगून तिनें युधिष्ठिराची काळजी निवारण केली. वास्तविक पाहतां दासीच्या भूमिकेंत एक वर्ष वावरणें ही गोष्ट तिला अतिशय कठीण होती.

विराटाच्या घरीं तिला कराव्या लागणाऱ्या कष्टांनीं तिच्या कोमल हातास घट्टे पडले, फोड आले. डोळ्यांत अश्रु आणून तिनें भीमाजवळ एकदां यासंबंधीं तक्रार केली. पण तिची याहून मोठी मनोव्यथा वेगळीच होती. विराटाचा सेनापति कीचक याची द्रौपदीवर पापी नजर होती व त्यामुळें तिला तो सारखा त्रास देई. हा त्रास सहन न होऊन एकदां भर सभेंत तिनें विराट राजाजवळ कीचकाविरुद्ध तक्रार केली. पण राजा गप्पच राहिला व उद्दामपणानें कीचकानें द्रौपदीस लाथेनें ठोकरलें. द्रौपदीला विलक्षण संताप आला व तिनें सर्व प्रजाजनांसमक्ष विराटाची खूप निर्भर्त्सना केली. " ज्याच्या राज्यांत नीति नाहीं व धर्म नाहीं तो राजा होण्याच्या

लायकीचा नाहीं. प्रजेनें अशा नालायक राजाच्या छत्राखालीं एक क्षणहि राहूं नये " अशी स्पष्ट सूचनाहि तिनें दिली.

अशा तऱ्हेचा जो कडवटपणा पांडवांत व विराट राजांत निर्माण झाला तो शेवटीं राहिला नाहीं. थोर मनानें पांडवांनीं विराटास क्षमा करून त्याची मुलगी उत्तरा हिचा अभिमन्यूशीं विवाह घडवून आणला.

अज्ञातवास पूर्ण झाल्यावर पांडवांनीं उपप्लव्य या मत्स्य देशाच्या सीमाप्रदेशांत वास्तव्य केलें. तेथें विराट, द्रुपद, श्रीकृष्ण वगैरेंशीं पांडवांनीं पुढील हालचालींबाबत विचारविनिमय केला. अर्जुन, भीम वगैरेंनीं जेव्हां शांततेच्या मार्गानेंच कौरवांबरोबरचे वाद मिटविण्याची भाषा सुरू केली तेव्हां द्रौपदीला राग आला. ती म्हणाली, " तुमच्यांत जर धमक नसेल तर माझा वृद्ध पिता माझ्या अपमानाची भरपाई करण्यासाठीं युद्ध करील. अभिमन्यु व माझे पांच पुत्र माझ्या बेअब्रूचा बदला घेतील. माझ्या वेणीस हात घालणाऱ्या दुःशासनाचे दोन्ही हात तुटून मातींत लोळलेले जेव्हां मी पाहीन तेव्हांच माझें समाधान होईल. " भीमासारख्यानें धर्माच्या नांवाखालीं युद्धाऐवजीं शांततेचा पुरस्कार करावा याचें तिला अधिकच दुःख झालें. तिच्या मतें सर्वच पांडव धर्माचा अर्थ चुकीचा लावीत होते. तिचा प्रमुख हेतु स्त्रीजातीचा व एका सन्माननीय राज्ञीचा अपमान करणाऱ्यास धडा शिकविण्याचा होता. तिच्या सात्त्विक संतापाचा श्रीकृष्णावर फार परिणाम झाला. वाटेल तें करून कौरवांशीं युद्ध घडवून आणून द्रौपदीच्या अपमानाचा बदला घेण्याचें वचन श्रीकृष्णानें तिला दिलें.

विधियोजनेनुसार कौरव-पांडवांचें घनघोर युद्ध झालें व त्यांत कौरव कुटुंबाचा सर्वनाश झाला. पांडव हस्तिनापुरांत आले व युधिष्ठिर सर्व भारताचा सम्राट् झाला. सम्राज्ञी म्हणून द्रौपदी हस्तिनापूरच्या राजवाड्यांत पुन्हां वावरूं लागली. छत्तीस वर्षें त्या वैभवाचा उपभोग घेतल्यानंतर पांडवांनीं तीर्थयात्रा व अरण्यवास पत्करण्याचा विचार केला. लगेच द्रौपदीनेंहि राजवेश टाकून सर्वांनीं संन्यासी वेश परिधान केला. सर्व भारताचा दौरा करून त्यांनीं आपल्या विस्तीर्ण प्रदेशाचें शेवटचें दर्शन घेतलें. नंतर सर्वजण हिमालयाच्या वाटेस लागलीं. हिमालयाच्या पलीकडे येताच त्यांना

वाळवंटाचा विस्तीर्ण प्रदेश दिसूं लागला. विरक्त वृत्तीनें ऐहिक जीवनाकडे पाठ फिरवून मोक्ष मार्गानें निघालेल्या या मंडळींत युधिष्ठिरच शेवटपर्यंत टिकला. द्रौपदी व इतर मध्येंच गळलीं. धर्मराज या नांवानें ओळखला जाणारा युधिष्ठिर मात्र डावीकडे अगर उजवीकडे दृष्टिक्षेपहि न करतां सरळ रस्त्यानें जात राहिला. या महाप्रयाणांत जरी द्रौपदी मागें राहिली तरी एक आदर्श स्त्री म्हणून द्रौपदीचें स्थान कोणींहि नाकबूल करणार नाहीं. कालिदासानें केलेल्या वर्णनाप्रमाणें ती सुगृहिणी होती, सल्लागार होती, प्रेमळ सहचारिणी होती व सर्व ललितकलांत निष्णात होती. तिचें भाग्य असामान्य होतें. अधूनमधून स्त्रीसुलभ विकार तिच्या मनाचा ताबा घेत. तरीहि तिची पतिनिष्ठा, नैतिक धैर्य व अध्यात्मिक दृष्टिकोन कौतुकास्पद होता. तिच्या चारित्र्यांत भारतीय स्त्रीजीवनाचे आदर्श साकार झाले आहेत.

# प्रकरण ९ वें

## महाभारतांतर्गत कथानायिका

भारताच्या संस्कृतीचें सर्वांगीण दर्शन घडविणारा महाभारतासारखा दुसरा ग्रंथ विरळाच. यांत उद्धृत केलेल्या अनेक कथांत भारतांतील निरनिराळ्या सामाजिक थरांतील स्त्रीजीवनाचें बहुविध दर्शन वाचकांस घडतें. या सर्व कथांतील स्त्रियांची चरित्रें येथें देतां येणार नाहींत. म्हणून कांहीं प्रातिनिधिक महिलांचीं व्यक्तिचित्रें थोडक्यांत रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे. यावरून महाभारतकालीन स्त्रीजीवनाच्या अनेक पैलूंचें वाचकांना दर्शन घडेल.

सुकन्या :—सुकन्या ही शर्याति राजाची एकुलती एक मुलगी. ती अतिशय सुंदर, सुसंस्कृत व तेजस्वी होती. वसंत ऋतूंत एका सुप्रभातीं शर्याति आपल्या कुटुंबियांसह वनक्रीडेसाठीं गेला. कांहीं वेळ वडील मंडळींबरोबर घालविल्यानंतर सुकन्या व तिच्या मैत्रिणी वेगळ्याच बाजूस झुकल्या. लतापल्लवांशीं हसतखिदळत त्या बऱ्याच दूर गेल्या. एके ठिकाणीं एक मोठें मातीचें वारूळ वाढलेलें सुकन्येला दिसलें. त्याच्या आंत कित्येक वर्षे च्यवनऋषि तपश्चर्या करीत बसले होते. मुलींच्या गडबडीनें त्यांच्या समाधीचा भंग झाला. त्यांनीं हळूच डोळे उघडून आसपास कोण आहे हें पाहण्याचा प्रयत्न केला. सुकन्येच्या सौंदर्यानें त्यांना क्षणभर मोहित केलें. त्यांनीं तिच्याशीं बोलण्याचा अनेकदां प्रयत्न करून पाहिला. पण दीर्घ तपस्येच्या कालांत त्यांचा आवाज नाहींसा झाल्यामुळें सुकन्येला त्यांचें बोलणें ऐकूं आलें नाहीं. पुढें वेंचीत वेंचीत सुकन्या वारुळाजवळ आली. च्यवनऋषींचे डोळे कांचेप्रमाणें वारुळांतून चमकतांना तिनें पाहिले. गंमत करण्यासाठीं एक काडी घेऊन तिनें च्यवनांच्या दोन्ही डोळ्यांत घातली. अभावितपणें तिच्याकडून एक भयंकर अपराध घडला होता. च्यवनांचे डोळे

फुटले. सुकन्येच्या पित्याला ही वार्ता समजतांच तो धांवतच च्यवनऋषींकडे आला व त्यानें मुनिवर्यांची क्षमायाचना केली. परंतु च्यवनानें असा आग्रह धरला कीं सुकन्येनें त्यांच्याशीं विवाह करूनच त्यांचें आंधळें व एकाकी जीवन सत्य केलें पाहिजे. सुकन्येनें वडिलांची समजूत घातली व नकळत घडलेल्या चुकीचें प्रायश्चित्त भोगण्यास ती तयार झाली.

सुकन्येसारखी अल्पवयी सुकुमार राजकन्या वृद्ध ऋषीशीं लग्न करून अरण्यवास पत्करते व पतीची मनोभावें सेवा करीत व्रतस्थ आयुष्य जगण्यास तयार होते यावरून भारतीय स्त्रियांच्या संस्कृतींत कर्तव्यास व सेवाधर्मास किती महत्त्वाचें स्थान होतें याची कल्पना येते.

सूर्यनारायणानें सात घोड्यांच्या रथांतून आपला प्रवास सुरू करण्यापूर्वीं आठी कमलदलें उमलूं लागण्यापूर्वींच सुकन्या आपली पर्णशय्या सोडी. सर्व गृहकृत्यें आटोपून स्नान करी व लतापल्लवांच्या आवरणांनीं आपला देह सुशोभित करी. पति वृद्ध व आंधळा म्हणून तिनें त्याच्याबद्दल कधींहि अनादर दाखविला नाहीं. त्यानें कधींहि चाखले नव्हते असे विविध रुचींचे पदार्थ ती त्यास करून घाली. झोंपडीभोंवतीं तिनें थोडीशीं बाग केली होती. त्यांत नानाप्रकारचा भाजीपाला तिनें लावला होता. येणाजाणाऱ्या अतिथींची मातेच्या प्रेमानें ती विचारपूस करी.

सुकन्या प्रेमळ पत्नी, आदर्श सहचरी, हुशार सल्लागार व विनम्र शिष्या होती. ती सुखी होती पण च्यवनऋषि मात्र दुःखी होते. त्यांना एकसारखे वाटे, "माझ्यासारख्या आंधळ्या म्हाताऱ्याशीं सुकन्येची जन्माची गांठ बांधून मीं तिच्यावर अन्याय तर केला नाहीं ना! सुकन्येला पति म्हणून मी योग्य आहे का?

एके दिवशीं ती आंघोळ करीत असतांना अश्विनीकुमारांच्या नजरेस पडली. अश्विनीकुमारांची वैद्यकीय ज्ञानाबद्दल व शरीरसौष्ठवाबद्दल अतिशय ख्याति होती. त्यांना पाहून सुकन्या शरमिंदी झाली. त्यांनीं तिला विचारलें, "तूं कोण?" सुकन्येनें उत्तर दिलें, "मी शर्याति राजाची कन्या व च्यवनऋषींची अर्धांगी." हें ऐकून अश्विनीकुमारांना फार आश्चर्य

वाटलें. ते म्हणाले, "तुझ्याइतकी सौंदर्यवती स्त्री आम्हांस स्वर्गांतहि आजपर्यंत आढळली नाहीं. अंगावर एकहि अलंकार नसूनदेखील तुझ्या लावण्यानें हें सर्व अरण्य प्रकाशित झालें आहे. उंची वस्त्रें व मूल्यवान् रत्नालंकारांनीं तुझी शोभा खुलून दिसेल! आमच्यापैकीं एकाचा पति म्हणून तूं स्वीकार केलास तर हें बहरलेलें तारुण्य सार्थकीं लागेल." हें ऐकून सुकन्या संतापली. "माझी माझ्या पतीवर पूर्ण श्रद्धा आहे. माझ्या निष्ठेविषयीं विनाकारण शंकित होऊं नका" असा इशारा तिनें त्यांना दिला. अश्विनीकुमारांनीं तिला आपल्या वैद्यकशास्त्रांतील करामतीची कल्पना दिली. ते म्हणाले, "तुझ्या पतीची दृष्टि परत आणून त्याला तारुण्य प्राप्त करून देण्याची कामगिरी आम्ही करूं, पण एका अटीवर. च्यवन तरुण व डोळस झाल्यानंतर तूं आम्हां तीघांपैकीं एकाची पति म्हणून निवड केली पाहिजेस." हें ऐकून सुकन्या पतीकडे गेली व त्याला तिनें सर्व हकीकत सांगितली. च्यवनाला दृष्टि व तारुण्य प्राप्त होण्याच्या कल्पनेनें आनंद झाला. तीं दोघें अश्विनीकुमारांकडे आलीं. अश्विनीकुमारांनीं च्यवनाला शेजारींच वाहत असलेल्या पाण्याच्या प्रवाहांत उडी मारण्यास सांगितलें आणि त्याच वेळीं त्यांनींहि दोघांनीं पाण्यांत बुड्या मारल्या. तिघे पाण्याबाहेर येतांच च्यवन इतका हुबेहुब अश्विनीकुमारांसारखा दिसूं लागला कीं सुकन्या क्षणभर गोंधळून गेली. पण तिच्या महान् पतिनिष्ठेच्या साहाय्यानें तिनें च्यवनाला नेमका ओळखून प्रेमानें आलिंगन दिलें. हें पाहून अश्विनीकुमारांनीं तेथून हळूच पळ काढला.

जरत्कारु :– परीक्षित राजाला शिकारीचा विलक्षण नाद होता. एकदां एका हरिणाची शिकार करीत तो बराच दूरवर गेला. मध्यें विश्रांति घेण्यासाठीं तो एका शेतांत थांबला. तेथें गाई चरत होत्या. वासरें दूध पीत होतीं. वासरांच्या तोंडून गळत असलेल्या फेंसाचें प्राशन करीत शमिकऋषि बसलेले राजानें पाहिले. परीक्षितानें शमिकास विचारलें, "हरिण कोणत्या दिशेनें पळाला?" परंतु मौनव्रत घेतलेलें असल्यानें शमिकानें उत्तर दिलें नाहीं. राजाला अपमान वाटला आणि त्यानें आपल्या बाणाच्या टोंकानें, थोड्या अंतरावर पडलेला एक मेलेला सर्प घेऊन शमिकाच्या मानेभोंवतीं गुंडाळला. शमिकाच्या चेहऱ्यावर कोणतीच भावना दिसली नाहीं. पण

त्याच्या मुलाला-शृंगिनाला-राजाच्या कृत्याचा फार राग आला. त्यानें परीक्षिताला असा शाप दिला कीं 'तो सात दिवसांच्या आंत सर्पदंशानें मरेल.' या शापानुसार राजाला तक्षकाच्या दंशानें मृत्यु आला. त्याच्यामागें जनमेजय हा त्याचा अल्पवयी मुलगा एकटाच राहिला.

जनमेजय वयांत आल्यावर त्याला आपल्या पित्याच्या मृत्यूचें कारण समजलें. चिडून त्यानें पृथ्वीवरील सर्व सर्पांचा नाश करण्याचें ठरविलें. जनमेजयाची प्रतिज्ञा कळतांच सर्पांचा राजा वासुकि फार अस्वस्थ झाला. एका सर्पाकडून त्याला असें समजलें कीं जरत्कारु नांवाचा ऋषि वासुकीची बहीण जरत्कारु हिच्याशीं विवाह करील व तिच्या पुत्राकडून सर्पांच्या जातीस अभय मिळेल. हें समजतांच वासुकीनें जरत्कारुच्या आसपास राहण्याची कांहीं सर्पांना आज्ञा दिली. ऋषीनें विवाहाची इच्छा दर्शवितांच त्यांनीं वासुकीला कळवावें अशी योजना ठरली.

वासुकीनें हीं सर्व हकीकत आपली बहीण जरत्कारु हीस सांगितली. ती तरुण होती, लावण्यवती होती. तिला विलास व उपभोग यांची अतिशय आवड होती. जरत्कारुऋषि दरिद्री, भटक्या व अतिशय रागीट होता. तरीहि आपल्या भावासाठीं व सर्पजातीच्या रक्षणासाठीं ती राजभगिनी या विवाहास आनंदानें तयार झाली.

इकडे जरत्कारुऋषीस त्याच्या पूर्वजांचे आत्मे भेटले आणि त्यानें लग्न करून पुत्राकरवीं पाणी न दिल्यास ते सर्व नरकांत जातील असें त्यांनीं सांगितलें. जरत्कारु म्हणाला, " मला संसार व संपत्ति यांची मुळींच ओढ नाहीं. पण पितरांच्या उद्धारासाठीं मी विवाहास तयार आहें. स्वेच्छेनें भिक्षा म्हणून माझ्याच नावाची स्त्री जर मला कोणी अर्पण केली तरच मी लग्न करीन. तिच्या उदारनिर्वाहाची जबाबदारीहि माझ्यावर असतां कामा नये." वासुकीच्या कानावर ही हकीकत आली. जरत्कारुऋषीनें आणखीहि एक अपमानास्पद अट घातली. त्याला आवडणार नाहीं असें पत्नीच्या हातून कांहींहि घडल्यास तो तिचा तावडतोब त्याग करील अशी ही अट होती. जरत्कारूनें—वासुकीच्या बहिणीनें—केवळ आपल्या जातीसाठीं हा सर्व अपमान मुकाट्यानें गिळला व ती जरत्कारुऋषीशीं विवाहास तयार झाली.

विवाहानंतर जरत्कारुऋषि पत्नीसमवेत वासुकींच्या राजवाड्यातच राहूं लागला. राजभगिनी आपलें बालपण विसरून पतीच्या खडतर तपस्वी जीवनाशीं एकरूप झाली. दिवसभर त्याची सेवा करावी व त्याच्या मर्जीनुसार वागावें असा तिचा दिनक्रम सुरू झाला. एके दिवशीं थकलेला ऋषि पत्नीच्या मांडीवर डोकें ठेवून गाढ झोंपला होता. तिन्हीसांज झाली तरी तो उठण्याचें लक्षण दिसेना. पतीस झोपेंतून जागे केल्यास तो रागावणार व न केल्यास त्याच्या धर्माचरणांत चूक घडणार. काय करावें असा जरत्कारूस पेंच पडला. स्वतःच्या सुखापेक्षां पतीच्या धर्माचरणाचें महत्त्व अधिक मानून तिनें त्याला उठविलें. अपेक्षेप्रमाणें जरत्कारु संतापला. "आपला अपमान करण्यासाठीं नव्हे तर आपल्या धर्माचरणांत चूक होऊं नये म्हणून मीं आपणांस झोपेंतून जागे केलें. मला क्षमा करावी" असें तिनें त्यास नम्रपणें सांगितलें. पण क्रोधायमान ऋषीचें समाधान झालें नाहीं. पूर्वजांसाठीं जरत्कारूनें जरी लग्न केलें होतें तरी त्याचें मन एकान्त तपस्वी जीवनासाठीं एकसारखें तळमळत होतें, हे पत्नीपासून लपविणें त्याला शक्य झालें नाहीं. तो तिला म्हणाला, "मला यापुढें तुजजवळ राहणें शक्य नाहीं." डोळ्यांत आसवें आणून जरत्कारु म्हणाली, "आपला मुलगा माझ्या सर्व आप्तेष्टांचें रक्षण करणार आहे. म्हणून निदान पुत्रप्राप्तीपर्यंत तरी आपण माझा त्याग करूं नये." त्या वेळीं ती गरोदर होती. "तुला मुलगा होईल आणि तो अतिशय तेजस्वी, शूर व वेदशास्त्रपारंगत म्हणून कीर्ति मिळवील" असें त्यानें पत्नीस आश्वासन दिलें. जरत्कारु एवढा शीघ्रकोपी पण तोसुद्धां पत्नीनें अहोरात्र केलेल्या सेवेनें क्षणभर विरघळला त्यानें पत्नीस आशीर्वाद दिला व विरहाचें दुःख न करण्याबद्दल तिला परोपरीनें सांगून तो निघून गेला: यथावकाश जरत्कारूस मुलगा झाला. त्याचें नांव आस्तिक असें ठेवण्यांत आलें. नागजातीवर प्रेम करण्याची व वडिलांच्या पावलावर पाऊल टाकून विद्वान् व तपस्वी होण्याची शिकवण ती आपल्या मुलास नेहमीं देई.

**पतिव्रता** :–कौशिक नांवाचा एक वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण होता. आपल्या वृद्ध मातापित्यांस सोडून दूर अरण्यांत जाऊन कडक तपश्चर्येंत त्यानें बराच काळ घालविला. एके दिवशीं एका बगळयानें त्याचें अंग खराब केलें. त्यानें संतापून बगळ्याकडे पाहतांच बगळा जळून भस्म झाला. इतक्या तप-

थर्यनंतरहि आपल्याला आपला राग आवरतां आला नाहीं याबद्दल कौशिकास खेद वाटला.

पुढें तो भिक्षा मागत मागत एका खेड्यांत आला. एका घरापाशीं येऊन भिक्षा मागतांच त्या घरांतून एक स्त्री पुढें आली. ब्राह्मणाचें भिक्षापात्र स्वच्छ नाहीं हें पाहून तिनें तें मागून घेतलें व स्वच्छ करण्यास ती तें घरांत घेऊन गेली. एवढ्यांत तिचा पति दमूनभागून घरीं आला. भांडें घासण्याचें काम तसेंच ठेवून ती पतिसेवेंत मग्न झाली. पतीस पाय धुण्यास पाणी देऊन तिनें त्याच्या फराळाची तयारी केली. दाराशीं भिक्षेसाठीं ब्राह्मण उभा आहे हें ती पार विसरून गेली. पतीला वाढीत असतांना तिचें ब्राह्मणाकडे लक्ष गेलें. लगेच त्याचें भांडें स्वच्छ करून तें भरून तिनें त्याला आणून दिलें. पूर्वीचा पश्चात्ताप विसरून ब्राह्मण पुन्हां रागावला. तो तिला म्हणाला, " भिक्षा न वाढतांच मला तावडतोब जा असें तूं कां सांगितलें नाहींस ? " तिनें नम्रपणें उत्तर दिलें, " परमेश्वरासमान असलेला माझा पति दमून-भागून घरीं आल्यानंतर त्याची विचारपूस करणें हें माझें पहिलें कर्तव्य होतें. " परंतु क्रोधाविष्ट ब्राह्मणास तिचें म्हणणें पटलें नाहीं. तो पुन्हां म्हणाला, " हे सामान्य स्त्रिये, पतीपेक्षां तूं ब्राह्मणाला कमी लेखलेस ! इन्द्रसुद्धा ब्राह्मणाला लवून अभिवादन करतो हें तुला माहीत नाहीं का ? ब्राह्मण हा अग्नीसारखा आहे व मनांत आणलें तर तो सर्व सृष्टि जाळून भस्म करील हें तूं कधीं ऐकलें नाहींस का ? " ब्राह्मणाचें गर्वहरण करण्याच्या उद्देशानें ती स्त्री म्हणाली, " मी कांहीं बगळ्यासारखी जळून भस्म होणार नाहीं ! कितीहि रागानें आपण माझ्याकडे पाहिलें तरी त्याचा काय उपयोग? स्वप्याखुन्या विद्वान् ब्राह्मणाचें महत्त्व मलाहि समजतें. " एवढें बोलल्यानंतर तिची चूक तिला उमगली. दारीं भिक्षेस आलेल्या ब्राह्मणाचा अपमान करणें हा गृहिणीधर्म नाहीं हें तिच्या लक्षांत येतांच ती पुन्हां म्हणाली, " मला क्षमा करा महाराज. विद्वान् ब्राह्मणाचा दर्जा मी जाणतें. ब्राह्मणाचा राग जसा भयंकर तशीच त्याची क्षमाशीलताहि फार मोठी असते. आपला अपमान करावा म्हणून नव्हे पण पतीला मी परमेश्वराहूनहि अधिक पूज्य मानतें म्हणून आपल्याला भिक्षा वाटण्यास थोडा विलंब करून त्यांची सेवा मीं अगोदर केली. पतीच्या एकनिष्ठ सेवेमुळेंच अंतर्ज्ञानानें आपण बगळ्याचें

भस्म केलेलें मी जाणूं शकलें. असा पातिव्रत्याचा महिमा आहे !" कौशिकाला थोडा उपदेश करावा या उद्देशानें ती पुढें म्हणाली, "देवादिक ज्याला खऱ्या अर्थानें ब्राह्मण समजतात त्यानें विकारांवर जय मिळविलेला असतो, तो सत्यवचनी असतो व आपल्या गुरूला तो नेहमीं सुख देतो. अशा ब्राह्मणाची वैदिक वाङ्मयावर श्रद्धा असते. तो अंतर्बाह्य निर्मळ असतो. ज्यानें काम, क्रोध, लोभ आणि मोह जिंकले आहेत, जो अध्ययनशील आहे, जो धर्माचरणांत कधींहि कसूर करीत नाहीं आणि जो सर्व प्राणिमात्रांना समान लेखतो त्यालाच देव ब्राह्मण म्हणून ओळखतात. सत्यावर आधारलेला धर्म सनातन आहे. नुसतीं तत्त्वें जाणणें म्हणजे धर्म जाणणें नव्हे. हे ब्राह्मणा, तुला जर खऱ्याखुऱ्या अर्थानें धर्म समजावून घ्यावयाचा असेल तर मिथिलेला जा. षड्रिपूंवर जय मिळविलेल्या सत्यप्रिय व मातृ-पितृ-भक्त व्याधाला भेट. तो तुला खऱ्या धर्माचें स्वरूप समजावून सांगेल. माझ्या शुभेच्छा तुझ्या पाठीशीं आहेत."

पुन्हां तिच्या लक्षांत आलें कीं एका गृहिणीनें विद्वान् ब्राह्मणाला एवढ्या अधिकारवाणीनें उपदेश करणें बरें नव्हें. तिनें त्याची क्षमा मागितली व म्हणाली, "क्षमाशील ब्राह्मण स्त्रीहत्या करूं शकत नाहीं."

त्या पतिव्रतेचें हें भाषण ऐकून कौशिकाला आपल्या तारुण्यकाळाची आठवण आली. त्यानें आपल्या आईवडिलांची आबाळ केली होती. त्याबद्दल आतां त्याला फार पश्चात्ताप होत होता. मातेसमान असलेल्या त्या स्त्रीच्या उपदेशानें त्याचें मन निर्मळ झालें होतें. तो तिला कृतज्ञतापूर्वक म्हणाला, "तुझ्या रागांतून मला हितोपदेशच मिळाला. तो ध्यानांत ठेवून मी आपलें यापुढील जीवन सार्थकीं लावीन."

शकुन्तला :—हरिणाच्या वेगानें पाठलाग करणाऱ्या दुष्यन्ताला हुलकावणी देऊन बाणाच्या टप्प्यापलीकडे गेलेल्या हरिणामागे शोधीत राजा एका दाट अरण्यांत शिरला. अरण्याच्या मध्यभागीं त्याला एक आश्रम दिसला. ब्रह्मचर्याच्या कडक व्रताचें पालन करणाऱ्या सत्वस्थ व दयार्द्र अंतःकरणाच्या कण्वमुनींचें तें निवासस्थान होतें. आपला सर्व लवाजमा दूर ठेवून आणि राजचिन्हें काढून ठेवून दुष्यन्त एकटाच कण्वमुनींच्या दर्शनासाठीं गेला. आश्रमाच्या

आसपास कोणी दिसेना म्हणून त्यानें मोठ्यानें हांक मारली. त्योच आंतून तापसीच्या वेषांत असलेली एक सुंदर तरुणी बाहेर आली. राजाचें स्वागत करून आंत येण्याची तिनें त्यास विनंती केली. त्यानें आपली ओळख सांगून कण्वमुनींच्या दर्शनाची इच्छा प्रगट केली. "बाबा फळें आणण्यासाठीं गेले आहेत. येतीलच ते आतां" असें ती म्हणाली.

ऋषिकन्येच्या सौंदर्यानें राजा क्षणोक्षणीं अधिकच मोहित होत होता. संभाषणाच्या ओघांत त्यानें तिची बरीच हकीकत काढून घेतली. सुप्रसिद्ध ऋषि विश्वामित्रास स्वर्गीय नृत्यांगना मेनका हिजपासून झालेली ती कन्या कण्व-मुनींना पक्ष्यांच्या घोळक्यांत एकटीच टाकून दिलेली आढळली. "क्षणाचाहि विचार न करतां कण्वमुनींनीं मला घरीं आणलें व आजपर्यंत मोठ्या प्रेमानें मुली-सारखें माझें संगोपन केलें. शकुन्त पक्ष्यांनीं माझें रक्षण केलें म्हणून बाबा मला शकुन्तला असें म्हणतात." असाहि तिनें खुलासा केला. जन्मदात्या कन्येहून अधिक प्रेमानें शकुन्तला आपल्या या पित्याची सेवा करीत असे. त्या आश्रमांतील प्रत्येक वस्तु तिच्या प्रेमाची व कण्वाच्या वात्सल्याची साक्ष देत होती. "हे भाग्यवान् स्त्रिये, तुझा जन्म राजघराण्यांत झाला आहे. माझी अर्धांगी झालीस तर स्वतःपेक्षां तुझ्यावर अधिक प्रेम करून मी धन्य होईन." अशा तऱ्हेनें राजानें आपलें मनोगत व्यक्त केलें. शकुन्तला विनयानें म्हणाली, "महाराज, जरा थांबा. माझे बाबा येऊं देत. ते माझा व आपला विधियुक्त विवाह घडवून आणतील." पण अनुभवी व मध्यमवयीन असूनहि प्रेमातुर राजा अधीर झाला होता. कण्व येईपर्यंत थांबण्यापेक्षां गांधर्व पद्धतीनें त्यांनीं एकमेकांचा पति-पत्नी म्हणून स्वीकार करावा असें त्यानें सुचविलें. वयांत आलेली असल्यामुळें तिचा स्वतःचा विवाह करण्यास कायद्यानें ती स्वतंत्र आहे हाहि मुद्दा त्यानें तिजपुढें मांडला.

शकुन्तलाहि मोहवश झालेली होती. तिनें उत्तर दिलें, "कायद्यानें जर मी माझी मुखत्यार असेन तर मी आपली पत्नी होण्यास तयार आहे. पण विवाहापूर्वी मला आपल्याकडून एक अभिवचन मिळालें पाहिजे. माझा पुत्र गादीचा वारस ठरून आपल्या मागें त्याला राज्य मिळालें पाहिजे." राजानें ही अट तावडतोब मान्य केली आणि तीं दोघें गांधर्व पद्धतीनें

विवाहबद्ध झालीं. कण्व येईपर्यंत राजा थांबला नाहीं, पण "राज्ीच्या मानमरातबानें मी लवकरच तुला नेण्याची व्यवस्था करतों" असें शकुन्तलेला आश्वासन देऊन तो निघून गेला.

थोड्या वेळानें कण्वमुनि परत आले. नेहमींच्या रिवाजानुसार शकुन्तलेनें धांवत जाऊन त्यांना त्या दिवशीं आलिंगन दिलें नाहीं. तपोबलानें कण्वांनीं सर्व जाणलें होतें. शकुन्तलेला प्रेमानें हांक मारून त्यांनीं सांगितलें, "राजघराण्यांतील वयांत आलेल्या तरुणीनें गांधर्व पद्धतीनें विवाह करणें धर्मास मान्य आहे. वर आणि वधू यांची अनुमति असल्यास क्षत्रियांच्या मंत्रविरहित विवाहास धर्माची आडकाठी नाहीं. माझ्या गैरहजेरींत घडलेल्या सर्व गोष्टी मला समजलेल्या आहेत." एवढें म्हटल्यावर शकुन्तला पुढें आली. पित्याच्या हातांतून फळांची करंडी घेऊन तिनें त्याचे पाय धुतले व विश्रांति घेण्यासाठीं त्यास आसन दिलें. ती म्हणाली, "बाबा, दुष्यन्ताला मीं वरलें आहे. त्याच्यावर व त्याच्या मंत्र्यांवर आपली कृपादृष्टि असावी." कण्वानें उत्तरादाखल म्हटलें, "मुली, तुझ्या निवडीवर मीं खूप आहें. तुला हवा तो वर मागून घे." पतिनिष्ठ शकुन्तलेनें स्वतःसाठीं नव्हे पण राजासाठीं वर मागितला. "बाबा, पौरवकुलाचें राज्यवैभव अखंड रहावें व या घराण्यांतील सर्व राजे सत्प्रवृत्त निघावत असा मला वर द्या."

यथाकाल शकुन्तलेनें एका तेजस्वी पुत्रास जन्म दिला. दुष्यन्त जाऊन सहा वर्षें पुरीं झालीं तरी कबूल केल्याप्रमाणे तिला नेण्यास राजाकडून कोणीहि आलें नाहीं. पण पतीबद्दल एकहि शंका त्या साध्वीच्या मनांत डोकावली नाहीं.

पुत्राचें नांव शकुन्तलेनें सर्वदमन असें ठेवलें. नावाप्रमाणें तो अतिशय शूर व धाडसी होता. एवढ्या लहान वयांत हिंस्र पशूंनाहि तो नमवी. कण्वांना त्याच्या असामान्य गुणांची कल्पना येताच त्यांनीं त्याला पद्धतशीर शिक्षण देण्यास सुरुवात केली.

कांहीं वर्षांनीं राजपुत्र गादीवर बसण्याची वेळ आली आहे हें जाणून शकुन्तलेची पाठवणी करण्याचा कण्वानें बेत केला. कांहीं शिष्य सोबतीस देऊन त्यांनीं तिच्या प्रयाणाची तयारी केली. "विवाहित स्त्रिया फार काळ माहेरीं राहिल्यास त्यांच्या चारित्र्याबद्दल लोक साशंक होतात. तेव्हां तुला

आतां पतिगृहीं गेलेंच पाहिजे " ही पित्याची सूचना शिरोधार्य मानून शकुन्तला निघाली. पित्याचा आश्रय सोडतांना होणारें दुःख व पतिमीलनाच्या कल्पनेनें होणारा आनंद अशा मिश्र भावनांनीं तिचें हृदय भरून आलें होतें.

शकुन्तलेस राजदरबारापर्यंत सोडून शिष्य परत फिरले. राजासमोर जाऊन शकुन्तला नम्रपणें म्हणाली, " महाराज, हा आपला पुत्र. शौर्यांत स्वर्गस्थ देवांनाहि तो भारी आहे. कण्वांच्या आश्रमांत विवाहापूर्वी मला दिलेलें वचन पूर्ण करा. आपला हा पुत्र राज्याचा वारस असल्याचें जाहीर करा आणि माझा अंगीकार करा. "

कोणतें भीषण संकट आपल्यासाठीं उभें टाकलें आहे याची त्या क्षणापर्यंत शकुन्तलेला कल्पना नव्हती. शकुन्तलेच्या व राजाच्या प्रेमसंबंधाची प्रजेला कांहींच कल्पना नव्हती. या प्रकरणानें भर दरबारांत आपली बेअब्रू होईल अशा हीन जाणिवेनें सर्व गोष्टी आठवत असूनहि राजा तिला म्हणाला, " तापसी वेषांतील हे दुष्ट स्त्रिये, तुझ्याशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध ठेवल्याचें मला स्मरत नाहीं. तुला हवें तर माझ्या आश्रयास राहा अगर मन मानेल तिकडे निघून जा. " राजाच्या या शब्दांनीं शकुन्तलेस विलक्षण धक्का बसला. संतापानें तिचें सर्वांग कांपूं लागलें. ती दगडासारखी तटस्थ झाली. पण थोड्याच वेळात तिनें स्वतःला सांवरलें आणि ती राजास उत्तरादाखल म्हणाली, " आपण मला ओळखलें असूनहि हीनकुलीन माणसाप्रमाणें असत्य भाषण करतां आहां. स्वतःच्या दर्जाला शोभेल असें वागा आणि वस्तुस्थिति सांगा. पाप करणाऱ्याला वाटतें कीं तो तें लपवूं शकतो. पण देवांपासून विशेषतः हृदयस्थ ईश्वरापासून कांहींच लपवितां येत नाहीं. मी आपली एकनिष्ठ पत्नी आहें. आपण होऊन आलें म्हणून माझा अपमान करूं नका. आदरानें वागवावें अशी माझी योग्यता असून आपण माझा अनादर करीत आहां. खरें पाहतां पति पत्नीच्या शरीरांत प्रवेश करून पुत्ररूपानें पुन्हां जन्म घेतो. म्हणून पत्नीला ' जाया ' अशी संज्ञा दिलेली आहे. गृहकृत्यांत दक्ष असलेली, पतीसाठीं त्याच्या मुलांना जन्म देणारी व पतीशीं निष्ठेनें वागणारीच खरी पत्नी असते. पत्नी ही पतीची अर्धांगी, हितचिंतक

आणि मोक्षदात्री असते. धर्माचरणाच्यावेळीं ती पित्याची भूमिका घेते तर पतीच्या आज्ञारांत ती त्याची माता बनते. पतीच पुत्ररूपानें तिच्या पोटीं येत असल्यानें पत्नीला मातेसमान लेखणें हें त्याचें कर्तव्य आहे. पुत्र पूर्वजांचें नरकापासून ( पुत् ) रक्षण करतो म्हणून त्याला ब्रह्मदेवानें ' पुत्र ' अशी संज्ञा दिलेली आहे. असें असतांना हे राजा, तुझ्याकडे मोठ्या आशेनें पघणाऱ्या या पुत्राचा तूं धिक्कार करतोस ! जरा लक्ष लावून पाहा म्हणजे शुभ्र जलाशयांतील प्रतिबिंबाप्रमाणें तुला याच्या डोळ्यांत आपलें स्वतःचेंच प्रतिबिंब दिसेल. महाराज, आपण माझा त्याग केला तर मी पुन्हां अरण्यांत निघून जाईन. पण आपल्या पुत्राचा तरी त्याग करूं नका. "

शकुन्तलेच्या निष्ठेनें आणि स्वाभिमानानें भारतीय स्त्रीहृदयाची कायमची पकड घेतली आहे. दुष्यन्ताच्या पाषाणहृदयावर मात्र तिच्या बोलण्याचा कांहींहि परिणाम झाला नाहीं. राजा बेदरकारपणें म्हणाला, " या पुत्राचा मी पिता आहें व तूं त्याची माता आहेस ही सर्व कपोलकल्पित कथा वाटते. स्त्रिया अशा कथा सांगण्यांत प्राचीन कालापासून प्रसिद्ध आहेत. त्यांच्यावर कोणता पुरुष विश्वास ठेवील ? तुझ्या निर्दय आईनें तुला पऱ्यांच्या घोळक्यांत टाकून दिलें आणि तुझा बाप विश्वामित्र तर तुझ्या जन्माची जबाबदारीहि मान्य करावयास तयार नाहीं. अशांची कन्या म्हणविण्यास तुला शरम वाटावयास हवी. मी तुला मुळींच ओळखीत नाहीं. तूं येथून ताबडतोब चालती हो. "

स्वतःचा क्रोध आवरून शकुन्तलेनें पुन्हां उत्तर दिलें, " राजा, इतरांचे मोहरीएवढे दोष काढणारा तूं स्वतःचा बेलफळाएवढा दोष मात्र झाकूं पाहतोस ! काहीं म्हटलेस तरी मेनका स्वर्गस्थ देवांच्या कुळांतील आहे आणि तेथील स्त्रियात तिला अग्रस्थान आहे. तूं मात्र पृथ्वीवरील एक सामान्य मानव आहेस. तूं जमिनीवरून चालतोस तर मी आकाशातून भ्रमण करूं शकतें. माझी जातकुळी तुझ्यापेक्षां कितीतरी श्रेष्ठ आहे. पर्वत व मोहरी यात जेवढा फरक असेल तेवढाच फरक आपल्या दोघांत आहे. सत्यापासून भ्रष्ट झालेल्या निरीश्वरवाद्यास विषारी सर्पाचीच उपमा शोभेल. माझ्यासारख्या विश्वासघात झालेल्या साध्वीनें आपला राग कोणत्या अधिक शब्दांत व्यक्त

करावा? स्वतःच्या औरस पुत्राचें स्वामित्व जो नाकारतो त्याचा सर्वनाश होतो. शंभर अश्वमेध यज्ञांची तुलना एका सत्याशीं केल्यास सत्याचें पारडें अधिक जड ठरतें. सत्य परमेश्वरस्वरूप आहे. म्हणून सांगतें, राजा, अजूनहि सत्याला जाग आणि या पुत्राचा स्वीकार कर. पण पापाचा तुझ्या मनावर पूर्ण पगडा बसला असेल तर मी तुझा सहवास टाळणेंच इष्ट ठरेल. मी जातें. पण लक्षांत ठेव, तुझ्यामागें माझा हा पुत्रच त्रिखंड पृथ्वीचें राज्य करील." इतकें बोलून अपमानाचें विव्हल झालेल्या शकुन्तलेनें राजसभा सोडली. सर्व सभा चित्रासारखी तटस्थ होती. राजाला जाब विचारण्याचें कोणालाच धाडस होईना. राजाहि दगडासारखा तटस्थ होऊन शून्य मनानें बसला होता. त्याची जणुं सर्व शुद्धबुद्ध हारपली होती. कांहीं क्षण असेंच गेल्यावर एक गंभीर आकाशवाणी सर्वांचे कानीं आली, "राजा, पुत्राचा अव्हेर करूं नकोस. शकुन्तला सत्यवचनी आहे. तिचा अपमान करूं नकोस. आमच्या विनंतीवरून स्वीकार केलेला तुझा पुत्र 'भरत' या नांवानें पृथ्वीवर ओळखला जाईल." दुष्यन्तानें सर्व प्रजाजनांना उद्देशून म्हटलें, "या आकाशवाणीवरून आपणा सर्वांची माझ्या गांधर्व विवाहाबद्दल व माझ्या या औरस पुत्राबद्दल खात्री पटली असेल. पण मी जर प्रथमच हें सत्य सांगितलें असतें तर आपला माझ्यावर कदाचित् विश्वास बसला नसता व माझ्या पुत्रावर अन्याय झाला असता." एवढें बोलून राजानें मोठ्या सन्मानानें शकुन्तलेस व पुत्रास परत बोलाविलें. सर्व पुरोहितांनीं त्यांना आशीर्वाद दिले. दुष्यन्त शकुन्तलेस म्हणाला, "हे देवते, आपल्या विवाहास एकहि साक्षीदार नव्हता यामुळें माझ्या प्रजाजनांनीं कदाचित् माझ्याबद्दल साशंकता व्यक्त केली असती. आपल्या पापांतून या पुत्राचा जन्म झाला आहे अशा कल्पनेनें राज्याचा वारस म्हणून प्रजेनें त्याला मान्यता दिली नसती. तुझ्या कठोर भाषणाची मी तुला केव्हांच क्षमा केली आहे.

स्वाभिमानी असूनहि शकुन्तला पतिनिष्ठ होती. झालें गेलें सर्व विसरून तिनें राजाचा स्वीकार केला आणि त्याला क्षमा केली.

लोपामुद्रा :– भगवान् अगस्त्यांनीं ब्रह्मचर्याची व त्यागी जीवन जगण्याची शपथ घेतली होती. परंतु आपले सर्व पूर्वज एका ल्हानशा छिद्रांत

खालीं डोकीं करून लोंबकाळतांना त्यांनीं एकदां पाहिले. ते सर्व नरकांत पडण्याच्या बेतांत होते. करुण वाणीनें त्यांनीं अगस्त्य ऋषीस विनंती केली, " कृपा करून आपली ब्रह्मचर्याची शपथ मोड आणि पुत्राकरवीं आम्हांस स्वर्ग मिळण्याची व्यवस्था कर." अगस्त्यानें हें मान्य केलें. परंतु त्याच्या तपस्वी जीवनास साजेशी स्त्री त्यास आढळली नाहीं. म्हणून त्यानें स्वतःच्या तपोबलानें एक अप्रतिम सौंदर्यवती कन्या निर्माण करून ती विदर्भ देशाच्या राजाला अर्पण केली. संतानहीन राजाराणीस अतिशय आनंद झाला. त्यांनीं ब्राह्मणांस आशीर्वादास बोलावून मोठ्या समारंभानें मुलीचें नांव ' लोपामुद्रा ' असें ठेवलें.

वयोमानानें लोपामुद्रेचें सौंदर्य आणि बुद्धिमत्ता चंद्रकलेप्रमाणें वाढत होती. वडिलांनीं तिला राजघराण्यास शोभेसें सर्व शिक्षण दिलें. पण तत्कालीन एकहि राजपुत्र तिला वरण्यास पुढें येईना. कारण अगस्त्यानें स्वतःसाठींच तिला निर्माण केली होती हें सर्वश्रुत होतें. राजानें तिच्यासाठीं खास शंभर दासींची नेमणूक केली असूनहि ती स्वतः मातापित्यांची सेवा करी, परिवारांतील वृद्ध व आजारी मंडळींची सेवा करी आणि सर्वांशीं अतिशय प्रेमळपणानें वागे.

लोपामुद्रा उपवर झाल्यावर तिचा पिता तिजसाठीं योग्य वर शोधण्याच्या मार्गास लागला. एके दिवशीं अगस्त्यमुनि आले व त्यानीं तिला मागणी घातली.

अगस्त्यांचा विचार ऐकून राजाराणीस धक्काच बसला. " हा दरिद्री ऋषि आपल्या कन्येस कसा सुखांत ठेवणार ? " हा प्रश्न त्यांच्या डोळ्यांसमोर उभा राहिला. पण नकार दिल्यास अगस्त्य मुनींच्या शापानें आपल्या कन्येचें जीवन बरबाद होईल ही त्यांना भीति होती. लोपामुद्रेला जेव्हां ही हकीकत समजली तेव्हां तिनें आईवडिलांची समजूत घातली व अगस्त्यांशीं विवाह करण्यास अनुमति दिली. मातेच्या करुण चेहऱ्याकडे पाहून तिच्या गळ्यांत हात टाकून लोपामुद्रा म्हणाली, " आई, अगस्त्य ऋषि म्हातारे असले तरी बाबांच्या सहवासांत तूं जितकी सुखी आहेस

तितकीच मी त्यांच्या सहवासांत सुखी राहीन. तूं माझी मुळींच काळजी करूं नकोस. ”

मुलीची वृत्ति पाहून राजाराणीनें आपला शोक आवरला आणि तिच्या विवाहाची तयारी केली. विवाहविधि आटोपल्यावरोबर अगस्त्यऋषींनीं लोपामुद्रेस सांगितलें, “ आतां यापुढें तुला माझ्या चंद्रमौळी झोंपडींत संसार करावयाचा आहे. तेव्हां सर्व उंची कपडे व मूल्यवान् अलंकार काढून टाकून नवीन जीवनाला योग्य असा वेष परिधान कर. ” लगेच लोपामुद्रा आपल्या महालांत गेली व कोणाच्याहि विरोधास न जुमानतां तिनें वल्कलें व हरिणाजिन परिधान केलें. या नव्या वेषांत ती अधिकच मोहक दिसत होती. आपल्या प्रेमळ मातापित्यांचा व इष्टमित्रांचा निरोप घेऊन पतीवरोबर जाण्यास ती सिद्ध झाली.

एकहि मूल्यवान् वस्तु तिनें आपल्यावरोबर घेतली नाहीं. परंतु वृद्ध मातापित्यांना आपल्या सेवेची जास्तींत जास्त गरज भासेल तेव्हां आपण त्यांच्याजवळ असणार नाहीं या कल्पनेनें मात्र तिच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. पतीकडेहि तिचें हृदय कसें ओढ घेत होतें याची जाणीव तिला झाली होती. यामुळें तिच्या अश्रूंत विरह व पतिभक्ति यांचें मीलन झालें होतें.

लोपामुद्रेचें वैवाहिक जीवन आदर्श होतें. पतीच्या आधीं उठून ती सर्व गृहकृत्यें स्वतः उरकी. नंतर स्नान करून पति उठण्याची प्रतीक्षा करीत वसे. दोघेहि रोज अग्नीसमोर बसून तासनतास तत्त्वचिंतनांत मग्न होत. लोपामुद्रेस अगस्त्यापत्नीकडे स्वतंत्र अस्तित्वच जणूं उरलें नव्हतें.

काहीं कालानें अगस्त्यांना आपल्या पूर्वजाच्या शब्दाची आठवण झाली आणि त्यांनीं पुत्रप्राप्तीचा विषय पत्नीजवळ काढला. लोपामुद्रा मोठी चाणाक्ष होती. तिनें उत्तर दिलें, “ आपली इच्छा मला शिरोधार्य आहे. पण ज्या तपस्वी वेषात आपण उभयतांनीं विरक्त वृत्तीनें आजपर्यंत तत्त्वचिंतन केलें तो वेष या ऐहिक जीवनात प्रवेश करण्यास मुळींच योग्य नाहीं. माझ्या लग्नापूर्वी मी ज्या थाटात रहात असे तें ऐश्वर्य आपण आपल्या तपःसामर्थ्यानें निर्माण करा व मग आपली पुत्रप्राप्तीची इच्छा पूर्ण करा. ” तिचें हें भाषण ऐकून अगस्त्य आश्चर्यचकित व थोडेसे हताशहि झाले. आपलें तपोवळ ऐहिक वैभव

निर्माण करण्यांत खर्च करण्याची त्यांची इच्छा नव्हती. कोणी राजा निरपेक्ष वृत्तीनें आपली गरज भागवील का हें जाणण्यासाठीं त्यांनीं तीन राजांकडे विचारणा केली. पण प्रत्येकाचा जमाखर्च सारखाच होता. शेवटीं दैत्यांचा राजा इल्वल यानें अगस्त्यांना जरूर तेवढें द्रव्य दिलें. लोपामुद्रेच्या इच्छेनुसार तिला हवी असलेलीं सर्व सुखसाधनें जमा करून त्या उभयतांनीं पुत्रप्राप्तीची इच्छा पूर्ण केली. या वेळीं अगस्त्यानें लोपामुद्रेस एक सूचक प्रश्न विचारला, " तुला एकच तेजस्वी पुत्र हवा कीं दहांच्या बरोबरीचा एक असे शंभर पुत्र हवेत ? " तिनें या प्रश्नांतील खोंच जाणली आणि लगेच उत्तर दिलें, " एक हजार मूर्ख पुत्रांपेक्षां एकच असामान्य तेजस्वी पुत्र मला अधिक आवडेल. " लोपामुद्रेचा हा पुत्र म्हणजेच सुप्रसिद्ध कवि दृढस्यु.

सुलभा :– मिथिलेचा राजा धर्मध्वज जनक हा एक थोर योगी व सिद्ध पुरुष होता. त्यानें जरी राज्याचा आणि प्रपंचाचा त्याग केलेला नव्हता तरी त्याची वृत्ति पूर्णपणें विरक्त होती. याच काळांत प्रधान नामक राजाची कन्या सुलभा हीहि एक विरक्त ब्रह्मवादिनी म्हणून सर्वतोमुखीं झालेली होती. अध्यात्मशास्त्रांत तिच्याइतका पूर्णत्वास पोंचलेला पुरुष न आढळल्यानें ती अविवाहित राहिली होती. योगपद्धतीनें ध्यान व धारणा करून एकतत्त्वाशीं एकरूप होण्याचें सामर्थ्य तिनें प्राप्त करून घेतलें होतें. तीर्थयात्रेच्या निमित्तानें ती ज्या ज्या ठिकाणीं गेली तेथें तेथें तिनें धर्मध्वज जनकाची सिद्ध पुरुष म्हणून फार ख्याति ऐकली होती. त्याच्या पूर्णत्वाची चांचणी घेण्यासाठीं व योगबलानें त्यानें अधिक सामर्थ्य मिळविलें असल्यास तें पाहण्यासाठीं सुलभेनें जनकाची भेट घेण्याचें ठरविलें. एका सुंदर तरुण भिकारणीचें रूप घेऊन ती जनकाच्या दरबारांत आली. योगप्रक्रियेनें जनकाची व आपली बुद्धिमत्ता एकत्र आणून व त्याच्या दृष्टींत आपली दृष्टि मिसळून सुलभा राजाचें निरीक्षण करूं लागली.

साक्षात्कारी त्या दोघांचे देह स्थिर दिसत होते. पण आत्मा आत्म्यास भेटून त्यांचा सुखसंवाद सुरू झाला होता. राजानें सुलभेस विचारलें, " हे तपस्विनी, तूं कोठून आलीस आणि कोठें जाणार ? तुझ्या जीवनाचा आदर्श कोणता ? मी जरी राज्याची धुरा वहात असलों तरी मला कोणत्याहि

ऐहिक वस्तूची अभिलाषा नाहीं. तुला जाणण्याची व तुझें जीवन समजावून घेण्याची मला अतिशय उत्सुकता आहे."

राजानें स्वतःची माहिती देतांना आपली गुरुपरंपरा तिला सांगितली. पराशराशीं जोडल्या गेलेल्या शिष्यपरंपरेपैकीं पंचशिखाचा जनक हा शिष्य होता. आपल्या गुरुजवळ त्यानें सांख्य व योग या दोन दर्शनांचा सखोल अभ्यास केला होता आणि गुरुच्या आज्ञेनुसार त्यानें राजधर्माचें पालन केलें होतें. प्रजेच्या हिताचीं सर्व कार्यें पार पाडीत असूनहि तो ब्रह्मचिंतनांत मग्न राही. आपली भूमिका स्पष्ट करतांना जनक म्हणाला, "त्यागांतूनच मानवाला शेवटीं मुक्ति प्राप्त होते. तत्त्वज्ञानाच्या प्राप्तीसाठीं योगपद्धतीनुसार केलेली साधना अतिशय उपयुक्त ठरते. या साधनेनें आत्मस्वरूपाचा आविष्कार होतो. शरीर म्हणजे आत्मा नव्हे हें जाणणें म्हणजेच आत्मज्ञान मिळविणें. शरीरधारी असून मी पूर्ण विरक्त आणि मुक्त अवस्थेंत आहे. पत्नीविषयीं मला लोभ वाटत नाहीं. शत्रूचा मी तिरस्कार करीत नाहीं. माझ्या उजव्या हाताला चंद्रनावलेप करणाऱ्याबद्दल मला जितका आदर वाटेल तितकाच आदर माझा डावा हात छाटून टाकणाऱ्याबद्दल मी बाळगीन. प्रेम व द्वेष या दोहोंपासून मी अलिप्त आहें. कारण या दोन्ही भावनांच्या आहारीं जाणें कसें निष्फळ ठरतें हें मी जाणतों.

माझ्या गुरुनें मला असें सांगितलें आहे कीं प्रपंचांत राहून यमनियमांचें जो पालन करतो तो साधु होतो. याच्या उलट साधु असून जो मनोदुर्बलता दाखवितो तो प्रापंचिक समजावा. भगवीं वस्त्रें, मुंडण, हातांत घेतलेला त्रिदंड व कमंडलु हीं बाह्य चिन्हें मुक्तावस्था निर्माण करीत नाहींत. दारिद्र्यात किंवा दास्यात मुक्ति नाहीं. श्रीमंत असो अगर गरीब असो, ज्याला आत्मज्ञान झालें तोच मुक्तपदाला पोंचला." इतकें सांगून जनकानें पुन्हां सुलभेस विचारलें, "हे स्त्रिये, तुझ्या योगसामर्थ्यानें तूं माझ्या शरीरांत प्रवेश केलास पण तुझ्या संन्यासिनीच्या वेषाला असा परपुरुषकायाप्रवेश योग्य नव्हे. तूं तर त्यागी आणि विरक्त दिसतेस. तूं ब्राह्मण तर मी क्षत्रिय ! तेव्हां कोणत्याच पातळीवर तुझें व माझें मीलन शक्य दिसत नाहीं." सुलभेला आपल्या योगबलाचा गर्व झाला आहे हें लक्षांत घेऊन जनकानें तिचा निषेध

केला. तीव्र नाराजीच्या स्वरांत तो तिला म्हणाला, " माझ्या आध्यात्मिक तपस्येचा हेवा वाटून तूं माझ्याकडे आलीस आणि सूक्ष्मरूपानें माझ्या बुद्धींत प्रवेश केलास. माझी परीक्षा करण्याचा तुझा उद्देश स्पष्ट झाला आहे. आतां तरी माझ्यापासून कांहीं लपवून न ठेवतां तुझे घराणें, तुझी तपस्या व तुझी आध्यात्मिक पातळी यासंबंधीं तूं सत्यकथन कर. "

जनकाच्या या कठोर भाषणानें सुलभा मुळींच गोंधळली नाहीं. तिनें राजाला दिलेल्या सविस्तर उत्तरांतून तिचा आध्यामिक अधिकार व विद्वत्ता प्रतीत होते. सुलभा म्हणाली, " राजा, कोणतेंहि भाषण अठरा दोषांपासून मुक्त व अठरा गुणांनीं युक्त असावें. मी जें बोलेन तें सुसंबद्ध, मुद्देसूद, प्रिय, स्पष्ट, सत्य व शिष्टाचारपूर्ण असेल. मी माझ्या ओघवती वाणीनें जें सांगेन तें तुला उपयुक्त ठरेल. माझ्या शब्दांत राग, भीति, लोभ, अगतिकता, लज्जा, सहानुभाव अगर गर्व यांपैकीं कोणतीच भावना असणार नाहीं.

मी कोण याचें उत्तर प्रथम ऐक. लाख व लांकूड अगर धूलिकण व पाण्याचे थेंब हे जसे एकमेकांत मिसळलेले असतात तसेच पृथ्वीवरील प्राणीहि. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे वेगवेगळे असूनहि लाख किंवा लांकूड यांच्यासारख्या वस्तूंत तीं सर्व एकत्रच वास करतात. या वस्तु निर्जीव असल्यामुळें डोळा स्वतःस पाहूं शकत नाहीं, कान ऐकण्याचें कार्य करूं शकत नाहीं. हीं इन्द्रियें एकमेकांनाहि जाणीत नाहींत.

प्रत्येक देहांत तीस तत्त्वें आहेत. काहींच्या मतें या सर्वांना निर्माण करणारी प्रकृति अव्यक्त आहे तर काहींच्या मतें दृश्य अणु हे हीं तीस तत्त्वें निर्माण करतात. खरें पाहता या तीस तत्त्वांच्या रूपानें व्यक्त होणारी प्रकृतीच सर्व निर्मितीच्या बुडाशीं आहे. म्हणून हे राजा, तूं, मी आणि इतर प्राण्यांची उत्पत्ति प्रकृतीपासून झालेली आहे. "

शरीराच्या घटकांत प्रत्येक क्षणाला फरक होत असतो. पण हे बदल अतिशय सूक्ष्म असल्यानें दिसून येत नाहींत. प्रत्येक क्षणीं जुन्या घटकांचा नाश होऊन त्या जागीं नवीन घटक येत असतात. पण अखंड तेवत असलेल्या दीपज्योतीप्रमाणें सजीव शरीरांतील घटकांचा नाशहि

समजून येत नाहीं. अशा रीतीनें जें शरीर वास्तविक प्रत्येक क्षणाला बदलत आहे त्या शरीराचें नांवगांव मी तुला कसें सांगणार ?

तुझ्या बुद्धीच्या साहाय्यानें ज्याप्रमाणें तूं तुला स्वतःला पहातोस त्याप्रमाणें इतरांच्या शरीरांतहि तूं स्वतःला कां पाहूं शकत नाहींस ? मुक्त होण्याची लायकी तुला अजून आलेली नाहीं असें मला वाटतें. कारण अजूनहि तुला झोंप, खाणें, वस्त्रप्रावरणें या सर्वांचा लोभ सुटलेला नाहीं.

माझ्या योगबलानें मी जरी तुझ्या शरीरांत कांहीं काल प्रवेश केला तरी शारीरिक मीलनाचा येथें कांहींएक संबंध नाहीं. जर तूं खरोखर मुक्त झाला असशील तर माझ्या बुद्धीनें तुझ्या शरीरांत प्रवेश करण्यांत तुला गैर कां वाटावें ? माझ्या शरीराचासुद्धां माझ्या आत्म्याशीं संबंध नाहीं अशी वस्तुस्थिति असतांना, माझा तुझ्या शरीराशीं संबंध येण्याची शक्यताच कोठें आहे ? मुक्तावस्थेच्या जवळसुद्धां तूं अजून पोंचलेला नाहींस. नाहींतर आत्मा एकच आहे हें ज्याला उमगलें तो शारीरिक पातळीवर मीलन होण्याच्या कल्पनेनें कसा घाबरेल ?

माझी प्रौढी मिरविण्यासाठीं मी हें सर्व सांगत नाहीं. तुझा अपमान करावा अशीहि माझी इच्छा नाहीं पण मला प्रामाणिकपणें असें वाटतें कीं, जो बुद्धीच्या पलीकडे जाऊन ब्रह्मरूप जीवन जगतो तोच मुक्त या संज्ञेस पात्र ठरतो. पांथस्थ ज्याप्रमाणें एखाद्या रिकाम्या घरांत रात्रभर मुक्काम करतो व सकाळीं उठून निघून जातो त्याप्रमाणें मी सूक्ष्मतत्त्वरूपानें आज रात्रीं तुझ्या देहात वास करून उद्या सकाळीं निघून जाईन. तुझी भेट व तुझ्याशीं झालेल्या संभाषणानें मला समाधान वाटलें."

तत्त्वज्ञ जनकानें सुलभेचा आध्यात्मिक अधिकार ओळखला व तो स्तब्ध राहिला.

विदुला :– विदुला राणी म्हणजे तेजस्वी क्षत्रिय वृत्तीचें मूर्तिमंत प्रतीक. पराभव मान्य न करतां मरेपर्यंत लढत राहणें हाच तिच्या मतें खऱ्या क्षत्रियांचा धर्म. विदुला नांवाची स्त्री खरोखर होऊन गेली कीं महाभारतकारांनीं तिला कथेसाठीं निर्माण केली हें तपासून पाहण्यास मार्ग नाहीं. पण

काल्पनिक विदुलेनेंहि भारतीय संस्कृतींत मानाचें स्थान पटकावून आमच्या शूर स्त्रियांना अखंड स्फूर्ति दिली आहे हें निश्चित. ती माता असली तरी सामान्य मातेप्रमाणें तिचें मातृप्रेम आंधळें नव्हतें. ती वीरमाता होती आणि आपल्या वीरपुत्रानें सर्व भारतावर राज्य करावें ही तिची दुर्दम्य आकांक्षा होती. विदुलेचा पुत्र संजय याचा सिंधु देशाच्या राजानें पराभव केल्यामुळें तो फार कष्टी झाला आणि राजवाड्यांत परत येऊन एखाद्या मुला-सारखा रडूं लागला. हें पाहून विदुलेस सहानुभूति तर वाटली नाहींच पण आपल्या भ्याड मुलाचा तिला मनस्वी संताप आला. तीव्र शब्दांत त्याचा निषेध करून ती म्हणाली, " आपल्या भीरु वृत्तीनें शत्रूला आनंद देणाऱ्या नालायक मुला, तूं माझा व तुझ्या शूर पित्याचा मुलगाच नव्हेस. अल्प-संतुष्ट न राहतां स्वतःच्या नांवाला शोभेल अशी महत्त्वाकांक्षा बाळग. ऊठ, खालीं मान घालून पराभव मान्य करूं नकोस. शत्रूला आनंदोत्सव करण्याची व इष्टमित्रांना दुःख करण्याची वेळ आणूं नकोस. एखाद्या भ्याड कुत्र्याचें मरण पत्करण्यापेक्षां सर्पाचा विषमणि काढतांना आलेलें धाडसी मरण शतपटीनें अधिक बरें. जा, जिवाचा धोका पत्करूनहि युद्ध कर. दीर्घकाळ धुमसत राहण्यापेक्षां क्षणभर पेटून भस्म होणें चांगलें. या राजघराण्यांत जन्माला आला आहेस, शौर्य दाखव किंवा मृत्यु पत्कर. जर तुझ्या हातून ऱ्या राजधर्माचें पालन होत नसेल तर तूं जगून तरी काय उपयोग ? "

एवढ्या वाक्ताडनानेंहि संजयाचा अभिमान जागृत झाला नाहीं. उलट तो आईला म्हणाला, " आई, मी मेलों तर तुला हें वैभव, राज्य, कशांत तरी सुख वाटेल काय ? " पण विदुला कच्च्या दिलाची नव्हती. उलट एखाद्या हुशार वैद्याप्रमाणें युक्तिप्रयुक्तीनें तिला मुलाच्या मनांतील भीति काढायची होती. तिनें पुन्हा युक्तिवाद केला, " संजया, फळांनीं लदलेल्या झाडाकडे पक्षी धांव घेतात. त्याच्यावर अनेक माणसें भरण-पोषणासाठीं अवलंबून असतात त्याचें जीवन जगण्यालायक ठरतें. देवांचा ऐषआराम इन्द्राच्या शौर्यावर चालतो. तसेंच राजाच्या शौर्याच्या आधारावर सामान्य लोकांना सुखी आणि समृद्ध जीवन जगतां आलें पाहिजे. स्वतःच्या बाहु-बलानें या जगांत मानमान्यता मिळविणाऱ्यास स्वर्गांत सहज प्रवेश मिळतो. विजयी होतो तो संजय ! पण तुझ्यांत तर मला हा गुण मुळींच दिसत

नाहीं. ल्हानपणीं तुला पाहून एका ब्राह्मणानें असें भाकीत केलें होतें कीं कांहीं काळ तुला अपयशाचा तडाखा सोसावा लागेल, पण शेवट गोड होईल. अखेर तुझा विजय होईल. तूं आपल्या खऱ्या क्षत्रियाचा बाणा दाखवीपर्यंत मी तुला असेंच बोलत राहणार ! ”

विदुलेनें संजयास पित्याच्या वैभवाची आठवण करून दिली. पति-निधनानंतर तिच्या सर्व आशा त्याच्यावर कशा केंद्रित झालेल्या आहेत याची त्याला जाणीव देऊन ती म्हणाली, “ उतारवयांत तूं मला अपमानित जीवन जगावयास लावणार का ? तुझ्या वडिलांनीं मला खऱ्या राणीच्या मोलानें ठेवलें. आता मात्र मी व तुझी पत्नी तुझ्याच कर्तृत्वावर जगणार आहोंत. आमच्या जीवनाचें तारूं सुखरूप पैलतीराला नेणें किंवा बुडविणें सर्वस्वीं तुझ्याच हातीं आहे. ” विदुलेचें मानवी स्वभावाचें निरीक्षण सखोल होतें. एखाद्याचा स्वाभिमान डिवचून त्याचें शौर्य कसें जागृत करावें हें तिला माहीत होतें. विदुला पुढें बोलूं लागली, “ विजयी होऊन सौवीराच्या कन्यांना सुख दे. पराभव झाल्यास सिन्धु देशाच्या कन्यांचा दास होण्याची तुझ्यावर पाळी येईल. आपल्या घराण्याला न शोभेल असें वर्तन करून तूं मला दुःखी करणार का ? तुझ्या मार्गेच इतरांनीं चालावें अशी तुझी योग्यता ! तूं इतरांच्या मागे जाण्याचा प्रसंग स्वतःवर ओढवून घेणार का ? ” इतकें बोलूनहि मंदबुद्धि संजयांत स्वाभिमान जागृत होण्याचें लक्षण दिसेना. थोड्या रागानें तो म्हणाला, “ माझी आई इतकी निर्दय कशी ? तूं फक्त तुझ्या राजवैभवाची काळजी करते आहेस. धिक्कार असो या क्षत्रियधर्माला ! तुझ्या आताच्या बोलण्यावरून मला असें वाटूं लागलें आहे कीं, तूं माझी आईच नव्हेस. ” विदुलेनें शांतपणें उत्तर दिलें, “ तुला कर्तव्यासाठीं जागें करण्याची हीच वेळ आहे तूं लढून राज्याचें रक्षण केलें नाहींस तर सर्व प्रजा तुझी छीथू करील. पराजित राजाला इहलोकीं आणि परलोकींहि स्थान नाहीं. भविष्याची कल्पना देऊन तुला जर धोक्याची सूचना दिली नाहीं तरच मी आईसारखी वागलें असें ठरेल ! ” संजयानें तिजकडे क्षमेची याचना केली. पण मुलानें जय किंवा मृत्यु या दोहोंपैकींच एक निवडावें असा विदुलेनें हट्ट धरला. “ माझ्याजवळ पुरेसें सैन्यबळ अगर मदतीला मित्रराजेहि नाहींत. मग मी एकटा गेलेलें राज्य परत कसें

मिळविणार ? पापी माणसाला जशी स्वर्गाची अपेक्षा करतां येत नाहीं त्याचप्रमाणें मला राज्य परत मिळविण्याची मुळींच आशा वाटत नाहीं " असें संजय निराशेनें म्हणाला. विदुला धूर्त होती. तिनें मुलाला विजयाची वाट दाखविली. " तुला माहीत नाहीं अशा ठिकाणीं तुझ्या पित्यानें अपरंपार धन ठेवलेलें आहे. तें मी तुला दाखवितें. राजकारणांत अशा अनेक क्लृप्त्या असतात कीं त्यांच्या साहाय्यानें आपल्याला परिस्थिति हवी तशी बदलतां येते. सिंधु देशाच्या राजाचा तिरस्कार करणारे व त्याच्या वैभवाचा हेवा करणारे सर्व लोक तुला वश होतील. कांहीं निरपेक्ष मित्रहि तुला मदत करतील. हरतऱ्हेनें शत्रूची बाजू तू या पैशाच्या बळावर कमकुवत करूं शकशील. फक्त तुला आत्मविश्वास हवा. " विदुलेच्या या भाषणाचा संजयावर अपेक्षित परिणाम झाला आईच्या सल्ल्यानेंच पुढील सर्व बेत आखण्याचें त्यानें ठरविलें व मोठ्या उमेदीनें तो कामाला लागला.

ही सर्व हकीकत ऐकून एखाद्याला असें वाटेल कीं, विदुला जर एवढी कर्तृत्ववान् होती तर आपल्या निर्बुद्ध पुत्राला शिकवीत बसण्यापेक्षां तिनें स्वतःच राज्यकारभार कां केला नाहीं ? याचें कारण इतकेंच कीं, राणी या दृष्टीनें विदुलेचें जीवन राजाच्या मृत्यूनंतर संपलें होतें. आई म्हणून तिला जगणें प्राप्तच होतें म्हणून ती जगली होती. अर्थात् मुलामध्यें राज्य चालविण्याची लायकी आणण्यासाठीं जिवाचें रान करण्याखेरीज तिला इलाजच नव्हता.

**दमयन्ती** :– निषध देशाचा राजा नल हा देखणा व शूर म्हणून फार प्रसिद्ध होता. रथ चालविण्याचें त्याचें नैपुण्य असामान्य होतें. त्या वेळच्या सर्व राजांत नलाला फार मान असे. त्याच्या स्वभावांत फक्त एकच दोष होता व तो म्हणजे जुगाराचा विलक्षण नाद.

या काळांत विदर्भ देशावर भीम राजा राज्य करीत होता. भीमाला तीन मुलगे व दमयन्ती नांवाची एक मुलगी होती. दमयन्ती अतिशय रूपवती होती. भाटांकडून भीमाच्या दरबारात नेहमीं नल राजाची व नलाच्या दरबारांत वारंवार भीमकन्या दमयन्तीची स्तुति ऐकूं येई. हळूहळू नलाला व दमयन्तीला एकमेकांबद्दल विलक्षण ओढ वाटूं लागली. नल राजा तर एकांतांत

सारखें दमयन्तीचेंच चिंतन करूं लागला. एके दिवशीं तो एकटाच आपल्या उद्यानांत बसला असतांना शेजारीं असलेल्या छोट्याशा सरोवरांत सोनेरी हंसांचा एक कळप राजानें पाहिला. त्यांतील एक हंस राजानें पकडला. हंसानें राजाचें मनोगत जाणून त्याला म्हटलें, "मी दमयन्तीकडे जाऊन तुझी अशी स्तुति करीन कीं दुसऱ्या कोणाशीं विवाह करण्याचा विचारहि तिच्या मनांत डोकावूं नये. मला जीवदान दिलेंस तर मी एवढी कामगिरी नक्की करीन." राजानें हंसास सोडलें व त्याच्या कामगिरींतून काय फलनिष्पत्ति होते याकडे तो डोळे लावून बसला.

नलाच्या हातून सुटका होतांच हंसांचा तो समुदाय दमयन्तीच्या बागेंत आला. दमयन्ती आपल्या सख्यांसह जलक्रीडा करण्यांत गर्क होती. सोनेरी पंखांचे ते हंसपक्षी पाहून त्या सर्वांना फारच आनंद झाला व त्या सर्वांनीं हंसांना धरण्याची खटपट सुरू केली. या धामधुमींत एक हंस दमयन्तीला घेऊन बागेच्या कोपऱ्यापर्यंत आला. तेथें तिला थांबवून मानवी आवाजांत तो म्हणाला, "निषध देशाचा राजा नल जर तुला पति म्हणून लाभला तर तूं अतिशय भाग्याची ठरशील. त्याच्यासारखा दुसरा शूर राजा भारतांत शोधूनहि सांपडणार नाहीं." दमयन्ती लाजली. तिनें त्याच हंसामार्फत नल राजाला आपलें मनोगत कळविलें.

लवकरच दमयन्तीच्या स्वयंवरासाठीं भीमराजानें दरबार भरविला. दमयन्तीच्या सौंदर्याच्या ख्यातीनें आकर्षित झालेले कांहीं स्वर्गीय महाभागसुद्धां या स्वयंवरसभेस हजर राहण्यासाठीं आले होते. नल राजा या समारंभासाठीं निघाला असतां वाटेंत त्याला देवांचा राजा इन्द्र, अग्नि, यम आणि वरुण हे चौघे भेटले. दमयन्तीनें त्या चौघांपैकीं एकाला पति म्हणून पसंत करावें यासाठीं दमयन्तीचें मन वळविण्याची विचित्र कामगिरी त्यांनीं नलाला सांगितली. नल राजा अतिशय प्रामाणिक व एकवचनी होता. देवांची ही विनंती त्याला मान्य करावीच लागली. त्यांच्या मदतीनें नल अदृश्य रूपानें दमयन्तीच्या महालांत गेला. दमयन्तीचें रूप पाहून त्याचें प्रेम शतपटीनें वृद्धिंगत झालें. मोठ्या कष्टानें नल तिला म्हणाला, "मी नल राजा. पण देवांचा दूत म्हणून मी आतां तुला भेटत आहे. इन्द्र, अग्नि, यम आणि वरुण या

सर्वांच्या मनांतून तुला वरावें असें आहे. त्यांच्यापैकीं तुला आवडेल त्याचा तूं स्वीकार करावास अशी त्यांची इच्छा आहे."

दमयन्तीला हसूं आलें. ती उत्तरली, "मी आपल्या सर्वस्वाचें दान आपल्यापायीं केव्हाच केलें आहे. आपण माझा स्वीकार नाहीं का करणार?" नलानें पुन्हां विचारलें, "देव तुला वरण्यास तयार असतांना तूं मानवाची पर्वा कशासाठीं करावीस?" दमयन्तीच्या गालांवरून अश्रु ओघळले. दीनपणें तिनें राजास विनविलें, "देवांना मी फारतर वंदन करीन, पण पति म्हणून मात्र आपल्यावांचून कोणाचाहि निवड करणें मला शक्य नाहीं." नलाची परिस्थिति मोठी चमत्कारिक झाली. शेवटीं दमयन्तीनें त्याला एक तोड सुचविली. ती म्हणाली, "महाराज, इतरांप्रमाणें आपणहि स्वयंवरमंडपांत हजर रहावें. मी सर्वांसमक्ष आपल्या गळ्यात माळ घालीन, म्हणजे आपल्याला कोणी दोष देणार नाहीं."

ठरल्याप्रमाणें स्वयंवरसभा भरली. भीमराजा दमयन्तीला घेऊन आला. धीरगंभीरपणें एकेका राजाला अभिवादन करीत ती पुढें जात होती. शेवटीं नलराजाचें नाव पुकारलें गेलें. दमयन्तीनें मान वर केली. तों काय चमत्कार! एकासारखे एक पाच नलराजे समोर बसलेले तिला दिसूं लागले. देवांचा हा डाव तिनें क्षणार्धात ओळखला. मनोमन नमस्कार करून तिनें देवांची प्रार्थना केली, "देवांनो, हंसपक्षानें सांगितलेला वृत्तान्त ऐकून नलाशिवाय कोणालाच वरावयाचें नाहीं असा मीं निश्चय केला. माझी प्रतिज्ञा पार पाडण्यास आपण सर्वांनीं मला मदत करावी." हें ऐकताच चौघे देव अंतराळांत तेजस्वीरूपांत दिसूं लागले व खरा नल तिच्यापुढे उभा राहिला. तिनें त्याला माळ घातली व देवांना कृतज्ञतापूर्वक वंदन केलें.

विवाहानंतर दमयन्तीचे कांहीं दिवस सुखात गेले. पण एकदा नलाच्या मनांत कलीनें प्रवेश केला आणि तो आपला भाऊ पुष्कर याच्याशीं द्यूत खेळायला तयार झाला. सर्व संपत्ति गमावली तेव्हां पुष्कर कुत्सितपणें त्याला म्हणाला, "का, थांबलास कां? राज्य गेलें तरी द्यूतांत लावायला दमयन्ती आहे कीं अजून!" भावाचे हे मर्मभेदी बोलणें ऐकून नलाचें अंग शहारलें. तावडतोब राजवस्त्र उतरवून एका वस्त्रानिशीं तो राजवाड्याबाहेर

करून भन्याच लोकांना ठार केलें. व्यापाऱ्यांना वाटलें, या नवीन आलेल्या स्त्रीच्या पायगुणानेंच सर्वांवर हें संकट आलें. पुन्हां अरण्यांत पळून गेली नसती तर तिच्या आयुष्याचें त्या व्यापाऱ्यांनीं कमे धिंडवडे केले असते या कल्पनेनेंहि दमयन्ती अतिशय दुःखी झाली. असे हाल भोगण्यापेक्षां मरण कां येत नाहीं असेंहि तिला वाटलें.

तशीच हिंडत हिंडत ती चेदी गांवाच्या वेशीपाशीं आली. भुकेनें व्याकुळ झाल्यामुळें तिचें हाडन्हाड दिसूं लागलें होतें. चालण्याच्या श्रमांनीं पायाला फोड आले होते. मुद्रा भयानक दिसत होती. राजवाड्याच्या गच्चीवर चेदींची राणी उभी होती. दमयन्तीला पाहून तिला कींव आली. दासीमार्फत तिनें दमयन्तीस बोलावणें पाठविलें. फक्त नांवें वगळून दमयन्तीनें आपली सर्व हकीकत राणीस सांगितली. राणीनें तिला आपली मुलगी सुनंदा हिच्या दासीचें काम दिलें. इतकें झालें तरी वडिलांना निरोप पाठविण्याचा विचारहि दमयन्तीनें केला नाहीं.

नळानें दमयन्तीला सोडल्यानंतर अनेक संकटांना तोंड दिलें. हाल-अपेष्टांनीं त्याची मुद्रा पार बदलून गेली. शेवटीं त्यानें अयोध्येचा राजा ऋतुपर्ण याच्या पदरीं रथ चालविण्याची नोकरी पत्करली. नलाचा सारथी वार्ष्णेय याच ठिकाणीं नोकरीस होता.

दमयन्तीच्या पित्यानें आपल्या मुलीच्या व जांवयाच्या शोधार्थ अनेक ब्राह्मण पाठविले. त्या दोघांचा शोध लावून देणाऱ्यास त्यानें मोठमोठीं बक्षिसें जाहीर केलीं. दमयन्तीच्या भावाचा मित्र सुदेव हा चेदींत याच कामगिरीवर हिंडत असतांना त्यानें सुनंदा दासीसमवेत बसलेली पाहिली. दमयन्तीशीं त्या दासीचें विलक्षण साम्य पाहून सुदेवाला फार आश्चर्य वाटलें. माहिती मिळ-विण्याच्या दृष्टीनें त्यानें स्वतःची ओळख दिली. दमयन्तीला दुःखावेग न आवरून ती रडूं लागली. एवढ्यांत राणी तेथें आली. आपण जिला आश्रय दिला ती विदर्भ देशाची राजकन्या—आपली भाची—दमयन्तीच आहे हें समजून राणीला खूप आनंद वाटला. " हें घर तुझेंच आहे असें समजून तू येथें सुखानें रहा " असा राणीनें व सुनंदेनें दमयन्तीस आग्रह केला. पण त्यांना कृतज्ञतापूर्वक नकार देऊन व त्या दोघींचे मनःपूर्वक आभार मानून ती

पित्याकडे जावयास निघाली. कारण मुलांना भेटण्याची तिला अतिशय ओढ वाटत होती.

मुलांना पाहून दमयन्तीस व दमयन्तीस पाहून तिच्या मातापित्यांस जो आनंद झाला त्याचें शब्दांत वर्णन करणें कठीण आहे. दमयन्तीला पतीविषयीं मात्र अतिशय रुखरुख लागून राहिली होती. डोळ्यांत पाणी आणून ती आईला म्हणाली, " आई, तुझी दमयन्ती जिवंत रहावी असें जर तुला वाटत असेल तर माझ्या लोकोत्तर पतीचा शोध करा. "

पतीचा शोध करण्यासाठीं दमयन्तीनें एक योजना आंखली. तिनें एक काव्य रचलें आणि नळाचा शोध घेण्यासाठीं जाणाऱ्यांना प्रत्येक ठेकाणीं तें म्हणण्यास सांगितलें. जो त्याचें उत्तर देईल तें उत्तर सेवकानें दमयन्तीस कळवावें असें ठरलें. हें काव्य म्हणण्यास कोणीं सांगितलें याचा कोणालाहि पत्ता लागूं द्यावयाचा नाहीं अशी तिनें सर्वांस सूचना देऊन ठेवली होती. तिच्या काव्याचा सारांश असा होता, " तुझ्या राणीला अरण्यांत टाकून तूं कोठें गेलास ? तूं कापल्यानंतर शिल्लक राहिलेलें अर्धे वस्त्र परिधान केलेली तुझी पत्नी अजून एकसारखी वाट पहात आहे. पत्नीचें रक्षण करून तिला सुखी करणें हें तुझें कर्तव्य तूं कसे विसरलास ? दया अनुकंपा हे मोठे सद्गुण आहेत असें तिनें तुझ्या तोंडून ऐकलें. मग आतां स्वतः ते गुण कां दाखवीत नाहींस ? "

हें काव्य घेऊन गेलेल्या दूतांपैकीं एकाकडूनहि दमयन्तीस उत्तर आलें नाहीं. पण तिनें धीर सोडला नाहीं. शेवटीं पर्णाद नांवाचा ब्राह्मण अयोध्येहून परत आला व दमयन्तीस भेटून त्यानें तिला सांगितलें, नळाचा शोध करीत मी अयोध्येस ऋतुपर्णाच्या दरबारांत जाऊन आपलें काव्य म्हटलें, पण कोणी उत्तर दिलें नाहीं. दरबारांतून बाहेर पडल्यानंतर बाहुक नांवाच्या राजाच्या सारथ्यानें मला थांबविलें. डोळ्यांत पाणी आणून म्हणाला, " पवित्र मनाच्या स्त्रिया विपत्तींतहि सत्वस्थ राहून स्वतःचा उद्धार करतात. इतर कोणताहि पर्याय न सांपडल्यानें नळानें राणीचा त्याग केला. तिनें त्याच्यावर रागाऊं नये. दोघांना अन्न मिळविण्याच्या धडपडींत त्यानें आपलें वस्त्र गमाविलें. त्यामुळें तिच्या वस्त्राचा अर्धा भाग कापून घेण्याखेरीज

पडला. दमयन्तीहि त्याच्याबरोबर जाण्यास तयार झाली. मुलांना तिनें आपल्या पित्याकडे पाठवून दिलें.

तीन दिवस गांवाच्या वेशीबाहेर नल व दमयन्ती अन्नपाण्याविना तळमळत होतीं. पण कोणालाहि त्यांची कींव आली नाहीं. पुढें चालत जातां जातां एका अरण्यांत त्यांना कांहीं सोनेरी पक्षी दिसले. वैतागलेल्या नलाला पक्षी पकडण्याची बुद्धि झाली. त्यानें त्या पक्षांच्या थव्यावर नेसतें वस्त्र फेंकलें. पक्षी भुरकन् उडाले. विचारा नल वस्त्रहीन झाला. दमयन्तीनें आपलें अर्धें वस्त्र त्याला दिलें व त्याची समजूत घातली. वारंवार नल दमयन्तीला पित्याच्या घराची वाट दाखवीत होता. पण अश्रुपूर्ण नेत्रांनीं दमयन्ती त्याला म्हणाली, " नाथ, राज्य गेलें, वैभव गेलें. अन्नहीन आणि वस्त्रहीन अशा विपन्नावस्थेंत आपल्याला एकट्यांना टाकून मी बाबांकडे कशी जाऊं? मनोव्यथेच्या कालांत पत्नीसारखा दुसरा वैद्य नाहीं असा वैद्यकतज्ज्ञांचा सिद्धान्त आहे ! "

नलानें तिची समजूत घालून सांगितलें, " मी कांहीं तुला कायमची सोडून देणार नाहीं ! "

" असें असेल तर आपणहि मजबरोबर विदर्भ देशांत कां येत नाहीं ? " दमयन्तीनें पुन्हां प्रश्न केला. " भीमराजा आपल्याला निश्चित सन्मानानें वागवील. "

नल यावर निरुत्तर झाला. सासऱ्याकडे जाण्याची कल्पना मात्र त्याला रुचली नाहीं. कांहीं वेळानें दोघांनीं विश्रांतीसाठीं धरणीला पाठ लाविली. नलाच्या डोक्यांत कांहीं वेडेवांकडे विचार येऊन तो स्वतःला अपाय करून घेईल या भीतीनें झोंपायचें नाहीं असें तिनें ठरविलें. पण ती इतकी दमली होती कीं थोड्याच वेळांत तिला गाढ झोंप लागली.

नलाच्या डोक्यांत विचाराचें थैमान चालू होतें. त्या भिकारी अवस्थेंत राणीची ओढाताण करायची नाहीं असें त्यानें ठरविलें. आपण हळूंच निघून गेल्यास ती आपोआप पित्याकडे जाईल व मुलांच्या सहवासांत तिचें दुःख हलकें होईल असेंहि त्याच्या मनांत आलें. पण विवश स्थितींत कमें

जावें हा त्यास प्रश्न पडला. वस्त्र अर्धे फाडतांना राणी जागी होईल अशीहि त्याला भीति वाटली. जवळच एक तरवार पडलेली त्यानें पाहिली. ती घेऊन त्यानें नेसत्या वस्त्राचे हळूच दोन तुकडे केले व तो निघाला. पुन्हां पुन्हां दमयन्तीला डोळे भरून पहात जड अंतःकरणानें नल हळू हळू मार्ग आक्रमूं लागला.

इकडे झोपेंतून जागी होऊन आसपास पाहतांच दमयन्तीला धक्काच बसला. भोंवताली, झोपडींत नल कोठेंतरी लपून बसला असेल असें समजून तिनें त्याला खूप हांका मारल्या. मग मात्र तिला दुःखावेग आवरेना. तिच्या शोकानें सर्व अरण्य दणाणून गेलें. एवढ्या शोकांत एकटीला टाकून गेल्याबद्दल एकदांहि तिनें पतीला दोष दिला नाहीं.

विचार करीत भ्रमिष्टासारखी ती किती चालली कोण जाणें ! एके ठिकाणीं तिला कांहीं झोंपड्या दिसल्या. अनेक वेदसंपन्न ऋषि तेथें ध्यानस्थ बसले होते. त्यांपैकीं कांहींनीं दमयन्तीला पाहिलें. त्यांना तिची दया आली. तिनें थोडें तरी खाऊन विश्रांति घ्यावी अशी त्यांनीं तिला सूचना केली. पण पतीशिवाय जगण्याचीहि कल्पना तिला असह्य होत होती. कांहीं अवधींत नलाचा तपास लागला नाहीं तर प्राणत्याग करण्याचा निश्चय तिनें मुनिवर्यां-जवळ बोलून दाखविला. ऋषींनीं तिची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. ते म्हणाले, " दमयन्ती, निराश होऊं नकोस. तुझा पति लवकरच आपलें राज्यवैभव परत मिळवील. शत्रूला शासन करून प्रजेला सुखी करील. तुझी व त्याची भेट होईल तेव्हां तो राजवेषांतच तुला दिसेल. " हे शब्द ऐकतांच एक क्षणभर दमयन्ती आनंदली. या सुखस्वप्नांत तिनें डोळे मिटले. पुन्हां कांहीं वेळानें डोळे उघडून पाहते तों ऋषीहि नाहींत आणि झोंपडीहि नाहीं. ती आश्चर्यचकित झाली. एक गोष्ट मात्र खरी कीं या सुखद आभासानें तिला दिलासा मिळाला, तिचें मनोधैर्य वाढलें. नाहींतर तिची अवस्था वेड्यासारखी झाली असती.

विकल अवस्थेंत अर्धवस्त्र परिधान केलेल्या दमयन्तीस हिंडता हिंडतां नदीकांठीं व्यापाऱ्यांचा एक तांडा भेटला. त्यांच्याबरोबर चेदीपर्यंत तिनें प्रवास करण्यास त्यांनीं अनुमति दिली. त्याच रात्रीं कांहीं हत्तींनीं त्यांच्यावर हल्ला

त्याला गत्यंतरच नव्हतें. हें लक्षांत घेऊन त्या साध्वीनें त्याला क्षमा करावी."

हें उत्तर नलाखेरीज दुसरा कोणीच देऊं शकणार नाहीं हें जाणून दमयन्ती लगेच पुढच्या उद्योगास लागली. तिनें आपल्या भावाचा मित्र सुदेव यास बोलाविलें. ती त्याला म्हणाली, " अयोध्येचा राजा ऋतुपर्ण याला असें कळीव कीं नलाचा शोध आतां लागणार नाहीं असें समजून दमयन्तीनें उद्यां पुन्हां स्वयंवर करण्याचें ठरविलें आहे." हा निरोप घेऊन सुदेव तावडतोब गेला. ऋतुपर्णास दमयन्तीच्या सौंदर्याचा अभिलाष वाटत असल्यानें तो लगेच स्वयंवरसमारंभासाठीं निघाला. पोंचावयास अवधि अगदीं थोडा असल्यानें रथ चालविण्यासाठीं त्यानें बाहुकाची योजना केली. बाहुकाचें सारथ्य-कलेंतील कौशल्य पाहून राजा थक्क झाला. ऋतुपर्ण द्यूत खेळण्यांत पटाईत होता. बाहुकानें रथ चालविण्याची कला ऋतुपर्णास शिकवावी व राजानें बाहुकास द्यूत खेळण्यास शिकवावें असें त्या उभयतांत ठरलें.

वाऱ्याच्या वेगानें रथ विदर्भास येऊन पोंचला. पण स्वयंवराची कांहींच तयारी न दिसल्यानें ऋतुपर्ण नाराज झाला. दमयन्ती आपल्या देहाचे डोळे करून बाहुकाचें निरीक्षण करीत होती. मुद्दामच तिनें आपल्या दोन्ही मुलांना बाहुकाकडे पाठविलें. बाहुकानें त्यांना प्रेमभरानें जवळ घेऊन अश्रूंनीं न्हाऊं घातलें. हें दृश्य दुरून पहात असतांना दमयन्ती मनाशीं विचार करीत होती, " राजाचा चेहरा इतका कुरूप कसा दिसूं लागला आहे ? " आणखी चौकशी करण्यासाठीं तिनें एका दासीस बाहुकाकडे पाठविलें. दासीनें त्याला विचारलें, " आपण नल राजाचें नांव ऐकलें आहे का ? " बाहुकानें उत्तर दिलें, " वैभवशून्य आणि संकटपरंपरेनें रूपहि गमावलेला नलराजा पृथ्वीतलावर कर्मेतरी आयुष्य कंठीत आहे. पण खरी वस्तुस्थिति तो कोणालाहि सांगणार नाहीं. " दासीनें पुन्हा प्रश्न केला, " दमयन्तीच्या दूतानें म्हटलेल्या काव्यास आपणच उत्तर दिलें ना ? तें उत्तर आमच्या बाईसाहेबांना पुन्हा ऐकण्याची इच्छा आहे. " बाहुकानें परत तीच हकीकत सांगितली, पण बाहुक म्हणजेच नल ही गोष्ट त्यानें गुप्तच ठेवली.

दासीकडून एवढा वृत्तान्त ऐकल्यानंतर दमयन्तीनें वडिलांच्या परवानगीनें बाहुकाला आपल्या महालांत बोलाविलें. महालांत पाय टेकतांच अर्धवस्त्र परिधान

केलेली कृश दमयन्ती त्याला दिसली. तिच्या नेत्रांतून प्रेम ओसंडत होतें. बाहुकाचा कंठ दाटून आला. अश्रुपूर्ण नेत्रांनीं त्याच्याकडे पहात दमयन्तीनें विचारलें, " स्वतःला न्यायी म्हणविणारा एखादा राजा सुप्तावस्थेंत पत्नीला एकटीच अरण्यांत टाकून निघून गेलेला तूं पाहिला आहेस का ? आपल्या निरपराध पत्नीस ही कठोर शिक्षा नलाखेरीज कोण भोगावयास लावणार ? " अनेक संमिश्र भावनांनीं नलराजा थरथर कांपत होता. स्वतःला कसेंबसें सांवरीत त्यानें विचारलें, " भीमराजाकडून देशोदेशीं दमयंतीच्या स्वयंवराची ग्वाही देण्यासाठीं दूत गेले आहेत याचा अर्थ नलानें काय लावावा ?"

" असे दूत फक्त अयोध्येसच गेले होते. कारण अयोध्येचा राजाच बाहुकास घेऊन येथपर्यंत इतक्या थोड्या अवधींत येणें शक्य होतें " दमयन्तीनें खुलासा केला.

कलीच्या तडाख्यांत सांपडल्यानें प्रिय पत्नीस सोडून तो कसा गेला हें सांगून नंतर राजानें दमयन्तीस सांगितलें कीं, त्यानें गेलेलें वैभव परत मिळविण्याची कला साध्य करून घेतली आहे. नलराजाजवळ असलेल्या एका जादूच्या अंगरख्यानें त्यानें आपली अंगकान्ति पूर्वीप्रमाणें सतेज केली. पूर्वीच्या रुबाबदार स्वरूपांत राजा समोर दिसल्यानंतर दमयन्तीस किती आनंद झाला असेल याची वाचकांस सहज कल्पना करता येईल.

यानंतर नलराजा आपला भाऊ पुष्कर यांजकडे गेला व द्यूतांत गमाविलेलें राज्य व वैभव त्यानें परत मिळविलें. मूर्ख पुष्करानें सुरुवातीस दमयन्तीस जिंकण्याची क्षुद्र कल्पना केली आणि शेवटीं सर्वच गमाविलें. नलाशेजारीं थाटानें बसलेल्या दमयन्तीचें प्रजाजनांना पुन्हां एकदां दर्शन घडलें. या आनंदोत्सवप्रसंगीं नलानें उदार मनानें पुष्करास क्षमा केली. एकनिष्ठ पत्नीप्रेमाचा आदर्श निर्माण करून भारतीय संस्कृतींत दमयन्तीनें अढळ स्थान प्राप्त करून घेतलें आहे.

**सावित्री** :– पतिव्रता सावित्रीचें नांव माहीत नाहीं अशी एकहि सुसंस्कृत भारतीय महिला सांपडणार नाहीं. प्रत्येक हिंदु स्त्रीच्या ओठावर

सावित्रीचें नांव आहे. इतकेंच नव्हे तर तिच्या तेजस्वी चरित्राचें पुण्यस्मरण करण्यासाठीं ज्येष्ठी पूर्णिमेस तीन दिवस उपवास करण्याची पद्धति आमच्या स्त्रियांत या शतकांतसुद्धां आहे.

सावित्री एका राजघराण्यांत जन्माला आली होती. मद्र देशाचा राजा अश्वपति याची ती कन्या. राणीस बरींच वर्षे संतान न झाल्यानें तीं दोघें दुःखी झालीं होतीं. अनेक वर्षे व्रतवैकल्यें केल्यानंतर एके दिवशीं यज्ञ-कुंडांतून सावित्री देवता प्रकट झाली. तिनें राजाराणीस तेजस्वी कन्या प्राप्त होईल असा आशीर्वाद दिला. योग्य वेळीं राणी प्रसूत होऊन मुलीचें नांव सावित्री असें ठेवण्यांत आलें. वडिलांच्या घरीं सावित्री अतिशय सुखांत वाढली. तिला त्यांनीं उत्तम शिक्षण दिलें. वयोमानानें तिचें शरीरसौष्ठव वाढत होतें. तिची वृत्ति शांत, सुशील व धीरोदात्त बनत होती. तिच्या स्वभावांत दिसून येणाऱ्या गांभीर्यामुळें आसमंतांतील कोणताहि राजपुत्र तिच्याबद्दल प्रगटपणें अभिलाषा दाखविण्यास धजत नसे.

एके दिवशीं नित्याप्रमाणें स्नान व पूजा आटोपून पित्याला अभिवादन करण्यासाठीं सावित्री गेली असतांना अश्वपति तिला म्हणाला, "सावित्री, तुझा विवाह करण्याची वेळ आतां आली आहे. अजून तुला मागणी घालण्या-साठीं माझ्याकडे एकहि योग्य वर आलेला नाहीं. तूंच तुझा जोडीदार पसंत कर म्हणजे मोठ्या थाटानें आपण विवाहसमारंभ घडवून आणूं.

सावित्रीच्या प्रवासाची सिद्धता झाली. अनेक नोकर व जुने विश्वासु सल्लागार बरोबर देऊन सोन्याच्या रथांतून सावित्री वरसंशोधनार्थ बाहेर पडली. कोणत्याहि देशाच्या राजाकडे न जातां ती थेट अरण्याच्या रोखानें निघाली. दिवसामागून दिवस जात होते. अनेक ऋषि व आश्रमांना भेट देऊनहि विवाहायोग्य पुरुष सावित्रीस आढळला नाहीं. एका घनदाट अरण्यांतून जात असतां समोरून एक तरुण खांद्यावर कुऱ्हाड घेऊन चाललेला तिनें पाहिला तो इतका देखणा व तेजस्वी होता कीं, क्षणभर सावित्रीची दृष्टि त्याच्यावर खिळूनच राहिली. "ज्याचा शोध घेत मी आजपर्यंत हिंडत होतें तोच हा तरुण!" अशी तिची खात्री झाली.

ताबडतोब तिनें त्याच्यासंबंधीं जरूर ती माहिती मिळविली व ती पित्याच्या कानावर घालण्यासाठीं परतली. तिनें पित्याच्या दरबारांत प्रवेश केला त्या वेळीं मंत्रिगणासमवेत बसलेल्या राजाच्या शेजारीं नारदमुनि बसलेले तिला दिसले. मुलीनें निवडलेल्या वराची हकीकत ऐकण्यास राजा फार उत्सुक होता. सावित्री सांगूं लागली, " बाबा, शाल्व देशांत द्युमत्सेन नांवाचा राजा राज्य करीत होता. दुर्दैवानें तो अंध झाला. त्याच्या शत्रूंनीं अचानकपणें क्रूर हल्ला चढवून द्युमत्सेनाचा पराभव केला व त्याला राज्याबाहेर हांकलून दिलें. राजानें राणी व पुत्रासह अरण्याची वाट धरली. दुष्ट जगाला विटलेला राजा आपला काळ ध्यानधारणेंत व्यतीत करीत असतो. राजपुत्र सत्यवान् त्यांच्याजवळ राहून त्यांची सेवा करतो. बाबा, या सत्यवानालाच मी आपला पति म्हणून निवडला आहे. "

सावित्रीचें बोलणें संपतें न संपतें तोंच नारदमुनि अधीरतेनें म्हणाले, " राजा, सत्यवानाला सावित्री देण्याचा विचार मुळींच मान्य करूं नकोस. " राजा चमकला. आपले हितचिंतक असून नारदांना सावित्रीच्या निवडींत काय गैर दिसलें असावें हें त्याला उमगेना. अश्वपतीची शंका ओळखून नारद पुढें सांगूं लागले, " सत्यवान् सूर्यासारखा तेजस्वी, बृहस्पतीसारखा बुद्धिमान्, इन्द्रासारखा शूर व पृथ्वीसारखा क्षमाशील आहे. " नारदांच्या तोंडचे हे शब्द ऐकून राजा अधिकच गोंधळांत पडला. पुन्हा त्याला वाटलें, इतके गुण असूनहि नारद ज्या अर्थी या विवाहाला नकार देत आहेत त्या अर्थी सत्यवानांत कोणता तरी गंभीर दोष असला पाहिजे. तो नारदांना म्हणाला, " मुनिवर्य, आपण सत्यवानाचे फक्त गुणच सांगितले. त्याचे दुर्गुण कोणते आहेत ते कृपा करून सांगा."

" एकच दोष आहे त्या मुलांत ! व तो नाहींसा करणें कोणालाच शक्य नाहीं. आजपासून एक वर्षाच्या आंत सत्यवान मृत्युमुखीं पडेल " नारदांनीं सांगितलें.

हें अशुभ भविष्य ऐकतांच सर्वांच्याच अंगावर भीतीनें शहारे आले. सावित्रीचे हातपाय गळून गेले. क्षणापूर्वी उल्हसित असलेला तिचा चेहरा पार कोमेजून गेला. मोठ्या प्रयासानें मनाचा तोल सांवरून राजा तिला म्हणाला,

" सावित्री, जा, तुझ्या योग्यतेचा दुसरा एखादा वर पसंत कर. इतक्या अल्पायुषी राजकुमाराशीं लग्न करण्यास मी तुला कशी परवानगी देऊं ? "

वडिलांचे हे शब्द ऐकतांच सावित्री दिङ्मूढ झाली. पण तिला एक गोष्ट निश्चितपणें उमगली कीं तिच्या आयुष्यांतील या महत्त्वाच्या प्रश्नाचा निर्णय विचारपूर्वक तिचा तिनेंच करावयाचा आहे. कोणतीहि गंभीर समस्या निर्माण झाली कीं स्त्रिया आपल्या प्रेमास, पावित्र्यास व त्यागी वृत्तीस अनुसरूनच निर्णय घेतात. अविस्मरणीय शब्दांत सावित्रीनें आपला निर्णय जाहीर केला. " फांसा एकदांच पडतो. तो पुन्हां उचलतां येत नाहीं. कन्येचें दानादि एकदांच होऊं शकतें. सत्यवानाला दीर्घायुष्य असो अगर अल्पायुष्य असो, तो गुणी असो अगर दुर्गुणी असो, माझी निवड मीं केली आहे. पुन्हां दुसरा तरुण निवडणें मला शक्य होणार नाहीं."

राजाला सावित्रीच्या निर्णयापुढें शेवटीं नमतें घ्यावें लागलें. सावित्रीच्या असामान्य प्रेमापुढें, पावित्र्यापुढें व मनोधैर्यापुढें आदरानें आपलें मस्तक नम्र करून नारदमुनींनीं तिला आशीर्वाद दिला. विवाहाची तयारी पूर्ण झाली.

एका शुभदिनीं अश्वपति, राणी व कन्येसह द्युमत्सेनाकडे आला व त्यानें सावित्रीचा विवाहसमारंभ पार पाडला. अनेक अमोलिक वस्तूंचा आहेर त्यानें नवरदेवास केला. सावित्रीचा आनंद गगनांत मावेना.

आईवडील परततांच सावित्रीनें सर्व उंची वस्त्रें व अलंकार काढून ऋषीच्या स्नुषेला शोभेल असा वेष चढविला. सासुसासऱ्यांची मनोभावें सेवा सुरू केली. सत्यवानालाहि तिनें आपल्या एकनिष्ठ प्रेमानें सुखी केलें. ती जेव्हां जेव्हां एकटीच असे त्या वेळीं मात्र नारदांची भविष्यवाणी आठवून सावित्री अस्वस्थ होई.

उपवासांनीं आणि प्रार्थनेनें सावित्रीचा देह दिवसेंदिवस कृश होत चालला होता. ती एखाद्या मंदिरातील मंद ज्योतीसारखी भासे. तिच्या रूपानें एखादी स्वर्गीय देवताच आपल्याभोंवतीं वावरत असल्याची जाणीव त्या तिघांना होई. पतीवर अतिशय प्रेम असूनहि नारदाचें भविष्य तिनें त्याला

अगर सासुसासऱ्यांनाहि कळूं दिलें नव्हतें. ती शेवटची काळरात्र उगवली. फाल्गुन वद्य त्रयोदशीची सारी रात्र सावित्रीनें ईश्वराची मनोभावें प्रार्थना करण्यांत घालविली. त्या निष्पाप सतीचे डोळे कोरडे पण हृदय मात्र भरून आलें होतें.

दिवस उजाडला. भयानक काळजीनें दडपून गेलेल्या सावित्रीनें नित्याप्रमाणें आपला दिनक्रम सुरूं केला. तपस्वी वयोवृद्ध ब्राह्मणांना व सासुसासऱ्यांना वंदन करतांना सर्वांनीं तिला " सौभाग्यवती भव " असा आशीर्वाद दिला. केवढ्या आशेनें तिनें तो आपल्या हृदयांत सांठविला असेल! या आशीर्वादानें तिचें मनोधैर्य आज शतपटीनें वाढलें होतें.

उपास सोडून अन्नग्रहण करण्याची सासुसासऱ्यांनीं तिला सूचना केली. पण " सूर्यास्तानंतर मी आज उपास सोडीन " अशी तिनें त्यांची समजूत घातली. इतक्यांत सत्यवान् लांकडें तोडण्यासाठीं बाहेर पडलेला तिनें पाहिला. आज त्याला एक क्षणहि डोळ्याआड करण्यास तिचें मन धजेना. तिनें सासुसासऱ्यांना विचारलें, " आज यांच्याबरोबर मीहि बाहेर जाऊं का? " विवाहानंतर सावित्रीनें प्रथमच व्यक्त केलेली ही इच्छा नाकारावी असें त्यांना वाटेना. सत्यवानानें मोठ्या उत्साहानें सावित्रीला आसपासच्या वनश्रीची ओळख करून दिली. जिकडेतिकडे विखुरलेले रंग व दरवळलेला सुवास यांनीं सावित्रीचें मन प्रफुल्ल झालें. अरण्याच्या अगदीं दाट भागांत आल्यावर त्यानें सावित्रीस कांहीं गोड, रसाळ फळें खावयास दिलीं आणि नंतर कुऱ्हाडीनें लांकडें तोडण्याच्या कामास सुरुवात केली. एकीकडे तो लांकडें तोडीत होता व अधूनमधून देवतेसमान भासणाऱ्या सावित्रीकडे प्रेमळ दृष्टिक्षेप टाकीत होता. अधेंवट ऊन-सावली सावित्रीच्या आसपास क्रीडा करीत होती.

निश्चल दृष्टीनें पतीकडे पहात असलेल्या सावित्रीस कुऱ्हाडीची गति मंद होत चालल्याचा भास झाला. थोड्या वेळानें सत्यवानाच्या मस्तकांत विलक्षण वेदना होऊं लागल्या, अंगास दरदरून घाम सुटला व शुद्ध जाऊन तो पडणार असें वाटे लागे भय[illegible] सावित्रीनें त्याला

सावलींत नेलें व अल्गद निजवून त्याचें डोकें आपल्या मांडीवर घेतलें. कोणती वेळ आली आहे हें तिनें ओळखलें. ती एखाद्या दगडी पुतळ्यासारखी स्तब्ध झाली. कांहीं वेळानें तिच्या डोळ्यांसमोर एक काळाकभिन्न पुरुष दिसूं लागला. त्याचे डोळे लालबुंद होते व हातांत फांस होता. त्याची दृष्टि सत्यवानावर खिळली होती. सावित्रीनें हळूंच पतीचें मस्तक आपल्या मांडीवरून खालीं ठेवलें व धडधडत्या हृदयानें ती त्या काळपुरुषास म्हणाली, " आपल्या असामान्य व्यक्तिमत्त्वाकडे पाहिल्यानंतर आपण कोणीतरी स्वर्गीय विभूति आहां असें वाटतें. आपण कोण व येथें येण्यांत आपला कोणता हेतु आहे हें मला कळेल का ? "

" माझें नांव यम. हें जग सोडल्यानंतर सर्व प्राणी जेथें जातात त्या मृत्युलोकींचा मी राजा. या राजपुत्राचा इहलोकींचा काळ संपला असल्यानें मी त्याला घेऊन जाण्यासाठीं आलों आहें " असें उत्तर देऊन यमानें सत्यवानाचा आत्मा आपल्या फांसांत अडकविला आणि तो दक्षिण दिशेनें निघाला. आपल्या मागोमाग सावित्रीहि येत असलेली पाहून त्याला आश्चर्य वाटलें. तो तिला म्हणाला, " मुली, माझ्यामागें न येतां परत जाऊन पतीचा यथोचित अंत्यविधि कर. यापुढें पतिविषयक तुझें कोणतेंहि कर्तव्य राहिलेलें नाहीं. शक्य होतें तेवढें अंतर तूं आली आहेस. " सावित्रीनें उत्तर दिलें, " माझा पति जिकडे जाईल तिकडे स्वेच्छेनें अगर जबरीनें जाणें हें माझें कर्तव्यच आहे. सृष्टीच्या अनादि सिद्धान्तानुसार पति व पत्नी यांची ताटातूट होऊंच शकत नाहीं." एवढ्या लहान वयांत सावित्रीची निष्ठा व प्रेम पाहून यमाला संतोष वाटला. तिचें सान्त्वन करण्याच्या उद्देशानें तो म्हणाला, " सावित्री, तुझ्यावर मी प्रसन्न झालों आहें. सत्यवानाचा आत्मा वगळून तूं जें मागशील तें द्यावयास मी तयार आहें. काय हवें तें माग. "

" यमराज," सावित्री विनयानें म्हणाली, " माझे सासरे अंध होऊन वनांत तपस्वी जीवन जगत आहेत. आपल्या आशीर्वादानें त्यांची दृष्टि व सर्व राजवैभव त्यांना पुन्हां प्राप्त होऊन ते सूर्य व अग्नि यांच्यासारखे तेजस्वी व्हावेत."

'जरूर' यम उद्गारला. "पण आतां तूं परत जा. फार लांब आल्यानें तूं थकली आहेस."

" छे, छे " सावित्री धीरानें म्हणाली, " माझ्या पतिदेवासमवेत जात असतां मी थकेन कशी ? आपण माझ्या पतीला जिकडे नेत आहां तीच माझी वाट आहे, महाराज, सज्जनांची भेट एकदां तरी व्हावी म्हणतात. त्यांच्याशीं स्नेह होणें ही तर त्याहून माग्याची गोष्ट. सज्जनाच्या संगतीचा लाभ झाल्याखेरीज कसा राहील ? मला वाटतं, मी सदैव आपल्याच छायेंत वावरावं. " सावित्रीच्या या लोभस भाषणानें यमराज फारच खूष झाले. " सत्यवानाचा जीव सोडून इतर कोणताहि आणखी एक वर माग आणि परत जा " असें सांगून त्यांनीं तिला दुसरा वर दिला. " माझे सासरे द्युमत्सेन यांना त्यांचें गेलेलें राज्य परत मिळावें " सावित्री नम्रपणें म्हणाली. पण ती परत जाईना. चालतां चालतां अनेक विषयांवर सावित्रीचें चतुर संभाषण चालूंच होतें. कांहीं वेळानें यमराजांनीं तिला तिसरा वर देऊं केला.

" माझ्या पित्याची कीर्ति द्विगुणित होऊन त्याच्या कुलाचें नांव राखतील असे तेजस्वी पुत्र त्याला व्हावेत, " सावित्री म्हणाली. याहि गोष्टीस यमानें रुकार दिला. तरी सावित्री त्याच्यामागें जात होती. तिच्या पतिप्रेमानें, सौजन्यानें व कुशाग्रबुद्धीनें तो जणू भारून गेला होता. त्यानें तिला चौथा वर मागण्यास सांगितलें. सावित्रीला आता बराच धीर आला होता. ती यमास म्हणाली, " मला बुद्धिमान् व सुदृढ असे शंभर पुत्र व्हावेत असा आपण आशीर्वाद द्यावा. " अभावितपणें यमानें होकार दिला आणि सावित्रीस परतण्यास सांगितलें. लगेच सावित्री उत्तरली, " मला शंभर पुत्र व्हावेत असा आशीर्वाद मिळाला, पण सत्यवानाचे प्राण परत केल्याखेरीज हा आशीर्वाद खरा कसा ठरणार ? म्हणून म्हणतें, महाराज, माझ्या पतीचे प्राण मला परत द्या. सत्यवानाखेरीज मला जगणेंच शक्य होणार नाहीं. "

यमराजांची चूक त्यांच्या लक्षांत आली. परंतु त्या मृत्युलोकींच्या न्यायाधीशानें आनंदानें आपला पराभव मान्य केला. सत्यवानास जीवदान मिळालें. हा सर्व सावित्रीच्या पातिव्रत्याचाच महिमा.

---

398।।

# प्रकरण १० वें

## पुराणकालीन महिला

वाङ्मय या दृष्टीनें पुराणें किती जुनीं आहेत हें सांगणें कठीण असलें तरी समाजाचें, विशेषतः स्त्रिया, शूद्र व इतर वरच्या वर्णातील अधर्मी वृत्तीच्या लोकांच्या जीवनाचें व नीतीचें नियमन करण्याच्या कामीं पुराणांची योजना झाल्याला फार कालावधि लोटलेला नाहीं. पुराणांचें कार्य सांगणाऱ्या कांहीं स्पष्ट ओव्या सांपडतात. त्यांपैकीं एका ओवीचा आशय असा आहे कीं, "स्त्रिया, शूद्र व कुलहीन द्विजांना वेद ऐकण्याचा अधिकार नाहीं. अशांच्या हितासाठींच प्रामुख्यानें पुराणांची रचना झाली." पुराणवाङ्मयास ही भूमिका प्राप्त होण्याचीं कारणें शोधूं गेल्यास असें आढळून येईल कीं, वेदोत्तर कालांत हिंदु समाजानें स्त्रियांना जेवढें स्वातंत्र्य दिलें होतें त्यापेक्षां कितीतरी अधिक स्वातंत्र्य त्यांना बौद्ध, जैन, वैष्णव व शैव पंथीयांनीं बहाल केलें होतें. पुराणांच्या लेखकांना समाजाच्या धारणेंतील व नैतिक विकासांतील स्त्रियांच्या जबाबदारीची पूर्ण जाणीव होती. पण वैदिक धर्मानें घालून दिलेल्या तत्त्वांचा पुरस्कार करणें, म्हणजेच वर्णाश्रमधर्माचा पुरस्कार करणें हा त्यांचा मुख्य उद्देश असल्यानें, स्त्रियांच्या पत्नी व माता या दोनच भूमिका पुराणांना मुख्यत्वेंकरून विचारात घ्याव्या लागल्या. म्हणून पुराणांत कुमारिकाधर्मा-विषयीं किंवा योध्या, राजकारणी अगर धर्मसुधारक स्त्रियांविषयीं फारसे उल्लेख आढळत नाहींत. ज्या ज्या ठिकाणीं असे उल्लेख आहेत त्या त्या ठिकाणीं रक्षणकर्ता व अधिकारी पिता, पति किंवा दुसऱ्या पालकाच्या आधारानें स्त्रीनें केलेल्या कार्याचा दुय्यम विचार केलेला आढळतो. वस्तुस्थिति अशी आहे कीं, कोणत्याहि सामाजिक अगर धार्मिक बाबतींत स्त्रीला पूर्ण स्वातंत्र्य देण्याची कल्पना पुराण-लेखकांना मान्य नाहीं. वैवाहिक जीवनाशीं एक-निष्ठ राहून भक्तिभावानें पतिसेवा करणें हेंच स्त्रीजीवनाचें उच्चतम ध्येय होय अशी विचारसरणी पुराणांत आढळून येते.

पौराणिक कथांतून मानवी व्यवहारांत देवांचा फार मोठ्या प्रमाणावर उपयोग केल्यामुळें व त्याचप्रमाणें चमत्कारांचा वारंवार आश्रय केल्यामुळें आधुनिक शास्त्रीय वृत्तीला पुराणांत असत्याचा अंश अधिक असल्याचा भास होतो. कित्येक वेळां मानव कोण व देव कोण यांचाहि गोंधळ पडतो. पण अशा तऱ्हेनें कांहीं प्रमाणांत अवास्तव व काल्पनिक वाटणाऱ्या पौराणिक व्यक्तींनींहि सामान्य मनाची त्या काळांत फार मोठ्या प्रमाणावर पकड घेतलेली दिसते. प्रत्यक्षांत होऊन गेलेल्या स्त्रीपुरुषांहून पुराणांत सांगितलेल्या स्त्रीपुरुषांचें अधिक आकर्षण वाटल्यामुळें, त्यांच्या जीवनादर्शाचा परिणाम सामान्य माणसांचें चारित्र्य व शील घडविण्यांत अधिक झाला. जीवनांतील ल्हानसहान घडामोडींतहि देवांचा हात असतो या कल्पनेनें पौराणिक कथा विशेष विलोभनीय वाटूं लागल्या. पौराणिक कथांतील व्यक्तींची ओळख करून घेतांना या सर्व गोष्टी वाचकांनीं ध्यानांत ठेवून मगच या व्यक्तिरेखांचें परीक्षण केलें पाहिजे.

## माता

**मदालसा :—** पुराणवाङ्मयांत माता व पत्नी या भूमिकेंत ज्या अनेक स्त्रियांचीं वर्णनें केलेलीं आहेत त्यांपैकीं मदालसा वाचकांना अधिक आकर्षित करते. एक महान् तत्त्ववेत्ती असूनहि ती सामान्य गृहिणीचें जीवन जगली. मार्कण्डेय पुराणांतील वीस ते चव्वेचाळीस प्रकरणांत असा उल्लेख आहे कीं, गंधर्वांचा राजा विश्वावसु याची कन्या मदालसा ही अत्यंत देखणी व सद्गुणसंपन्न होती. ती एकदां बागेंत खेळत असतां पातालकेतु या नांवाच्या दानवानें तिला बळजबरीनें पळवून नेलें व तिच्याशीं विवाह करण्याच्या हेतूनें पाताळांतील एका सुंदर शहरांत तिला बंदिस्त करून ठेवलें. तेथें मदालसेला तीर्थयात्रा करीत हिंडत असलेली विंध्यवताची कन्या कुण्डला भेटली. बंदिवासात मदालसा अतिशय दुःखांत काळ कंठीत होती. राक्षसाशीं विवाह होणें अटळ आहे हें कळतांच तिनें आयुष्याचा शेवट करण्याचा निश्चय केला. सुरभीनें तिला या विचारापासून परावृत्त करून असा दिलासा दिला कीं, " या दानवाला तुझी प्राप्ति होणें शक्य नाहीं. तो

पृथ्वीवर गेल्यानंतर आपल्या बाणांनीं त्याचा जो वध करील त्याच्याशीं तुझा विवाह होईल."

या घटनेनंतर थोड्याच वेळांत ऋतध्वज नांवाचा एक तरुण राजपुत्र अकस्मात् तेथें आला. निरनिराळ्या हिंस्र प्राण्यांचीं रूपें घेऊन गालव ऋषींच्या आश्रमांत पातालकेतु अतिशय ताप देत असे. म्हणून त्यांनीं शत्रुजित् राजाला पातालकेतूचें पारिपत्य करण्यास सांगितलें. शत्रुजितानें ही कामगिरी आपल्या पुत्राकडे–ऋतध्वजाकडे–सोंपविली. गालवांनीं ऋतध्वजाला विशेष गुणांनीं युक्त असा एक कुवलय नांवाचा घोडा या कामगिरीसाठीं दिला होता. पातालकेतूला आश्रमांत बाणांनीं विद्ध करून घोड्यावर स्वार झालेला ऋतध्वज पातालकेतूचा पाठलाग करीत पाताळांत येऊन पोंचला. मदालसा भेटल्यानंतर त्यानें तिला आपला सर्व वृत्तांत कथन केला. ऋतध्वजाचें शरीरसौष्ठव पाहून मदालसेच्या मनांत त्याच्याबद्दल प्रेम उत्पन्न झालें. कुण्डलेच्या सल्ल्यानें ऋतध्वज ऊर्फ कुवलयाश्व याचा मदालसेशीं विवाह ठरला आणि तिचे कुलोपाध्याय तुंबरू यांनीं पौरोहित्य करून हा समारंभ पार पाडला. विवाहसमारंभ पार पडल्यानंतर कुण्डला पुन्हां तीर्थयात्रेस निघण्यापूर्वीं तिनें ऋतध्वजास असा उपदेश केला कीं, "पत्नीचा प्रतिपाळ करणें हें प्रत्येक पतीचें आद्य कर्तव्य आहे. पतीच्या धर्माचरणांत, वैभवोपभोगात व प्रेमाच्या पूर्तींत पत्नी आपला अर्धा भाग उचलते. जेथें पति-पत्नी एकमेकांच्यावर पूर्ण नियंत्रण ठेवतात तेथेंच धर्म, अर्थ व काम हीं तिन्ही साध्य होतात. पत्नीच्या सहकार्याखेरीज पति देवांची अगर पितरांची आराधना करूं शकत नाहीं. कुटुंब व अतिथि यांच्याविषयींचीं कर्तव्यें पार पाडण्यासहि पत्नीची मदत लागते. संपत्ति मिळवून आणली तरी सद्गुणी पत्नीच तिचा योग्य विनियोग करूं शकते. पत्नीशिवाय खऱ्या प्रेमाचा लाभ होऊं शकत नाहीं. विवाहित दंपती तीन प्रकारचीं कर्तव्यें अंगीकारीत असतात. मुलाच्या रूपानें पति पितृऋण फेडतो, अन्नसंतर्पणानें अतिथींचें समाधान करतो, देवांची भक्ति करतो आणि पतीचीं कर्तव्यें पार पाडून पत्नीस सुखी करतो त्याचप्रमाणें पत्नीला पतिशिवाय प्रेम, संतति, धर्म अगर वैभव यापैकीं कशाचीहि प्राप्ति होऊं शकत नाहीं. म्हणून या त्रिविध कर्मासाठीं विवाहाची आवश्यकता आहे."

पातालकेतु व इतर राक्षसांचा नाश करून ऋतध्वज मदालसेसह राजधानीस परतला. शत्रुजितानें आपल्या मुलाच्या यशाबद्दल त्याचा गौरव केला. मदालसेनें आपल्या प्रेमानें व सेवेनें पतीची व सासुसासऱ्यांची मर्जी संपादन केली. पण या तरुण दंपतीचा आनंद दैवाला फार दिवस पाहवला नाहीं. बापाच्या आज्ञेवरून ऋतध्वजाला ब्राह्मणांना त्रास देणाऱ्या दैत्यांचा नाश करण्यासाठीं पुन्हां जावें लागलें. या कामासाठीं ऋतध्वजाला घोड्यावरून अनेक ठिकाणीं सारखें हिंडावें लागे. असाच एकदां यमुनेच्या कांठीं तो हिंडत असतां त्याची पातालकेतूचा भाऊ तालकेतु याच्याशीं गांठ पडली. भावाच्या मरणाचा सूड घेण्यासाठीं तालकेतु यमुनेच्या कांठीं ऋषीचा वेष घेऊन रहात असे. ऋतध्वज झोपडींत बसलेला असतांना तालकेतु तेथें आला. त्यानें गळ्यांतली सोन्याची माळ यज्ञकार्यासाठीं मागितली व यमुनेच्या कांठीं वरुणदेवाची पूजा करून परत येईपर्यंत आपली झोंपडी सांभाळण्यास ऋतध्वजास सांगून तो गेला. ऋतध्वज झोपडीच्या रक्षणार्थ तेथें थांबला. तालकेतु तेथून निघून शत्रुजिताकडे आला व " ऋतध्वज राक्षसांशीं युद्ध करतांना मृत्युमुखीं पडला आणि त्याचा घोडाहि राक्षसांनीं पळविला " असें त्यानें शत्रुजितास सांगून खात्री पटण्यासाठीं ऋतध्वजाचें कंठभूषण त्यानें राजास दिलें.

ही दुःखद वार्ता कानीं पडताच मदालसेनें प्राणत्याग केला. शत्रुजित् व राणी यानीं कशीबशी स्वतःची समजूत घातली व वीरमरणानें आपल्या पुत्राचा देह सत्कारणीं लागला यांतच समाधान मानलें. तालकेतूचा दुष्ट हेतु सिद्धीस गेला होता. तो आपल्या झोंपडीकडे परतला आणि तेथें गेल्यावर ऋतध्वजाचे आभार मानून त्यानें त्यास निरोप दिला. घरातून बाहेर पडून फार दिवस झाले होते म्हणून ऋतध्वज घाईघाईनें राजधानीकडे परतला. पण त्याची लाडकी मदालसा आता त्याला भेटणार नव्हती. तिच्या आत्म्यास शांति लाभावी म्हणून त्यानें सर्व क्रियाकर्मांतर करून कडक ब्रह्मचर्य पाळण्याची शपथ घेतली.

ऋतध्वजाच्या अंगच्या अनेक असामान्य गुणांमुळें दोन नाग युवराजांशीं त्याची दोस्ती जमली. एके दिवशीं त्यांनीं आपला पिता अश्वतर

याला ऋतध्वजाची सावंत हकीकत सांगितली. मदालसेच्या मृत्यूनें त्याची किती केविलवाणी अवस्था झाली आहे हेंहि त्यांनीं राजास सांगितलें. अश्वतरानें आपल्या योगसामर्थ्यानें मदालसेस पुन्हां जिवंत केली. राजाच्या इच्छेनुसार मदालसा वेदनिपुण होऊन मागील जन्मांच्या सर्व हकीकती तिच्या स्मरणांत ताज्या झाल्या. मदालसेला राजवाड्यांतील एका खोलींत लपवून अश्वतर राजानें ऋतध्वजास युवराजांमार्फत निमंत्रण पाठविलें. तो आल्यानंतर " आपल्या भेटीचें प्रतीक म्हणून कोणती मूल्यवान् वस्तु मी तुला देऊं ? " असा ऋतध्वजास राजानें प्रश्न केला. आपली मृत पत्नी पुन्हां एकदां दिसावी ही ऋतध्वजाची इच्छा जाणून त्यानें मदालसेस त्याच्यासमोर आणून उभें केलें व " ही मायेनें निर्माण केलेली मदालसा म्हणजे एक फक्त आभास आहे " असें राजानें त्यास सांगितलें. मदालसा दृष्टीस पडतांच भावनोद्रेक असह्य होऊन ऋतध्वज बेशुद्ध झाला. त्याची बेशुद्धावस्था पाहून मदालसा मनात म्हणाली, " केवढें हें पत्नीप्रेम ! मी नुसती दृष्टीस पडतांच हा अजिंक्य युवराज धरणीवर पडला. बाकी मानवी देह म्हणजे तरी पंचतत्त्वांनीं निर्माण केलेला आभासच नव्हे का ? " ऋतध्वजाची करुणास्पद अवस्था पाहून राजाला कींव आली. त्याला सावध करून त्यानें त्याची मदालसेशीं भेट करविली. आनंदित होऊन ऋतध्वज मदालसेसह पित्याकडे आला.

मदालसेच्या सहवासांत कांहीं काल ऋतध्वज सुखांत होता. मागील जन्मीं घडलेल्या पुण्याईचें फळ भोगण्याच्या हेतूनें मदालसाहि त्याला सुख देत होती. म्हातारा शत्रुजित मृत्युमुखीं पडल्यानंतर राज्याची सर्व जबाबदारी ऋतध्वजावर येऊन पडली. थोड्याच दिवसांत मदालसेस एक पुत्र झाला. राजानें त्याचें नांव विक्रान्त असें ठेवलें. सर्व प्रजेनें पुत्रजन्माचा आनंदोत्सव केला. मदालसेनें स्मित केलें. विक्रान्त रडूं लागला. त्याला अंगाईगीत *गाण्याऐवजीं मदालसा म्हणाली*, " *बाळा, तुझा आत्मा पवित्र आहे*. तुला विशिष्ट नांवानें संबोधणें ही आमची भ्रामक कल्पना आहे. तुझा देह पंच-महाभूतांचा बनलेला आहे. तूं म्हणजे देह नव्हेस. मग रडतोस कशासाठीं ? पण छे ! खरोखर तूं रडत नसून राजपुत्र या नांवानें ओळखला जाणारा देह फक्त रडत आहे. या वयात व या देहात तूं गुरफटूं नकोस. कारण

चांगल्या व वाईट कर्माच्या परिपाकानें देहधारणा होते. वासना आणि अहंता यांच्या तडाक्यांत सांपडलेलीं माणसें ' मी ' आणि ' माझें ' या कल्पनेंत बुडलेलीं असतात. " हा माझा पिता, ही माझी माता, हें माझें राज्य " या विनाशी कल्पनांत तूं दंग राहणार का ? मनाच्या आंदोलनांत गुरफटलेल्या माणसाची अशी समजूत असते कीं सत्कर्म सुखाला जन्म देतें आणि दुष्कर्म दुःखाची निर्मिति करते. मनानें निर्माण केलेली सृष्टि सत्य आहे, अशा कल्पनेंत वावरणारा मनुष्य दुष्कर्मांनाच सुख समजतो. पृथ्वीवर उभ्या असलेल्या रथांत देह आहे आणि देहांत आत्मा आहे. दुर्दैवाची गोष्ट अशी कीं माणसाला देहाबद्दल जें प्रेम वाटतें, तें आत्म्याबद्दल वाटत नाहीं. "

दिवसामासा वाढणाऱ्या आपल्या मुलास मदालसा नेहमीं हाच उपदेश देई. याचा परिणाम असा झाला कीं, मुलाची वृत्ति पूर्ण विरक्त बनून त्याला ऐहिक जीवनाचें कांहींच आकर्षण उरलें नाहीं.

मदालसेला आणखी दोन पुत्र झाले. राजानें त्यांचीं नांवें अनुक्रमें सुबाहु व शत्रुदमन अशीं ठेवलीं. पूर्वीप्रमाणेंच मदालसेनें भावपूर्ण स्मित केलें. पहिल्या मुलासारखेंच याहि दोन्ही मुलांना मदालसेनें आत्मज्ञानाचे धडे दिले. तेहि विरक्त बनले. चौथ्या खेपेस मुलगा झाल्यावर त्याचें नांव काय ठेवावें या विचारानें जेव्हां राजानें राणीकडे पाहिलें तेव्हां तिनें पुन्हां तसेंच स्मित केलें. क्षत्रियाला व त्याच्या शूर वृत्तीला शोभेल अशींच प्रत्येक मुलाच्या नांवाची निवड राजानें करूनहि मदालसा हंसली होती. म्हणून या वेळीं राणीनेंच नांव ठरवावें असें त्यानें सुचविलें. पतीची आज्ञा शिरोधार्य मानून राणीनें मुलाचें नाव अलर्क ( वेडा कुत्रा ) असें ठेवलें. राजाला नांवाचा अर्थ समजला नाहीं म्हणून त्यानें राणीला विचारतांच ती म्हणाली, " ही माझी एक विचित्र इच्छा इतकेंच ! जगाच्या रीतीप्रमाणेंच मी एक कोणतें तरी नांव सुचविलें. आपण पहिल्या तीन मुलांचीं जीं नांवें ठेवलीं आहेत तींहि अर्थशून्यच आहेत. कशीं तीं पहा. ' क्रान्ति ' म्हणजे गति. गतीमध्यें एका अवस्थेकडून दुसऱ्या अवस्थेप्रत जाण्याची कल्पना आहे. पण एकच आत्मा सर्व देहांत वास करतो. याच तत्त्वानें कोणी कोणाचा शत्रु

असणें शक्य नाहीं. म्हणजे शत्रुदमन हें नांवहि चुकीचेंच आहे. सारांश, पहिलीं तीन नांवें जशीं आपण निवडलीं तसेंच मीं चौथें निवडलें. ''

मदालसेचें तर्कशुद्ध प्रतिपादन मान्य करूनहि राजानें तिला असें सांगितलें कीं, अलर्कास तिनें प्रवृत्तिमार्गी बनवावें म्हणजे तो देव, ब्राह्मण व ऋषिमुनि यांच्या उपयोगी पडेल. गृहस्थधर्म स्वीकारून पितरांनाहि संतुष्ट करील. मदालसेनें पतीची सूचना मान्य केली. ती अलर्कास म्हणाली, ''बाळा, वडिलांच्या इच्छेनुसार खूप शूर हो. मित्रांना सुखी करून शत्रूंचा नाश कर. सदाचरणानें सर्व पृथ्वीचें राज्य केलेंस तर तूं अमर होशील. यज्ञयाग करणाऱ्या इहलोकींच्या देवांचें, ब्राह्मणांचें रक्षण कर. आप्तेष्टांच्या आकांक्षा पूर्ण कर. परस्त्रीकडे तुझी कधींहि नजर वळूं नये. नेहमीं यज्ञयाग करून देवाब्राह्मणांना संतुष्ट कर. तुझ्यावर प्रेम करणाऱ्या तुझ्या स्त्रियांना सुखी ठेव. गुरूचें आज्ञापालन करून उत्तम शिष्य हो. उच्च कुलाला भूषण ठरणाऱ्या स्त्रियांना तारुण्यांत आनंद दे व उत्तर आयुष्यांत वनांतील ऋषिमुनींना सुखी ठेव. अनेकांचें रक्षण करतांना तुला धारातीर्थी मरण येऊं दे. ''

अलर्क मोठा झाल्यावर मदालसेनें हळूहळू त्याला राजधर्मांचीं व वर्णधर्मांचीं कर्तव्यें समजावून दिलीं. चारित्र्य, सत्य व कायदा यांचें महत्त्व विशद करून सांगितलें. वयांत येताच अलर्काचा विवाह करण्यांत आला व त्याला यथाकाल मुलेंबाळेंहि झालीं. अलर्काला राज्याभिषेक करून ऋतध्वज अरण्यांत तपश्चर्येसाठीं निघाला. जातांना मदालसेनें अलर्कास सांगितलें, '' ज्या ज्या वेळीं प्रियजनांच्या विरहानें, शत्रूच्या विरोधानें, वैभवाच्या नाशानें किंवा स्वतःच निर्माण केलेल्या दुःखानें तूं दुःखी होशील तेव्हां मी दिलेल्या अंगठीवर कोरलेला संदेश वाच. त्याचें मनन कर. '' एवढें सांगून ती पतीबरोबर जाण्यास निघाली.

अलर्कानें खूप वर्षें यशस्वी रीतीनें राज्य केलें. पण त्याला मानसिक समाधान लाभेना. सुबाहु अरण्यांत वास करीत असतां त्याला अलर्काच्या मनःस्थितीची माहिती मिळाली. ससारी वृत्तींतून अलर्काचा बचाव करण्यासाठीं त्यानें एक योजना आखली. सुबाहूच्या सूचनेनें काशीच्या राजानें अलर्कावर स्वारी केली. अलर्काचा पराभव झाला व त्याच्या शहराभोंवतीं

शत्रूचा वेढा पडल्यानें तो अगदीं हताश झाला. आईनें दिलेल्या अंगठीची त्याला एकदम आठवण झाली व त्यावर कोरलेला संदेश तो वाचूं लागला. " संगति अगर सहवास प्रत्येकानें टाळला पाहिजे. जर तो टाळणें अशक्य असेल तर सत्संग हाच त्यावर एकमेव उपाय आहे. त्याचप्रमाणें वासनादि त्याज्य आहे. पण वासना समूळ नाहींशी करतां येणें अशक्य असल्यास मुक्तीची वासना धरणेंच इष्ट ठरेल. कारण ही वासना इतर वासना नाहींशा करण्याचा उपाय आहे. " मातेच्या या संदेशानें अलर्काचें मन शान्त झालें. लगेच दत्तात्रेय नांवाच्या एका महान् योग्यास तो भेटला व त्याच्याकडून वासनाक्षय करण्यासाठीं जरूर त्या योगसाधनेचे धडे त्यानें घेतले. मुक्तीची वाट दाखविल्याबद्दल त्यानें आपला भाऊ सुबाहु व काशीचा राजा या दोघांचेहि मन:पूर्वक आभार मानले. आनंदानें राज्यत्याग करून त्यानें अरण्याचा मार्ग धरला.

देवाहुति :— सांख्य तत्त्वज्ञानाचा प्रणेता कपिलमुनि याची आई देवाहुति ही पुराणांतील दुसरी नामवंत स्त्री. भागवत पुराणांत ( ३·२१-३३ ) असें सांगितलें आहे कीं, देवाहुति ही आद्य मानववंशाचा राजा स्वायंभुव मनु याची कन्या. जन्मापासूनच तिला योगप्रक्रियेचें ज्ञान झालेलें होतें. वयांत आल्यानंतर प्रजापति कर्दमाच्या व्यक्तिमत्त्वाची आणि योगिक सामर्थ्याची कीर्ति तिच्या कानीं आली व त्यालाच वरण्याचा तिनें निश्चय केला. संतति प्राप्त करून पितरांच्या ऋणांतून मुक्त व्हावें या कल्पनेनें योग्य पत्नीच्या शोधात कर्दम होताच. त्यानें प्रार्थना करून विष्णूस प्रसन्न करून घेतलें. स्वायंभूव मनूची मुलगी देवाहुति हिच्याशीं विवाह केल्यास कपिल नांवाचा पुत्र होईल असा खुलासा विष्णूनें केला. सरस्वती नदीच्या कांठीं कर्दमाचा आश्रम आहे हें समजताच देवाहुतीस घेऊन तिचे आईवडिल तेथें गेले व मोठ्या नम्रपणें त्यांनीं देवाहुतीस पदरांत घेण्याची ऋषिवर्यास विनंति केली. देवाहुती अतिशय देखणी होती. ती एकदा चेंडू खेळत असताना विश्वावसु गंधर्वानें आकाशयानांतून जातांना तिला पाहिली. तिचें अप्रतीम सौंदर्य पाहून तो ताबडतोब बेशुद्ध झाला. ही कथा कर्दमानें ऐकली होती. " गरोदर राहतांच तूं मला माझें तपस्वी जीवन स्वतंत्रपणें व्यतीत करण्यास परवानगी दिली पाहिजे " या

अटीवर त्यानें देवाहुतीशीं लग्न करण्यास संमति दिली. विवाह आटोपून मनु आपल्या पत्नीसह बर्हिष्मति राजधानीस परतला.

देवाहुतीनें आपलें पतिसेवेचें व्रत आरंभलें. स्वतःच्या सर्व वासना, गर्व, राग, लोभ वगैरे नाहींसे करून, इतकेंच काय पण स्वतःचें सर्व स्वत्व विसरून ती पतिजीवनाशीं एकरूप झाली. बऱ्याच कालानंतर कर्दम तिच्यावर प्रसन्न होऊन त्यानें तिला दिव्य दृष्टि प्राप्त करून दिली. तिलाहि स्वर्गीय जीवनाचा आस्वाद घेतां यावा यासाठीं त्यानें ही देणगी देवाहुतीस बहाल केली. त्याच्या कृपेनें प्रोत्साहन मिळून देवाहुतीनें त्याला गतकालांतील एका गोष्टीची आठवण करून दिली. कर्दमापासून देवाहुतीस पुत्रप्राप्ति होण्यास कर्दमानें मान्यता दिलेली होती. ही आठवण देतांच कर्दमानें योगबलानें देवाहुतीस मातृत्व प्राप्त करून दिलें. दुर्दैवानें देवाहुतीस सर्व मुलीच झाल्या. दुःखित मनानें ती पतीस म्हणाली, " आपण आपला शब्द खरा केला. पण मला पूर्ण संरक्षण मात्र आपण दिलें नाहीं. या सर्व मुलींना पति शोधण्यासाठीं आपल्याकडेच यावें लागेल. सर्व जणी विवाह होऊन आपापल्या घरीं गेल्यानंतर आणि आपणहि सोडून गेल्यानंतर मी परत निराधार होईन. इतकीं वर्षें मीं आपली सेवा करण्यांत घालविलीं पण परमतत्त्वाचें ज्ञान मला मिळालें नाहीं. त्यामुळें मी इन्द्रियसुखाच्याच पातळीवर राहिलें. दुर्जनांच्या संगतीनें संपूर्ण अधःपात होतो, पण सज्जनांच्या संगतीनें मुक्तीचा मार्ग सुलभ होतो. जें कर्म, धर्म, भक्ति अगर मुक्ति कशाचीच प्राप्ति करून देत नाहीं तें शेवटीं निष्फळ ठरतें. आपल्या तेजानें मी मोहित झालें, इतकी कीं मुक्तीचीहि जाण मला राहिली नाहीं. आपल्यासारखा ज्ञाता लाभूनहि मीं कोरडीच राहिलें. " हें ऐकून कर्दमानें तिला धीर देऊन सांगितलें कीं, विष्णु स्वतःच पुत्ररूपानें तिच्या पोटीं जन्म घेऊन तिला ज्ञानप्राप्ति करून देईल. यानंतर देवाहुतीनें विष्णूची अनन्यभक्ति करून त्यास प्रसन्न करून घेतलें. कपिलमुनींच्या रूपानें विष्णु तिच्या पोटीं जन्मास येऊन त्यांनीं तिला ब्रह्मज्ञान करून दिलें

कर्दमऋषि अरण्यांत निघून गेल्यानंतर कपिल मातेसह राहूं लागला एके दिवशीं देवाहुतीनें त्यास विनंती केली, " हे ज्ञानी पुरुषा, विषयवासनेंत

गुरफटून गेल्यानें मी अज्ञानांधकारांत चांचपडत आहे. अनेक जन्मांच्या पुण्याईनें तुझी मला प्राप्ति झाली आहे. तूंच मला ज्ञानदृष्टि प्राप्त करून या जीवनांतून मुक्त करूं शकशील. 'मी' आणि 'माझें' या भ्रामक कल्पनेंतून व देहासक्तींतून माझी सुटका करून जन्ममरणांच्या फेऱ्यांतून मला कायमचें मुक्त कर. पुरुष आणि प्रकृति यांचें खरें स्वरूप काय आहे हें जाणण्यासाठीं हे धर्मज्ञात्या, मी तुला शरण आलें आहे."

मातेची प्रामाणिक इच्छा जाणून कपिलमुनींनीं तिजपुढें सांख्ययोगाचें विवरण केलें. भक्तीचा महिमा सांगून कपिल म्हणाले, "फार प्राचीन काळीं मीं हा सांख्ययोग ऋषिमुनींना विशद करून पुरुषानें प्रकृतीपासून कसें अलिप्त व्हावें हें स्पष्ट केलें आहे." सांख्य व योगाची प्रक्रिया सांगत असतांना देवाहूतीनें कपिलास जे प्रश्न विचारले त्यावरून तिची प्रखर बुद्धिमत्ता दिसून येते. कपिलाच्या उपदेशानें देवाहुती ब्रह्मवादिनी बनून मनन-चिंतनाच्या साहाय्यानें ब्रह्मरूपांत विलीन झाली.

## पत्नी

वर सांगितलेल्या स्त्रियांशिवाय आणखीहि कांहीं आदर्श माता पुराणांत आहेत. पण एकंदरीनें पुराणकारांच्या अनेक कथांत पतिसेवा हा परमधर्म मानणाऱ्या स्त्रियांचाच उल्लेख प्रामुख्यानें वारंवार केलेला आढळतो. मार्कंडेय व पद्मपुराणांत एका महारोगी ब्राह्मणाची कथा आहे. एका सुंदर वारांगनेशीं संभोगसुख घ्यावें अशी त्यास इच्छा झाली. त्याच्या पत्नीला ही इच्छा समजल्यावर तिनें अंधाऱ्या रात्रीं बुरख्याखालीं लपवून पतीला त्या वारांगनेकडे नेलें व त्याची कामना पूर्ण केली. पतीच्या सुखासाठीं पत्नी किती परा-कोटीचा त्याग करते याचें हें उत्कृष्ट उदाहरण आहे. पद्मपुराणाच्या भूमि-खंडांत सुकलेसंबंधीं एक कथा दिली आहे. तिला एकटीला दारिद्र्यांत व दुःखांत टाकून तिचा पति तीर्थयात्रेस निघून गेला. ती एकटी असतांना प्रत्यक्ष कामदेव आणि देवाचा राजा इंद्र तिला भुलविण्यासाठीं आले, पण त्यांना ती वश झाली नाहीं. नरसिंह पुराणांत आणखी एक कथा आहे. सावित्री नांवाच्या एका ब्राह्मणाच्या पत्नीनें निव्वळ पतिसेवेनें योग-सामर्थ्य व आत्मज्ञान प्राप्त करून घेतल्याची हकीकत यांत दिलेली आहे. पुराणांतील पातिव्रत्याची

आदर्श उदाहरणें म्हणून सती व उमा यांचा नामनिर्देश प्रामुख्यानें केला जातो. या दोन स्त्रिया म्हणजे विशुद्ध चारित्र्य, दैवीगुण व पतिभक्ति यांच्या जणूं मूर्त प्रतिमाच समजल्या जातात.

सती :– वायुपुराण, लिंगपुराण, स्कंधपुराण, भागवतपुराण, ब्रह्मपुराण, शिवपुराण, बृहद्धर्मपुराण इत्यादि पुराणांत दिलेल्या सतीच्या कथेंत थोडाफार तपशिलाचा फरक दिसून येतो. या पुराणांवरून असें दिसतें कीं प्रजापति दक्षाच्या अनेक कन्यांपैकीं सती ही सर्वांत वडील कन्या होय. हिचा विवाह शिवाशीं झाला होता. दक्षानें एकदां एक मोठा यज्ञ आरंभिला. या प्रसंगीं त्यानें आपल्या सर्व जांवई-लेकींना बोलावून फक्त सती व शिव या दोघांनाच निमंत्रण केलें नाहीं. कारण वागण्याच्या चमत्कारिक तऱ्हेमुळें व विक्षिप्त कल्पनांमुळें शिवाबद्दल दक्षाचें मत फारसें चांगलें झालें नव्हतें. आपल्या सर्व बहिणी पतिसमवेत पित्याकडे यज्ञसमारंभास हजर राहण्यास गेल्या आहेत अशी बातमी सतीच्या कानीं गेल्यावर आई-वडिलांना व बहिणींना भेटण्याच्या उद्देशानें सती निमंत्रणावांचून आपणहूनच पित्याकडे गेली. शिवाबद्दल दक्षाची अशी वृत्ति कां आहे हेंहि तिला जाणून घ्यावयाचें होतें. तेथें गेल्यानंतर पित्याच्या बेफिकीर वृत्तीनें सतीला वाईट वाटलें. इतर सर्वांचें दक्ष सन्मानानें स्वागत करीत होता. पण शिवासाठीं साधें आसनहि मांडलें गेलें नाहीं. दुःखित मनानें सती बापाकडे गेली व शिवाला अशी अपमानास्पद वागणूक देण्याचें कारण तिनें त्याला विचारलें. यावर दक्षानें शिवाचा वेष, त्याचा परिवार, राहणी व विचारसरणी यातील विक्षिप्तपणाचें वर्णन करून स्वतःच्या वागण्याचें समर्थन केलें. पतीचा हा अपमान सतीला सहन झाला नाहीं. ती पित्यास म्हणाली, "शिव हा अजातशत्रु आहे. तो सर्वांचा आत्मा आहे. सर्वांना प्रिय आहे. त्याच्या जगांत शत्रु नाहीं व मित्रहि नाहीं. प्रत्येक देहधारी प्राण्यांत वात्सल्य करणाऱ्या या सत्त्वस्वरूपी शिवाचा तुमच्याखेरीज कोण द्वेष करील ? दुसऱ्याचा अतीव लहान गुणहि मोठा करण्याची सज्जनांची रीत असते. तुम्हांला मात्र त्यांचे दोष दिसले. शरीर म्हणजेच आत्मा असें मानणाऱ्या दुष्टबुद्धि लोकांचा महाजनांकडून कडक शब्दांत निषेध केला जातो तें योग्यच आहे. ज्या शिवाचें दोन अक्षरीं नांव घेतांच सर्व पापें भस्म

होतात त्या शिवाच्या नांवाचा तुम्ही तिरस्कार करावा हें खरोखर दुर्दैव म्हटलें पाहिजे. ज्याच्या चरणपदांना स्पर्श करतांच जगाचें दुःख निवारण होतें त्याच्याविरुद्ध तुम्ही बंड करतां? ज्याच्या चरणस्पर्शानें पवित्र झालेले पुष्पांचे मुकुट ब्रह्मा व इतर देव परिधान करतात त्यांना शिव स्मशानांत राहतो, अंगाला राख फासतो व गळ्यांत मृतांच्या कवट्यांच्या माळा घालतो हा गोष्टी माहीत नव्हत्या का? ज्या ठिकाणीं धर्मरक्षक शिवाची निंदा केली जाते अशा ठिकाणीं ताकद असेल त्यांनीं नालस्ती करणाऱ्यांच्या जिभा उपटून काढाव्यात, नाहींतर आपले कान तरी निदान बंद करावेत, हाच खरा धर्म होय. नवल्तहि पतिताचें अन्न पोटांत गेल्यास तें ओकून टाकल्यानें पापक्षालन होतें असें म्हणतात. शिवाच्या निंदकाची मुलगी या दृष्टीनें मीहि पापीच आहे म्हणून हा माझा देह नाहींसा करूनच मी या पापाचें परिमार्जन करीन." असें म्हणून सती खालीं बसली. शिवाचें ध्यान करून तिनें आपल्या देहांतील अग्नि प्रज्वलित केला व स्वतःचें भस्म करून घेतलें.

उमा :– उमेची कथाहि अनेक पुराणांतून व उपपुराणांतून दिलेली आढळते. या कथेवर कालिदासाच्या 'कुमारसंभवाची' बरीच छाप पडलेली दिसून येते. मत्स्य व इतर जुन्या पुराणांतील उमेची कथा व कालिदासाच्या कुमारसंभवाचें कथानक यांतील साम्य सर्वश्रुत असल्यानें येथें त्याची पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं. मत्स्य पुराणांत सांगितल्याप्रमाणें उमा ही हिमालयाची कन्या. तिचा शिवाशीं विवाह व्हावयाचा होता. शिवानें कामदेवाचें भस्म केल्यामुळें सौंदर्याच्या बळावर शिवाला आकर्षित करण्याबाबत उमा निराश झाली. शिवाला प्रसन्न करून घेण्यासाठीं तिनें खडतर तपश्चर्या करण्याचा निर्णय घेतला. आईवडिलांच्या विरोधास न जुमानतां उमा अरण्यांत गेली व तिनें शिवाला प्रसन्न करून घेतलें.

शैव्या :– इतर पौराणिक महिलांत शैव्या, सुनीति व मामिनी या विशेष उल्लेखनीय स्त्रिया आहेत. मार्कण्डेय पुराण व देवी भागवतांत सांगितल्याप्रमाणें शैव्या ही हरिश्चंद्र राजाची राणी. विश्वामित्राच्या शापानें राजावर अनेक संकटे आलीं असता राणी छायेसारखी त्याच्याबरोबर राहिली. राजाला ऋण-मुक्त करण्यासाठीं तिनें स्वतःला गुलामाच्या बाजारांत विकून घेतलें.

सुनीति :– विष्णुपुराण व इतर कांहीं पुराणांतील उल्लेखांनुसार सुनीति ही उत्तानपाद राजाची नावडती व उपेक्षित राणी आणि अढळ पद मिळविणाऱ्या बालध्रुवाची माता होती. राजाच्या मांडीवर बसण्याची इच्छा प्रदर्शित केल्यामुळें सुरुचीनें केलेला अपमान व राजानें दाखविलेली अनास्था याबद्दल एकदां ध्रुवानें आईकडे तक्रार केली. सुनीतीला हें ऐकून वाईट वाटलें. पण नैसर्गिक सवतीमत्सराच्या अधीन न जातां एक दीर्घ सुस्कारा सोडून ती आपल्या मुलास म्हणाली, " एका दृष्टीनें तूं दुर्दैवी आहेस. पण वाईट वाटून घेऊं नकोस. पूर्वपुण्याईनें तुला जें मिळायचें असेल तें कोणी काढून घेऊं शकणार नाहीं आणि जें तूं पूर्वसुकृतानें मिळविलेलें नाहींस तें तुला कोणी देऊं शकणार नाहीं. सिंहासन, छत्रचामर, हत्ती व घोडे मिळण्यासाठीं विशेष भाग्य लागतें. सुरुचीनें मागील जन्मीं पुण्य केल्यामुळें ती राजाच्या अनुग्रहास पात्र ठरली आहे. तिचा मुलगा उत्तम हाहि पूर्वपुण्याई घेऊन जन्मास आला आहे. तूं कमनशिबी आहेस. एक तर, मिळालें आहे त्यांत तुला समाधान मानलें पाहिजे, नाहींतर सुरुचीच्या रागाची एवढी खंत वाटत असल्यास अधिक पुण्य जोडण्याची धडपट केली पाहिजे. सुस्वभावी, सदाचरणी व सहृदय हो, म्हणजे उताराबरून पाणी जसें आपोआप वाहतें त्याप्रमाणें वैभवाचा ओघ तुझ्याकडे आपोआप वळेल." या समतोल आणि हृद्य विचारांचा ध्रुवावर योग्य तो परिणाम झाला. अरण्यांत जाऊन केलेल्या अखंड तपस्येनें या बालभक्तानें देवाला प्रसन्न करून घेतलें व भारतीय वाङ्मयांत आपलें नांव अजरामर केलें.

भामिनी :– मार्कण्डेय पुराणानुसार भामिनी ही अविक्षित राजाची पट्टराणी व राजा मरुत्ताची माता. नागांकडून कांहीं ऋषींना मृत्यु आल्यानें मरुत्ताची आजी वीरा हिनें सर्व नागांना मारून टाकण्याची त्याला आज्ञा दिली. हें नागांना समजतांच ते भामिनीकडे येऊन जीवदान मागूं लागले. भामिनीनें त्यांना अभय दिलें व मरुत्तास नागांना मारण्यापासून परावृत्त करण्याची अविक्षितास विनंती केली. पण ऋषींचें रक्षण हें राजांचें कर्तव्य असल्यामुळें मरुत्त आपल्या निश्चयापासून ढळेना. बाप व मुलगा यांचें युद्ध जुंपण्याचा प्रसंग आला. दोघांपैकीं एकजण मृत्युमुखीं पडेपर्यंत हें युद्ध

थांबणें शक्य नव्हतें. भामिनी मात्र शान्त होती. पति अगर पुत्र गमवावा लागला तरी नागांना संरक्षण देणें हें आपलें कर्तव्य आहे अशी तिची भावना होती. भृगु ऋषींनीं नागांकरवीं मारल्या गेल्या सर्व ऋषींना पुन्हां जिवंत केलें म्हणूनच हा भयंकर प्रसंग टळला.

## कुमारिका

**शर्मिष्ठा :–** विद्यमान पुराणांत अविवाहित मुलींचें समाजांतील स्थान व त्यांचीं कर्तव्यें यांचा क्वचितच उल्लेख असल्याचें यापूर्वीं आम्हीं सांगितलेंच आहे. दानवांचा राजा वृषपर्वन् याची कन्या शर्मिष्ठा हिचा उल्लेख नामवंत कुमारिकांच्या सदरांत प्रामुख्यानें करावा लागेल. महाभारतांतील शर्मिष्ठेच्या कथेचा शब्दशः अनुवाद करणाऱ्या मत्स्यपुराणांत सांगितल्याप्रमाणें शर्मिष्ठा ही दानवांचे गुरु शुक्राचार्य यांच्या एकुलत्या एक कन्येची–देवयानीची–सखी. देवयानी व शर्मिष्ठा त्यांच्या कांहीं मैत्रिणींसह एकदां जलक्रीडा करीत होत्या. पाण्याच्या बाहेर आल्यावर शर्मिष्ठेनें चुकून देवयानीचीं वस्त्रें परिधान केलीं. यावरून झुंपलेल्या भांडणांत शर्मिष्ठेनें रागानें देवयानीस "भिकाऱ्याची पोर" असें हिणावलें आणि तिला शेजारच्या एका खड्ड्यांत ढकलून दिलें. इतक्यांत शिकार करीत हिंडत असलेल्या ययाति राजानें तिला पाहिलें व मदत देऊन देवयानीस वर काढलें. मानी शर्मिष्ठेस हें न आवडून तिनें ययातीबद्दल वृषपर्व्याकडे तक्रार केली. इकडे शुक्राचार्यांना देवयानीचें समाधान करतां येईना. तेव्हां ते संतापून वृषपर्व्याकडे आले व शर्मिष्ठेमुळें दुखावल्या गेलेल्या देवयानीचें समाधान करण्यास त्यांनीं राजास बजावलें. "माझा शब्द न पाळल्यास तुझ्या राज्यांतून मी निघून जाईन" असा धाकहि त्यांनीं घातला. यामुळें राजा घाबरला व देवयानीकडे येऊन त्यानें तिची इच्छा विचारली. देवयानी रागानें म्हणाली, "शर्मिष्ठा माझी दासी झाली पाहिजे व माझा विवाह झाल्यावर इतर एक हजार सामान्य दासींप्रमाणें तिनें माझी सेवा करण्यास माझ्या सासरींहि आलें पाहिजे." ही शिक्षा ऐकून राजानें शर्मिष्ठेस तावडतोब बोलावणें पाठविलें. निरोप घेऊन गेलेली स्त्री शर्मिष्ठेस म्हणाली, "तुझ्यामुळें दानवांचे गुरु राज्य सोडून जावयास निघाले आहेत. सर्वांच्या हितासाठीं तू आतां शिक्षा भोगण्यास तयार हो. हे निरपराध मुली, या क्षणापासून तूं देवयानीची दासी झाली

आहेस." ही भयंकर शिक्षा ऐकल्यानंतरहि शर्मिष्ठा शान्तच होती. बचावाचा एक शब्दहि तिनें तोंडांतून काढला नाहीं. प्रजाजनांचें व सर्व दानववंशाचें हित तिला अधिक महत्त्वाचें वाटत असल्यानें स्वतःवर ही कठोर शिक्षा तिनें आनंदानें लादून घेतली. ती म्हणाली, " मी यावयास तयार आहें. शुक्राचार्य व देवयानी यांचा माझ्यामुळें इतरांवर रोष होऊं नये." लगेच तिनें एक हजार दासी बरोबर घेतल्या आणि त्यांच्यासमवेत ती देवयानीकडे येऊन - हजर झाली. नम्रपणें ती देवयानीस म्हणाली, " तुझ्या आज्ञेनुसार एक हजार दासींसमवेत मी आलें आहे. विवाहानंतर तूं जेथें जाशील तेथें आम्हीहि तुज-बरोबर येऊं." ही संधि साधून देवयानीनें शर्मिष्ठेची खूप निर्भर्त्सना केली. उपरोधानें ती शर्मिष्ठेस म्हणाली, " खुषमस्करी करून इतरांकडून देणग्या घेणाऱ्या भिकाऱ्याची मी मुलगी ! आणि ज्याच्यावर सर्वजण स्तुतिसुमनें उधळतात अशा महाराजांची तूं कन्या ! माझें दास्य तुला कसें जमणार ? " शर्मिष्ठा शान्तपणें उत्तरली, " दलितांचें रक्षण करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. आमच्या राज्यांतील सर्व प्रजाजनांच्या हितासाठीं मी पाहिजे तो त्याग कर-ण्यास तयार आहे." देवयानीचा राग शान्त होऊन ती पित्याबरोबर घरीं परतली. शर्मिष्ठेनें आपल्या कर्तव्यदक्षतेनें, त्यागानें व आज्ञाधारकपणानें सर्व भारतीयांच्या तोंडीं आपलें नांव अमर केलें.

पुराणकालीन स्त्रियांच्या कथा वाचतांना एक गोष्ट वाचकांनीं लक्षांत ठेवली पाहिजे. या प्रकरणांत उल्लेखिलेल्या स्त्रियांचीं चरित्रें ज्या जुन्या पुराणां-तून घेतलीं आहेत, तीं त्या काळच्या सामाजिक स्थितीचीं प्रातिनिधिक आहेत. काळाच्या ओघांत हिंदु समाजापुढें अनेक नवनवीन समस्या निर्माण झाल्या व स्त्रियांचें पूर्वीचें तेज आणि जिवंतपणा नष्ट झाला. पुराणवाङ्मय अशा लोकांच्या हातीं पडलें कीं, त्यांनीं त्यांतील खऱ्या महत्त्वाच्या गोष्टी गाळून टाकल्या. या वाङ्मयांत उपलब्ध असलेल्या कथावस्तूचा उपयोग करून नवीन कथाहि लिहिल्या गेल्या नाहींत. सावित्री व सीता यांचीं चरित्रें पुराणांतून पुन्हांपुन्हां आलीं आहेत, पण विशिष्ट काळाच्या कल्पनांशीं जुळतें असे फेर-फार त्यांत न केल्यानें त्या कथांतील निम्मेअधिक आकर्षण नाहींसेंच झालें.

---

# प्रकरण ११ वें



## संस्कृत विदग्ध वाङ्मयांतील महिला

भारताच्या बहुरंगी इतिहासाकडे नजर टाकल्यास जी एक गोष्ट मनावर ठसते ती ही की, कोणत्याहि थोर आणि भव्य कल्पनेची इमारत सत्य व शिव यांवरच आधारलेली आहे. अमर झालेल्या संस्कृत लेखकांनी आपल्या कलापूर्ण लेखणींतून याचाच पुरावा दिला आहे. या वाङ्मयाला राजाश्रय लाभला, जनतेची स्तुति लाभली तरीहि त्याच्या जनानी थाटांतून व संस्कृतींतून सत्य व शिवाचा साक्षात्कार झांकला नाहीं. कालिदासानें निर्माण केलेली अजाची अल्पायुषी पत्नी इन्दुमति ही आदर्श गृहिणी होती, सखी होती, सचिव होती आणि ललितकलांत पारंगत होती. परंतु ही एवंगुणविशिष्ट इन्दुमति प्रामुख्यानें सत्य आणि शिव यांची प्रतिमा आहे हें वाचकांस प्रथम परिणामकारक रीतीनें जाणवतें. मात्र आजच्या भारतीय समाजाची मनोरचना लक्षांत घेतां जुन्या आदर्शांचा पुरस्कार करणें किंवा आजचा समाज अवनत होत आहे असें मानणें थोडें धोक्याचें आणि धाडसाचें होईल. कारण आपल्या नायिका क्रान्तिकारक कल्पनाच्या अगर आधुनिक असाव्यात अशी कालिदासाची कधींच कल्पना नव्हती. एक गोष्ट मात्र निश्चित दिसून येते कीं, बौद्ध अगर बौद्धोत्तर वाङ्मयांत किंवा ' बृहत्कथा ' या प्राकृत कथासंग्रहांत स्त्रियांबद्दल ज्या हीन कल्पना चित्रित करण्यांत आलेल्या आहेत त्यांचा मागमूसहि कालिदासाच्या लिखाणांत आढळून येत नाहीं. कालिदासापूर्वी होऊन गेलेल्या बौद्धधर्मीय अश्वघोषाचें स्त्रियांसंबंधीं फारसें उदार मत दिसत नाहीं. स्त्रियांसंबंधीं अनुदार उद्गार काढणाऱ्या सर्व लेखकांचीं तोंडें परिणामकारक रीतीनें बंद करून त्यांचें सन्माननीय व्यक्तिमत्त्व समाजापुढें निर्भयपणें मांडणारा कालिदास त्या कालांतील एक प्रमुख कवि होऊन गेला यांत संशय नाहीं.

बौद्धांच्या काळांत वासनाक्षय व निवृत्ति यांचा समाजांत अतिरेक झाला होता. या प्रवाहाला प्रतिबंध घालण्याचें कार्य वात्स्यायनाच्या कामसूत्रानें केलें. सोज्ज्वळ वातावरणांत जीवनेच्छांची पूर्ति करण्याचा जो आदर्श कामसूत्रांत ( ४·३५ ) मांडला आहे त्याचेंच प्रतिबिंब कालिदासाच्या इन्दुमतीच्या जीवनांत वाचकांना दिसतें. त्या काळचें अर्थशास्त्र स्त्रियांना प्रतिकूल व पुरुषांना आपल्या दुष्ट राजकीय हेतूसाठीं स्त्रियांना फसविण्यास प्रोत्साहन देणारें होतें. सुसंस्कृत आणि प्रगत समाजाच्या जीवनाचें केन्द्र जें धर्मशास्त्र तें ' गृहदीप्ति ' म्हणून स्त्रीला मानाचें स्थान देत होतें तरी वैदिक ब्राह्मणांच्या कालापासून चालत आलेलें संततिसंवर्धनाच्या कार्याखेरीज इतर कोणतेंहि कार्य या शास्त्रानें स्त्रियांकडे दिलें नाहीं. कौटुंबिक खर्चावर नियंत्रण ठेवणें, धर्मकार्याची सिद्धता करणें व सैंपाक करणें हेंच स्त्रीचें इतिकर्तव्य ! सदासर्वदा तिनें पुरुषाच्या पालकत्वाखालीं वावरावें आणि चारित्र्यास कलंक लागेल असा कोणताहि सामाजिक संबंध जोडूं नये असा दंडक असे. अनाथ स्त्री असहाय असते असें महाभारत सांगतें, तर याच तत्त्वानुसार विधवांनीं स्वतःचें बलिदान करावें असें हर्षचरित पुरस्कारतें. संस्कृत विदग्ध वाङ्मयांत मात्र अगदीं अपवादात्मक का होईना पण प्रजोत्पादनाव्यतिरिक्त कामप्रेरणेच्या पूर्तीस स्थान दिलें आहे. थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास असें म्हणतां येईल कीं, या वाङ्मयाचा उद्देश धर्मशास्त्रास प्राधान्य देऊन कामशास्त्र व धर्मशास्त्र यांचा समन्वय घालणें हा आहे. अनेक संस्कृत कवींनीं स्त्रियांची मनोरचना वर्णन करतांना प्रेमभावना ही त्यांच्या जीवनांतील प्रमुख प्रेरणा म्हणून रंगविली आहे. यावरून त्यांचा कामशास्त्राबाबतचा सहानुभूतिपूर्ण दृष्टिकोन स्पष्ट होतो. हीच दृष्टि भरताच्या नाट्यशास्त्रांतहि आढळते. वृत्तानुरूप नायिकांचे प्रकार सांगतांना भरत धीरा, ललिता, उदात्ता व निभृता यांचा उल्लेख करतो. शेवटचे दोन प्रकार घरंदाज स्त्रियांत आढळतात व दुसरा व तिसरा प्रकार वारांगनांत आढळतो. संस्कृत ग्रंथकारांनीं इतिहास व लोककथा यांतून निर्माण केलेल्या प्रेमकथांवरून असा निष्कर्ष निघतो कीं, त्या काळांत मान्यवर पुरुषांचे पत्नीव्यतिरिक्त वेश्यांशीं अगर गणिकांशीं प्रेमसंबंध रूढ होते. या वाङ्मयांत आलेल्या वर्णनांवरून स्त्रियांचे खालील विशेष सांगतां येतील.

( १ ) प्रभुत्व अगर सत्ता गाजविणें ही स्त्रीची भूमिका नव्हे.

स्वतःच्या इच्छेनुसार आयुष्याची दिशा ठरविण्याचा जन्मसिद्ध हक्क स्त्रीला नाहीं. पुरुषाच्या आज्ञेंत राहून त्याच्या गरजा भागविणारी ती एक कार्यशक्ति आहे.

( २ ) शिव आणि सुंदर याकडे स्त्रीची नैसर्गिक प्रवृत्ति आहे. दुर्गुणी पुरुषांनाहि अनेक वेळां सच्छील स्त्रिया लाभतात. पण त्याचें मोठेपण त्यांच्या स्वतःच्या गुणांवरून मोजलें जातें. सत्यावर परमनिष्ठा ठेवून सत्याचा सतत निर्भयपणें पुरस्कार करणाऱ्या गांधारीचा अपवाद सोडल्यास भानुमति ( दुर्योधनाची पत्नी ), मंदोदरी ( रावणाची पत्नी ) व निकषा ( रावणाची माता ) या स्त्रिया सत्प्रवृत्त परंतु निष्क्रिय आहेत. कांहीं संस्कृत लेखकांनीं कैकेयीला सत्प्रवृत्त दाखविण्याचा प्रयत्न केला आहे, तर कांहींनीं सीतेनें लक्ष्मणाबद्दल दाखविलेला गैरसमज स्पष्ट करतांना, शूर्पणखेनें तिला पछाडल्यामुळें तिचा तसा समज झाल्याचें सांगून सीतेची तरफदारी केली आहे.

( ३ ) सहनशीलता, क्षमाशीलता व तपस्वी वृत्ति हे गुण स्त्रीत्वाचे निदर्शक आहेत. घरकामांत ती दासी आहे तर धर्मकार्यांत तिची भूमिका सहचारिणीची आहे. पृथ्वीमातेप्रमाणें क्षमेची ती प्रत्यक्ष मूर्ति आहे.

( ४ ) स्वामी विवेकानंदांनीं म्हटल्याप्रमाणें भारतीय कल्पनेंतील स्त्री ही सीता, उमा किंवा सावित्रीसारखी आहे. हे आदर्श पौराणिक कथांवर आधारलेले असून संस्कृत लेखकांनीं नवीन आदर्श घालून देण्याचा प्रयत्न क्वचितच केला आहे. जुन्या कल्पना घेऊन त्या आपल्या काव्यमय व वैशिष्ट्यपूर्ण भाषेंत मांडणें हें संस्कृत कवींचें कार्य आहे. नवीन काल्पनिक व्यक्तिरेखा रंगवून समाजाची टीका ओढवून घेण्यापेक्षां औचित्याच्या आधारानें जुनेंच उचलून धरण्याची प्रवृत्ति सर्व लेखकांत दिसून येते.

## कांहीं विशेष व्यक्तिरेखा

**सीता**:– संस्कृत साहित्यिकांना सर्वांत अधिक आकर्षित करणारी महिला म्हणजे सीता. प्रेमानें पतीशीं एकरूप होण्याचा भारतीय आदर्श तंतोतंत प्रत्यक्षांत उतरविणारी असा तिचा गौरव केला जातो. सीता नेहमीं

पतीच्या सुखासाठीं झटे, त्याच्या आवडीनिवडीशीं मिळतें घेई व त्याच्या सेवेस निरंतर तत्पर राही. पतिसेवा व पतिप्रेमानेंच ऐहिक व पारलौकिक पूर्णत्व प्राप्त होतें अशी तिची समजूत होती. तिच्यावर आलेल्या अनेक प्रसंगांचें चित्रण करून या लेखकांनीं तिचें आत्मबल प्रकट केलें आहे. सीतेची कथा रंगवितांना रामायण ग्रंथच सर्वांनीं आधारभूत मानला आहे. सीतेच्या महत्त्वपूर्ण जीवनास रामाच्या वनवासापासून सुरुवात होते. कर्तव्यापेक्षां पतिनिष्ठ प्रवृत्तीमुळेंच सीता रामाबरोबर वनांत जाण्यास तयार होते. दंडकारण्यांतील जनस्थानांत त्यांचें बराच काल वास्तव्य घडतें. या ठिकाणीं सीतेचा काळ खूप सुखांत जातो. कारण राम – तिचा मूर्तिमंत आनंद – तिजबरोबर असल्यानें ती सर्व आसमंत समाधानानें भरून टाकते. उत्तर-राम-चरितांत असा उल्लेख आहे कीं, " महाराज ! याच लताकुंजांत आपण सीतेच्या वाटेकडे डोळे लावून बसत होता. गोदावरींत जलक्रीडा करणाऱ्या हंसांचें निरीक्षण करीत बसल्यामुळें तिला येण्यास विलंब लागे. पण आपला काळजीग्रस्त चेहरा लांबून दिसतांच थोडी भयभीत होऊन एखाद्या कमल-दलाच्या देठाप्रमाणें असलेले आपले हात ती नम्रपणें जोडी. " पण या वन्य जीवनाचा आनंदहि तिला फार काल उपभोगतां आला नाहीं. दुष्ट रावणानें तिला पळविली. लंकेंतील अशोकवनांत असतांना रात्रंदिवस तिला रामाचा ध्यास लागलेला होता. एके दिवशीं राम विजयी होईल या एकाच आशेवर ती जगत होती. तिची अपेक्षा पूर्ण झाली. तिची सुटका होऊन ती पुन्हां राणीपदावर आरूढ झाली. पण लोकनिंदा व लोकापवाद टाळण्यासाठीं रामानें परत तिचा त्याग केला या वेळीं वनातून रामाला तिनें दिलेला संदेश रघुवंशांत पुढीलप्रमाणें दिला आहे—" नाथ, एके काळीं राज्यलक्ष्मीला लाथाडून तुम्हीं माझ्याबरोबर अरण्यवास पत्करलांत, त्या वेळीं मी विजयी झालें. पण तिला माझा मत्सर वाटला आणि मला बाहेर काढून आज ती विजयी झाली. मला पुत्रप्राप्ति झाल्यानंतर मी आपले शिणलेले नेत्र पलीकडच्या तेजस्वी सूर्यनारायणाकडे लावीन व कडक तपश्चर्या करून एवढीच प्रार्थना करीन कीं पुढच्या जन्मीं आपणच माझे स्वामी व्हा." तिला जुळे मुलगे झाल्यानंतर खरोखरच ती तपस्वी वृत्तीनें जगली. सर्वतऐवजी सीतेची सोन्याची प्रतिमा शेजारीं बसवून रामानें अश्वमेध यज्ञ केल्याची हकीकत

जेव्हां तिच्या कानांवर आली तेव्हां आपल्या स्वाभिमानाचें रक्षण झाल्याचें समाधान तिला त्यामळें. सीतेच्या कथेचा बाकीचा भाग दुःखद आहे. वास्तविक पाहतां कवीनें सीतेला वेगळा न्याय द्यावयास हवा होता. उत्तर-राम-चरिताचा कर्ता भवभूति "वाल्मीकीच्या महाकाव्याचा खरोखर हाच उद्देश असेल का ?" असें साशंकतेनें उद्गार काढतो आणि रामसीतेच्या मीलनानें आपल्या काव्याचा शेवट करतो.

## स्त्रियांचे आणखी कांहीं प्रकार

प्रेमानें मृत्यूहि जिंकतां येतो ही निव्वळ कविकल्पना नसून भारतीय संस्कृतींतील तें एक उघड सत्य आहे. सावित्रीनें आपल्या नितांत पतिभक्तीनें यमाला जिंकून आपली कीर्ति दिगंत केली आहे. सावित्रीची कथा प्रथम महाभारतांत येते. त्यानंतर रामायणांतहि तिचा उल्लेख आहे. पण आश्चर्य असें कीं, त्यानंतरच्या लेखकांनीं सावित्रीच्या कथेचा फारसा उपयोग केला नाहीं. 'छंद कौशिकां'त वर्णिलेल्या शैब्यंच्या हालअपेष्टा व 'नल-विलास' आणि 'नलाभ्युदय' या ग्रंथांत वर्णिलेली दमयंतीची दुर्दैवपरंपरा यांना भारतीय इतिहासांत तोड नाहीं. दक्षकन्या सती पतिप्रेमासाठीं स्वतःचें भस्म करते. तिनें बापाला ऐकविलेल्या पतिमहिम्यानें तिचें चरित्र अतिशय स्फूर्तिदायक बनलें आहे.

द्रौपदी :– निःशंकपणें जिला 'महाभारताची एकमेव नायिका' असें संबोधतां येईल, त्या द्रौपदीमध्यें अनेक व्यक्तिमत्त्वांचें संकलित दर्शन वाचकांस घडतें. मोठमोठ्या राजपुत्रांच्या शौर्यास तिनें आव्हान दिलें. होमरच्या हेलन-प्रमाणें ती अनेकांच्या वादांचें आणि युद्धांचें केन्द्र बनली. तिच्यामुळें जें युद्ध पेटलें त्यांत सर्व क्षत्रिय वंशाच्या वर्चस्वाचा शेवट झाला आणि तिच्यावर ओढवलेल्या संकटात तिनें प्रकट केलेल्या श्रद्धेमुळें ती एक महान् भक्त म्हणून परमेश्वरी कृपेस पात्र ठरली. नंतरच्या संस्कृत लेखकांनीं द्रौपदीचें व्यक्तिचित्र रंगवितांना एक अतिशय सन्मान्य व प्रतिष्ठित राणी, पतिव्रता आणि कुलाच्या इभ्रतीस प्राणापलीकडे जपणारी एक स्वाभिमानी स्त्री हेच तिचे गुण अतिशय उत्कटतेनें रेखाटलेले आहेत.

बंदुकीच्या दारूप्रमाणें तिच्या सात्त्विक संतापाचा केव्हां स्फोट होईल याचा नेम नसे, पण जेव्हां जरूर असेल तेव्हां ती अत्यंत मृदु व प्रेमळहि होऊं शके. किंबहुना तिच्या अंगची सहनशीलता व प्रेमळपणा वाचकांस विलोभनीय वाटतो. कुरुक्षेत्रावरील युद्धासाठीं पांडवांचीं मनें तयार करतांना तिनें दाखविलेलें तेज, कणखरपणा आणि प्रत्यक्ष युद्ध सुरूं होण्याच्या दिवशीं तिच्या मनांत चाललेली भावनांचीं तीव्र आंदोलनें यांचें बहारदार वर्णन अनुक्रमे किरातार्जुनीय व वेणीसंहार यांत वाचकांस आढळेल. प्रसंगांत सांपडल्यामुळें पांडवांसारख्या शूर योद्धयांची सुद्धां पडखाऊ मनोवृत्ति तयार होते हें पाहून द्रौपदीस मनस्वी दुःख होतें. युद्धांत दिव्य अस्त्रांचा उपयोग करण्याच्या वेळीं अर्जुन द्रौपदीस भेटावयास जातो तेव्हां ती त्याला मनःपूर्वक निरोप देते. हें शुभकार्य निर्विघ्नपणें पार पडावें म्हणून भरलेल्या डोळ्यांतून अश्रु खालीं सांडूं नये यासाठीं ती आपले मिटलेले डोळे उघडीत नाहीं. तिचा शेवटचा अर्थपूर्ण दृष्टिक्षेप हृदयांत सांठवून अर्जुन बाहेर पडतो. युद्ध सुरूं होण्याच्या वेळीं भावनाप्रधान भीमाचें शौर्यहि तिला जागें करावें लागतें. पत्नीच्या यातनांनीं भीमाचें हृदय पिळवटून निघतें आणि युधिष्ठिराच्या निष्क्रियतेचा धिक्कार करून तो अशी प्रतिज्ञा करतो कीं, " मी कौरवांना जमीनदोस्त करून धूळ चारीन, दुष्ट दुःशासनाला मारून त्याचें रक्त प्राशन करीन आणि माझी गदा दुर्योधनाच्या मांडीचा चुराडा करून टाकील." ( वेणीसंहार )

## परस्पर-विरोधी व्यक्तिचित्रें

संकटकालीं अतिशय अस्वस्थ होणाऱ्या द्रौपदीचें चित्र इतर क्षत्रिय स्त्रियांशीं विरोधी असल्याचें सूक्ष्म दृष्टीच्या वाचकांस तावडतोब दिसून येईल. श्रीकृष्णाचें सान्निध्य व आठवण सतत असावी म्हणून सुखापेक्षां संकटपरंपराच कुंती अधिक पसंत करते. या जन्मांतील दुःखें हीं गतजन्मीं केलेल्या कर्मांचीं फळें आहेत हें लक्षांत ठेवून कोणत्याहि प्रसंगांत गांधारी आपली मनःशान्ति ढळूं देत नाहीं. हर्षवर्धनाची बहीण राज्यश्री ही संकटांनीं निराश व हतबल होऊन आत्मत्यागास तयार होते ( हर्षचरित ). श्रीकृष्णाची बहीण व अर्जुनाची पत्नी सुभद्रा ही शालीन पण तडफदार आहे. हेच दोन गुण सौम्य स्वरूपांत सत्यभामेच्या स्वभावांतहि दिसतात ( पारिजात-हरण ). स्वप्रसुख-

प्रस्थापन व राजकृपेबद्दल असहिष्णुता हे देवयानीचे स्वभावविशेष (शर्मिष्ठा-ययाति व शर्मिष्ठा—परिणय) गरुडाच्या मातेवर (विनतेवर) जुलूम करणाऱ्या कद्रूंतहि प्रकट होतात. महाभारतानें निर्माण केलेल्या या स्त्रिया त्या काळच्या स्त्रीजीवनाच्या कल्पनांस धरून आहेत. संस्कृत विदग्ध वाङ्मयाच्या काळांत ज्येष्ठ पत्नीनें कनिष्टेवर नियंत्रण ठेवण्याची कल्पना रूढ दिसते. इतकेंच नव्हे तर कनिष्टेस ज्येष्ठेची दासी म्हणूनहि वागविलें जाई (प्रेष्या). महाभारतांतील द्रौपदी व सुभद्रा यांचे संबंध कांहींसे अशाच स्वरूपाचे होते. सर्व संस्कृत वाङ्मयांत चित्रित केलेल्या स्त्रियांची दोन प्रकारांत विभागणी करतां येईल. एका प्रकारांतील स्त्रियांत आत्मनिष्ठा व तडफ यांचा विग्रह दृष्टीस पडतो, तर दुसऱ्या प्रकारच्या स्त्रियांत तेजस्वी निवृत्ति व विलोभनीय मार्दव यांचा सुंदर संगम झालेला आढळून येतो. दुसऱ्या प्रकारच्या स्त्रियांसारख्या स्त्रिया जगाच्या पाठीवरील वाङ्मयांत भारताखेरीज इतरत्र क्वचितच आढळतात.

पार्वती :— वर उल्लेखिलेलें दुसरें स्वभाववैशिष्ट्य हिमालयकन्या पार्वती हिच्यांत उत्कृष्ट रीतीनें प्रकट झालेलें दिसतें. दृढनिश्चय, स्थैर्य व चिकाटी म्हणजेच पार्वती असें यथार्थतेनें म्हणतां येईल. तिची प्रेमभावना नितांत भक्तींत विलीन होते. तारुण्यांत भारदस्तपणा दिसतो आणि पावित्र्यांत विकार एकजीव होतात. कालिदासानें रेखाटलेली पार्वती वेलीप्रमाणें नाजूक आहे, पण वज्राहून कठोर आहे. मानवांतील अपूर्णता तिच्यांत असूनहि ती दिव्य व दैवी असल्याचा प्रत्यय वाचकांस येतो. संन्यासी वृत्तीच्या शिवाला शेवटीं ती आपल्या मानवसुलभ प्रेमानें कशी जिंकते ही कथा सर्वश्रुत असल्यानें येथें तिची पुनरावृत्ति करण्याची आवश्यकता नाहीं. प्रेम आणि सौन्दर्य यांच्या मानवी व अतिमानुष जगांत खेळ करणाऱ्या कामदेवाचा वध केल्यानंतर शिवाला जिंकण्यास हीं आयुधें निकामी होतात. तरीहि निराश न होतां पार्वती कडक तपश्चर्येनें शिवाला आपलेसें करून घेते. यावेळीं संन्यस्त वृत्ति बाजूला ठेवून शिव सुहास्यवदनानें व सौजन्यानें तिचें स्वागत करतो. आध्यात्मिक कुंचल्यानें रंगविलेली मानवी प्रेमाची संस्कृत वाङ्मयांतील ही कथा अद्वितीय आहे यात शंकाच नाहीं.

महाश्वेता :— स्वतःच्या औद्धत्याचीं फळें भोगण्यासाठीं ज्याला दोन

जन्म घ्यावे लागले त्या पतीला आपल्या पुरश्चरणानें परत मिळविणारी दुसरी महिला म्हणजे महाश्वेता. बाणभट्टानें कादम्बरींत वर्णिलेली महाश्वेता उमेसारखी दृढनिश्चयी असूनहि तिच्यांत शृंगाराचें रसिकत्व आहे. मार्कण्डेय पुराणांतील मदालसेशीं महाश्वेतेचें बरेंच साम्य आहे. ही कथा लिहितांना बृहत्कथेंतील सुमानस आख्यानहि बाणाच्या मनांत असावें असें दिसतें. गंधर्व आणि अप्सरा यांची कन्या असून महाश्वेतेची वृत्ति मानवी भावनांशीं अधिक जुळती आहे. तिच्यांतील तडफेमुळें व उमेशीं असलेल्या साम्यामुळें कादम्बरीच्या नायिकेपेक्षांहि महाश्वेताच वाचकांच्या डोळ्यांत अधिक भरते. जेथें तिचा परागंदा झालेला प्रियकर तिला प्रथम भेटतो त्या अच्छोद सरोवराच्या कांठीं ती दीर्घकाल त्याची मार्गप्रतीक्षा करीत असते. कारण पुन्हां तेथेंच त्याची आणि तिची भेट होईल अशी दिव्य वाणी तिच्या कानीं येते. उच्चकुलीन महाश्वेतेची व पुंडरीक नांवाच्या तेजस्वी ऋषिकुमाराची एकदां अकस्मात् भेट होते. तिच्या सौंदर्यानें वेडा झालेला पुंडरीक महाश्वेतेचा लाभ होण्यापूर्वीच झुरून मरण पावतो. आपल्या प्रेमाचें प्रतीक म्हणून तो महाश्वेतेस एक पारिजातपत्र व जपमाळ पाठवितो. प्रेमविव्हल झालेली महाश्वेता संन्यासिनी बनते. पुंडरीकास प्रधानपुत्राचा पुनर्जन्म येतो. हा प्रधानपुत्र सरोवराच्या कांठीं असलेल्या तपस्विनी महाश्वेतेस पाहून मोहित होतो व आपलें प्रेम व्यक्त करतो. पुंडरीकाशीं एकनिष्ठ असलेली महाश्वेता अर्थातच प्रधानपुत्राचा अव्हेर करते. पुन्हां पुन्हां प्रधानपुत्रानें केलेल्या पोपटपंची प्रेमालापांचा राग येऊन " तुला पोपटाचा जन्म येईल " असा महाश्वेता त्यास शाप देते व त्यानुसार प्रधानपुत्रास पुन्हां पोपटाचा जन्म प्राप्त होतो. शेवटीं खूण पटून त्यांचें पुनर्मीलन होतें.

शकुन्तला :– संस्कृत वाङ्मयांतील अनेक स्त्रिया सर्वस्वी मानवी नाहींत. सीतेच्या जीवनांतील पुष्कळशा घटना सामान्य असल्या तरी तिचा जन्म धरणीमातेपासून झालेला आहे. द्रौपदी यज्ञकुण्डांतून प्रगट झाली. उमा ही दिव्यत्वाचा स्पर्श झालेल्या हिमालय पर्वताची कन्या आणि महाश्वेता ही गंधर्वकन्या. फक्त शकुन्तला मात्र या नियमाला अपवाद आहे. शकुंतलेचें जीवन म्हणजे शृंगारिक प्रेमाची एक अमर कथा आहे. स्वर्गीय अप्सरेच्या पोटीं जन्माला येऊनहि तिचें संपूर्ण जीवन इहलोकांतील मानवांनींच घडविलें. ती चुका करते आणि त्यांचे परिणाम भोगते. या भोक्तृत्वांतून तिची मान-

सिक उन्नति झाल्यामुळें असामान्य महिलांच्या मालिकेंत तिचें नांव ओंवलें जातें. स्त्रीसुलभ भावनांचा वारसा शकुन्तलेनें मातेकडून आणलेला असतो. अनुवंश व तिला लाभलेलें वातावरण परस्परविरोधी असते. तिच्या बोलण्यांत कांहीं वेळां तुटकपणा तर कांहीं वेळां असंस्कृतताहि दिसते. तिचे नेत्रकटाक्ष, प्रेमाचें संभाषण व दुष्यंताच्या प्रथम भेटीच्या वेळचा तिचा संभ्रम पाहिल्यानंतर वाचकांना पुढील घटनांची कल्पना येते. राज्याकडे परत गेल्यानंतर दुष्यन्त तिला नेण्याची व्यवस्था करीत नाहीं. यामुळें अस्वस्थ झालेली शकुन्तला अतिथिसत्कारांत चूक करते व हा अतिथि दुर्वास ऋषि असल्यानें तो तिला शाप देऊन भरपूर शिक्षा भोगावयास लावतो.

" जिचें मन प्रियकराच्या विचारांनीं व्यापलें आहे व जिच्या हातून माझ्यासारख्या अतिथीकडे दुर्लक्ष झालें आहे तिचा प्रियकराहि तिला विसरेल. दारु प्यालेला मनुष्य ज्याप्रमाणें स्वतःची वडबड धुंदी उतरल्यानंतर विसरतो त्याप्रमाणें दुष्यन्ताहि येथें बोललेलें सर्व विसरून जाईल " या शब्दांत दुर्वास आपली शिक्षा फर्मावितो. या शापानुसार दुष्यन्त भर दरबारांत तिचा अपमान व दुष्कीर्ति करून तिच्या सर्व भावना धुळीस मिळवितो. जशी अप्सरेची तशीच ती एका योग्याची कन्या असल्यामुळें राजाच्या अपमानानें तिचा अभिमान डिवचला जातो व ती चिडते. तिच्या कठोर वाक्ताडनाचा कांहींच परिणाम न झाल्यामुळें तिची आई तिला घेऊन जाते. आंगठी परत मिळतांच दुष्यन्ताच्या पूर्व स्मृति जागृत होतात व पश्चात्तापानें तो विनम्र होतो. इकडे मारिच ऋषींच्या आश्रमांत दिवस कंठणारी शकुन्तलाहि अनेक संकटांना तोंड देत असते. " संतति हा माता-पित्यांना एकत्र आणणारा एकच सामर्थ्यवान् दुवा आहे " हा प्रेमाच्या राज्यांतील महत्त्वाचा सिद्धान्त कालिदास या ठिकाणीं आपल्या कौशल्यपूर्ण शैलीनें वाचकांपुढें मांडतो. दुष्यन्त ज्येव्हां कालांतरानें शकुन्तलेस पाहतो तेव्हां आश्चर्यानें तो स्वतःशींच म्हणतो, " धुळीनें मलीन झालेली, वयस्क दिसूं लागलेली, तपश्चर्येनें जिचें शरीर थकलेलें आहे अशी, जिचा केशपाश मोकळाच मानेवर रुळत आहे ती ही शकुन्तला दीर्घ काल एकटी राहूनहि अजून माझ्याशीं एकनिष्ठ आहे ! तिचें माझ्यावर अजून प्रेम आहे ! "

राजाला आपल्या बेलगाम वृत्तीचा पश्चात्ताप होतो. मोकळ्या मनानें

तो आपली चूक कबूल करतो. दोघांचें पुनर्मीलन होऊन मुलाच्या आधारानें त्यांच्या वैवाहिक जीवनाची इमारत पुन्हां भक्कम पायावर उभी राहते.

**वासवदत्ता** :– वासवदत्ता ही उदयन राजाची सुप्रसिद्ध राणी. पत्नी म्हणजे पतीची सचिव, सखी व शिष्या. हे त्या काळचे स्त्रीजीवनाचे आदर्श प्रत्यक्षांत जगण्याचें भाग्य वासवदत्तेस लाभलें होतें. तिच्या व्यक्तिमत्त्वांत भावनोत्कटता व सेवावृत्ति विशेषत्वानें प्रकट होतात. कांहीं कवींनीं आणि नाटककारांनीं पद्मावती, सागरिका आणि प्रियदर्शिका या राण्यांशीं तिची तुलना करून व विरोध दाखवून वासवदत्तेच्या व्यक्तिमत्त्वांतील विशेष चित्रित केले आहेत. भासाच्या दोन नाटकांपैकीं एका नाटकांत वासवदत्तेभोंवतींच सर्व घटना गुंफल्या आहेत. यौगंधरायणाच्या धोरणाचा विजय दोन कारणांनीं होतो. एक वासवदत्तेचा स्वतःच्या कर्तृत्वावरील विश्वास आणि तिनें स्वयंप्रेरणेनें त्याला केलेली मदत व दुसरें परिस्थिति. विश्वासु व मान्यवर दासीची भूमिका पत्करल्यानंतर पद्मावतीच्या विवाहाच्या योजना तिला आंखाव्या लागतात आणि इतरहि अवघड कार्यें अंगावर घ्यावीं लागतात. विरहदुःखाबद्दल ती फक्त आपल्या दुर्दैवास बोल लावते. समुद्रगृहाबाबत घडलेल्या घटनांनीं तिला समाधान वाटतें. कारण या प्रकरणांत पतीची तिजविषयींची निष्ठा व आदर सिद्ध होतो. आपली प्रिय व आदरणीय सवत म्हणून वासवदत्ता पद्मावतीचा गौरव करते. यावरून मोठ्या, उच्चकुलीन व नामवंत घराण्यांत बहुपत्नीत्वाबद्दल कोणता दृष्टिकोन होता हें दिसून येतें. वासवदत्ता व पद्मावती एकमेकींशीं प्रेमानें वागतात, पद्मावती तिला योग्य तो मान देते. पद्मावतीबद्दल वासवदत्ता जो उदार व सहानुभूतिपूर्ण दृष्टिकोन ठेवते त्यामुळें आणि स्वतःचीं दुःखें ती ज्या धिम्या वृत्तीनें सहन करते त्यामुळें नाटकाचा सुखपर्यवसायी शेवट होऊं शकतो. स्त्रियांनीं पतिनिष्ठेसाठीं स्वतःच्या जीवनाशीं व पतीच्या इतर पत्न्यांशीं किंबहुना अभिसारिकांशींहि तडजोड केल्याचीं अनेक उदाहरणें संस्कृत विदग्ध वाङ्मयांत आहेत. पतिसेवेच्या जाज्वल्य कल्पना महाकाव्यांच्या कालापासूनच प्रचलित आहेत. मनोरमा, विनयवती किंवा सागरिका यांच्या कथा वरील कल्पनेची सत्यता पटवितात. कित्येक वेळां राजाच्या विवाहित पत्नीइतकाच राजाच्या या प्रेयसीबद्दलहि आपल्याला म्हानुभाव वाटतो.

वसंतसेनाः—रक्तांतील सद्गुण प्रतिकूल परिस्थितींतहि झांकत नाहीं ही गोष्ट भासानें 'दरिद्र-चारुदत्त' व शूद्रकानें 'मृच्छकटिकांत' वसंतसेनेचें जें सोज्वळ चित्र रंगवलें आहे त्यावरून सिद्ध होतें. चारुदत्त हा प्रथम श्रीमंत पण नंतर धंदांत खोट येऊन दरिद्री झालेला एक ब्राह्मण असतो. त्यांच्या आणि वसंतसेनेच्या मृच्छकटिकांतील प्रेमकथेवरून पुरुषांच्या विवाहबाह्य गणिका-संबंधाबद्दल त्या वेळच्या समाजाचा दृष्टिकोन कसा होता याची कल्पना येते. कामसूत्र व अर्थशास्त्रांतहि या सामाजिक दृष्टिकोनास पुष्टि मिळते. संस्कृत *विदग्ध वाङ्मयांतील उल्लेखांवरून गणिकांच्या प्रेमासंबंधीं त्या काळच्या समाजांत* विरोध अगर अनादर दिसून येत नाहीं. शकाराच्या अमानुष व गलिच्छ प्रचारानंतरहि आपल्या पवित्र प्रेमाचा चारुदत्तानें स्वीकार केलेला पाहून वसंत-सेनेला समाधान वाटतें. चारुदत्ताशीं झालेल्या पहिल्याच भेटींत आपली दागिन्यांची पेटी त्याच्या स्वाधीन करणें, धर्मकार्यांबद्दल आस्था दाखविणें, प्रमुख दासीला तिच्या कामगिरीबद्दल उदार देणगी देणें, विलोभनीय मातृत्वा-संबंधीं प्रसंगोपात्त उद्गार काढणें, चारुदत्ताच्या पत्नीबद्दल नितान्त आदर दाखविणें व तिच्या प्राणांतिक यातनांत मदतीचा हात पुढें करणें या वसंतसेनेच्या सर्व गोष्टी पाहिल्या कीं ती नुसती गणिका नव्हती तर एक थोर स्त्री होती अशी वाचकांची खात्री पटते. "आपला प्रियकर एखादा युवराज आहे कीं तत्सम एखादा थोर पुरुष आहे?" अशी दासीनें विचारणा करतांच वसंत-सेना तिला सांगते, "हा प्रश्न खऱ्या प्रेमाचा आहे, प्रेमाचा बाजार मांडण्याचा नाहीं." इतर श्रीमान् व्यापाऱ्यांचीं मुलें सोन्याच्या गाड्या घेऊन खेळतात हें पाहून मातीची गाडी बनवून खेळणाऱ्या चारुदत्ताचा मुलगा हिरमुसला होतो. त्याची समजूत घालून वसंतसेना म्हणते, "बाळ, वाईट वाटून घेऊं नकोस. आपणहि तशीच गाडी आणूं." चारुदत्ताच्या मुलाची दाई वसंतसेनेची ओळख त्याची 'आई' अशी करून देते. यावर मुलगा दाईला म्हणतो, "तूं खोटें सांगतेस. माझी आई असे मूल्यवान् दागिने कसे घालील?" हे भेदक उद्गार ऐकून तावडतोब सर्व दागिने त्याच्या हातांत देत वसंतसेना म्हणते, "आतां तरी मला तुझी आई म्हणशील ना? जा, तूं सोन्याची गाडी आण." जीवनांतील अनेक अशुभ व हीन घटना पाहूनहि तिची सात्त्विक वृत्ति गलिच्छ बनत नाहीं. चारुदत्तानें एके ठिकाणी

म्हटल्याप्रमाणें एखाद्या देवतेप्रमाणें ती वंदनीय वाटते. वासना व सदसद्विवेक-बुद्धि यांचा संगम तिच्या व्यक्तिमत्त्वांत झालेला दिसून येतो. सारासार-विचारानें ती विनम्र बनते, तर नैसर्गिक वासनेंतून तिच्या निष्प्रयत्न प्रेमाचा उदय होतो.

दमयन्ती :– ' नैषध-चरितांत ' दिलेल्या दमयन्तीच्या वर्णनांतून एका असामान्य बुद्धिमतीचें दर्शन वाचकांना घडतें. राज्याबाहेर पडल्यापासून तिची व नलराजाची पुनर्भेट होईपर्यंतचा कथाभाग या पुस्तकांत दिलेला आहे. हा भाग वाचकांना फारसा परिचित नाहीं. पण वनवासाच्या यातना सहन करणारी धीरवृत्ती दमयंती सीतेची आठवण करून देते. या ग्रंथापूर्वी लिहिल्या गेलेल्या ' नल-चम्पू ' या ग्रंथांतहि दमयंतीच्या जीवनांतील हा खडतर काळच ग्रथित केला आहे. ' नल-चम्पू ' वाचीत असतांना दमयंतीच्या समयसूचकतेची व कुशाग्र बुद्धिमत्तेची वाचकांवर छाप पडते ( ३.२८ व ७.४६ ). तिचें संभाषण-कौशल्य अतिशय आकर्षक आहे. कृत्रिम स्वरूपाच्या या काव्य-ग्रंथांतील प्रत्येक घटनेंत दमयन्तीच्या बुद्धीची चमक दिसून येते. हंसाबरोबर निरोप देतांना व स्वयंवरप्रसंगीं देवांनीं गोंधळांत टाकल्यानंतर नलाला शोधून काढतांना तिच्या कल्पकतेची साक्ष पटते. नल-दमयन्तीच्या या शृंगारिक व भावनापूर्ण प्रेमकथेंत खरा रंग दमयंतीच्या कुशाग्र बुद्धिमत्तेमुळेंच भरला जातो.

बुद्धीचें चापल्य व प्रखरता हे गुण एखाद्याला अभ्यासानें विकसित करतां येतील; पण शहाणपण, निष्ठा व सौजन्य ह्या गुणांची वाढ करण्यासाठीं अनुभवाचा सखोल विचार व्हावा लागतो. संस्कार आणि शिक्षण ह्या गुणांचा परिपोष करीलच असें हमखास सांगतां येणार नाहीं. ' शंकर-दिग्विजयांत ' उल्लेखिलेली मंडनमिश्राची तरुण पत्नी उभयभारती उर्फ शारदा ही आपल्या विद्वत्तेनें व वादविवादपटुत्वानें वाचकांस दिपवील. सु-प्रसिद्ध कवि व टीकाकार राजशेखर याची गुणवती पत्नी अवंतिसुंदरी गांभीर्य व विद्वत्तेपेक्षां आपल्या प्रमुखत्वानें व आग्रही वृत्तीनें वाचकांवर छाप पाडते. पुस्तकी ज्ञानास व्यवहारज्ञानाची जोड मिळाल्यास लाभ होतो हें खरें असलें तरी ' मालती-माधवांतील ' कोमलहृदयी बौद्ध भिक्षुणी कामंदकी जेव्हां प्रेम-प्रकरणांत आपल्या ज्ञानाचा व बुद्धिकौशल्याचा उपयोग करूं लागते तेव्हां

वाचकांस तिची कींव येते. इतकेंच काय पण प्रत्यक्ष सरस्वतीलाहि आपल्या विद्येचा गर्व झाल्याबरोबर शापरूपानें प्रायश्चित्त भोगावें लागलें हें हर्ष-चरितकारांनीं नमूद करून ठेवलें आहे. अत्रिमुनींची एकनिष्ठ व तपस्वी पत्नी अनसूया आणि अगस्त्यांची याच असामान्य गुणांनीं युक्त असलेली पत्नी लोपामुद्रा आपल्याला खरी स्फूर्ति देत नाहींत. नम्रता, बुद्धिमत्ता, सहृदयता, विवेक व ज्ञान या सर्वांच्या साहाय्यानें त्रिलोकीं मांगल्याची पखरण करणारी ' कुमारसंभव ' आणि ' उत्तररामचरितां ' तील अरुंधती मात्र एवढ्या दीर्घ कालानंतरहि भारतीयांचें एकमेव स्फूर्तिस्थान बनलेली आहे. तिची प्रेमपूर्ण नजर वसिष्ठांवर एकसारखी खिळलेली असते. छायेसारखी ती त्यांच्या आसपास राहते. ऋषि ( वसिष्ठ ) यज्ञांतील पवित्र अग्नीप्रमाणें तेजःपुंज भासतात व ती ( अरुंधती ) म्हणजे जणूं अग्निभार्याच ( स्वाहा ). एखाद्या निपुण पर्यवेक्षिकेप्रमाणें देव व मानव यांना वैवाहिक रज्जूंनीं एकत्र बांधणें व या मीलनावर आपलें शिक्कामोर्तब करणें हें कार्य अरुंधति अविरतपणें करीत आहे. सीतेबद्दल प्रेमादर व्यक्त करतांना "गुणाः पूजास्थानं गुणिषु न च लिंगं न च वयः " हें ती जाणते. ' मेणाहून मऊ पण वज्राहून कठोर ' अशी तिची मनोरचना तिला श्रेष्ठपद प्राप्त करून देते.' ललित-माधवां ' त पावित्र्यानें सुपरिचित झालेली अरुंधती राधेच्या शीलाची चांचणी घेऊन आशीर्वाद देते. ' कलंक-मोचना ' सारख्या अनेक संस्कृत ग्रंथांत वैष्णव ग्रंथांप्रमाणें स्त्रीवरील कलंकाची छाननी करून तिची निष्कलंकता सिद्ध करणें हाच उद्देश दिसून येतो.

**राधा** :– भागवत पुराणापासून स्फूर्ति घेतलेल्या वैष्णव भक्तांनीं व कवींनीं राधा-कृष्णांच्या चरित्रांत वेगळेंच नावीन्यपूर्ण रंग भरण्याचा प्रयत्न केला आहे. तात्त्विक दृष्टीनें जेव्हां आठ प्रकारच्या पाशांचें वर्णन केलें जातें तेव्हां त्यांत स्त्रियांच्या बाबतींत लज्जा, कुल व शील यांचा प्रामुख्यानें अंतर्भाव केला जातो. राधेच्या कृष्णविषयक प्रेमांतहि जगद्दृष्ट्या ह्याच अडचणी उभ्या होत्या. राधा-कृष्ण व कृष्ण-गोपी यांच्या कथांत जेथें काम-चेष्टांचीं वर्णनें आलीं आहेत तेथें राधेबद्दल हे प्रश्न वाचकांच्या मनांत उभे राहतात ही वस्तुस्थिति नाकारतां येणार नाहीं. नंतरच्या वाङ्मयांत मात्र राधा व कृष्ण यांचा वियोग व त्यांतून निर्माण झालेलें कारुण्य यावर अधिक भर देण्यांत आला आहे. द्वारकेंत असतांना राधेच्या व गोपींच्या सहवासांत

यमुनाकांठीं घालविलेल्या कालाची स्मृति कृष्णास अस्वस्थ करीत असणें साहजिक आहे. पण अनेक ग्रंथांत राधा विरह-दुःखानें झुरत असते. तिच्याशीं रमणाऱ्या तरुण कृष्णाची तिला सारखी आठवण येते अशी कल्पना केलेली आहे. उदा. कृष्ण-कर्णामृतांत राधा म्हणते, "देवा, किती तरी वेळां तूं मला संकटांतून सोडविलें आहेस. पुन्हां माझ्या दृष्टीस तूं कसा पडशील?" 'आनन्द-वृंदावन-चम्पू' मध्यें रासक्रीडेच्या वेळीं लाभलेले कृष्णाच्या सान्निध्याचे प्रसंग राधा रंगविते. गोपींच्या आग्रहाला कृष्ण दुरूनच मानेनें कौशल्यपूर्ण रीतीनें नकार देत आहे असेंहि वर्णन यांत आहे. 'विदग्ध-माधव' या ग्रंथांत कृष्णाची कृपा विषाहून परिणामकारक व अमृताहून मधुर असते असें म्हटलें आहे. कृष्णावर प्रेम करणारी राधा शेवटीं कृष्णाशीं एकरूप होते व तेंच तिच्या प्रेमाचें अंतिम साध्य असतें या उदात्त कल्पनेनें चैतन्याला भुरळ घातली. आपण इतके आकर्षक आहोंत व चन्द्रकलेप्रमाणें आपलें सौन्दर्य वर्धमान आहे ह्या कल्पनेनें हर्षभरित झालेला कृष्ण स्वतःच गोंधळून जातो अशी कल्पना 'माधुर्य-पूर' या ग्रंथांत आढळते.

स्वतःच्या जीवनाचा उलगडा करतांना पुरुषाला स्त्रीच्या दिव्य प्रेमाचा व थोरवीचा साक्षात्कार होतो. ह्याच प्रेमाच्या भावनेची देहभाव सुटतांच भक्तींत परिणति होते, ह्या कल्पनेनें मानवी जीवनाला एक आगळेंच सौंदर्य प्राप्त झालें. आराधनेंत भेटीची आतुरता आहे, अनंत कालपर्यन्त वाट पाहण्याची तयारी आहे आणि ईश्वराच्या भेटीचा मार्ग दिसण्याची खात्री आहे. याच वाटेनें उमा गेली व तिचा आदर्श महाश्वेतेनें आपल्यापुढें ठेवला. प्रेमाची तपस्या व एकरूपता याचें दुसरें उत्कृष्ट उदाहरण सिद्ध शबरीच्या जीवनांत सांपडतें (उत्तररामचरित व अध्यात्म-रामायण). दुसरा मार्ग ज्ञानाचा, गुरूकडून ज्ञानप्राप्ति झाल्यावर स्वतःच्या अध्ययनानें आत्मज्ञानाप्रत जाऊन पोंचणें हा. वैदिक वाङ्मयांत या मार्गानें गेलेल्या स्त्रियांचींहि उदाहरणें दिलीं आहेत. ब्रह्मज्ञानासाठीं पतीजवळ हट्ट करणाऱ्या मैत्रेयीचें उदाहरण सर्वश्रुत आहे. देवाहुतीच्या सूचनेवरून भक्ति-योगाचें विवरण करणारा कपिल याच सिद्धान्तास पुष्टि देतो.

**चूडाला** :— आपल्या सौंदर्यानें पतीचें मन वेधून घेऊन त्याला अध्यात्म व आत्मज्ञानापासून परावृत्त करणाऱ्या स्त्रियांचीं अनेक उदाहरणें

इतिहासांत आढळतात. पण ऐहिक सुखाचा व सौन्दर्याचा मोह सोडून आत्मज्ञानाचा मार्ग स्वतः चोखाळून पतीस आपल्या मार्गानें नेऊं शकणारी अशी एक नामवंत स्त्री संस्कृत वाङ्मयांत आढळते. ही स्त्री म्हणजे योग-वासिष्टांतील चूडाला. सौराष्ट्रांतील एका राजाची ही कन्या अत्यंत देखणी, धार्मिक व सद्गुणी होती. लहानपणींच तिचा विवाह उज्जयिनीचा शूर राजपुत्र शिखिध्वज याच्याशीं झाला होता. दोघांच्याही आवडीनिवडी एक असल्यानें व दोघेहि विद्वान् व कलासंपन्न असल्यानें त्यांचें वैवाहिक जीवन सुखी होतें. परंतु चूडालेचें वय जसजसें वाढत गेलें व तिचें बाह्य सौंदर्य जसजसें कमी होऊं लागलें तसतशी तिची विरक्त वृत्ति वाढत गेली. ऐहिक क्षणभंगुर सुखाच्या मागें न धावतां आत्मसंशोधन करून चिरंतन सुखाचा मार्ग शोधण्यानें खरें समाधान लाभेल अशी तिची खात्री पटली. अध्यात्मविषयक शिक्षण घेत असतां तिच्या मनांत वारंवार हे प्रश्न उभे रहात, " मी म्हणजे कोण ?" " माझें नित्य आणि अविनाशी स्वरूप कसें आहे ? " " या विचारांचा आणि इच्छा-आकांक्षांचा स्वामी कोण हें मला कळेल का ? " शेवटीं तिला असें पटलें कीं पंचेंद्रियांना ज्याचा बोध होतो तें जग भासमय आहे. हें ज्ञान प्राप्त होतांच चूडालेच्या चेहऱ्यावर विलक्षण तेज दिसूं लागलें. तिची प्रसन्नता पाहून राजानें आश्चर्यानें विचारलें; " अमृत पिऊन तूं अमरत्व तर प्राप्त करून घेतलें नाहींस ? तुला कोणता तरी मोठा ठेवा सांपडला आहे असें दिसतें ! " चूडाला उत्तरली, " जगाच्या खऱ्या स्वरूपाचें ज्ञान मला झालें. त्यांतील सर्व वस्तूंचें अपूर्णत्व मला उमगलें. आतां मला कसलीच अपेक्षा उरली नाहीं. मला पूर्ण समाधान लाभलें आहे. म्हणून आपल्याला माझ्या ठिकाणीं ही प्रसन्नता दिसत आहे. " हे ऐकून राजाला हंसूं येतें. चूडालेला वेड तर लागलें नाहीं अशी त्याला शंका येते आणि ऐहिक जगाचा त्याग न करण्याची तो तिला सूचना देतो. चूडालेवर अर्थातच याचा कांहीं परिणाम होत नाहीं. राजवाड्यांतच पण ती नेहमीं एकान्तांत राहते. योगसाधनेनें तिचें आत्मिक बल खूप वाढतें. कालान्तरानें राजाहि तिच्या मार्गाकडे वळतो. एके दिवशीं राज्याचा त्याग करून चूडाला नको म्हणत असतांहि तो अरण्यांत निघून जातो. अठरा वर्षांनीं चूडाला आपल्या योगसामर्थ्यानें त्याला शोधून काढते राजानें पूर्ण विरक्त व्हावें व गेल्या जन्मांतील सर्व

घटनांचें सिंहावलोकन करावें असा ती त्यास सल्ला देते. हें केल्यानंतर राजा मुक्त होतो. पतीला संसारांतून काढून मोक्षाचा मार्ग दाखविणाऱ्या चूडालेची थोरवी असामान्य आहे.

संस्कृत विदग्ध वाङ्मयांत स्त्रीजीवनाचे जे नमुने चित्रित करण्यांत आले आहेत, त्यांपैकीं बुद्धीचें उदात्तीकरण साधणारी अरुंधती, प्रेमाचें दिव्य भक्तींत रूपांतर करणारी राधा व संसाराचें परमार्थांत रूपांतर घडवून आणणारी चूडाला हे तीन मार्गदर्शक दीपस्तंभ म्हणून दाखवितां येतील. स्त्रियांच्या स्वाभिमानाचें रक्षण करणारी, संकटकालीं देशाच्या रक्षणार्थ सज्ज झालेली आणि युद्धाचें नेतृत्व करणारी गणिका वीरा, एका देशभक्ताचा मनोभंग करण्यास निघते. पण तिच्या सहवासांत त्याची देशभक्तिच अधिक जाज्वल्य बनते. ही कामगिरी पार पडतांच वीरा तापसी बनते.

बौद्ध वाङ्मयाच्या इतिहासांत धर्मासाठीं आत्मार्पण करणाऱ्या स्त्रिया आढळत नसल्या तरी सेवावृत्तीनें मठांत तपस्विनींचें जीवन जगणाऱ्या अनेक स्त्रिया या धर्मांत आहेत. कादम्बरींतील पत्रलेखेचें उदाहरण या बाबतींत उल्लेखनीय आहे. पत्रलेखा म्हणजे निरपेक्ष प्रेमाचें प्रतीक. संस्कृत विदग्ध वाङ्मयांतील स्त्री वाचकांस धक्का देत नाहीं, आश्चर्यचकित करीत नाहीं आणि मळलेली वाट ती कधीं सोडीत नाहीं. वृत्तीनें ती ऐहिक आहे तरीसुद्धां तिला परतत्त्वाचा स्पर्श झाल्यामुळें तिच्यांत कांहींतरी दैवी आहे असा प्रत्यय येतो. मात्र धोक्याची सूचना देणें, नियंत्रण करणें आणि विरंगुळा देणें, या भूमिका संस्कृत वाङ्मयांतील स्त्रिया क्वचितच करतात. याचें एक कारण असें सांगतां येईल कीं, शास्त्रांनीं दिलेल्या स्त्रीजीवनाच्या चाकोरींतच हें वाङ्मय राहिलें. स्त्री कवयित्री असो, तत्त्वज्ञ असो, विदुषी असो किंवा ब्रह्मवादिनी असो, ती कधीं एखाद्या विराट् सभेंत प्रकट होऊन आपलें मत जाहीर रीतीनें सांगणार नाहीं. कारण या कालांतील स्त्रींत विद्वत्तेबरोबर पुरोगामित्व दिसून येत नाहीं. तिचें मोठेपण पतिसेवेंतून किंवा माता या भूमिकेवरून राम, शंकर, चैतन्य अगर भरत यांच्यासारख्या मुलांचें चारित्र्य घडवितांनाच फक्त दिसे. शृंगारिक प्रेमकथांचा दृष्टिकोनहि हाच आहे. वासवदत्तेची थोरवी, ती नरवाहनदत्ताची माता म्हणूनच अधिक मानली आहे.

---

# प्रकरण १२ वें

## बौद्धकालीन महिला

भारतासारख्या पुराणमतवादी देशांत बौद्धांच्या काळांत फार क्रांतिकारक फरक झाले असतील अशी अपेक्षा करणे चुकीचें ठरेल. तरी बौद्ध तत्त्वज्ञानांतील कांही मूलभूत सिद्धान्तांचे स्त्रीजीवनावर इष्ट परिणाम घडून आले. हे बदल खालीलप्रमाणे नमूद करतां येतील.

( १ ) पुरुषाप्रमाणेच स्त्रीहि कृतकर्मांची फळें भोगण्यासाठींच जन्माला येते असा गौतमबुद्धाचा एक सिद्धान्त आहे. तिला तिच्या मुक्तीसाठीं स्वतःच्या कर्मांवर अवलंबून रहावें लागतें. आईवडील, शिक्षक अगर आध्यात्मिक गुरु तिचें प्रारब्ध बदलण्यास साहाय्य करूं शकत नाहींत. हिंदु धर्माच्या कल्पनेप्रमाणें पुत्र झाला कीं त्याच्या चांगल्या अगर वाईट कर्मानुसार पितरांना स्वर्ग किंवा नरक प्राप्त होतो. बुद्धाच्या शिकवणीनें या कल्पनेचें मूळच ढासळलें गेलें. बुद्धपूर्व काळांत पुत्रजन्माचा आनंदोत्सव करण्याच्या व कन्याजन्माचें दुःख करण्याच्या हिंदु समाजांतील रीतीला बुद्धाच्या विचारसरणीनें जो धक्का दिला त्यामुळें मुलींचा समाजांतील दर्जा वाढण्यास मदतच झाली.

( २ ) हिंदु धर्मविधींत पुत्रवती स्त्रीस दुय्यम स्थान मिळे व निपुत्रिकेस आणि विधवेस धर्मविधींत स्थानच नसे. या पद्धतीचा बुद्धानें तीव्र निषेध केला. त्यामुळें धर्मदृष्ट्या स्त्रियांना दिली गेलेली हीन भूमिका थोडीफार बदलली.

( ३ ) आध्यात्मिक जगतांत बुद्ध स्त्री व पुरुष हा भेद मानीत नसे. त्याचीं धार्मिक प्रवचनें स्त्रीपुरुषांसाठीं असत. त्याच्या मतें नैतिक बंधनेंहि उभयतांना सारखींच लागू आहेत. याचा परिणाम असा झाला कीं, आध्यात्मिक संस्कृतींत स्त्री व पुरुष हा भेद फारसा उरला नाहीं. निर्वाणपदीं पोंचलेल्या अनेक भिक्षुणींच्या जीवनावरून ही गोष्ट सहज सिद्ध करतां येईल.

( ४ ) बौद्ध धर्माची दीक्षा घेण्यास विवाहित, अविवाहित व गतभर्तृका सारख्याच पात्र असत. श्रमणेरी अगर भिक्षुणी यांपैकीं कोणत्याहि पातळी-पर्यंत पोंचणाऱ्या सर्व स्त्रिया सारख्याच योग्यतेच्या समजल्या जात. बौद्ध संघांत फक्त आध्यात्मिक पूर्णतेनुसारच व्यक्तीचें मूल्यमापन केलें जाई. गणिकेलाहि या धर्मांत प्रवेश मिळे व एकदां दीक्षा घेतल्यानंतर तिचें पूर्वचरित्र कोणीहि विचारांत घेत नसे. श्रीमंत लिच्छवींच्या विनंत्या झिटकारणाऱ्या बुद्धानें अंबपालीचें निमंत्रण स्वीकारल्याची कथा प्रसिद्ध आहे. तिनें भक्तिभावानें अर्पण केलेल्या आम्रफलाचें ग्रहण करून त्यानें तिला आपल्या धर्माची दीक्षाहि दिली. अशाच तऱ्हेचीं आणखी कांहीं गणिकांचीं उदाहरणें आहेत.

( ५ ) बौद्ध धर्माची दीक्षा दिल्यानंतर धर्मशिक्षणाचे प्राथमिक पाठ देण्याबाबत स्त्री व पुरुष यांत भेद केला जात नसे. सर्वसामान्य स्त्रियांस बुद्धाचीं तत्त्वें शिकविलीं जात व भिक्षुणींस बौद्ध तत्त्वज्ञानांतील सखोल प्रश्नांचा अभ्यास करावा लागे. साधनेनें प्राप्त होणारें परमतत्त्वाचें अनुभवसिद्ध ज्ञानहि भिक्षुणींस मिळवितां येई. बौद्ध वाङ्मयांत दर्दी असणाऱ्या स्त्रिया तत्त्वज्ञानप्रचुर प्रवचनें करीत.

इतकें असूनहि बौद्ध मठांत भिक्षु व भिक्षुणी यांच्या दर्जांत फरक केला जाई, ही वस्तुस्थिति नाकारतां येणार नाहीं. स्त्रियांचा नैसर्गिक कमकुवत-पणा लक्षांत घेऊन कांहीं निर्बंधांचें कदाचित् समर्थन करतां येईल; पण सर्व नियमांचें समर्थन या मुद्यावर होऊं शकणार नाहीं. उदाहरणार्थ—

( १ ) अनुभवी व वयोवृद्ध भिक्षुणीनेंहि तरुण व अननुभवी भिक्षूपुढें नम्र झालें पाहिजे हा नियम पहा. राणी महाप्रजापती गौतमीनें या नियमा-विरुद्ध आवाज उठविला. पण बुद्धाच्या हट्टापुढें तिला नमतें घ्यावें लागलें.

( २ ) जेथें भिक्षु नाहींत अशा ठिकाणीं एकट्या भिक्षुणीस पावसाळ्यांत ( वर्षावास ) राहण्याची बंदी असे.

( ३ ) वर्षावासाच्या कालांत जर एखाद्या भिक्षुणीच्या हातून कांहीं गैरवर्तन घडलें असेल तर अखेरीस तिला भिक्षु-भिक्षुणीसंघापुढें जाहीर रीतीनें त्यासंबंधीं निवेदन करावें लागे.

( ४ ) दर पंधरवड्यानें जी सांघिक बैठक घ्यावयाची ( आपोसथ व ओवाद ) त्यासाठीं भिक्षुणीस भिक्षूकडून अगोदर सूचना घ्याव्या लागत.

( ५ ) भिक्षुणीच्या हातून कांहीं अपराध घडल्यास दोन्ही संघांकडे तिला दोषमुक्ततेसाठीं याचना करावी लागे.

( ६ ) दीक्षा घेऊन उच्च श्रेणींत जाण्यासाठीं भिक्षुणीस दोन्ही संघांच्या अनुमतीची आवश्यकता असे.

( ७ ) भिक्षुणीस दीक्षा देण्यास भिक्षुच लागे. भिक्षुणी दीक्षाविधीचें नेतृत्व कधींहि करूं शकत नसे.

( ८ ) भिक्षुणीनें भिक्षूची निंदा केव्हांहि करतां कामा नये.

स्त्रियांना दीक्षा देण्यास प्रथम गौतम प्रतिकूलच होता. पण " व्यक्तीनें आपला उद्धार आपणच करावयाचा आहे " या त्याच्या तत्त्वाशीं हें विसंगत आहे असें दृष्टोत्पत्तीस येतांच स्त्रियांना संघांत प्रवेश देण्याखेरीज त्यास गत्यंतरच उरलें नाहीं. एकदां खास धर्माची दीक्षा दिल्यानंतर संघजीवनांत स्त्री व पुरुष असा भेद करणें इष्ट नाहीं ही जाणीव गौतम बुद्धास होती. पण धार्मिक जीवनाच्या प्रथमावस्थेंत स्त्री-पुरुष एकत्र राहिल्यास त्यांच्याकडून गैरवर्तन होईल अशी भीति वाटल्यामुळें त्यानें वर उल्लेखिलेले विशेष निर्बंध स्त्रियांवर घातले. पूर्णत्वाच्या चार पायऱ्यांपैकीं पहिली पायरी ज्यांनीं ओलांडली आहे अशा भिक्षुणींना हे निर्बंध लागूं नसावेत. ब्रह्मचर्य, व्रतस्थ जीवन व कडक शिस्त हे बौद्ध धर्माचे प्रमुख आधारस्तंभ आहेत. स्त्रिया व पुरुष यांचें सांघिक जीवन विशिष्ट नैतिक पातळीवर राहील कीं नाहीं याविषयीं बुद्ध नेहमीं काळजींत असे. म्हणूनच स्त्रियांसाठीं त्यानें विशेष कडक नियम केले असावेत.

बौद्ध धर्म हा प्रामुख्यानें तपस्वी जीवन जगणाऱ्यांसाठींच आहे. त्यामुळें या धर्मात ख्यातनाम झालेले स्त्री-पुरुष अर्हत्-पदीं पोंचलेले होते असें दिसून येईल.

## साधनें

बौद्ध धर्मातील स्त्रियांच्या आध्यात्मिक प्रगतीची माहिती मिळण्याचें थेरीगाथा हें एकच साधन उपलब्ध आहे. हा ग्रंथ पाली भाषेंत लिहिलेला असून

यांत एकूण ५२२ कवनें आहेत. निर्वाणपदीं पोंचलेल्या मुक्त स्त्रियांनीं आपला अनुभव या कवनांतून व्यक्त केला आहे. थेरीगाथेवरील ' परमथ्थ-दीपनी ' नांवाच्या टीकेंत भिक्षुणींचा ( थेरींचा ) जीवन-वृत्तांतहि दिलेला आढळतो. परंतु त्यांतील बहुतेक भाग काल्पनिक असावा असा समज आहे. ' अंगुत्तर-निकाय ' या ग्रंथावर ' मनोरथ-पूरणी ' या नांवाची जी टीका उपलब्ध आहे त्यांत कांहीं नामवंत थेरींचीं नांवें दिलेलीं आहेत. कांहीं श्रमणेरी व उपासिकांचाहि उल्लेख त्यांत आहे. ' मनोरथ-पूरणी ' व ' परमथ्थ-दीपनी ' यांतील चरित्रांत बरेंच साम्य आढळतें.

आतां बौद्ध धर्माच्या इतिहासांत ठळकपणें प्रसिद्धीस आलेल्या कांहीं महिलांचा जीवनवृत्तान्त पाहूं.

## भिक्षुणी

**महापजापती गौतमी**:— शाक्य आधिपत्याखालीं असलेल्या देवदह या खेड्यांत गौतमीचा जन्म झाला. तिच्या पित्याचें नांव सुप्पबुद्ध. सिद्धार्थ गौतमाच्या मातेची ( महामायेची ) गौतमी ही धाकटी बहीण. महामाया व गौतमी या दोन्ही बहिणींचीं लग्नें शुद्धोदन राजाशींच झालीं होतीं. सिद्धार्थाला जन्म दिल्यानंतर महामाया सातव्या दिवशींच निवर्तली. महापजापती गौतमीनें यानंतर सिद्धार्थास वाढविलें. महामायेच्या मृत्यूनंतर गौतमी पट्टराणी झाली. गौतमीला स्वतःला नंद नांवाचा मुलगा व सुंदरीनंदा नावाची मुलगी होती. या दोन मुलांना दायांवर सोंपवून सिद्धार्थाकडे राणी स्वतः लक्ष पुरवी.

बोधिपद प्राप्त झाल्यानंतर गौतम बुद्धानें एकदा कपिलवस्तूस भेट देऊन कांहीं प्रवचनें केलीं. तीं ऐकल्यानंतर शुद्धोदनानें बौद्ध धर्माचा स्वीकार केला व निर्वाणमार्गावरील स्रोतआपन्न हें पद त्यास लाभलें. नंद व राहुल हे दोघे परमोच्च भिक्षुपदापर्यंत पोंचले. शुद्धोदनाच्या मृत्यूनंतर राणी महापजापती अतिशय दुःखी व निराश झाली. ऐहिक जीवनाचा त्याग करण्याचे विचार तिच्या मनांत घोळत असतांनाच शाक्य व कोली राजांत रोहिणी नदीच्या पाण्यावरून वाद निर्माण झाले. याचा शेवट मोठ्या युद्धांत होऊन शेकडों लोक मारले गेले. यानंतर अनेक शाक्य विधवा महापजापती गौतमी-

समवेत जोगिणी बनण्याच्या निश्चयानें घराबाहेर पडल्या. सर्वांसह गौतमी बुद्धाकडे आली आणि संघांत प्रवेश देण्याची तिनें त्यास विनंती केली. या वेळीं बुद्ध वैशालीस होता. यापूर्वीची गौतमीची अशाच तऱ्हेची विनंती बुद्धानें फेटाळून लावली होती. म्हणून या वेळीं गौतमी व इतर पांचशें स्त्रियांनीं मुंडण करून व भगवीं वस्त्रें परिधान करूनच त्या बुद्धाकडे आल्या होत्या. याहि वेळीं बुद्धाची भिक्षुणीसंघ स्थापन करण्याची इच्छा नव्हती. परंतु त्याचा शिष्य आनंद यानें फार गळ घातल्यामुळें बुद्धानें गौतमीसकट पांचशें स्त्रियांना भिक्षुणी होण्यास संमति दिली. या वेळीं बुद्धानें त्यांच्यावर वर उल्लेखिलेल्या आठ अटी घातल्या. दीक्षा घेतल्यानंतर प्रत्यक्ष गौतमाकडूनच महापजापतीनें साधनेचे धडे घेतले व लवकरच ती पूर्णत्वास पोंचली. महापजापती एकशेंवीस वर्षें जगली. बुद्धानें तिला " *निर्वाणपदीं पोंचलेली पहिली भिक्षुणी* " म्हणून जाहीर मान्यता दिली.

आई म्हणून बुद्धानें महापजापतीस कोणतीहि विशेष सवलत दिली नाहीं. आपल्याजवळ असलेलें मूल्यवान् सूत व इतर साधनें वापरून बुद्धासाठीं एक सुंदर अंगरखा महापजापतीनें बनविला. पण आनंदानें आग्रह करूनहि त्याचा स्वीकार करण्यास बुद्धानें स्पष्ट नकार दिला. " सर्व भिक्षुसंघास भेट म्हणून दिल्यास फार तर तो घेईन, " असें त्यानें तिला सांगितलें.

तिच्या मरणकालीं मात्र बुद्ध तिच्याजवळ बसून कांहीं वेळां प्रवचन करी. यासाठीं " भिक्षुणीच्या शय्येजवळ पुरुषानें जाऊं नये " हा नियम प्रथम त्यानें बदलून घेतला.

बुद्धाला भिक्षुणीसंघ स्थापन करण्यास भाग पाडण्याची महान् कामगिरी महापजापतीनेंच केली. " भिक्षुणी-प्रातिमोक्ष-सूत्र " या नांवानें ओळखला जाणारा नियमसंग्रहहि तिच्यामुळेंच बुद्धास तयार करावा लागला. थेरीगाथेंत महापजापतीच्या नांवानें जीं कवनें दिलेलीं आहेत तीं बुद्धस्तुतिपर आहेत. " बुद्धानें अनेकांना ऐहिक यातनांतून सोडविलें. त्याच्यामुळेंच मी वासनाक्षय करू शकलें, " असा या कवनांचा सारांश आहे. बुद्धानें सांगितलेल्या आठहि मार्गांचें ती आचरण करी. ज्ञानप्राप्ति झाल्यानंतर अनेक जन्मानंतरचा हा आपला शेवटचाच जन्म आहे हें तिला समजलें होतें. पुन-

जन्म न यावा यासाठीं जरूर ती सर्व साधना तिनें केली होती. " महा-मायेनें गौतमास जन्म दिला हें तिचेंच नव्हे तर लाखों लोकांचें भाग्य होय. बुद्धानें जगाला प्रकाश दिला व दुःखमय जगांतून सुटकेचा मार्ग दाखविला." हे महापजापतीचे उद्गार अगदीं सार्थ वाटतात.

क्षेमा :– मद्रासच्या राजघराण्यांत सागल या गांवीं क्षेमाचा जन्म झाला. वयांत आल्यावर ती अतिशय सुंदर दिसूं लागली. यथाकालीं तिचा बिंबिसार राजाशीं विवाह होऊन पट्टराणी म्हणून राजगृहांत ती वावरूं लागली. या वेळीं राजानें बौद्ध संघास देऊं केलेल्या वेळुवनांत गौतम रहात असे. स्वतःच्या सौंदर्यांत गुरफटून राहणाऱ्याचा बुद्ध तिरस्कार करतो हें क्षेमाला समजल्यापासून ती त्याला टाळूं लागली. कारण तिला स्वतःच्या सौंदर्याचा फार अभिमान वाटे. बिंबिसारानें औपचारिकरीत्या बौद्ध धर्माचा स्वीकार केला तेव्हां त्याला असें वाटूं लागलें कीं पट्टराणीनें अधूनमधून केव्हांतरी बुद्धाच्या प्रवचनास हजर रहावें. यासाठीं त्यानें आपल्या भाटांना, राणीला ऐकूं जाईल अशा बेतानें वेळुवनाच्या सौंदर्याची तारीफ करण्यास सांगितलें; उद्देश हा कीं हें वर्णन ऐकून राणीची वेळुवन पाहण्याची उत्सुकता वाढेल व ती तिकडे जाण्यास तयार होईल. एके दिवशीं राणीनें वेळुवनांत जाण्यासाठीं राजाची परवानगी मागितली. राजानें अर्थातच आनंदानें तिला परवानगी दिली मात्र तेथें गेल्यानंतर तिनें बुद्धाचें दर्शन घेऊन यावें असें त्यानें सुचविलें. क्षेमानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. ती रथांत बसून वेळुवनाकडे निघाली. तिच्याबरोबर जाणाऱ्या मंडळींनीं कांहींहि करून राणी बुद्धासमोर जाईल अशी योजना करावी असें राजानें त्यांना सांगून ठेवलें. राणीनें सर्व दिवस वेळुवनांत मोठ्या मजेंत घालविला. मात्र बुद्धास न भेटतां परतावें अशी तिची इच्छा होती. थोड्याफार बळजबरीनेंच बरोबरीच्या मंडळींनीं तिला बुद्धासमोर नेली. बुद्धानें अंतर्ज्ञानानें सर्व जाणून एक बेत आंखला. योगबलानें एक रूपमती स्त्री निर्माण करून तिच्याकडून पंख्यानें वारा घालून घेत तो बसून राहिला. क्षेमानें त्या लावण्यवतीस पाहिल्यानंतर आपण तिची दासी म्हणूनसुद्धां शोभणार नाहीं या कल्पनेनें ती शरमिंदी झाली. टक लावून कितीतरी वेळ ती त्या स्त्रीकडे पहात राहिली. बुद्धाच्या चमत्कार-सामर्थ्यानें हळूहळू ती स्त्री प्रौढ व नंतर म्हातारी दिसूं लागली. शेवटीं हातांतील पंख्यासकट ती धरणीवर पडली. क्षेमानें हें सर्व

पाहिलें. पूर्वपुण्याईनें क्षेमा मोहनिद्रेंतून जागी झाली. बाल्य, तारुण्य, वार्धक्य व मृत्यु या सर्व अवस्थांतून प्रत्येक व्यक्तीला जावेंच लागतें या कल्पनेनें ती गंभीर झाली. याच वेळीं बुद्धानें मोठ्यानें एक कवन म्हटलें. " प्रवृत्तिमार्गी माणूस जाळ्यांतील कोळ्याप्रमाणें जन्ममरणाच्या - भोंवऱ्यांत अडकतो; पण विरक्त मनुष्य हें जाळें निर्धारानें तोडून मोकळा होतो " असा या धम्मपदांतील ३४७ व्या श्लोकाचा अर्थ आहे.

हें कवन ऐकतांच राणींत एकदम क्रान्तिकारक बदल घडून आला. ती अर्हत् बनली. अर्हतास संसारांत राहतां येत नाहीं असा नियम असल्यानें तिनें दीक्षा घेण्याचा निश्चय केला. राजवाड्यांत परत आल्यानंतर " बुद्धाचें दर्शन झालें का ? " असा राजानें प्रश्न केला. " मला बुद्धाचें जें दर्शन झालें त्याच्या शतांशानेंहि खऱ्या अर्थी त्याचें दर्शन आपल्याला झालें नसेल ! " असें सांगून क्षेमानें राजाकडे भिक्षुणी होण्याची परवानगी मागितली. पत्नींतील परिवर्तन पाहून राजानें तिला परवानगी दिली व सोन्याच्या पालखींतून तिची संघांत रवानगी केली. तेथें क्षेमानें खूप अध्ययन केलें. संतुष्ट झालेल्या बुद्धानें " उच्च श्रेणींतील एक थेरी " या शब्दांत तिचा सन्मान केला.

थेरीगार्थेत क्षेमाच्या नांवावर जीं कवनें आहेत त्यांत ती म्हणते, " एका देखण्या तरुणानें मला भुरळ घालण्याचा प्रयत्न केला, पण त्याच्या सुखाच्या कल्पना मला तीव्र बाणांसारख्या वाटल्या. " क्षेमा आपल्या रोगग्रस्त पण बाह्यात्कारी सुंदर देहाला विटली होती. तिनें निर्वाणाचें ज्ञान प्राप्त करून घेतल्यामुळें जगाविषयीं तिची वृत्ति पूर्ण विरक्त बनली होती. बुद्धाच्या संदेशानुसार तिनें साधना केली होती. त्यामुळें आकाशस्थ ग्रहांची आराधना अगर अरण्यांत जाऊन यज्ञयाग करण्याची तिला गरज उरली नव्हती.

श्रावस्तीजवळच एका झोंपडींत क्षेमा रहात असतांना प्रसेनजित राजा तत्वचर्चेस योग्य अशा गुरूच्या शोधात होता. तोरणवत्थूच्या आश्रमांत क्षेमाचें नांव " एक अतिशय विद्वान् व सर्व गूढ प्रश्नांची साधकबाधक चर्चा करण्याची योग्यता असलेली भिक्षुणी " म्हणून गाजलेलें प्रसेनजिताच्या कानीं आलें. राजा क्षेमाकडे आला आणि त्यानें तिला विचारलें, " तथागत

पदास पोहोंचलेला मनुष्य मृत्यूनंतर कोणत्या स्वरूपांत राहतो ?" क्षेमानें उत्तर दिलें, "समुद्रांतील पाण्याचे थेंब ज्याप्रमाणें मोजतां येत नाहींत त्याचप्रमाणें मरणोत्तर जीवनाबद्दलहि कांहीं सांगतां येत नाहीं. असले प्रश्नच अयोग्य होत." ती पुढें म्हणाली, "मृत्यूनंतर रूप, वेदना अगर इतर पंचभूतात्मक दृश्य स्वरूपांत तथागत दिसूं शकत नाहीं. म्हणून तथागताचें मरणोत्तर जीवन हा शब्दप्रयोगच संभवत नाहीं. बुद्धानें अशा प्रश्नांना 'अगम्य' या सदरांत टाकलें होतें." क्षेमाच्या या स्पष्टीकरणानें राजाचें समाधान झालें. तिच्या विद्वत्तेचा प्रसेनजिताच्या मनावर खोल ठसा उमटला.

पटाचारा :– पटाचारा ही श्रावस्तीच्या एका श्रीमान् सावकाराची कन्या. वयांत आल्यावर वडिलांच्या पदरीं नोकरी करणाऱ्या एका तरुणावर तिचें प्रेम बसलें. ही गोष्ट तिनें गुप्त राखली होती. तिच्या पित्यानें आपल्या घराण्यास साजेशा एका तरुणाबरोबर तिचा विवाह ठरविला. पटाचारास हें कळतांच ती आपल्या प्रियकराबरोबर एका रात्रीं पळून गेली व तीं दोघें एका खेड्यांत राहूं लागलीं. पहिल्या मुलाच्या खेपेस तिला वडिलांकडे जाण्याची इच्छा होती, पण पतीनें तिला जाऊं दिलें नाहीं. दुसऱ्या मुलाच्या वेळीं मात्र पतीच्या इच्छेस न जुमानतां ती बापाकडे जावयास निघाली. अरण्यांतून जात असतांना वाटेंतच ती प्रसूत झाली. एक निवारा तयार करण्यासाठीं तिचा पति झाडपाला जमविण्यासाठीं गेला. त्या वेळीं त्याला सर्प चावून तो जागच्या जागींच मेला. इकडे पटाचारा पतीची वाट पाहून दमली व स्वतःच त्याला शोधण्यासाठीं बाहेर पडली. कांहीं अंतरावर तिला मृतावस्थेंत तिचा पति आढळला. त्या धक्क्यानें ती अगदीं हतबुद्ध झाली. मुलांच्या रडण्यानें शुद्धीवर येऊन ती परतली. एका मुलाला हातावर व दुसऱ्याला हातानें धरून पटाचारा एकटीच पित्याच्या घराचा मार्ग आक्रमूं लागली. कांहीं वेळानें वाटेंत एक पाण्याचा प्रवाह आडवा आला. दोन मुलांना घेऊन प्रवाहापलीकडे कसें जावें हा प्रश्न तिजपुढें उभा राहिला. एकेका मुलाला प्रवाहापलीकडे न्यावें असें ठरवून मोठ्या मुलाला तिनें अलीकडच्या कांठावर ठेवलें व लहानाला घेऊन ती प्रवाहांतून चालूं लागली. पलीकडच्या कांठावर गेल्यानंतर मुलाला गवतांत ठेवून थोडें गवत त्याच्या अंगावर घालून तिनें त्यास झांकलें व मोठ्या मुलाला आणण्यासाठीं ती पुन्हा येऊं लागली.

प्रवाहाच्या मध्यांत येतांच एक ससाणा आपल्या झांकलेल्या बाळाजवळ गेलेला तिनें पाहिला. त्याला हांकलण्यासाठीं तिनें हात हालविला. तो पाहून आई आपल्याला बोलावते आहे असें तिच्या मोठ्या मुलास वाटलें व तो पाण्यांतून निघाला. पण तोल जाऊन तो पाण्यावरोबर वाहवत गेला. इकडे ससाण्यानें तिचें दुसरें मूलहि पळविलें. पतीपाठोपाठ दोन्ही मुलांचा हृदयद्रावक अंत पाहण्याचें तिच्या नशिबीं आलें. पित्याच्या घरीं पोहोंचतांच भावाकडून तिला समजलें कीं आदल्याच रात्रीं घर कोसळून तिचे आईवडील त्याखालीं सांपडून मेले. एकाच चितेवर नुकताच त्यांचा दहनविधि पार पडला होता. एकापाठोपाठ घडलेल्या दुःखद घटनांचा ताण सहन न होऊन तिला शेवटीं वेड लागलें.

एके ठिकाणीं प्रवचन चालू असतां पटाचारा बुद्धाच्या दृष्टीस पडली. तिला बोलावून घेऊन आपल्या सामर्थ्यानें बुद्धानें तिचें डोकें ठिकाणावर आणलें. शुद्धीवर आल्यानंतर तिनें त्यास आपलें दुःख सांगितलें. तिला समजावितांना बुद्ध म्हणाले, " गेले अनंत जन्म तूं आपल्या प्रियजनांसाठीं अश्रु ढाळीत आहेस. ते सर्व जर जमविले असतेस तर चार समुद्राइतकें पाणी साठलें असतें. मेलेला नातेवाईक पुन्हां समाधान करण्यास येऊं शकत नाहीं. किंबहुना जिवंतपणींहि एकाचें दुःख दुसरा कमी करूं शकत नाहीं. यासाठीं मन दगडासारखें कठोर करून बुद्धानें दाखविलेल्या मार्गानें जा. " बुद्धाचे हे शब्द ऐकून ती ' स्रोत-आपन्न ' बनली. रीतसर दीक्षा घेण्याची तिनें इच्छा दर्शवितांच भिक्षुणी करून दिला संघांत दाखल करून घेण्यांत आलें.

एकदां पायांवर घेतलेलें पाणी वहात जातांना ती निरीक्षण करूं लागली. कांहीं अंतरावर जाऊन पाणी नाहींसें होई. तिनें पुन्हां पाणी ओतावें व थोडें वाहिल्यानंतर तें नाहींसें व्हावें असें अनेकदां पाहिल्यानंतर तिच्या मनांत विचार आला, " आयुष्यहि असेंच क्षणभंगुर आहे ! " त्या दिवशीं बुद्धांनीं जें प्रवचन केलें त्यांत त्यांनींहि असेंच सांगितलें कीं, " निर्माण झालेली प्रत्येक वस्तु नाहींशी होते. म्हणून पंचमहाभूतांनीं एकत्र येऊन आपल्यासाठीं शरीर निर्माण करण्याची संधीच आपण त्यांना देतां कामा नये." बुद्धाच्या या विचारावर मनन करून पटाचारा मुक्त झाली. तिनें आपला

अनुभवानंद पुढील शब्दांत व्यक्त केला आहे. " पुरुष शेतांत कष्ट करून पीक काढतो आणि पत्नी व मुलें यांचा योगक्षेम चालवितो. मग पत्नीनें नीति-नियमांचें आचरण व बुद्धाच्या शिकवणीचें मनन करून निर्वाणपद कां प्राप्त करून घेऊं नये ? " पाण्याच्या प्रवाहाकडे पाहून तिला आयुष्याचा अर्थ लागतां आला. एके रात्रीं तिनें एक पेटलेली पणती समोर ठेवून सुईनें जळती वात तेलांत घालून विझविली. या लहानशा घटनेनें तिच्या मनावर आयुष्याचें क्षणभंगुरत्व ठसलें व ती मुक्त झाली.

संघानें जीवनासाठीं निर्माण केलेली शिस्त ( विनय ) पटाचारानें आत्मसात् केली. " विनयावर अधिकारवाणीनें बोलणाऱ्या फार थोड्या भिक्षुणींपैकीं ती एक आहे " असा बुद्धानें तिचा एकदां गौरव केला. पटपटु म्हणजे पटुत्व व आचारा म्हणजे आचरणांत आणणारी. पटाचारा म्हणजे विनयाचे सर्व नियम अत्यंत काटेकोरपणें आचरणांत आणण्यांत जी पटाईत आहे ती. पटाचारानें एकूण तीस भिक्षुणींना शिक्षण दिलें व त्या सर्वांनीं पूर्ण ज्ञानाची प्राप्ति करून घेतली.

भद्दा ( सुभद्दा ) कुण्डलकेशा :—ही राजगृहांतील एका श्रीमान् सावकाराची कन्या. कुण्डलकेशा ज्या दिवशीं जन्मली त्याच दिवशीं त्या देशाच्या राजाच्या उपाध्यायास एक मुलगा झाला. त्याचें नांव सत्तुक. सत्तु-काला अगदीं लहानपणापासून चोरी करण्याची संवय जडली होती आणि वयोमानानें ती वाढतच गेली. खूप प्रयत्न करूनहि आईवडिलांना त्याची ही खोड घालवितां येईना. शेवटीं त्यांनीं सत्तुकाला घराबाहेर हांकलून दिलें. त्या दिवसांपासून त्यानें एक हूक व एक दोर पैदा केला आणि रात्रीं मजल्यां-वरील घरांत शिरून जेवढ्या वस्तूंची चोरी करतां येईल तेवढी करण्याचा क्रम सुरू केला. गांवांतील एकहि घर त्याच्या कचाट्यांतून सुटलें नाहीं. ही हकीकत जेव्हां राजाच्या कानीं गेली तेव्हां त्यानें वाटेल तें करून सत्तुकाला पकडून आणण्याची शिपायांना आज्ञा केली. मोठ्या शिताफीनें सत्तुकाला मुद्देमालासकट पकडण्यांत आलें. राजानें सत्तुकाला कड्यावरून ढकलून देहान्त शासन देण्याची शिक्षा फर्माविली. शिपायांनीं बेदम मारून नंतर कडेलोट करण्यासाठीं चालविलें असतांना त्याला सुभद्देनें पाहिलें.

पहिल्याच दृष्टिक्षेपांत सुभद्रा सत्तुकाकडे आकर्षिली गेली व त्याला वांचवून आपला विवाह त्याच्याशीं करावा अशी तिनें आईवडिलांना विनंती केली. एकुलत्या एक मुलीचा हट्ट पुरविण्यासाठीं सावकारानें शिपायांना लांच देऊन सत्तुकाची सुटका करविली. राजाच्या समाधानासाठीं शिपायांनीं दुसऱ्याच एका माणसाचा कडेलोट केला.

सावकारानें सत्तुकाला घरीं आणलें. सचैल स्नान घालून त्याला उंची वस्त्रें दिलीं. सुभद्रेनें थाटामाटानें त्याचें स्वागत केलें. संवयीनुसार सत्तुक सुभद्रेच्या अंगावरील अलंकार कसे चोरतां येतील याचा विचार करूं लागला. विवाहानंतर एके दिवशीं तीं दोघेच बसलीं असतांना सत्तुक तिला म्हणाला, " आज मी तुला एक अत्यन्त गुप्त गोष्ट सांगणार आहे. " पतीचा आपल्यावरील विश्वास पाहून सुभद्रा आनंदली व त्याची जी इच्छा असेल ती पुरी करण्याचें तिनें त्यास वचन दिलें. सत्तुक म्हणाला, " मरणाची शिक्षा झाली त्या वेळीं मी मनांत असें ठरविलें होतें कीं, जर बचावलों तर कड्या-वरील देवतेची पूजा बांधून शक्य तें धन तिला अर्पण करीन. ही पूजा तुझ्यासमवेत करावी अशी माझी इच्छा आहे. " सुभद्रेनें पूजेची सर्व तयारी केली व मूल्यवान् वस्त्रें व अलंकार परिधान करून तीं दोघें कड्याकडे निघालीं. टेकडीच्या पायथ्याशीं येतांच नोकरांना खालीं थांबवून सुभद्रेनें एकटीनेंच पूजासाहित्य घेऊन वर चलावें असें सत्तुकानें सुचविलें. टेकडी चढतांना सत्तुकानें जें भाषण केलें त्यावरून त्याच्या नीच हेतूची सुभद्रेस कल्पना आली. कड्याच्या टोंकावर पोंचतांच अंगावरील सर्व दागिने काढून त्यांची रुमालांत एक पुरचुंडी बांधण्याची सत्तुकानें तिला आज्ञा दिली. यावर सुभद्रा उत्तरली, " माझे दागिनेच काय पण मी सुद्धां आपलीच आहे. मी आपल्या इच्छेबाहेर नाहीं. पण दागिने काढण्यापूर्वी एकदां माझ्याकडे तोंड करून व दुसऱ्यांदां पाठ करून मला आलिंगन द्यावें." सत्तुकानें होकार दिला. त्याची पाठ आपल्याकडे वळतांच सुभद्रेनें त्यालाच ढकलून कृतकर्माचें प्रायश्चित्त दिलें. या वेळीं तिला एक दैवी वाणी ऐकूं आली. " प्रत्येक वेळीं पुरुष शहाणा ठरतोच असें नाहीं. कांहीं वेळां परिस्थितींत सांपडलेली स्त्रीहि बुद्धिमत्ता व चातुर्य प्रकट करते. "

या घटनेनंतर परत घरीं जावें असें मात्र सुभद्रेस वाटेना. कडक

ब्रह्मचर्य पाळून धर्मसाधना करावी असा तिनें निश्चय केला. निर्ग्रंथ संघांत दाखल होऊन तिनें औपचारिकरीत्या बौद्ध धर्माची दीक्षा घेतली. संन्यस्त बनण्यासाठीं जेव्हां तिचे केंस काढण्यांत आले त्या वेळीं पुन्हां लगेच तिच्या डोक्यावर कुरळ्या केसांचे झुपके दिसूं लागले. म्हणून तिला कुण्डलकेशा असें नांव मिळालें. संघांत दाखल झाल्यानंतर तिनें अनेक विषयांचें अध्ययन केलें. विशेषतः तर्कशास्त्रावर तिनें बरेंच प्रभुत्व मिळविलें. जेथें जेथें नामवन्त बौद्ध भिक्षु होते त्या सर्व ठिकाणीं ती हिंडली आणि अनेक शास्त्रांबरोबर वाद-विवादपटुत्वहि तिनें संपादन केलें. एक उत्कृष्ट सभाजेती म्हणून तिची चोहींकडे ख्याति पसरली. तिच्याशीं वाद करण्यास सहसा कोणी धजत नसे. प्रत्येक गांवांत शिरल्यानंतर ती वाळूचा एक ढीग करी, त्यावर जांभळाच्या झाडाची एक फांदी रोवी आणि वादास जो कोणी तयार असेल त्यानें पुढें येऊन त्या फांदीस पायांखालीं तुडवावें असें जाहीर करी. सात दिवसपर्यंत कोणी न आल्यास ती फांदी काढून घेऊन ती पुढच्या गांवीं जाई. असें करतां करतां बुद्ध त्या वेळीं ज्या ठिकाणीं होते त्या श्रावस्तीस सुभद्रा आली. श्रावस्तीस पोंचतांच तिनें वाळूचा ढीग करून त्यावर फांदी रोवली. बुद्धाचा एक विद्वान् शिष्य सारि-पुत्त यानें फांदीचा उद्देश लक्षात येऊन ती पायाखालीं तुडविली. ही बातमी सुभद्रेस कळतांच मोठ्या मित्रपरिवारासह सारिपुत्ताशीं वाद करण्यास ती निघाली. या वेळीं सारिपुत्त भोजनोत्तर विश्रांति घेत होता. तिनेंच पाहिजे ते प्रश्न विचारावेत असें सारिपुत्तानें सुचविल्यावरून सुभद्रेनें अनेक प्रश्न विचारले. त्यानें सर्व प्रश्नांचीं भरामर उत्तरें देऊन टाकलीं. नंतर सारिपुत्तानें तिला एकच प्रश्न विचारला, पण सुभद्रेस त्याचें उत्तर देता आलें नाहीं. शरणागति पत्करून सारिपुत्तास तिनें आपला गुरु केलें. त्यानें तिला बुद्धाकडे नेलें. बुद्धाच्या एकाच समयसूचक प्रवचनानें तिला खरें ज्ञान झालें. बुद्ध भेटेपर्यंत मुंडन करून एका वस्त्रानिशीं धुळीनें माखलेल्या अवस्थेंत ती फिरे. योग्य गोष्टींकडे दुर्लक्ष करून अयोग्य गोष्टी करण्यांतच तिचा कालापव्यय होई. एका दुपारीं गृध्रकूट पर्वतावर तिला बुद्धाचें दर्शन झालें. गुढगे टेकून तिनें त्यांना वंदन केलें. “ हे स्त्रिये, ये ” असें म्हणून त्यांनीं तिला ज्ञान दिलें. यानंतर पन्नास वर्षें ती भिक्षादेहि करीत अंग, मगध, काशी, कोशल वगैरे भागांत हिंडली. ज्यांनीं तिला भिक्षा दिली त्यांची ती ऋणी आहे असें तिला वाटलें

नाहीं. कारण या दानानें त्यांच्या पुण्यांत भर पडली होती अशी तिची समजूत होती.

अंबपाली ( आम्रपाली ): – शाक्य राजाच्या पदरीं असलेल्या महानाम नांवाच्या श्रीमंत सरदाराच्या आंब्याच्या बागेंत सांपडलेल्या या मुलीचें नांव अंबपाली असें ठेवण्यांत आलें. कुटुंबियांसमवेत बागेंत हिंडत असतांना नुकतीच जन्मलेली एक मुलगी एका ठिकाणीं पडलेली महानामानें पाहिली. त्यानें लगेच तिला उचलून घेऊन आपल्या पत्नीकडे दिलें. त्या उभयतांनीं तिला आपली कन्या मानून मोठ्या ऐषारामांत वाढविली. मोठेपणीं ती अत्यन्त देखणी दिसूं लागली. अनेक श्रीमंतांनीं तिला लग्नाची मागणी घातली. आपल्या मानस-कन्येसाठीं कोणता वर पसंत करावा असा महानामास पेंच पडला. ज्यांच्या मागणीस नकार मिळतील ते सर्व त्याच्यावर चिडतील अशी त्याला भीति वाटत होती. त्यांच्याच कुलांतील तरुणाशीं अंबपालीचा विवाह त्याकाळच्या रूढीनुसार त्याला करावा लागणार होता. सर्व लिच्छवींची एक सभा घेऊन त्यानें तिच्या लग्नाचा प्रश्न त्यांच्यासमोर टाकला. प्रथम तिला पाहण्याची इच्छा सर्वांनीं दाखविल्यावरून अंबपालीस सभेंत आणण्यांत आलें. तिचें लावण्य पाहून सर्वांच्या भोगासाठींच ( गण-भोग्या ) तिची योजना व्हावी असें एकमतानें ठरविण्यांत आलें. सभेचा निर्णय ऐकून महानामास धक्का बसला. त्याची कन्या गणिका व्हावी ही कल्पना त्याला कशीशीच वाटली. परंतु जमातीचा एकमुखी निर्णय फिरविण्याचें सामर्थ्य त्याच्यांत नव्हतें. त्यामुळें काय करावें हें त्यास सुचेना. बापाचें संकट ओळखून अंबपाली गणिका होण्यास तयार झाली. परंतु हें जीवन पत्करण्यापूर्वीं तिनें सभेपुढें पांच अटी ठेवल्या. ( १ ) शहराच्या उत्कृष्ट भागांत सर्व सुखसोयींनीं युक्त असें एक स्वतंत्र घर तिला मिळावें. ( २ ) तिच्याकडे एका वेळीं एकाच पुरुषानें यावें. ( ३ ) प्रत्येक वेळीं तिचें शुल्क म्हणून ५०० कार्षापण दिले पाहिजेत. ( ४ ) एखाद्या गुन्हेगाराला शोधण्यासाठीं तिच्या घराची झडती घ्यावयाची असल्यास शोध सुरू केल्यापासून ती सातव्या दिवशीं घ्यावी आणि ( ५ ) तिच्या घरीं कोण येईल जाईल त्याच्यावर कोणीहि देखरेख ठेवतां कामां नये.

सभेनें या सर्व अटी मान्य केल्या. नंतर अंबपालीनें एक घर स्वतःसाठीं पसंत केलें. घराच्या सर्व भिंतींवर राजे, प्रधान, सरदार, व्यापारी, सावकार

वगैरेंची चित्रें तिनें रंगवून घेतलीं. सर्व चित्रांची पाहणी करीत असतांना राजा बिंबिसाराच्या चित्रानें तिला अतिशय मोहित केलें. त्याला केव्हां एकदां पाहीन असें तिला वाटलें. अंबपाली अप्सरेसारखी सुन्दर आहे अशी माहिती राजा बिंबिसाराच्या कानीं गेली होती. त्यामुळें तो तिला भेटण्यास उत्सुक झाला होता. मगध देशाचा राजा व लिच्छवी जमात यांच्यांत त्या वेळीं कांहीं कारणानें वैमनस्य आलें असल्यानें लिच्छवींच्या प्रदेशांत येण्याचें धाडस करूं नये अशी त्यास ताकीद देण्यांत आली होती. या आदेशाकडे दुर्लक्ष करून एका गोपास बरोबर घेऊन राजा अंबपालीकडे जाण्यासाठीं वैशालीस निघाला. आपल्या प्रदेशांत मगध देशाचा राजा आल्याचें वर्तमान लिच्छवींना समजतांच त्यांनीं त्याचा शोध सुरूं केला. पण सात दिवसांची सूचना दिल्याखेरीज त्यांना अंबपालीचें घरांत राजाचा शोध करतां येईना. यामुळें राजा अंबपालीच्या घरीं सद्दा दिवस सुरक्षित राहिला. या कालांत अंबपाली गरोदर राहिली. हें समजतांच मगध देशाच्या राजघराण्याचें चिन्ह असलेली एक अंगठी झिरझिरीत वस्त्रांत बांधून राजानें तिजजवळ दिली. उद्देश असा कीं, मुलासाठीं मदतीची गरज उत्पन्न झाल्यास त्या अंगठीचा तिला उपयोग करतां यावा. यथाकाल अंबपाली प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. तो अतिशय उमदा व राजबिंडा दिसे. आसपासचीं सर्व मुलें त्याला 'दासीचा अनौरस पुत्र' म्हणून चिडवीत. मुलास तें सहन होईना. म्हणून अंबपालीनें त्यास बिंबिसाराकडे पाठवून दिलें. राजानें आपल्या पुत्रास ओळखून त्याचा सांभाळ केला. पुढें ह्या मुलाा नामवंत बुद्ध भिक्षु होऊन विमल कोण्डण्ण या नांवानें ओळखला जाऊं लागला.

इकडे अंबपालीनें आपल्या गणिकेच्या व्यवसायांत अमाप संपत्ति जमा केली. तिनें बौद्ध धर्माची औपचारिक दीक्षा घेतली. बुद्ध त्याच्या शेवटच्या प्रवासांत जेव्हां वैशालीजवळच्या कोटिगाम या गांवीं आला, तेव्हां ती त्याला भेटण्यासाठीं गेली. तिच्यासाठीं बुद्धानें एक छोटेसें प्रवचन केलें. तें ऐकल्यानंतर अंबपालीनें आपल्या घरीं बुद्धास सर्व शिष्यांसमवेत दुपारच्या भोजनाचें निमंत्रण केलें. सर्व लिच्छवी जमातीनें भोजनासाठीं दिलेलें निमंत्रण नाकारून बुद्धानें अंबपालीस होकार दिलेला पाहतांच त्या सर्वांची फार निराशा झाली. दुसरे दिवशीं सर्वांनीं अंबपालीकडे भोजन केलें. तिनें आपली

आम्यांची बाग भिक्षुसंघास देऊं केली. तिच्या या देणगीचाहि बुद्धानें स्वीकार केला.

अंबपालीचा पुत्र विमल याचें प्रवचन ऐकण्याचा तिला एकदां योग आला. प्रवचन झाल्यावर भिक्षुणी होण्याचा तिनें निश्चय केला. दीक्षा घेतल्यानंतर लवकरच तिला पूर्ण ज्ञान प्राप्त झालें. स्वतःच्या सौंदर्यांत वयोमानानें पडलेल्या फरकाचा जेव्हां तिनें विचार केला तेव्हां जीवनाचें क्षणभंगुरत्व तिला उमगलें. सतत चिंतनानें तिनें शेवटीं अर्हत्‌पद मिळविलें. अंबपालीनें रचलेल्या वचनांत तिचें मनोगत उत्तम रीतीनें व्यक्त झालें आहे.

इसिदासी :— ही उज्जयिनीच्या एका श्रीमान् धर्मनिष्ठ सावकाराची कन्या. आईवडिलांनीं या एकुलत्या एक मुलीच्या संगोपनाकडे प्रथमपासूनच विशेष लक्ष पुरविलें होतें. वयांत आल्यावर त्यांनीं साकेताच्या एका सधन सावकाराच्या मुलाशीं तिचा विवाह केला. लग्नांत वरपक्षाकडून तिला खूप मूल्यवान् देणग्या मिळाल्या. इसिदासी सकाळ-संध्याकाळ नेमानें सासुसासऱ्यांस वंदन करी. नणदांच्या सुखसोयींकडे लक्ष पुरवी. पतिसेवेंतहि सर्वतोपरी ती अतिशय दक्ष असे. पण त्याला तिच्या सहवासानें कधीं समाधान वाटलें नाहीं. एके दिवशीं घर सोडून जाण्याचा त्यानें तिला धाक घातला. सासुसासऱ्यांनीं तिची बाजू घेऊन त्याची समजूत घालण्याचा खूप प्रयत्न केला, पण त्यांना यश आलें नाहीं. इसिदासीला त्यांनीं पतीच्या रागाचें कारण विचारलें. परंतु ती बिचारी कांहींच सांगूं शकली नाहीं. शेवटीं तिला पतीचें घर सोडून पित्याकडे उज्जयिनीस जाणें भाग पडलें. इसिदासीच्या पित्यानें तिचा पुनर्विवाह करून दिला. तेथेंहि इतिहासाची पुनरावृत्ति होऊन तिला पित्याकडे परतावें लागलें.

दोनदां हा प्रकार घडल्यानंतर तिच्या बापानें एका तरुण संन्याशास इसिदासीशीं लग्न करण्याची विनंती केली. त्यानें लग्न केलें. परंतु पंधराच दिवसांत संसाराला कंटाळून तो तिला सोडून निघून गेला. इसिदासी तिसऱ्यांदा पित्याच्या आश्रयास आली. याच सुमारास जिनदत्ता नांवाच्या भिक्षुणीनें त्या कुटुंबास भेट दिली व इसिदासीला संन्यासिनी होण्याचा तिनें सल्ला दिला. वडिलांच्या इच्छेविरुद्ध इसिदासीनें दीक्षा घेतली. त्या वेळीं तिला ज्ञान प्राप्त

झालें. त्या वेळीं तिला समजून आलें कीं पूर्वजन्मांत तिनें अनैतिक वर्तन केल्यामुळें या जन्मीं तिला संसारसुख मिळूं शकलें नाहीं.

## धर्मोपासिका

**सामावती :**—भद्दीय गांवच्या एका श्रीमंत शेट्टीची सामावती ही एकुलती एक मुलगी. हिच्या जन्मानंतर कांहीं वर्षांनीं गांवांत मोठा दुष्काळ पडून या कुटुंबाची अन्नान्नदशा झाली. सामावतीच्या पित्याचा एक मित्र घोषकशेट्टी कौशांबीस रहात असे. त्याच्या आश्रयास जाण्यासाठीं हें कुटुंब कौशांबीस आलें. पण अशा विपन्न स्थितींत मित्राला तोंड दाखविण्याची लाज वाटल्यानें त्यांनीं एका झोंपडींत मुक्काम केला. गोरगरिबांना अन्नदान करण्यासाठीं घोषकशेट्टीनें अन्नसत्र सुरू केलें होतें. स्वतः तेथें जाऊन अन्नाची भीक मागण्याची शरम वाटल्यामुळें पित्यानें सामावतीस तिघांसाठीं अन्न घेऊन येण्यास सांगितलें. अन्नसत्रांतील ओरडाआरड व धक्काबुक्की पाहून सामावती दूर एका बाजूला जाऊन उभी राहिली. तेथील व्यवस्थापकाचें तिच्याकडे लक्ष जाऊन त्यानें तिला अन्न दिलें. पहिल्या दिवशीं सामावतीनें तीन माणसांचें अन्न नेलें, दुसऱ्या दिवशीं तिनें दोन माणसांचें अन्न मागितलें व तिसऱ्या दिवशीं एका माणसाचेंच अन्न देण्यास सांगितलें. हें पाहून व्यवस्थापक तिला म्हणाला, "आज तुला पोटाची खरी भूक किती आहे हें समजलें तर!" यावर डोळ्यांत अश्रु आणून सामावतीनें आईवडिलांच्या लागोपाठ मृत्यूची हकीकत त्यास सांगितली. व्यवस्थापकास सहानुभूति वाटून त्यानें तिला आपल्याजवळ ठेवून घेतलें.

अन्न वाटतांना होणारा गोंधळ पाहून सामावतीनें व्यवस्थापकास कांहीं सूचना केल्या. त्याप्रमाणें अन्नगृहास कुंपण घालण्यात आलें व अन्न घ्यावयास येणाऱ्या व अन्न घेऊन जाणाऱ्या लोकांसाठीं रांगा धरण्याची पद्धति सुरू करण्यांत आली. सामावतीच्या या योजनेमुळें अन्नाचें वांटप अतिशय व्यवस्थित रीतीनें होऊं लागलें. अन्नगृहांतील सुधारणा कोणीं केल्या त्याची चौकशी करतांना घोषकशेट्टीस सामावतीची हकीकत समजली. आपल्या मित्राच्या मुलीची ती अनुकंपनीय अवस्था पाहून घोषकशेट्टीस वाईट वाटलें. तावडतोब त्यानें तिला आपल्याकडे आणून स्वतःच्या कन्येप्रमाणें तिचा प्रतिपाळ केला.

सामावती नदीवर स्नानास चालली असतां एके दिवशीं कौशांबीचा राजा उदयन याच्या दृष्टीस पडली. तिच्या सौंदर्यानें वेडावलेल्या राजानें तिला लग्नाची मागणी घातली. परंतु घोषकशेट्टीनें ती धुडकावून लाविली. राजाला या गोष्टींचा राग येऊन त्यानें शेट्टीस घराबाहेर काढून घरावर राजमुद्रा ठोकली. आपल्या मानलेल्या पित्याची ही अवस्था पाहून सामावती उदयनाशीं विवाह करण्यास तयार झाली. मात्र तिच्या पांचशें दासींसह राजानें तिला न्यावें अशी तिनें अट घातली. तिची अट मान्य करून उदयनानें तिला आपली पट्टराणी केली.

पुढें थोड्या दिवसांनीं उदयनास चूळमांगदिय नांवाची आणखी एक सौंदर्यवती भेटली. तिच्याशीं पुन्हां लग्न करून राजानें सामावतीचें पट्टराणीपद चूळमांगदियेस दिलें. यापूर्वी चूळमांगदियेचा बुद्धाशीं विवाह व्हावा म्हणून तिच्या आईवडिलांनीं खटपट केली होती. पण बुद्धानें नकार दिल्यामुळें बुद्धाबद्दल तिच्या मनांत विलक्षण अढी निर्माण झाली होती.

आपल्या देशपर्यटनाच्या कार्यक्रमांत बुद्ध एकदां कौशांबीस आला. घोषकशेट्टीनें त्याचें स्वागत करून त्याला व त्याच्या शिष्यपरिवारांस राहण्यासाठीं आपली "घोषिताराम" नांवाची बाग देऊं केली. त्या वेळीं पट्टराणीपदावर असलेल्या चूळमांगदियेस बुद्धावर सूड घेण्याची संधि मिळाली असें वाटून त्याची जाहीर सभेंत निंदा करण्यासाठीं म्हणून तिनें दोन हीन वृत्तींच्या माणसांची योजना केली. परंतु बुद्धानें शान्तपणें त्यांच्याकडे सतत दुर्लक्ष केल्यामुळें चूळमांगदियेस हार खावी लागली. कौशांबीच्या प्रजाजनांपुढें बुद्धाचीं रोज प्रवचनें चालूंच होतीं.

सामावतीची दासी खुज्जुत्तरा ही राणीसाठीं फुलें आणण्यास रोज ज्या माळ्याकडे जाई त्याच्या तोंडून बुद्धाच्या प्रवचनांची खूप तारीफ तिच्या कानीं येई. बुद्धाच्या शिकवणींपैकीं माळ्यानें जो कांहीं भाग खुज्जुत्तरेस सांगितला तोहि तिनें सामावतीस कथन केला. तो ऐकून बुद्धास पाहण्याची व त्याचा धर्म व संघ समजावून घेण्याची सामावतीस तीव्र इच्छा झाली. परंतु उदयनास बुद्धाबद्दल आदर नसल्यानें तिला बुद्धाचें दर्शन घडण्याची शक्यता नव्हती. रस्त्यावरून जातां येतां तरी बुद्धाचें दर्शन घडावें म्हणून

सामावती तासन् तास आपल्या महालाच्या खिडकींत बसे. चूळमांगदियेस ही गोष्ट कळतांच तिनें सामावतीबद्दल राजाचें मन कलुषित करण्याचा उपक्रम सुरूं केला. प्रथम प्रथम राजानें तिच्याकडे दुर्लक्ष केलें. पण शेवटीं त्यालाहि सामावतीचा राग येऊन तो तिला बाण मारण्यास धावला. आपल्या सदिच्छेच्या जोरावर राजाच्या बाणाचें निवारण करण्याचें सामावतीनें ठरविलें आणि तिच्या या नैतिक प्रतिकाराचा इतका परिणाम झाला कीं, राजा धनुष्यबाणांसकट जागच्या जागींच खिळला. त्याला हालचालच करतां येईना. दीन होऊन राजानें सामावतीची क्षमा मागितली. नंतर राजानें सामावतीस बुद्धाचें दर्शन घेण्यास खुषींनें परवानगी दिली. राजवाड्यांत एका भिक्षूनें नियमितपणें येऊन प्रवचन करावें अशी इच्छा तिनें प्रगट करतांच राजानें आनंदास ही कामगिरी सांगितली. सामावतीच्या नैतिक निष्ठेची हकीकत जेव्हां बुद्धाच्या कानीं गेली तेव्हां 'नीति-पारंगत' म्हणून त्यानें तिचा सन्मान केला.

**खुज्जुत्तरा :**– बौद्ध धर्मांतील अतिशय विद्वान् उपासिकांपैकीं खुज्जुत्तरा ही एक होती. ती घोषकशेठीच्या परिचारिकेची मुलगी. जन्मतःच तिला कुबड आलें असल्यानें तिचें नांव कुब्जा-उत्तरा म्हणजेच खुज्जुत्तरा असें पडलें. सामावतीचें लग्न झाल्यानंतर तिच्याबरोबर खुज्जुत्तराहि राजाकडे रहावयास गेली. राणीसाठीं फुलांच्या माळा आणण्याची कामगिरी तिच्याकडे असे. फुलें आणण्यासाठीं जेवढे पैसे रोज राणी तिला देई त्यापैकीं निम्मे ती गुपचुप ठेवी व निम्म्याच्याच माळा आणी. कोशांबीस बुद्ध आला असतांना एकदां माळ्यानें सर्व फुलांच्या माळा बुद्ध व त्याच्या शिष्यगणास देण्याचें ठरविलें. त्यामुळें सामावतीस तो एकहि फूल देऊं शकला नाहीं. खुज्जुत्तरा फुलें आणण्यास गेली तेव्हां माळ्यानें तिला बुद्धाकडे अन्न पोंचविण्यास सांगितलें. भोजन केल्यानंतर बुद्धानें उपदेशपर जें छोटेसें भाषण केलें तें परत आल्यावर खुज्जुत्तरेनें सामावतीस म्हणून दाखविलें. तिचा एकपाठीपणा पाहून सामावतीस खूप आश्चर्य वाटलें.

बुद्धाच्या उपदेशामुळें खुज्जुत्तरेची पैसे चोरण्याची संवय गेली. ती नेहमीपेक्षां दुप्पट माळा तेवढ्याच पैशांत कशी आणते याचें आश्चर्य वाटून राणीनें खुज्जुत्तरेस याचें स्पष्टीकरण विचारलें. खुज्जुत्तरेनें प्रामाणिकपणें सांगितलें कीं, पूर्वी ती निम्मे पैसे स्वतःसाठीं ठेवी. पण बुद्धाच्या दर्शनानंतर

तिला पश्चात्ताप होऊन तिनें ती संवय सोडली. गरें सांगितल्यामुळें राणी तिच्यावर खूश झाली आणि तिनें खुज्जुत्तरेस रोज बुद्धाचें प्रवचन ऐकून तें जसेंच्या तसें तिला सांगण्याची कामगिरी दिली. प्रवचन सांगतांना खुज्जुत्तरेस बसण्यासाठीं एक उपासन तयार करण्यांत आलें. या वेळीं राणी खालच्या आसनावर बसे. रोज खुज्जुत्तरेनें बुद्धाचें प्रवचन ऐकून यावें व जसेंच्या तसें राणीस ऐकवावें असा क्रम पुष्कळ दिवस चालू होता. या सर्व प्रवचनांचा पाली भाषेंत जो संग्रह तयार करण्यांत आला तो 'इतिवुत्तक' या नांवानें प्रसिद्ध आहे. खुज्जुत्तरेची विद्वत्ता पाहून 'उपासिकांमधील प्रथम श्रेणीची विदुषी' असा स्वतः बुद्धानेंहि तिचा गौरव केला.

विशाखा :– अंग प्रान्तांत भद्दीय या गांवीं मेण्डक नांवाचा एक गर्भश्रीमन्त सावकार रहात असे. त्याचा पुत्र धनंजय यास विशाखा नांवाची रूपवती एक कन्या होती. मेण्डक व त्याची सर्व कुटुंबीय मंडळी बौद्ध-धर्मीय होती. बिंबिसार राजाच्या राज्यांत जे पांच अतिशय श्रीमान् सावकार होते त्यांपैकीं मेण्डक हा एक होता. कोसल देशाचा राजा प्रसेनजित यानें बिंबिसारास अशी विनंती केली कीं, या पांच धनिकांपैकीं एकानें प्रसेनजिताच्या राज्यांत येऊन स्थायिक व्हावें. या विनंतीनुसार मेण्डकाचा पुत्र धनंजय कोसल देशांत आला. राजधानीपासून सात योजनांवर ( सुमारें छप्पन्न मैल ) साकेत नांवाच्या गांवीं धनंजयानें स्वतःसाठीं महाल बांधून तो तेथें राहूं लागला.

मेण्डक बुद्धाचा एकनिष्ठ पूजक होता. एकदां गौतमबुद्ध भद्दीयनगरास आला असतां मेण्डकानें त्याचें भव्य स्वागत केलें. आपली नात विशाखा हिनेंहि बुद्धाचें दर्शन घ्यावें असें सुचविल्यावरून विशाखा आपल्या पांचशें दासींसह बुद्धाच्या दर्शनार्थ निघाली. कांहीं अंतरापर्यंत वाहनांतून गेल्यानंतर वाहनांतून उतरून त्या पायींच पुढें गेल्या. बुद्धाचें एक प्रवचन ऐकल्यानंतर विशाखा तावडतोब स्रोत-आपन्न बनली.

श्रावस्तीला मिगार या नांवाचा सावकार रहात असे. त्याला पुण्ण-वध्दन नांवाचा एक मुलगा होता. या मुलाकरितां योग्य वधूचा शोध करण्या-साठीं मिगारानें आसपासच्या गांवीं कांहीं माणसें पाठविलीं. या मंडळींनीं विशाखा एका उपवनांतून दासींसह जातांना पाहिली. तिच्या सौंदर्याची

विलक्षण छाप पडल्यानें तिचें आणखी निरीक्षण करण्यासाठीं ती मंडळी तेथेंच थांबली. इतक्यांत पाऊस सुरू झाला. विशाखेच्या दासी निवाऱ्यांत जाण्यासाठीं धावपळ करूं लागल्या. पण विशाखा मात्र भिजली असूनहि सावकाश चालत एका झाडाखालीं येऊन थांबली. याचें त्या मंडळींना खूप आश्चर्य वाटलें. त्यांच्यापैकीं एकानें तिजजवळ जाऊन जेव्हां तिला याबद्दल विचारलें, तेव्हां तिनें उत्तर दिलें, "एक वस्त्र भिजलें तरी माझ्याकडे अनेक वस्त्रें आहेत आणि दुसरें असें कीं, ओल्यांत धावपळ करून एखादेवेळीं पडल्यास दुखापत होण्याचा संभव. क्वचित् एखादा भाग कायमचा अधू झाल्यास अविवाहित मुलीच्या दृष्टीनें ती फारच अनिष्ट गोष्ट ठरेल. म्हणून मी सावकाश चालत आलें." हें तिचें चलाख उत्तर ऐकून मंडळी खूष झाली व हीच मुलगी मिगारास सून म्हणून मिळवावी असें त्यांनीं ठरविलें. वधूनिवडीची निदर्शक पुष्पमाला तिच्या डोक्यावर घालण्यांत आली. नंतर या मंडळींनीं धनंजयास भेटून विशाखेला मिगाराच्या मुलासाठीं रीतसर मागणी घातली. पैशाच्या दृष्टीनें मिगार धनंजयाच्या पासंगासहि पुरणारा नव्हता. पण समान सामाजिक दर्जा लक्षांत घेऊन या विवाहाला धनंजयानें होकार दिला.

धनंजयाशीं आपलें व्याह्याचें नातें जुळणार या कल्पनेनें मिगाराला खूप धन्यता वाटली. त्यानें सर्व हकीकत प्रसेनजिताच्या कानीं घातली. मिगारकुटुंबाबरोबर राजा प्रसेनजितहि विवाहसमारंभास हजर राहण्यासाठीं निघाला. धनंजयाच्या स्वागताचा दरबारी थाट पाहून राजासकट सर्वच वरपक्षाची मंडळी आश्चर्यचकित झाली. असलें स्वागत धनजयास फार दिवस करणें परवडणार नाहीं असें वाटून प्रसेनजितानें त्याला विचारलें, "तुम्ही मुलीला सासरीं केव्हां पाठविणार?" यावर धनंजयानें उत्तर दिलें, "आतां नुकताच पावसाळा सुरू झाला आहे. तो संपल्यावर चार महिन्यांनीं आपण सर्वांनींच विशाखेसह येथून हलावें." म्हटल्याप्रमाणें धनंजयानें त्याच थाटानें वरपक्षीयांना तीन महिने ठेवून घेतलें. चौथ्या महिन्यांत वधूचे दागिने घडविण्यासाठीं कांहीं विशेष प्रकारच्या लांकडाच्या विस्तवाची गरज भासूं लागली. तेव्हां घराच्या बांधकामापैकीं कांहीं व घोड्यांच्या तबेल्यापैकीं कांहीं लांकूड वापरून सोनें वितळविण्याचें काम सोनारास सांगण्यांत आलें. दागिने घडले. इतरहि सर्व तयारी झाली.

निघण्याच्या आदल्या दिवशीं धनंजयानें कन्येला उपदेश केला, " कोणाचीहि निंदा अगर चहाटी करूं नकोस. उसनें द्रव्य देतांना अगर गरीब नातेवाईकांना मदत करतांना पूर्ण विचार करीत जा. पति व सासु-सासऱ्यांच्या सेवेंत दक्ष रहा व दारावर भिक्षेसाठीं आलेल्या तपस्व्यास कधींहि विन्मुख परतवूं नकोस. " या विशेष सूचना विशाखेला देऊन व तिला सल्ला देण्यासाठीं आठ अनुभवी मंडळी तिजबरोबर देऊन धनंजयानें तिची सासरीं रवानगी केली.

नखशिखान्त निवडक अलंकारांनीं मंडित केलेली विशाखा त्यांतून मिरवणुकीनें पतिगृहीं आली. वडिलांनीं तिला दिलेल्या देणग्या व तिचें सौंदर्य हे दोन विषय कित्येक दिवस श्रावस्तीच्या प्रत्येक नागरिकाच्या तोंडीं झाले होते. स्वतःच्या अनेक देणग्या आसपासच्या मंडळींना देऊन विशाखेनें आपलें औदार्यहि श्रावस्तीकरांना पटविलें.

मुलाच्या विवाहानिमित्त मिगारानें एक समारंभ साजरा केला. निर्ग्रन्थ पक्षाचे कांहीं भिक्षु आले असतांना विशाखेनें बाहेर येऊन त्यांना वंदन करावें अशी मिगारानें आज्ञा करतांच विशाखा तत्परतेनें बाहेर आली. पण विवस्त्र अवस्थेंतील भिक्षूंना पाहून तिला तिरस्कार वाटला व ती नमस्कार न करतां तशीच चटकन् घरांत गेली. भिक्षूंचा अपमान झाल्यामुळें ते रागावले. बुद्धाच्या तत्वज्ञानावर विश्वास असलेल्या कुलक्षणी वधूस तावडतोब हांकलून देण्याचा सल्ला त्यांनीं मिगारास दिला. पण एवढ्या श्रीमंत घराण्यांतील मुलीस असें तडकाफडकीं घालवून देता येणार नाहीं असें सांगून मिगारानें तिच्या वर्तनें भिक्षूंची क्षमा मागितली.

दुसऱ्या दिवशीं मिगाराचें भोजन चालू असतांना एक बौद्ध भिक्षु भिक्षेसाठीं दारांत येऊन उभा राहिला. मिगारानें त्याच्याकडे दुर्लक्ष केलें व जेवण चालूं ठेवलें. हें पाहून विशाखा भिक्षूस म्हणाली, " मामंजी शिळें अन्न खात आहेत, आपण पुढच्या दारीं जावें." हें ऐकून मिगार अतिशय संतापला. पुढील अन्न उचलून नेण्यास व तावडतोब घरांतून चालती होण्यास त्यानें विशाखेस सांगितलें. विशाखेनें स्पष्ट शब्दात त्याचा निषेध करून ती म्हणाली, " इतक्या सहजासहजीं घरातून हांकलून द्यायला मी कांहीं नदीवर पाणी

मरणाऱ्या बाईची मुलगी नव्हे ! माझे कुलवन्त आईवडील ह्यात असतांना तुम्ही मला अशा रीतीनें घालवूं शकणार नाहीं. " विशाखेस सल्ला देण्यासाठीं जी मंडळी आली होती त्यांच्याकडे मिगारानें शिळ्या अन्नाबद्दल तक्रार केली. तेव्हां विशाखेनें असें स्पष्टीकरण केलें कीं, मागील जन्मांत जें पुण्य केलें त्याचें फळ मिगार भोगीत आहे. परंतु या जन्मांत तो कोणतेंहि पुण्यकर्म करीत नाहीं. दारावर आलेल्या तपस्व्यास भिक्षा देण्याबाबत मिगारानें जी बेफिकीर वृत्ति दाखविली तिला उद्देशून विशाखेचे उद्गार होते. हें समजल्यानंतर मिगार गप्प झाला.

यानंतर एकदां विशाखा रात्रीं दिवा घेऊन तबेल्यांत गेली व एका विणाऱ्या घोडीची तिनें सुखरूप सुटका केली. विशाखा रात्रीच्या वेळीं बाहेर गेल्याबद्दल मिगारानें पुन्हां तक्रार केली. पण मिगाराच्या गैरसमजास कांहींहि आधार नाहीं हें जेव्हां तिच्या सल्लागारांनीं त्याला पटवून दिलें तेव्हां मिगारानें खेद प्रदर्शित केला. या संधीचा फायदा घेऊन बुद्ध व त्याच्या शिष्यांना इच्छेनुसार अन्न देण्याची परवानगी विशाखेनें सासऱ्याकडून मिळविली. थोड्या नाखुशीनेंच मिगारानें होकार दिला. पुढें एकदां मिगार खूप आजारी पडला. त्या वेळीं विशाखेनें त्याची जी सेवा केली त्यामुळें मिगाराला तिच्याबद्दल अतिशय आदर वाटून त्यानें तिला मातेप्रमाणें मानण्यास सुरुवात केली. त्यामुळें इतिहासांत विशाखा " मिगारमाता " या नांवानेंहि ओळखली जाते.

बुद्धाच्या प्रवचनांना विशाखा नेहमीं हजर राही. दिवसेंदिवस तिला अलंकारहि नकोसे वाटूं लागले. बुद्ध सोन्याच्या रूपांत देणगी घेणार नाहीं म्हणून तिनें सर्व दागिने विकून त्याचे जे नऊ कोटि कार्षापण आले ते खर्चून एक मोठी इमारत बांधली. त्या ठिकाणीं एक हजार खोल्या होत्या. ही इमारत ' मिगार-माता-प्रासाद ' या नांवानें ओळखली जाई. बुद्धाचें प्रवचन ऐकल्यानंतर नियमानें ती या प्रासादांत जाई व सर्वांची विचारपूस व हवें-नको पाहून मग घरीं परते. तिनें बुद्धाकडून खालील विशेष सवलती मागून घेतल्या होत्या. श्रावस्तींतील सर्व भिक्षूंना पावसाळ्यांत कपडे देणें, श्रावस्तीच्या सर्व भिक्षूंना भोजन देणें, भिक्षु-भिक्षुणींसाठीं नेहमीं तांदुळाचे सांठे तयार ठेवणें, भिक्षुणींना

स्नानासाठीं वस्त्रांचा पुरवठा करणें व आजारी भिक्षु-भिक्षुणींस औषधोपचार करणें. या गोष्टी स्वतःकडे राखून ठेवण्यास तिनें बुद्धाची सम्मति घेतली.

संघाला देणग्या देण्यांत विशाखा व अनाथपिंडिका यांची जणूं कांहीं चढाओढच लागली होती. रात्रंदिवस विशाखेचें घर भगवीं वस्त्रें परिधान केलेल्या भिक्षु-भिक्षुणींनीं गजबजलेलें असे. दुपारीं औषधोपचार चालत. बौद्ध संघास असंख्य देणग्या देणारी एक विख्यात स्त्री म्हणून स्वतः बुद्धानें तिचा गौरव केला.

# प्रकरण १३ वें

## जैनधर्मीय महिला

### माता आणि कन्या

श्वेतांबर व दिगंबर जैन वाङ्मयांत दिलेल्या सर्व स्त्रियांचीं चरित्रें या एका प्रकरणांत समाविष्ट करणें अशक्य आहे. फक्त कांहीं महिलांची साग्र माहिती द्यावयाची म्हटलें तरी तेंहि शक्य होणार नाहीं. दुसरें असें कीं, यांपैकीं कांहीं महिला फक्त दंतकथांतच असतील व कांहीं निश्चितपणें होऊन गेल्या असतील. या ऐतिहासिक चर्चेत शिरण्याचेंहि हें स्थळ नव्हे. कांहीं असलें तरी लाखों जैन स्त्रियांना या नामवंत स्त्रियांनीं जीवनाची स्फूर्ति दिलेली आहे. ज्या शेकडों श्राविकांचा उल्लेख वाङ्मयांत अगर कोरीव लेण्यांत नाहीं, अशांचें जीवन या अद्वितीय महिलांनीं घडविलें आहे.

एक गोष्ट मात्र निश्चितपणें सांगतां येईल व ती म्हणजे जैन विचार-प्रणालींत स्त्रीला मानाचें स्थान दिलें आहे. चोरी, दरोडा, महापूर अगर आग अशा संकटांत स्त्रियांना प्रथम वांचवावें असा दंडक असे. अगदीं पुरातन कालापासून जैन धर्मांतील प्रमुख चोवीस तीर्थंकरांच्या माता-पित्यांना पूजनीय स्थान देण्यांत आलें आहे. अनेक जैन मंदिरांत चोवीस माता आपापल्या चिरंजीव तीर्थंकरांना मांडीवर घेऊन बसल्या आहेत, अशी प्रतिमा ठेवून त्यांची पूजा करण्याची पद्धत आहे. अशा प्रतिमा अबू, गिरनार, पाटण, ओशिआ आणि इतर ठिकाणींहि आढळतात.

खि. पू. सहाव्या शतकांत होऊन गेलेला शेवटचा तीर्थंकर महावीर हा क्षत्रिय राजकन्या त्रिशला हिचा मुलगा. प्रियकारिणी या नांवानेंहि महा-वीराची माता ओळखली जाते. नंतरच्या कथांतून असा उल्लेख आहे कीं महावीर प्रथम एका ब्राह्मण स्त्रीच्या पोटीं होता. इन्द्रानें तेथून तो गर्भ काढून

त्रिशला या क्षत्रिय स्त्रीच्या पोटीं ठेवला. यावरून जैनधर्म पुराणमतवादी ब्राह्मण धर्माच्या विरुद्ध होता एवढेंच अनुमान काढतां येईल. कदाचित् देवानंदा या ब्राह्मण स्त्रीचा विवाह क्षत्रिय राजा सिद्धार्थ याच्याशीं होऊन नंतर तिला ' महावीर ' हा पुत्र झाला असावा हेंहि संभवनीय आहे. देवानंदाच त्रिशला व प्रियकारिणी या नांवानीं ओळखली जात असावी. हे सर्व तर्क करण्यास आधार देतां येईल. भगवती-सूत्र या श्वेतांबरपंथीय जैनांच्या प्रमाणग्रंथांत असा एक प्रसंग दिला आहे कीं, महावीराला केवलज्ञान प्राप्त झाल्यानंतर त्याच्या एका जाहीर प्रवचनास देवानंदा हजर राहिली. महावीरास पाहतांच तिच्या स्तनांतून दुधाच्या धारा झिरपूं लागल्या. एका शिष्यानें यासंबंधीं प्रश्न विचारतांच " ही माझी माता आहे " असें महावीरानें त्यास सांगितलें. देवानंदेनें धर्मदीक्षा घेण्याची इच्छा प्रदर्शित करतांच महावीरानें तिला जैन संन्यासिनी होण्याची परवानगी दिली.

मथुरेच्या बाजूकडील जैनांनीं महावीराच्या मातेच्या पूजनास फार महत्त्व दिलेलें दिसतें. अयापटावर काढलेली या महान् सिद्ध पुरुषास जन्म देणाऱ्या आर्यावतीची ( महावीराच्या मातेची ) प्रतिमा ख्रि. पू. पहिल्या शतकांतील असावी असा इतिहासकारांचा तर्क आहे.

चोवीस तीर्थंकरांच्या मातांपैकीं पहिला तीर्थंकर ऋषभनाथ याची माता मरुदेवी ही जैनधर्मीयांत अधिक सुप्रसिद्ध आहे. ऋषभाला केवलज्ञान प्राप्त झाल्याची बातमी जेव्हां मरुदेवी व भरत ( विनीतेस राज्य करणारा ऋषभाचा पुत्र ) यांना कळली तेव्हां तीं दोघें परिवारासह हत्तीवर बसून ऋषभाचें दर्शन घेण्यासाठीं गेलीं. या वेळीं देवांनीं तयार केलेल्या समवसरणांत ऋषभ बसला होता. पुत्राच्या चेहऱ्यावरील तेज व कांति पाहून आई ध्यानमग्न झाली व तत्क्षणीं तिला केवलज्ञान प्राप्त होऊन तिचें शरीर पंचमहाभूतांत विलीन झालें. जैनांच्या समजुतीप्रमाणें पृथ्वीतलावर पहिला ऋषभ व दुसरी मरुदेवी.

ब्राह्मी व सुंदरी या दोघी ऋषभनाथाच्या कन्या. ऋषभानें ब्राह्मीला अठरा मुळाक्षरांचें व सुंदरीला अंकगणितचें बरेंच शिक्षण दिलें होतें. पुरातन काळची ओळखली जाणारी ब्राह्मी लिपी ही ब्राह्मीनेंच परिपाटींत आणली

अशी कल्पना आहे. पोदनपूर ऊर्फ तक्षिला येथें राज्य करणारा ऋषभाचा पुत्र बाहुबली हा आपला मोठा भाऊ भरत याचें चक्रवर्तिपद मान्य करण्यास तयार नव्हता. शेवटीं त्या दोघांचें युद्ध झालें. त्यांत बाहुबलीचा जय झाला. ऐहिक सुखोपभोगासाठीं धडपड करण्यांतील निरर्थकता भरताला या प्रसंगानें पटली व तो सर्वसंगपरित्याग करून भिक्षु बनला. परंतु शेवटपर्यंत त्याला अहंकार नाहींसा करतां आला नाहीं व त्यामुळें निर्वाणाच्या शेवटच्या पायरीपर्यंत तो पोहोचूं शकला नाहीं. एकदां ब्राह्मी व सुंदरी या दोघींनीं भरतास शेपटीच्या बाजूनें हत्तीवरून उतरण्यास सांगितलें. अहंकारानें माघार घ्यावी अशी यांत गर्भित सूचना होती. भरताला जें जमलें नाहीं तें बाहुबलीला जमलें. त्यानें अहंकारावर मात करून पूर्णत्व संपादन केलें.

एकोणिसावा तीर्थंकर म्हणून ओळखली जाणारी मल्ली श्वेतांबर ग्रंथानुसार एक राजकन्या होती. मिथिलेचा (बिहार) राजा कुंभ याची ती कन्या. अतिशय देखणी व विदुषी म्हणून तिची सर्वत्र ख्याति झालेली होती. तिच्या प्राप्तीसाठीं कोसल, अंग, काशी, कुणाळ, कुरु आणि पांचाल देशांच्या राजांत अहमहमिका लागली होती. कुंभानें सर्वांच्याच मागणीस नकार दिल्यामुळें सर्वांनीं मिथिलेवर स्वारी केली. घनघोर युद्ध झालें. कुंभाचा पराभव होण्याचीं चिन्हें दिसूं लागतांच मल्लीनें पित्यास सांगितलें, " सर्व राजांना माझ्या महालांत पाठवा. मला त्यांना भेटायचें आहे. " सर्व राजे तिच्या महालांत येतांच त्यांना मल्लीचें जें दर्शन झालें, त्यानें सर्वजण अगदीं तटस्थ झाले. खरी मल्ली दुसऱ्याच एका दारानें प्रवेश करून म्हणाली, " आपण पहात होता ती माझी सोन्याची मूर्ति आहे. " इतकें बोलून मल्लीनें मूर्तीच्या डोक्यावरील कमळाचें फूल दूर करून तेथील एक झांकण उघडलें. तें उघडतांच इतकी घाण सुटली कीं ती सहन होईना. मूर्तीच्या आंत जो पोकळ भाग होता त्यांत कांहीं दिवसांपूर्वी उत्तमोत्तम खाद्यपदार्थ भरून ठेवले होते. ते नासून त्याची घाण येऊं लागली होती. या दृष्टान्ताच्या आधारानें मल्लीनें त्या सर्वांना असें पटविलें कीं बाह्यांगीं सुंदर दिसणारा तिचा देहहि किळसवाण्या रक्तमांसानें भरलेला आहे. मानव नाशिवंत आहे. इतकें सांगून संन्यासिनी बनून जगाचा

त्याग करण्याचा आपला निश्चय मल्लीनें जाहीर केला. सर्व राजांना उपरति होऊन तिच्यामागें तेहि सर्व आपापलीं राज्यें वारसदारांना देऊन भिक्षु झाले.

## पवित्र जीवनाचे आदर्श

राजीमति:-भारतीय संस्कृतीनें पावित्र्य व एकनिष्ठता यासंबंधींचीं जीं आदर्श तत्वें प्राचीन कालापासून स्त्रीसमाजापुढें ठेवलीं होतीं, त्यांचें पालन जैनधर्मानेंहि अत्यन्त काटेकोरपणें केलें. स्वत:चें जीवन निष्पाप ठेवून पत्नी या नात्यानें वाग्दत्ता वधूहि आपल्या पतीशीं एकनिष्ठ राही. कृष्णाचा एक नातेवाईक, यावियाचा तीर्थंकर नेमिनाथ त्याची पत्नी राजीमति हीहि अशीच एक आदर्श मांडला होती. विवाहमंडपाकडे वराची मिरवणूक जात असतांना नेमिनाथानें रस्त्याच्या बाजूला एका छोट्याशा पिंजऱ्यांत अनेक जनावरें कोंडून ठेवलेलीं पाहिलीं. अधिक चौकशी करतां त्याला असें सांगण्यांत आलें कीं, ल्ग्नाच्या मेजवानीसाठीं त्या जनावरांचा वध करण्यांत येणार होता. आपल्या भोजनासाठीं एवढ्या प्राण्यांना ठार मारण्याच्या कल्पनेनें नेमिनाथाचें अंग शहारलें. जगण्याची व सुखाची कल्पना त्याला किळसवाणी वाटली व तावडतोब संन्यस्त बनण्याचा त्यानें निश्चय केला. राजीमतीनेंहि त्याच्या पावलावर पाऊल ठेवून ती तपस्विनींच्या संघांत दाखल झाली. नेमिनाथ, राजीमति व नेमिनाथाचा भाऊ रथनेमी हीं तिघें एकदां गिरनार पर्वतावर साधना करीत असतां स्वत:च्या मनावरील ताबा सुटून रथनेमीच्या मनांत भावजयीबद्दल पापवासना निर्माण झाली. तीव्र शब्दांत त्याचा निषेध करुन राजीमति म्हणाली, "दुसऱ्यानें ओकून टाकलेलें आपण खाण्याचा प्रयत्न करीत आहां" ( दशवैकालिक-सूत्र २.७.११ ).

जैन धर्मग्रंथांतील एका प्रसिद्ध काव्यांत रथनेमि व राजीमति यांच्यांतील हा प्रसंग चित्रित केला आहे. यावरून पावित्र्याचा एक महान् आदर्श या दृष्टीनें राजीमतीला जैन वाङ्मयांत किती मानाचें स्थान होतें याची कल्पना येईल ( उत्तराध्ययन-सूत्र २२ ).

-कन्नकी:-शिलप्पदिकारम् या तामीळ भाषेंतील नामवन्त काव्यांत दक्षिण भारतातील कन्नकीची कथा दिलेली आहे. हें काव्य दुसऱ्या शतकांतील आहे.

विशुद्ध चारित्र्याची देवता म्हणून हिची आज अनेक शतकें तामीळ भाषिकांत पूजा होत आहे. पद्मिनीदेवी या नांवानें सिलोनी लोकांतहि हिचें भजन-पूजन करण्याची प्रथा आढळते. कन्नकीच्या पतीचें नांव कोवलन्. माधवी नांवाच्या वेश्येच्या नादीं लागून तो कन्नकीला विसरून जातो व स्वतःचा व कन्नकीचाहि सर्वनाश करतो. शेवटीं त्याला पश्चात्ताप होतो व पूहार सोडून पत्नीसह तो मदुरेस जावयास निघतो. हीं दोघें मदुरेंत पोंचण्याच्या सुमारास मदुरेच्या पांड्य राणीचें एक रत्नखचित कंकण चोरीस जातें. चोर म्हणून कोवलन्‌ला पकडण्यांत येते. कोवलन्‌ला शिक्षा झाल्यामुळें कन्नकी दुःखानें अगदीं खचून जाते. यानंतर निरपराध व निष्पाप कन्नकी आपल्या आध्यात्मिक सामर्थ्यानें मानवी कमकुवतपणास जिंकते. मृत पतीच्या दर्शनानें दुःखावेग न आवरून ती स्वतःचा डावा स्तन उखडून काढून रस्त्यावर फेंकते. सतीच्या सामर्थ्यानें सर्व मदुरा शहर जळून खाक होतें. ती स्वर्गांत पतीला भेटते. पृथ्वीवर प्रेम व पावित्र्य यांची देवता म्हणून कन्नकी अमर होते.

## भिक्षुणी आणि उपासिका

महावीराची समकालीन अज्ज (आर्या) चंदना ही महावीराची पहिली शिष्या जैन भिक्षुणी संघाची प्रमुख होती. कौशांबीचा राजा शतानीक याच्या बहिणीचें नांव जयन्ती. महावीराचीं प्रवचनें नियमानें ऐकून व वारंवार त्याच्याशीं तत्त्वचर्चा करून तिला ऐहिक जगाचा त्याग करण्याची उपरति झाली आणि ती भिक्षुणी बनली. शतानीकाची सौंदर्यवती पत्नी मृगावती ही चारित्र्य, राजकीय दूरदृष्टि व शौर्य या गुणांमुळें फार प्रसिद्धीस आलेली होती. त्या युगातील ही ख्यातनाम राज्ञी मिळविण्यासाठीं उज्जनियीच्या प्रद्योत राजानें कौशांबीवर स्वारी केली. युद्ध चालू असतांना शतानीक आजारी पडून मरण पावला. पण धूर्त राणीनें राजा फक्त आजारी असल्याची वार्ता जाहीर करून स्वतः सैन्याचें नेतृत्व पत्करलें. प्रद्योताचा पराभव करून त्याला राज्याबाहेर पिटाळल्यावर मग तिनें राजाच्या मृत्यूची वार्ता जाहीर केली. प्रद्योतानें पुन्हां उचल केली त्या वेळीं मात्र कौशांबीच्या दमलेल्या सैन्याचा त्याच्यापुढें टिकाव लागेना. बांका प्रसंग ओळखून मृगादेवीनें प्रद्योताच्या

जनानखान्यांत जाण्याचें मान्य केलें. पण तिनें अशी अट घातली कीं प्रद्योतानें तिच्या लहान मुलास (उदयनास) कोशांबीच्या सिंहासनावर बसवावें व त्याच्या रक्षणासाठीं एक मजबूत किल्ला बांधून द्यावा. ही अट पुरी होतांच ती महावीराच्या एका प्रकट सभेंत गेली. प्रद्योताच्या परवानगीनें जैन भिक्षुणी होण्यासाठीं दीक्षा देण्याची तिनें महावीरास विनंती केली. प्रद्योताचें मन त्या विशिष्ट क्षणीं पश्चात्तापानें कमकुवत बनलें असल्यामुळें त्यानें मृगावतीस व आपल्या जनानखान्यांतील आणखी कांहीं राण्यांना भिक्षुणी होण्याची परवानगी दिली.

जैन धर्मतत्त्वांच्या प्रसारास हातभार लावणाऱ्या अनेक भिक्षुणी व उपासिकांचीं नांवें जैन वाङ्मयांत आलेलीं आहेत. यांपैकीं बऱ्याच स्त्रिया बुद्धिमान् व सुशिक्षित म्हणून प्रसिद्ध होत्या. त्या सर्व भिक्षुणीच होत्या. एक महान् जैन आचार्य म्हणून प्रसिद्धीस आलेल्या आर्य वज्र सहा वर्षांचा असतांनाच त्याच्या पालक साधूनें त्याला भिक्षुणींच्या स्वाधीन केलें. त्यांनीं त्याला सर्व तऱ्हेचें ज्ञान दिल्यामुळेंच तो पुढें इतका मोठा झाला. परंतु या सर्वांपेक्षां याकिनी महत्तरा हिचा उल्लेख विशेष प्रामुख्यानें केला पाहिजे. हरिभद्रसूरी नांवाचा एक विद्वान् ब्राह्मण होता. त्यानें अशी प्रतिज्ञा केली होती कीं, जो त्याला वादांत जिंकील व ज्याचें बोलणें त्याला समजणारसुद्धां नाहीं इतकें वरच्या दर्जाचें असेल त्याला तो आपला गुरु करील. याकिनी नांवाच्या जैन भिक्षुणीनें त्याचा वादांत पराभव करून त्याला जैन धर्माची दीक्षा दिली. हरिभद्रसूरींची विद्वत्ता व त्याचें निरनिराळ्या विषयांवरील लेखन समजलें म्हणजे त्याला जिंकणाऱ्या याकिनीच्या विद्वत्तेची आपोआप कल्पना येईल. हरिभद्रानें नीतिशास्त्र, योग, तर्कशास्त्र व धर्मविधि यांवर प्रमाणग्रंथ लिहिले आहेत. जे जैन भिक्षु देवळांत रहात व जवळ पैसे बाळगीत त्यांच्यावर कडक टीका करून हरिभद्रानें जैन धर्मांतहि क्रान्तिकारक फरक घडवून आणले. अशा विद्वानाचा वादांत पराभव करणें ही गोष्ट सोपी नव्हती. हरिभद्र स्वतःस मोठ्या अभिमानानें 'याकिनी-पुत्र' (याकिनी-महत्तरा-सूनु) असें म्हणवी. हरिभद्राला शिक्षण देण्याइतकी पारंगतता याकिनींत असली पाहिजे यांत शंका नाहीं.

जैन भिक्षुणींत ज्ञानाची जी उच्च पातळी दिसून येते तिचा पुरावा

गुणा साध्वीच्या जीवनांत दिसून येतो. स्वतः सिद्धर्षीनें " विवेची मूर्तिमंत देवता " अशा शब्दांनीं तिचा गौरव केला आहे.

' उपामितभव-प्रपंच-कथा ' या नांवानें प्रसिद्ध असलेला कथा-संग्रह प्रथम गुणा साध्वीनेंच तयार केला ( इ. स. ९०५ ). इ. स. ११११८ त सिद्धराज जयसिंहाच्या अमदानींत महानंदा श्रीमहत्तरा व गणिनी वीरमति या दोन भिक्षुणींनीं मलधारी हेमचन्द्रास ' विशेषावश्यकभाष्य ' या जिन-भद्राच्या ग्रंथावर साग्र टीका लिहिण्यांत खूप मदत केल्याचा उल्लेख सांपडतो. इ. स. १३५० त गुणसमृद्धि महत्तरा हिनें " अञ्जना-सुंदरी-चरित्र " या नांवाच्या प्राकृत ग्रंथाची रचना केली.

सर्वसामान्यतः स्त्रीच्या जीवनांत दोनच अपेक्षा विशेषेंकरून असतात. नितान्त पतिप्रेम व सद्गुणी मुलांचें मातृत्व. आईचें मुलांवर किती निरपेक्ष प्रेम असतें याचें उदाहरण सालोमनच्या न्यायप्रियतेविषयींच्या गोष्टींत दिसून येतें. एखाद्या मोठ्या ध्येयाच्या सिध्यर्थ आपल्या मुलाचा त्याग करणें किंवा आपखुषीनें त्याला संन्यास घेण्यास अनुमति देणें ही गोष्ट वाटते तेवढी सोपी नाहीं. श्रेणिक राजा व राणी धारिणी यांचा पुत्र मेघकुमार यानें जैन भिक्षु होण्याचा हट्ट धरला. कांहींहि करून त्याचें मन फिरेना. तेव्हां तीं दोघें त्याला महावीराकडे घेऊन गेलीं. दीक्षा घेण्यापूर्वी धारिणीनें मुलाला " खरा व आदर्श भिक्षु " होण्याची सूचना दिली. याहूनहि पाहिणीचा त्याग अधिक थोर आहे. तिच्या औदार्यामुळें व त्यागामुळेंच जैन धर्माला हेमचन्द्राचार्या-सारखा थोर आचार्य व विद्वान् लेखक लाभूं शकला.

उत्तर गुजरायेंतील धंधुका या गांवीं चाचिग नांवाचा एक श्रीमान् जैन व्यापारी रहात असे. त्याची पत्नी पाहिणी ही अतिशय धार्मिक वृत्तीची होती. इ. स. १०८८ मध्यें त्यांना चांगदेव नांवाचा एक मुलगा झाला. असें म्हणतात कीं त्याच्या जन्मापूर्वी पाहिणीला एक स्वप्न पडलें. त्या स्वप्नांत तिनें आपल्या गुरूंना ( देवचंद्रांना ) एक चिंतामणिरत्न देऊं केलें. तिनें देवचंद्रास हें स्वप्न सांगितलें. मुलगा पांच वर्षांचा झाल्यानंतर त्याला घेऊन ती एकदां देवचंद्रांच्या दर्शनास गेली. तेथें गेल्याबरोबर चांगदेव तडक जाऊन देवचंद्रांच्या आसनावर बसला. हें पाहून मुलाचें सर्व भविष्य त्यांच्या ध्यानीं

आलें. पाहिणीला तिच्या स्वप्नाची आठवण देऊन गुरु म्हणाले, "तुझा हा एकुलता एक पुत्र तूं जैन मंदिरास देऊन टाक." थोडा वेळ ती गोंधळली. हा प्रसंग घडला तेव्हां चांगदेवाचा पिता परगांवीं गेलेला होता. तो येईपर्यंत वाट पहायची असें ठरविल्यास कदाचित् पुत्रप्रेमामुळें त्याचा नकार मिळेल असें वाटून त्याच्या गैरहजेरींतच पाहिणीनें पुत्राला धर्ममंदिरास देऊन टाकण्याचा अवघड निर्णय घेतला. तिच्यापुढें दुहेरी पेंच होता. एक मुलाचा विरह सहन करणें व दुसरा नवऱ्याचा रोष सहन करणें. कल्पनेप्रमाणें चांगदेवाचा पिता परत आल्यानंतर त्याला जेव्हां ही गोष्ट कळली तेव्हां तो खूप संतापला आणि मुलाला परत मिळविण्यासाठीं त्यानें भगीरथ प्रयत्न केले. पण देवचन्द्रानें चांगदेवाला दूर हालवून मोठ्या चातुर्यानें परिस्थितीस तोंड दिलें. कालांतरानें चाचिगानेंहि चांगदेवाच्या दीक्षाविधीस अनुमोदन दिलें. मोठेपणीं कलि-काल-सर्वज्ञ आचार्य हेमचन्द्र या नांवानें चांगदेव प्रसिद्ध झाला.

पाटणच्या पहिल्या भीमदेवाचा प्रधान विमल याची पत्नी श्रीदेवी हिजसंबंधींहि अशाच तऱ्हेची माहिती उपलब्ध आहे. विवाहानंतर प्रत्येक स्त्रीला मातृत्वाच्या सुखाची अपेक्षा असते. पण या सुखाचा त्याग करून श्रीदेवी अमर झाली. अनहिल्लवाद पाटणच्या चालुक्य राजांना वंशपरंपरेनें प्रधान म्हणून सल्ला देणाऱ्या नामवंत शूर घराण्यांत विमलचा जन्म झाला होता. एकदां राजानें विमलची चन्द्रावती विभागाचा राज्यपाल म्हणून नेमणूक केली. या विभागांतच अबूच्या पहाडाचा समावेश होई. चन्द्रावतीच्या निसर्ग-सौन्दर्यांत व सांस्कृतिक व कलापूर्ण वातावरणांत विमल व त्याची सुशिक्षित पत्नी श्रीदेवी दोघेंहि पूर्णपणें रममाण झालीं. याच ठिकाणीं विमलची एका जैन भिक्षूशीं गांठ पडली. युद्धांत व राजकारणांत नाइलाजानें कराव्या लागलेल्या पातकांच्या क्षालनासाठीं कांहीं धर्मविधि करण्याचें विमलनें या भिक्षूच्या सल्ल्यानें निश्चित केलें. अबूला जैनमंदिर बांधण्याची भिक्षूनें सूचना दिली.

विमल व श्रीदेवी यांनीं आराधना करून देवी अंबिकेस प्रसन्न करून घेतलें व तिजकडे दोन वर मागितले. एका वरानुसार त्यांना एक पुत्र व्हावा व दुसऱ्या वरानुसार अबूवरील जैनमंदिर बांधण्यास देवीनें मदत करावी. दुसऱ्या दिवशीं देवीनें प्रकट होऊन विमलला सांगितलें कीं, "दोन्ही वर

मान्य करण्याइतकी तुझी पुण्याई नाहीं तेव्हां दोन्हींपैकीं कोणताहि एकच वर तूं घे." उत्तर देण्यास एका दिवसाची मुदत विमलनें मागून घेतली व घरीं जाऊन पत्नीचा सल्ला विचारला. श्रीदेवीनें विचार केला, "मुलगा बापाप्रमाणें शूर व सद्गुणी निघेलच अशी खात्री नाहीं. त्याऐवजीं जर मंदिरासाठीं देवीची मदत मागितली तर या कलाकृतीनें विमलचें नांव अजरामर होईल. हा सल्ला पतीला देण्यांत जी वृत्ति श्रीदेवीनें दाखविली आहे ती असामान्य व कौतुकास्पद आहे. या कथेंत थोडीशीं काल्पनिक भेसळ झाली असण्याचा संभव आहे, तरीहि यामुळें श्रीदेवीची योग्यता कमी होत नाहीं.

अशा रीतीनें देवळें बांधणें, तलाव किंवा पायऱ्यांच्या विहिरी बांधणें अगर महत्त्वाच्या धर्मग्रंथांच्या हस्तलिखित प्रती तयार करणें वगैरे कामांत अनेक जैनधर्मीय स्त्रियांनीं उल्लेखनीय कामगिरी बजावलेली असल्याची इतिहास साक्ष देतो. अनेक ठिकाणीं दगडांत कोरलेल्या मजकुरावरूनहि स्त्रियांची महती सिद्ध होते. अशा तऱ्हेचीं कामें करण्याबाबत अनुपमादेवी ही अतिशय प्रसिद्ध होती. श्रीदेवी व अनुपमादेवी यांच्या चरित्रांवरून जैन धर्माच्या काळांत थोर स्त्रियांना किती आदरानें वागविलें जात असे याची कल्पना येते.

दक्षिण भारतांत कर्नाटक प्रांतांत जैन धर्माचा पुरस्कार करणाऱ्या अनेक नामवन्त स्त्रिया होऊन गेल्या. उपवासानें जीवनाचा शेवट करणें ( सल्लेखन ) ही एक अतिशय अवघड साधना जैन धर्मानें मानिली आहे. राष्ट्रकूट कुलांतील दुसऱ्या कृष्ण राजाच्या कारकीर्दींत जक्कियव्वे या नांवाची एक महिला होऊन गेली. पतीच्या निधनानंतर राजानें नगरखण्ड ७० या विभागाची जिल्हाधिकारी म्हणून तिची नेमणूक केली. आपल्या राजकारणकौशल्यानें व उच्च नैतिक वर्तनानें तिनें नगरखण्ड ७० चें उत्कृष्ट प्रशासन केलें. शेवटीं क्षणभंगुर जीवाला कंटाळून तिनें सल्लेखन करून जीवनाचा शेवट केला.

पश्चिम चालुक्याचा राजा तैलप ( इ. स. ९७३ ते ९९७ ) याचा सेनापति मल्लप्पा याची पत्नी अट्टीमब्बे हीहि एक नामांकित भक्त म्हणून प्रसिद्ध होती. पोन्नाच्या शान्तिपुराणाच्या एक हजार प्रती तिनें आपल्य

खर्चानें तयार करवून घेतल्या होत्या. सोनें व जवाहीर वापरून पधरांशे मूर्तिहि तिनें घडवून घेतल्या होत्या.

जैनधर्मीय सेनापति गंगराज याची पत्नी लक्कले हिजसंबंधीं त्या वेळच्या लिखाणांत "व्यवहारकुशल" व "युद्धांत सदैव विजय मिळविणारी" असे उल्लेख केलेले आढळतात. हिनें इ. स. १११८ त श्रवणबेळगोळला एक मोठें जैनमंदिर बांधलें. तिचें दातृत्व, दानशूरता व परोपकारी वृत्ति दाखविण्यासाठीं "सुमंगलाची खाण" असेंहि तिचें वर्णन केलें जातें.

होसलराजा विष्णुवर्धनदेव याची पत्नी शान्तादेवी ही उत्कृष्ट नर्तिका, गायिका व वादनपटु म्हणून प्रसिद्ध होती. ही जैन धर्माची उपासिका होती. देवळें बांधणें, देणग्या देणें वगैरे बाबतींत तिची इतकी कीर्ति होती कीं, त्यावरून तिला "जैन श्रद्धेचा मुकुटमणी" अशी संज्ञा दिली जात असे.

# प्रकरण १४ वें

## उत्तर हिंदुस्थानांतील महिला

(खि. पू. ४०० ते इ. स. १२००.)

सुमारें १६०० वर्षांच्या कालखंडांत उत्तर हिंदुस्थानांत होऊन गेलेल्या नामवन्त राजकारणी व प्रशासक स्त्रियांच्या कार्याचा आढावा या प्रकरणांत घेण्याचा मानस आहे. कांहीं सुविख्यात विदुषी व लेखिकांचाहि येथें समावेश केलेला आहे. परंतु एक गोष्ट मात्र सुरुवातीसच नमूद करणें भाग आहे व ती म्हणजे खि. पू. ४०० ते इ. स. १२०० या कालांतील इतिहासाबद्दल फारच थोडा लेखी पुरावा आज उपलब्ध असल्यानें मिळालेल्या पुराव्यावरच ही सर्व माहिती आधारावी लागली आहे.

### प्रशासक स्त्रिया

स्त्रीराज्य:–भारतीय वाङ्मयांत स्त्रीराज्याविषयीं अनेक उल्लेख आढळतात. जैमिनी भारताच्या बाविसाव्या प्रकरणांत अर्जुन व प्रमिला राणी यांच्यामधील युद्धाची हकीकत दिलेली आहे. प्रमिला राणी ही जरी फक्त दन्तकथेंत असली तरी उत्तर हिंदुस्थानांत अनेक विभागांवर स्त्रिया वंशपरंपरेनें राज्य करीत होत्या ही वस्तुस्थिति आहे. इ. स. च्या सातव्या शतकांत चिनी प्रवासी ह्यु-एन-सँग् यानें आपल्या सियुकी नामक ग्रंथांत कांहीं स्त्रीराज्यांचा उल्लेख केलेला आहे. ब्रह्मपुत्रा नदीच्या उत्तरेकडचा जो भाग हल्लीं हिमाल्यांतील कूमॉन गऱ्हवाल या नांवानें ओळखला जातो, तो पूर्वी 'पूर्वेकडील स्त्रीराज्य' या नांवानें ओळखला जाई असें सियुकी या ग्रंथांत म्हटलें आहे. यालाच "सू-वर्ण-गोत्र देश" असेंहि संबोधण्यांत येई. या भागावर वंशपरंपरा स्त्रियाच राज्य करीत होत्या. राणीच्या पतीला राजा म्हणत व प्रशासनकार्यांत राजा भाग घेई. बंड झालें तर तें मोडण्यासाठीं व शेतीच्या

कामासाठीं फक्त पुरुषांचा उपयोग करून घेण्यांत येई. अशाच तऱ्हेची माहिती " हिमालयांतील जिल्हे " या ॲट्किन्सननें लिहिलेल्या पुस्तकांतहि आढळते. पिंचिन नांवाची स्त्री तिबेटमधील नू-वँग जमातीची राणी होती अशी हकीकत ॲट्किन्सनच्या या पुस्तकांत दिलेली आहे. ह्यू-एन-संगनें आणखी एका स्त्रीराज्याचा उल्लेख केला आहे. हें राज्य हल्लींच्या बलुचिस्तान प्रांतांत ठंकरजवळ असून याला त्यानें पश्चिमेकडील स्त्रीराज्य असें म्हटलें आहे. वराहमिहिराच्या बृहत्‌संहितेंत याच राज्याचा उल्लेख भारतवर्षाच्या वायव्येकडील प्रांतांत केला आहे. या तुरळक उल्लेखांपलीकडे जुन्या भारतवर्षांतील या दोन राज्यांविषयीं कांहींहि माहिती दुर्दैवानें आज उपलब्ध नाहीं.

**वाकाटक राणी प्रभावती गुप्ता** :–इ. स. ३७६ ते ४१४ या कालांत उत्तर हिंदुस्थानांत होऊन गेलेल्या दुसऱ्या चंद्रगुप्त विक्रमादित्याची प्रभावती ही मुलगी. तिचा विवाह वाकाटक वंशांतील दुसऱ्या रुद्रसेनाशीं झाला होता. दक्षिण हिंदुस्थानच्या विस्तीर्ण भागावर रुद्रसेनाचें आधिपत्य होतें.

ऐतिहासिक पुराव्यावरून असें दिसतें कीं इ. स. ४०० हें शतक संपण्याच्या सुमारास रुद्रसेन दिवंगत झाला असावा. रुद्रसेनाला तीन मुलगे होते– दिवाकरसेन, दामोदरसेन व प्रवरसेन. वडील मेले तेव्हां हीं मुलें लहान असावींत आणि दिवाकरसेनाची पालनकर्ती म्हणून त्याच्या वतीनें प्रभावतीनें राज्यकारभार पाहिला असावा. कांहींहि असलें तरी रुद्रसेनाच्या मृत्यूनंतर सुमारें १२–१३ वर्षें प्रभावती एवढ्या मोठ्या राज्याचा कारभार पहात होती एवढें निश्चित.

दिवाकरसेन महाराजा म्हणून रुद्रसेनाच्या गादीवर बसल्याचा पुरावा अजूनहि उपलब्ध झालेला नाहीं. दुसरा प्रवरसेन गादीवर आल्यानंतर अठरा वर्षानंतरच्या एका लेखांत प्रभावतीचा उल्लेख " दामोदरसेन व प्रवरसेन या दोन महाराजांची माता " असा केलेला आढळतो. या वेळीं तिचें वय शंभर वर्षांहून अधिक होतें. पहिला कुमारगुप्त राजा इ. स. ४५५ मध्यें मृत्यु पावला. याच्या अगोदर थोडेच दिवस राणी प्रभावती मेली असावी. नागपूरजवळच असलेल्या रामटेक या ठिकाणीं प्रभावती एकदां यात्रेनिमित्तानें गेली असतां रामगिरीस्वामींच्या प्रेरणेनें राणीनें प्रसिद्ध केलेला एक जाहीरनामा

उपलब्ध आहे. यांत राणी विष्णूची उपासिका असल्याचा उल्लेख आहे. ती आपल्या गोत्राचा व कुलनामाचाहि या जाहीरनाम्यांत उल्लेख करते. प्रभावतीच्या पतीचें गोत्र विष्णुवृद्ध असूनहि प्रभावती आपल्या गोत्राचा ज्या अर्थी 'धारण' असा निर्देश करते त्या अर्थी लग्नानंतर मुलीचें गोत्र बदलण्याचा रूढीनियम त्या काळीं अंमलांत नसावा असें दिसतें. संप्रदानाच्या अभावीं गोत्र बदलण्याची पद्धत त्या काळच्या विवाह-विधींतून गाळली असण्याचा संभव आहे.

**ओरिसामधील भौमकर वंशांतील राज्यकर्त्या स्त्रिया :–** राजाच्या मृत्यूनंतर त्याची पत्नी अगर मुलगी गादीवर येण्याची पद्धत प्राचीन काळीं हिंदुस्थानांत रूढ नव्हती. ओरिसांतील भौमकर वंश या पद्धतीस अपवाद असलेला दिसून येतो. दत्तक घेण्याची रूढि या भागांत परिचित असूनहि या वंशांतील सहा महिलांना राज्ञीपदाचा व प्रशासनाचा मान मिळाला. ओरिसा प्रान्तावर या वंशाचें राज्य सुमारें नवव्या शतकापासून अकराव्या शतका-पर्यंत होतें.

**राणी पहिली त्रिभुवन महादेवी :–** राजमल्ल नांवाच्या दक्षिणेकडील नाग जमातीच्या प्रमुखाची ही कन्या राजा ललितहार याची पत्नी. हिचें दुसरें नांव सिद्धगौरी. त्या काळच्या एका लेखानुसार राजा तिसरा शुभाकर मरण पावल्यानंतर त्याच्या मातेनें--पहिल्या त्रिभुवन महादेवीनें–नातू वयांत येईपर्यंत राज्यकारभार पाहिला अतिप्राचीन काळीं ओरिसावर राज्य करणाऱ्या राणीचें गोस्वामिनी हें नांव त्रिभुवन महादेवीनें धारण केलें. भौमकर वंशांतील सर्व लोक बौद्धधर्मीय असूनहि ही राणी विष्णूची महान् उपासिका होती.

**राणी दुसरी त्रिभुवन महादेवी :–** चवथ्या शुभाकर राजाची ही पत्नी. शुभाकराचा धाकटा भाऊ तिसरा शिवाकर याच्या मृत्यूनंतर दुसरी त्रिभुवन महादेवी गादीवर आली. हिचें दुसरें नांव पृथ्वी महादेवी. कोशलाधि-पति स्वभावतुंग याची पृथ्वी महादेवी ही कन्या. स्वतः वैष्णव उपासनेची कट्टी पुरस्कर्ती असूनहि शैवपंथीयांना तिनें धार्मिक स्वातंत्र्य दिलें होतें.

**राणी गौरी महादेवी व राणी दण्डी महादेवी :–** राजा पांचवा शुभा-कर याच्या मृत्यूनंतर भौमकर वंशांतील चार राण्या लागोपाठ गादीवर आल्या. यापैकीं एकीनेंहि दत्तक कां घेतला नाहीं याचें आश्चर्य वाटतें. पांचवा शुभा-

कर हा भौमकर वंशांतील शेवटचा पुरुष. याची पत्नी गौरी महादेवी. गौरी महादेवीचा काल इतिहासकारांना अजून निश्चित करतां आलेला नाहीं. हिच्यानंतर गादीवर आलेली दण्डी महादेवी ही शिवभक्त होती. दण्डीनें सुमारें आठ वर्षें राज्य केलें असावें. हिच्या कालांतील कागदोपत्रीं भौमकर शकानुसार एकशेऐंशी ते एकशेसत्यांऐशी असा काल दिलेला आढळतो. बहुतेक हा काल म्हणजेच इ. स. १०११ ते १०१८ हीं वर्षें असावींत. या दोन्ही राण्यांच्या राज्यव्यवस्थेबद्दल कांहींहि विशेष माहिती उपलब्ध नाहीं.

**राणी बकुल महादेवी व राणी धर्म महादेवीः**—दण्डी महादेवीनंतर तिची सावत्र आई बकुल महादेवी ही गादीवर आली. हिचा जन्म भञ्ज वंशांत झाला होता. हिच्या राज्यकारभाराबद्दल कांहींच माहिती देतां येत नाहीं. बकुल महादेवीनंतर तिची जाऊ धर्म महादेवी ही गादीवर आली. हिच्या पतीचें नांव राजा तिसरा शान्तिकर. भौमकर वंशांतील ही शेवटची राणी.

**दिद्दा राणी व काश्मीरमधील कांहीं शूर महिलाः**—काश्मीरच्या इतिहासांत इ. स. ९५८ ते १००३ हा काळ दिद्दा राणीच्या कर्तृत्वाचा कालखंड म्हणून ओळखला जातो. हिन्दुस्थानच्या इतिहासांत ही एकच राणी अशी आहे कीं जिच्या कारकीर्दीबद्दल सविस्तर माहिती उपलब्ध आहे. दिद्दा ही लोहरचा राजा सिंहराज याची मुलगी व उदभांडपूरचा शाही राणा भीम ऊर्फ भीमपाल याची नात. तिचा विवाह काश्मीरचा राजा क्षेमगुप्त याच्याशीं झाला होता. इ. स.च्या बाराव्या शतकाच्या मध्यांत काश्मीरसंबंधीं जो अधिकृत अहवाल ' राजतरंगिणी ' या नांवानें कल्हणानें तयार केला त्यांत अशी माहिती दिली आहे कीं, क्षेमगुप्तावर दिद्दा राणीचा एवढा पगडा बसला होता कीं त्यावरून राजाला " दिद्दा-क्षेम " असें म्हणण्याची प्रथा पडली. कल्हणाच्या या हकीकतीस बळकटी आणणारा आणखी एक पुरावा मिळतो. क्षेमगुप्ताच्या कारकीर्दीतल्या तांब्याच्या नाण्यांवर ' दि-क्षेम ' अशीं अक्षरें कोरलेलीं आहेत. ' दिद्दा-क्षेम ' यावरून तयार झालेलें हें लघुरूप असावें.

विवाहानंतर आठ वर्षांनीं म्हणजे इ. स. ९५८ मध्यें क्षेमगुप्त राजा मरण पावला. यानंतर त्याचा अल्पवयी पुत्र अभिमन्यु याला गादीवर बसवून राणीनें पालक या नात्यानें राज्यकारभार पाहण्यास सुरुवात केली. क्षेमगुप्ताला

स्वतःची मुलगी देऊन मुख्य मन्त्री फल्गुनानें दिद्दा राणीचा रोष ओढवून घेतला होता. अभिमन्यु गादीवर बसल्यानंतर राणीनें फल्गुनाला नेस्तनाबूत करून टाकला. यानंतर तिला महिमन् व पाटल या नांवाचे दोन बलाढ्य सरदार काश्मीरचें राज्य बळकाविण्यासाठीं करीत असलेल्या कटाचा सुगावा लागला. राजवाड्यांतून हांकलून दिल्यानंतर त्यांनीं बंड पुकारलेलें पाहून त्यांच्या ब्राह्मण सहकाऱ्यांना राणीनें लांच देऊन फोडलें व लांच घेतलेल्या यशोधर नांवाच्या ब्राह्मणाकडे तिनें सैन्याचें आधिपत्य सोंपविलें. हें बंड मोडल्यानंतर ठक्कनच्या शाही राजाचाहि यशोधरानें पराभव केला. यशोधराचें बळ पाहून राणी पुन्हां त्याच्याविषयीं संशयित झाली. ठक्कनला राज्यावर ठेवण्यासाठीं यशोधरानें लांच घेतली असा तिनें त्याच्यावर आरोप केला. या आरोपावरून यशोधराचा सेनाधिकार काढून घेण्याचें जेव्हां राणीनें ठरविलें तेव्हां मात्र सैन्यानें बंड केलें व दिद्दाला राजवाड्यांत नजरकैदेंत ठेवण्यांत आलें. राणीनें पुन्हां उठाव केला व नरवाहन या नांवाच्या मंत्र्याच्या साहाय्यानें सर्वाधिकार आपल्या ताब्यांत घेतले. यशोधराचें बंड मोडण्यासाठीं तिनें काश्मीरच्या इतिहासांत एकांग या नांवानें गाजलेल्या सैन्यविभागाचा उपयोग केला. कल्हणानें दिद्दाच्या कर्तृत्वाचें वर्णन अतिशय परिणामकारक भाषेंत केलें आहे. तो म्हणतो, " काश्मीरांत विश्वासघातकी मंत्र्यांची एक परंपराच होती. या लांचखाऊ अधिकाऱ्यांनीं स्थानिक लौकिक शक ३९९७ (इ. स. ९०१-९०२) पासून साठ वर्षांत गोपाल राजापासून अभिमन्यु राजापर्यन्त एकूण सोळा राजांना पदच्युत करून त्यांच्या वैभवाचें अपहरण केलें होतें. दिद्दानें या सर्व शत्रूंचा चुटकीसरसा पाडाव केला." यशोधराचें बंड मोडून काढल्यानंतर दिद्दानें नरवाहनास " राजानक " असें अभिदान देऊन तिचा प्रमुख सल्लागार म्हणून त्याची नेमणूक केली. कांहीं कालानें नरवाहनासहि सत्तेची हांव उत्पन्न झाली आहे असें तिला वाटलें व तो तिच्या मर्जीतून उतरला. नरवाहनाला राणीचा विश्वास गमावल्यामुळें अतिशय दुःख झालें व त्यानें आत्महत्या केली. यानंतर थोड्याच दिवसांनीं एका खेड्यांतील सरदारांनीं (धामर) दिद्दाविरुद्ध बंड केलें. या वेळीं फल्गुनाला तिनें साहाय्यासाठीं बोलाविलें. याच सुमारास (इ. स. ९७२) दिद्दाचा पुत्र राजा अभिमन्यु मरण पावला व त्याच्या गादीवर त्याचा मुलगा नंदिगुप्त हा आला.

मुलाच्या मृत्यूनें दिद्दाला फार मोठा धक्का बसला. पुण्यसंचयार्थ एक वर्षभर तिनें देवळें, मठ वगैरे बांधण्यांत लाखों रुपये खर्च केले. दिद्दा राणींत दोन फार मोठे दुर्गुण होते. एक हीन चारित्र्य व दुसरा लोभ. मन्त्रतन्त्राच्या साहाय्यानें तिनें आपले तिन्ही नातू-नंदिगुप्त, त्रिभुवन आणि भीमगुप्त—यमसदनास पाठविले व ती स्वतः इ. स. ९८१ त परत गादीवर बसली.

तुंग नांवाच्या एका खालच्या जातीच्या माणसाशीं तिनें विशेष सख्य केलेलें पाहून मुख्य मंत्री व इतर मंत्री यांनीं तिच्याविरुद्ध बंडाळी सुरू केली. या बंडाचें नेतृत्व दिद्दाच्या भावाचा मुलगा विग्रहराज यास देण्यांत आलें. राज्यांतील वजनदार ब्राह्मणांनीं निषेधार्थ उपोषण सुरू करावें अशी विग्रहराजानें खटपट सुरू केली. हें दिद्दाला समजतांच तिनें सर्व ब्राह्मणांना सोनें वाटून खुष केलें. तुंगानें बलाढ्य सैन्याच्या साहाय्यानें विग्रहराजाचा पराभव केला व राजपुरीच्या पृथ्वीपाल राजाचा धीमोड करून त्याच्याकडून खंडणी वसूल केली. दिद्दाच्या राज्याच्या आसपासच्या धामर लोकांनीं केलेल्या पुंडाईहि तुंगानें मोडून काढली. राणीनें तुंगाला सर्व सेनेचें आधिपत्य बहाल केलें.

दिद्दा राणी इ. स. १००३ मध्यें स्वर्गवासी झाली. तत्पूर्वी तिनें आपल्या भावाच्या मुलाला ( लोहरचा संग्रामराज ) गादीचा वारस ठरवून तिच्या मृत्यूनंतर गादीसाठीं होणारें संभाव्य अराजक टाळलें. दिद्दांतील दोष सोडले तर ती एक फार हुशार व धूर्त राज्यकर्ती स्त्री होऊन गेली याबद्दल सर्व इतिहासकारांचें एकमत आहे.

यानंतर तीन शतकांनीं म्हणजे सुमारें १३३८ त कोटादेवी ही स्त्री काश्मीरच्या गादीवर आली.

राजतरंगिणींत दिद्दाचें वरील चरित्र दिलें आहे. त्यांत असेंहि म्हटलें आहे कीं, एकंदरीनें काश्मीरच्या स्त्रियांना खूप स्वातंत्र्य असे. स्त्रिया मोठमोठ्या स्थावर व जंगम मालमत्तेची व्यवस्था पहात. इतकेंच नव्हे तर सैन्याचें आधिपत्य स्वीकारून लढायाहि करीत. खेडेगांवांतील जमीनदारांचें ( धामरांचें ) काश्मीरच्या राजकारणांत प्रथमपासूनच खूप प्राबल्य होतें. राजतरंगिणींत धामरांबद्दलची जी माहिती दिलेली आहे ती आपल्या दृष्टीनें अधिक महत्त्वाची व मनोरंजक आहे. इ. स. ११३६–३७ या कालांतील काव्यांत छुद्दा या

नांवाच्या धामरीबद्दल असा उल्लेख केलेला आहे कीं, " राजाच्या सैन्याच्या मदतीनें तिनें शत्रूंशीं सामना दिला. दुसऱ्या एका बंडखोरानें ती गैरसावध असतांना तिच्यावर हल्ला करून तिला युद्धांत ठार केलें."

सुस्सल नांवाच्या काश्मीरच्या राजाचा एक सेनाधिकारी विजय याची आई सिल्ला हिचाहि राजतरंगिणींत उल्लेख आहे ( १०६९ वें काव्य ). एकदां बंडखोरांशीं युद्धांत गुंतलेला सुस्सल राजा विजयेश्वराहून श्रीनगरला जात होता. वितस्ता ( झेलम ) ओलांडून जातांना कांहीं सैन्य पलीकडे गेलें न गेलें तोंच नदीवरील पूल कोसळला व बरेंच सैन्य तीरावर राहिलें. सिल्लानें या मागें राहिलेल्या सैन्यास विजयेश्वराहून देवसरसपर्यंत नेऊन पोंचविलें. बंडखोरांनीं देवसरसवर हल्ला केला व सिल्लास ठार मारून शहराला वेढा दिला. दुर्दैवानें अशा अनेक शूर स्त्रियांचे राजतरंगिणींत नुसते धावते उल्लेख केलेले आहेत. त्यांचीं तपशीलवार चरित्रें यांत दिलेलीं नसल्यानें भारताच्या कितीतरी शूर महिला आज अज्ञात राहिल्या आहेत.

## इतर कांहीं शूर राज्यकर्त्या स्त्रिया

वर उल्लेखिलेल्या राण्यांखेरीज आणखीहि कांहीं शूर राज्यकर्त्या स्त्रिया भारतीय इतिहासाच्या अभ्यासकांना परिचित आहेत.

मॅसिडॉनचा सुप्रसिद्ध बादशहा अलेक्झँडर हिंदुस्थानांत आला होता. त्या वेळीं खि. पू. ३२७ त त्यानें वायव्य सरहद्द प्रांतांतील स्वत्-बूनरच्या राजाचा पराभव करून त्याला ठार केल्याची हकीकत इतिहासांत आहे. ( या राजाचें नांव अस्सकेनॉस उर्फ अश्वक उर्फ अस्मक. ) राजाचें निवासस्थान मलकंद खिंडीच्या उत्तरेस मस्सग येथील किल्ल्यांत होतें. कर्टिअसच्या मतें अश्वकाच्या मृत्यूनंतर त्याची आई ( कदाचित् पत्नीहि असेल ) क्लिओफिस् ( कृपि असेंहि हें नांव असण्याचा संभव आहे. ) हिनें निकराची लढाई करून कांहीं काल शहराचें रक्षण केलें. शेवटीं ग्रीक राजानें तिलाहि शरण येण्यास भाग पाडलें.

इ. स. ७१२ त महमद-इब्न्-कासीम यानें सिंध प्रांताचा राजा दधिर ( दाधिराज ) याचा रावळच्या रणांगणावर पराभव केला. राजाला मारल्यावर

त्याच्या राणीस ( राणी बाई उर्फ लाडी उर्फ गाई ) अरब सैन्यानें कैद केलें. अशा परिस्थितींतहि रावळच्या किल्ल्यांतून राणीनें १५०० सैनिकांनिशीं निकराचा प्रतिकार चालू ठेवला. पण अरबांचें सैन्य फार बलाढ्य असल्यानें व त्यांनीं शेवटपर्यंत कसोशीनें प्रतिकार केल्यानें राणी हताश झाली. अखेरीस तिनें किल्ल्यांतील सर्व स्त्रियांना एकत्र बोलावून सांगितलें, "यवनांकडे स्वातंत्र्याची भीक मागण्याची वेळ आली आहे. या प्रसंगांतून आपली सुटका करण्याचा कोणताच मार्ग मला दिसत नाहीं. आपण अग्नि पेटविण्याचें साहित्य जमा करूं व स्वतःचें भस्म करून स्वर्गांत आपल्या पतींना भेटावयास जाऊं. स्वाभिमान राखण्याचा हा एकच राजमार्ग आतां आपणांस मोकळा आहे. यावरुनहि एखादीला आपल्या जिवाचें रक्षण करावेंसें वाटल्यास तिनें करावें." हें तिचें भाषण ऐकून किल्ल्यावरील सर्व स्त्रिया एका घरांत जमल्या व त्या घराला आग लावून त्या सर्वांनीं जोहार केला.

## कवयित्री

काव्यमीमांसेचा सुप्रसिद्ध लेखक राजशेखर म्हणतो, "पुरुषांप्रमाणें स्त्रियाहि काव्य करूं शकतात. प्रतिभा ही लिंगभेदावर अवलंबून नाहीं. आतांपर्यंतच्या इतिहासावरून असें दिसून येतें कीं, अनेक राजकन्या, प्रधानकन्या व गणिकादि शास्त्रपारंगत होऊन गेल्या. असामान्य बुद्धीच्या आणि प्रतिभासंपन्न स्त्रियांनाहि भारतीय इतिहासांत वाण नाहीं." राजशेखरच्या या लिखाणावरून असें दिसतें कीं इ. स. च्या नवव्या आणि दहाव्या शतकांत व तत्पूर्वीहि अनेक नामवंत कवयित्री होऊन गेल्या असाव्यात. यांपैकीं बऱ्याच जणींचें काव्य कालाच्या ओघांत नष्ट झालेलें आहे. पण कांहींच्या काव्यरचनेचा समावेश नंतरच्या संस्कृत व प्राकृत ग्रंथकर्त्यांनीं आपल्या पुस्तकांत केलेला आहे. कांहीं कवयित्रींचीं आज फक्त नांवें उपलब्ध आहेत. पण त्यांचा जन्मसन, जन्मठिकाण, शिक्षण व इतर कार्य याबद्दल कांहींच माहिती मिळत नाहीं. अशा स्थितींत कांहीं स्त्रियांचा त्रोटक वृत्तान्त सादर करण्याखेरीज गत्यंतर नाहीं.

**सत्तसईतील कवयित्री :–** सत्तसई हा काव्यसंग्रह "गाथा-सप्तशती" या नांवानें ओळखला जातो. याचा संग्राहक सातवाहन कुटुंबांतील हाल

राजा हा होय. खि. पू. पहिल्या ते इ. स. तिसऱ्या शतकांत प्रतिष्ठानचें ( हल्लींचें औरंगाबाद जिल्ह्यांतील गोदावरीकांठचें पैठण.) राजघराणें म्हणून या घराण्याची कीर्ति होती. हाल राजाचा काल याहून अधिक निश्चित करतां आलेला नाहीं. या काव्यसंग्रहांत एकूण सातशें काव्यांचा समावेश केलेला आहे. पण निरनिराळ्या प्रतींत सारख्या अशा फक्त साडेचारशेंच ओव्या मिळतात. या काव्यसंग्रहांत नंतर कांहीं काव्यें घातलीं गेलीं असलीं तरी यांपैकीं कोणतीच कवयित्री इ. स. ७ व ८ या शतकानंतरची नसावी. सत्तसईंत अनुलक्ष्मी, असुलब्धी, माधवी, प्रहता, रेवा, रोहा, शशिप्रभा आणि बद्धावही यांच्या कविता आहेत. परंतु कोणत्या मूळ ग्रंथांतून हीं काव्यें निवडलीं आहेत याचा उलगडा होत नाहीं. या सर्व कवयित्री भारताच्या कोणत्या विभागांत होऊन गेल्या त्याचाहि खुलासा कोठेंच केलेला आढळत नाहीं.

**राजशेखरानें उल्लेखिलेल्या कवयित्री** :— गुर्जर-प्रतिहार राजाच्या दरबारांत राजशेखराचा मान विशेष होता. पहिला महेंद्रपाल ( इ. स. ८८५ ते ९०८ ), त्याचा मुलगा महिपाल ( इ. स. ९१४ ते ९४५ ) आणि कलचूरी वंशांतील राजा पहिला युवराज ( दहाव्या शतकाचा पूर्वार्ध ) यांच्या कारकीर्दीतहि राजशेखर कवीला अतिशय मानाचें स्थान देण्यांत आलेलें होतें. यावरून या कवीच्या भरभराटीचा काल सुमारें इ. स. ८९० ते ९४० हा मानण्यास हरकत दिसत नाहीं. सुप्रसिद्ध चौहान कुलांत जन्मलेली अवन्तीसुंदरी ही राजशेखराची पत्नी होय. धनपालानें आपली बहीण सुंदरा हिच्या उपयोगासाठीं पैयलच्छी या नांवाचा प्राकृत शब्दकोश तयार केला होता. सुंदरा व अवन्तीसुंदरी हीं दोन्ही नांवें एकाच स्त्रीची म्हणजे राजशेखराच्या पत्नीची असावीत असें कांहीं लेखकाचें मत आहे.

काव्य-मीमांसा या ग्रंथांत राजशेखरानें अवन्तीसुंदरीचें मत तीन ठिकाणीं उद्धृत केलें आहे. त्यानें लिहिलेलें प्राकृत नाटक 'कर्पूर-मञ्जरी' याचा प्रयोग तर तिच्याच मतानुसार करण्यांत आला असें त्यानें नमूद

धरून ठेवलें आहे. इ. स. १०८८ ते ११७२ या काळांत होऊन गेलेल्या हेमचन्द्रानें आपल्या 'देशी-नाममाला' या ग्रंथांत अवन्तीसुंदरीच्या तीन कविता दिल्या आहेत. इतर कांहीं कवयित्रींनीं वापरलेल्या प्राकृत शब्दांचे रूढार्थ स्पष्ट करण्यासाठीं आधार म्हणून या कविता दिल्या आहेत. यावरून भाषाशैली व प्रतिभा या दोन गुणांबाबत अवन्तीसुंदरीची किती ख्याति होती याची कल्पना येते. तिचें सर्व काव्य आज उपलब्ध नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट होय.

जल्हणाच्या 'सूक्ति-मुक्तावलींत' राजशेखराच्या कांहीं कविता दिल्या आहेत. त्यांत शीला-भट्टारिका, विकटानितंबा, विजयांका, लाटमधील प्रभुदेवी आणि सुभद्रा यांचा उल्लेख केलेला आहे. यांपैकीं कर्नाटकी कवयित्री विजयांका हिला सरस्वतीची उपमा देऊन कालिदासाच्या तोडीची वैदर्भी भाषेंतील कवयित्री असा तिचा गौरवपूर्ण उल्लेख केलेला आढळतो. कांहींनीं विजयांका ही विज्जा, विद्या, विद्यावती, विज्जका, विज्जाका यादि नांवांनीं ओळखली जाते असें म्हटलें आहे. इ. स. च्या सातव्या शतकाच्या मध्यांत होऊन गेलेली चंद्रादित्य या चालुक्य राजाची राणी विजयभट्टारिका म्हणजेच कवयित्री विजयांका असाहि एक तर्क आहे.

शीला भट्टारिका हिची तुलना राजशेखरानें बाणाशीं केली आहे. ज्याप्रमाणें बाणाच्या लेखनांत शब्द आणि ध्वनि यांना सारखेंच महत्त्वाचें स्थान द्यावें लागतें त्याचप्रमाणें पांचाली पद्धतीच्या शीला भट्टारिकेच्या काव्य-रचनेंतहि ध्वनि श्रेष्ठ कीं शब्द श्रेष्ठ हें ठरविणें अशक्य होतें. निरनिराळ्या काव्यसंग्रहांत शीला भट्टारिकेचीं जीं काव्यें दिलेलीं आहेत त्यांवरून वरील विधानास चांगलीच पुष्टि मिळते.

भट्टारिका या अभिधानावरून शीला राणी असावी असें दिसतें. भोजराजाशीं तिचा जो संबंध दाखविला गेला आहे त्यावरून हा तर्क बरोबर ठरतो. इ. स. ११०० च्या सुरुवातीस प्रसिद्ध झालेल्या 'कवीन्द्र-वचन-समुच्चयांत' भोजराजाच्या नांवावर जीं काव्यें घातलीं आहेत तो हाच भोज-राजा असावा. इ. स. ८३६ ते ८८५ त कनोजवर राज्य करणारा सुप्रसिद्ध गुर्जर प्रतिहार राजा भोज म्हणजेहि हाच भोजराजा असला पाहिजे.

वरून शैला ही कनोजच्या पहिल्या भोजराजाची पट्टराणी असली पाहिजे असा निष्कर्ष निघतो. निरनिराळ्या काव्यसंग्रहांत हिच्या अनेक कविता दिलेल्या आढळतात.

विकटनितंबेच्याहि अनेक कविता प्रसिद्ध आहेत. नवव्या शतकाच्या मध्यांत काश्मीरमध्यें रचलेल्या आनंदवर्धनाच्या 'ध्वन्यालोक' या ग्रंथांत विकटनितंबेची एक कविता दिलेली आहे. यावरून या कवयित्रीच्या कालाचाहि उलगडा होतो. अकराव्या शतकांत प्रसिद्ध झालेल्या भोजाच्या 'शृंगार-प्रकाशांत' असा उल्लेख आहे कीं विकटनितंबा ही 'पुनर्भू' म्हणजे पुनर्विवाहित स्त्री होती. हिचा एक पति शब्दांचे उच्चार अगदीं चुकीचे करी. यांत किती तथ्य असेल तें सांगणें कठीण आहे. परंतु या स्त्रीचा एक विवाह तिच्या दृष्टीनें सुखी नव्हता एवढा निष्कर्ष कदाचित् काढतां येईल. लाटी कवयित्री प्रभुदेवीबद्दल तर कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. वल्लभदेवाच्या 'सुभाषितावलींत' सुभद्रेचें एक काव्य आहे. हा संग्रह पंधराव्या शतकां-तील असावा.

राजशेखराच्या 'कर्पूर-मञ्जरींत' असें म्हटलें आहे कीं, त्रिभुवन-सरस्वती ही महितळ-सरस्वतीची मोठी बहीण. बंगालमधील श्रीधरदास या नांवाच्या लेखकानें इ. स. १२०६ च्या सुमारास प्रसिद्ध केलेल्या 'सदुक्ति-कर्णामृत' नांवाच्या संग्रहांत हिचीं दोन काव्यें आहेत. सीता या नांवाच्या कवयित्रीचें जें काव्य पुढील वाङ्मयात अनेकदां दिलेलें आढळतें तें प्रथम राजशेखराच्या काव्यमीमांसेंत आलेलें दिसतें. यावरून त्रिभुवन-सरस्वती व सीता या दोन कवयित्री दहाव्या शतकाच्या पूर्वार्धांत केव्हांतरी होऊन गेलेल्या असाव्यात एवढेंच सांगतां येईल.

राजशेखरानें ज्यांचा विशेष उल्लेख केलेला नाहीं अशा आणखी कांहीं कवयित्री दहाव्या शतकाच्या सुरुवातीस होऊन गेल्याबद्दलचा पुरावा इतर कांहीं ग्रंथांवरून मिळतो. त्यांपैकीं काहींचा त्रोटक वृत्तान्त यापुढें द्यावयाचा आहे.

## इतर वाङ्मयांत उल्लेखिलेल्या कवयित्री

इ. स. १३६३ च्या सुमारास लिहिल्या गेलेल्या 'शारंगधर-पद्धति' या ग्रंथांत धनदेवाच्या नांवावर एक काव्य दिलेलें आहे. यांत शीला, विज्जा,

मारुला, मोरिका वगैरे नामवंत कवयित्री होऊन गेल्याचा उल्लेख आहे. यांपैकीं शीला म्हणजे पूर्वी उल्लेखिलेली शीला भट्टारिका हीच असावी. जी विज्जा इतर अनेक नांवांनीं ओळखली जाते तीहि राजशेखरापूर्वी होऊन गेली. काश्मीरचा राजा अवन्तिवर्मन् ( इ. स. ८५५ ते ८८३ ) याचा समकालीन जो भट्ट त्याचा मुलगा मुकुल यानें लिहिलेल्या 'अभिधा-वृत्ति-मातृका' या ग्रंथांत विज्जाचें एक काव्य दिलेलें आहे. 'कवीन्द्र-वचन-समुच्चयांत' तिच्या अनेक काव्यांचा समावेश करण्यांत आलेला आहे. यांपैकीं सर्वांत सुप्रसिद्ध काव्य खालीलप्रमाणें आहे:—

नीलोत्पल-दल-श्यामां विज्जाकां मामजानता ।
वृथैव दण्डिनाप्युक्तं सर्वशुक्ला सरस्वती ॥

म्हणजे "जी मी विज्जाका नीलकमलाप्रमाणें सांवळी आहे, तिला न जाणतांच दण्डि कवीनें सरस्वतीचें वर्णन शुभ्रवर्णी असें केलें आहे." कांहीं काव्यसंग्रहांत 'माम्' असा शब्दप्रयोग असून हें वर्णन कवयित्रीनें स्वतःचें केलें आहे असा त्याचा अर्थ लावलेला आढळतो, तर कांहीं संग्रहांत 'ताम्' असा शब्दप्रयोग असून विज्जा दुसऱ्या कोणाबद्दल हे उद्गार काढते असा अर्थ लावला आहे.

कांहींहि असलें तरी या काव्यावरून विज्जा ही दण्डीनंतर होऊन गेली एवढें या काव्यावरून नक्की होतें. हिचा काल सातव्या शतकाचा उत्तरार्ध अगर आठव्या शतकाचा पूर्वार्ध हा असावा. हिंदुस्थानच्या कोणत्या भागांत या कवयित्रीचा जन्म व कार्य झालें असावें याबद्दल निश्चित माहिती उपलब्ध नाहीं; परंतु विज्जा दक्षिण हिंदुस्थानांत होऊन गेली असावी असा कांहीं लेखकांचा तर्क आहे.

मारुला आणि मोरिका या दोघींबद्दल कांहींच माहिती मिळत नाहीं. यांचीं कांहीं काव्यें इ. स. १२५८ त लिहिलेल्या जल्हणाच्या 'सूक्ति-मुक्तावलींत' आलेलीं असल्यानें आपल्या चर्चेच्या कक्षेत या कवयित्री येऊं शकत नाहींत.

भावदेवी ( भावक-देवी उर्फ भावाक-देवी ) हिचीं कांहीं काव्यें 'कवीन्द्र-वचन-समुच्चयांत' आहेत. यांपैकीं कांहींचा समावेश इ. स.

१२०६ त लिहिलेल्या ' सूक्ति-कर्णामृतांतहि ' केलेला आढळतो. याव्यतिरिक्त या कवयित्रीबद्दल कांहींहि माहिती देतां येत नाहीं.

इसवी सनाच्या अकराव्या शतकाच्या पूर्वी फल्गुहस्तिनी नांवाची आणखी एक कवयित्री होऊन गेली, पण तिच्या एकाहि काव्याचा समावेश कवीन्द्र-वचन-समुच्चयांत केलेला दिसत नाहीं. ' शारंगधर-पद्धतींत ' हिच्या कांहीं काव्यांचा समावेश केलेला आहे. इ. स. ७७९-८१३ या कालांत काश्मीरमध्यें होऊन गेलेल्या जयपीडा राजाच्या पदरीं असलेल्या वामन नांवाच्या सचिवानें ' काव्यालंकार-सूत्र-वृत्ति ' हा जो ग्रंथ प्रकाशित केला त्यांत फल्गुहस्तिनीचीं कांहीं काव्यें समाविष्ट केलेलीं आहेत. यावरून ही कवयित्री आठवें शतक संपण्यापूर्वी होऊन गेली असावी. हिच्याबद्दलहि अधिक कांहीं माहिती मिळत नाहीं.

' सदुक्ति-कर्णामृत ' या ग्रंथांतील एक काव्य चण्डालविद्या, विक्रमादित्य आणि कालिदास या तिघांच्या नांवें दिलें आहे. यावरून चण्डालविद्या ही कवयित्री कालिदासाची समकालीन होती असें सिद्ध होतें. इ. स. च्या चौथ्या व पांचव्या शतकांत गुप्त सम्राटांच्या कालांत कालिदास होऊन गेला. पण गुप्तांच्या कालांत चण्डालविद्या नांवाची कवयित्री होऊन गेली असें समजण्यास इतिहासांत कोणताच आधार मिळत नाहीं.

' कवींद्र-वचन-समुच्चयांतील ' एक काव्य कांहीं संग्राहक जघनचपलेच्या नांवावर देतात. जघनचपला हें काव्यांतील एक वृत्त आहे. त्या वृत्ताच्या नांवाची कवयित्री होती अशी कांहींची समजूत आहे. जघनचपला हें फक्त वृत्त असून हें काव्य कोणीतरी अज्ञात कवीनें रचलें असावें हा तर्क अधिक सयुक्तिक वाटतो. शारंगधर-पद्धतींतील दोन काव्यें बिल्हण व राजकन्या या दोघांच्या नांवें दिलीं आहेत. राजकन्या म्हणजेच शशिकला अगर चंद्रकला या नांवाची कवयित्री असावी.

सदुक्तिकर्णामृतानें सुरुवात असलेल्या आणखी कांहीं काव्यसंग्रहांत ' सरस्वती ' च्या रचना म्हणून कांहीं काव्यांचा अंतर्भाव करण्यांत आला आहे. परंतु अकराव्या शतकाच्या मध्यांतील सरस्वतीकण्ठाभरणांत भोजानें सरस्वतीचें एक काव्य उद्धृत केलें आहे. यावरून सरस्वती या नांवाची

कवयित्री वरील संग्रहरचनेच्या बरीच पूर्वीची आहे असें निश्चितपणें सिद्ध होतें.

कांहीं विद्वानांच्या मतें राजशेखर-चरित या अकराव्या शतकाच्या सुरुवातीस रचलेल्या ग्रंथांत कामलीला, कनकवल्ली, सुनंदा, ललितांगी, मधुरांगी आणि विमलांगी इतक्या कवयित्रींचा उल्लेख आलेला आहे. शेवटच्या तीन माळव्यांतील असाव्यात असें म्हणतात. परंतु वर उल्लेखिलेल्या नांवांवरून असें वाटतें कीं, या कवयित्री कदाचित् प्रत्यक्षांत झालेल्या नसाव्यात. कारण त्यांच्यासंबंधीं इतर कोणत्याहि ग्रंथांत उल्लेख केलेला नाहीं. राजशेखर-चरितांत दिलेल्या कविपरंपरेबाबत इतर कोणताच पुरावा उपलब्ध नाहीं. ज्या मूळ ग्रंथांतून वरील कवयित्रीच्या काव्यांपैकीं कांहीं भाग घेतलेला आहे ते मूळ ग्रंथच नाहीसे झाल्यानें या कवयित्रींच्या प्रतिभेचें व काव्यगुणांचें मूल्यमापनहि करणें अशक्य आहे. या स्त्रियांच्या काव्यविषयांत कांहीं स्त्रीसुलभ आविष्कारा-खेरीज विशेष कल्पनासौंदर्य आढळत नाहीं.

## कांहीं परंपरागत विदुषी

भारताच्या निरनिराळ्या भागांत होऊन गेलेल्या विदुषींबद्दल कांहीं लेख व दंतकथा उपलब्ध आहेत. यांपैकीं बऱ्याच जणींबाबत उपलब्ध इतिहास कांहींच माहिती देत नाहीं. क्वचित् ठिकाणीं हा पुरावा दंतकथेच्या विरोधीहि असलेला दिसून येतो.

प्रसिद्ध खगोलशास्त्रज्ञ व गणिती भास्कर हा बाराव्या शतकांत महाराष्ट्रांत होऊन गेला. भास्कराच्या लिखाणांपैकीं ' लीलावती ' हा गणित-विषयक ग्रंथ सुविख्यात आहे. याबद्दल अशी कथा सांगतात कीं, भास्कराच्या लीलावती नांवाच्या विधवा मुलीनें हा ग्रंथ लिहिला. लीलावतीच्या विवाह-प्रसंगीं घटिपात्रांत लीलावतीच्या अलंकारांतील एक बारीक मूल्यवान् खडा चुकून पडला. हें भास्कराच्या लक्षांत न आल्यामुळें लग्नवेळ चुकली. भास्कराला लीलावती नांवाची मुलगी असेल व ती गणित व खगोलशास्त्रांत पारंगतहि असेल. परंतु यावरून " लीलावती " हा ग्रंथ तिनेंच लिहिला असेल असें निश्चितपणें सांगतां येणार नाहीं. या ग्रंथांतील अनेक गणितें समजा-

वितांना " हे बाले, लीलावती " असा शब्दप्रयोग लेखकानें केला आहे. यावरून फारतर एवढेंच म्हणतां येईल कीं, मुलीला गणित विषय समजावून देण्यासाठीं भास्करानें हा ग्रंथ लिहिला असावा.

बंगालमध्यें ' खना ' ऊर्फ ' क्षणारती ' नांवाच्या खगोलशास्त्रज्ञ महिलेविषयीं बऱ्याच म्हणी प्रचारांत आहेत. या म्हणी जुन्या बंगाली भाषेंत रूढ असून त्यांत खगोलशास्त्र व फलज्योतिषशास्त्र यांचा कृषिशास्त्राशीं संबंध दाखविला आहे. खना ही प्रसिद्ध खगोलशास्त्रज्ञ मिहिर याची पत्नी. मिहिराचा बाप वराह हाहि नामवंत खगोलशास्त्रज्ञ होता अशी समजूत रूढ आहे. इसवी सनाच्या सहाव्या शतकांत प्राचीन भारतांत वराहमिहिर नांवाचा जो खगोलशास्त्रज्ञ होऊन गेला यावरून ही अपभ्रष्ट कथा प्रचलित झाली असावी. वराहमिहिराचा वास्तविक बंगालशीं कांहीं संबंध नाहीं. ' खना ' नांवाची खगोलशास्त्रज्ञ महिला कदाचित् झालीहि असेल, पण तिच्या चरित्राविषयीं अगर कार्याविषयीं कांहींहि तपशील आज मिळत नाहीं.

सुमारें नवव्या शतकाच्या सुरुवातीस होऊन गेलेले मलबारमधील नंबुद्रि ब्राह्मण आद्य शंकराचार्य यांच्यासंबंधांतहि अशीच एक कथा रूढ आहे. निरनिराळ्या तत्त्वज्ञांशीं जाहीर चर्चा करण्यासाठीं त्यांनीं जेव्हां दौरा काढला तेव्हां ते एकदां मिथिलेस गेले. तेथें त्यांनीं मंडणमिश्राशीं वाद करून त्याचा पराभव केला. मंडनमिश्राची पत्नी उभयभारती हिनें शंकराचार्यांनीं तिजबरोबर कामशास्त्रावर चर्चा करावी असें सुचविलें. प्रथम त्यांनीं या गोष्टीस नकार दिला, पण आपल्या विजयास पूर्णत्व प्राप्त होण्यासाठीं ही चर्चा करण्यास नंतर त्यांनीं मान्यता दिली. वादात उभयभारती हरली व तीं दोघें पुढें शंकराचार्यांची अनुयायी बनलीं. या कथेंत किती सत्यांश आहे हें तपासून पाहणें अवश्य आहे.

प्राचीन भारतांत होऊन गेलेल्या महिलांबद्दल अशा अनेक कथा आहेत कीं त्यांतील सत्यासत्यता तपासून पाहण्यास साधन नाहीं.

---

# प्रकरण १५ वें

## दक्षिण भारतांतील महिला

( खि. पू. ४०० ते इ. स. १३०० )

बौद्ध धर्मांत होऊन गेलेल्या संत व अनुभूतिवादी महिलांसंबंधींच्या जुन्यांत जुन्या इतिहासापैकीं कांहीं माहिती पश्चिम भारतांतील चैत्यांवरून, कोरीव लेण्यांवरून व विहारांवर दिलेल्या लेखांवरून एकत्र केलेली आढळते. गुंटूर जिल्ह्यांतील अमरावती व नागार्जुनीकोण्ड या दोन ठिकाणच्या अवशेषांवरूनहि त्या काळचा कांहीं इतिहास उपलब्ध होतो ( खि. पू. दुसऱ्या शतकापासून इ. स चौथ्या शतकापर्यंत ). इ. स. च्या सातव्या शतकांतील शिलालेखां-वरून असें दिसून येतें कीं, या काळांत दक्षिण भारतांत अनेक नामवंत जैन साध्वी होऊन गेल्या. त्यांपैकीं कांहीं जणींनीं मोठमोठ्या मठांचीहि स्थापना केली. ही हकीकत प्रामुख्यानें म्हैसूरमधील श्रवणबेळगोळ व तामीळ प्रान्तां-तील शिलालेखांत दिलेली आढळते. यांपैकीं बहुतेकांच्या नांवांपलीकडे कांहींच माहिती देतां येत नाहीं. ज्यांच्याबद्दल थोडीफार सुसूत्र हकीकत उपलब्ध आहे त्या दोन स्त्रियांपैकीं पहिली, प्रसिद्ध जैन साधु अज्जनंदी याची माता गुणमति आणि दुसरी पट्टीनकुरत्ति. हिचा शिष्यसमुदाय फार मोठा होता.

शंगमोत्तर तामीळ महाकाव्यांत प्रामुख्यानें भिक्षुणींचेच उल्लेख केलेले आहेत. या महाकाव्यांतील कांहीं महिला काल्पनिक असल्या तरी त्यांच्या व्यक्तिचित्रांवरून त्या काळच्या स्त्रियांच्या धार्मिक जीवनाची चांगली कल्पना येते. सहाव्या शतकापूर्वी अव्वई नांवाचा एक सुविख्यात महंत या भागांत होऊन गेला. याचें त्रोटक चरित्र पुढें येणारच आहे.

पांचव्या शतकापासून दक्षिण भारतांत भक्तिमार्गी तत्त्वज्ञानाची जी भरभराट सुरू झाली ती सातव्या शतकांतहि चालूच होती. या दोनशें वर्षांत शैव व वैष्णव दोन्ही संप्रदायांत जे अनेक प्रसिद्ध साधुसंत होऊन गेले त्यांत

कांहीं स्त्रियाहि होत्या. भक्तीप्रमाणेंच ज्ञानमार्गाचा पुरस्कार करणारे महान् पंडित शंकर व कुमारीलहि याच काळांतले. मंडनमिश्राची पत्नी सरसवाणी ही प्रथम कुमारीलभट्टाची अनुयायी होती. पण वादविवादानंतर तिनें शंकराचार्यांचें अनुयायित्व पत्करलें. एक थोर तत्त्वज्ञ विदूषी म्हणून हिचें नांव आजहि भारतीयांना सुपरिचित आहे.

तिलकवती :– इ. स.च्या सातव्या शतकांत तिलकवती नांवाची एक अद्वितीय उपासिका होऊन गेली. तिरुत्तोण्डर पुराणांत तिचा व मंगैयरकरशी या दोघींचा पूर्णावस्थेस पोंचलेल्या भक्त स्त्रिया म्हणून उल्लेख केलेला आढळतो. या दोघींच्या ईश्वरभक्तीचा त्यांच्या आसमंतांतील अनेक आप्तेष्टांवर परिणाम होऊन ते सर्व भक्तिमार्गाकडे वळले.

तिलकवती ही वेल्हाळ जमातींतील मुलगी. तिचा विवाह कलिप्पगै नांवाच्या सैनिकाशीं ठरला होता. वाङ्निश्चय होतांच तो घाईघाईनें युद्धावर गेला व तिकडेच मेला. हें ऐकतांच तिलकवतीनें पुन्हां विवाह करण्यास नकार देऊन विरक्तवृत्तीनें ती तिरुवदिगै येथील शिवालयांत उपासनेसाठीं जाऊन राहिली. मुरुणीक्कि नांवाच्या तिच्या ज्या भावाचें तिनें लहानपणापासून पालनपोषण केलें होतें तोहि जैन भिक्षु बनला. स्वतः तिलकवती शिवभक्त असल्यामुळें भावानें जैन धर्माचा स्वीकार केलेला समजून तिला दुःखाचा जबरदस्त धक्का बसला. त्याची वृत्ति बदलावी म्हणून तिनें शिवाची सारखी आराधना चालविली होती. एकदा मुरुणीक्कीस पोटदुखीचा अतिशय त्रास होऊं लागला. कोणाहि जैनास त्याचें हें दुखणें बरें करता येईना. तेव्हां तिलकवतीनें त्यास शिवाची उपासना करण्यास सांगितलें. तो शिवमंदिरांत येतांच त्यानें स्वयंस्फूर्तीनें एक भक्तिस्तोत्र रचलें. पुढें मुरुणीक्कि, अप्पर उर्फ तिरुनावुक्करशर या नांवानें ओळखला जाऊं लागला आणि शैवपंथांतील चार प्रमुख महंतांत त्याची गणना होऊं लागली. भावाचें मतपरिवर्तन घडवून आणण्याचें सर्व श्रेय तिलकवतीस आहे. तिच्या अनुयायांनीं तिची एक प्रतिमा तिरुवदिगै येथील मंदिरांत स्थापन केली.

मंगैयरकरशी :– सहाव्या शतकाच्या सुमारास दक्षिण भारतांत जैन धर्माचा बराच प्रसार झालेला होता. या भागांतील अनेक राज्यकर्त्यांनीं या

धर्मास आश्रय दिल्यामुळें जैन साधूंना राजगुरूंचा मान मिळूं लागला होता. मदूरेचा राजा कूण पाण्डय (ऊर्फ अरिकेसरी पराङ्कुश मारवर्मन्) यानें स्वतः जैन धर्माचा स्वीकार करून आपल्या राजसभेंत अनेक जैन साधूंना मानाचें स्थान दिलें होतें. चोळ घराण्यांतील राजकन्या मंगैयरकरशी ही कूण पाण्डयाची पत्नी. राणी व राजाचा एक मंत्री कुलचिरइ हीं दोघें शैवपंथीय होतीं. पाण्डय वंशाच्या कुलदैवताकडे (सुंदरेशाकडे) राजा दुर्लक्ष करी. यामुळें त्याच्या राणीस व या मंत्र्यास फार दुःख होई. त्यांच्या निमंत्रणावरून संबंदर नांवाचा एक महान् साधु मदुरेस आला व त्यानें राजाची वृत्ति शिवोपासनेकडे वळविली. संबंदरानें आपल्या अनेक काव्यांत मंगैयरकरशीच्या गुणांचें व ईश्वरभक्तीचें सविस्तर वर्णन केलें आहे. एक अद्वितीय नायनार म्हणून हिचा गौरव केला जातो.

कारेकल अम्मैय्यार:--इतिहास जिला कारैकलची माता म्हणून ओळखतो तिचें मूळ नांव पुनीतवती. पुनीतवती ही एका श्रीमान् वैश्याची कन्या. तिचें कारैकलमधील एका धनाढ्य व्यापाऱ्याशीं लग्न झालेलें होतें. तिच्या घराण्यांत वंशपरंपरेनें भक्ति चालत आल्यानें तिचेंहि चित्त सदासर्वदा शिवोपासनेंत मग्न असे. असें असलें तरी पतिसेवेंत ती नेहमीं तत्पर असे.

एकदां एक शैवपंथीय भिक्षेकरी दारावर आला असतां पतीनें दिलेल्या दोन आंब्यांपैकीं एक आंबा तिनें त्याला दिला. कांहीं वेळानें पति घरीं आला. त्याला फराळासाठीं तिनें उरलेला आंबा दिला. दुसरा आंबा काय झाला अशी जेव्हां पतीनें विचारणा केली तेव्हां ती गोंधळली. तिनें मनांत शिवाचा धावा केल्याबरोबर कपाटांत दुसरा आंबा तिला दिसला. तो लगेच तिनें पतीपुढें नेऊन ठेवला. देवानें तें अमृतफळ भक्तासाठीं निर्माण केलेलें असल्यामुळें त्याची रुचि अतिशय मधुर होती. हें अपूर्व फळ पत्नीनें कोठून आणलें अशी त्यानें पृच्छा केली. पत्नीनें खरी हकीकत सागतांच व्यापाऱ्यानें आणखी एका आंब्याची तिच्याजवळ मागणी केली. आपली पत्नी एक सामान्य स्त्री नसून देवता व साध्वी आहे ही जाणीव होऊन व्यापाऱ्यानें तिच्यापुढें आदरानें मस्तक नम्र केलें व तो पाण्डय देशांत गेला. तेथें त्यानें पुन्हां दुसऱ्या स्त्रीशीं विवाह केला. या पत्नीपासून त्याला जी मुलगी झाली तिचें नांव त्यानें पुनीतवती असें ठेवलें.

अम्मैय्यारला जेव्हां पति कोठें आहे हें समजलें तेव्हां ती त्याच्याकडे गेली व आपल्याला ठेवून घेण्यासाठीं तिनें पतीला विनंती केली. त्या सर्वांनीं तिला साष्टांग दंडवत घालून तिच्यांतील दैवी अंशाची तिला जाणीव दिली. आपण ऐहिक संसारी जीवन जगण्यासाठीं नाहीं ही तीव्र जाणीव अम्मैय्यारला झाली व ती संन्यासिनीचा पेशा पत्करून तीर्थयात्रेस निघून गेली. सौंदर्याचा नाश व्हावा व कोणाहि पुरुषाचें लक्ष आपल्याकडे वेधूं नये अशा इच्छेनें तिनें देवाची प्रार्थना केली. अनेक ठिकाणें पाहिल्यानंतर ती शेवटीं तिरुवालंगाडु या ठिकाणीं पोंचली. याच ठिकाणीं शिवभक्तींत तिनें आपलें उर्वरित आयुष्य घालविलें.

तिच्या काव्यरचनेंत तिच्या हृदयांत न सामावणारी भक्ति व ईश्वरभेटीची तळमळ उत्कृष्ट रीतीनें व्यक्त झालेली दिसते. शिवाच्या सर्व रूपांकडे ती सारखीच आकर्षित होते. त्याचें रुद्र रूप व शांत रूप दोन्ही तिला मोहक भासतात. ज्या एका काव्यांत तिची सिद्धावस्था तिनें रेखाटली आहे, त्यांत ती म्हणते, "ज्याचें हृदय त्या अनादि व विश्वनिर्मात्या हराविषयींच्या भक्तीनें ओतप्रोत भरलेलें आहे त्याला त्याचें अस्तित्व स्वतःच्या हृदयांत तेजस्वी ज्योतीच्या स्वरूपांत भासमान होतें." नीलकंठानें तिच्याविषयीं सहानुभाव दाखविला नाहीं किंवा त्यानें तिला मोक्षमार्ग दाखविला नाहीं तरी तिला त्याचें महत्त्व वाटत नाहीं. त्याची आपल्या हृदयमंदिरांत स्थापना करून ती पूर्ण सुखी झालेली असते.

ज्या अर्थी सातव्या शतकांतील संबंदराच्या काव्यांत अम्मय्यारबद्दल उल्लेख आढळतात त्या अर्थी अम्मय्यार सातव्या शतकापूर्वी होऊन गेली असली पाहिजे. शैवपंथीयांत जे त्रेसष्ट नामवंत महंत होऊन गेले त्यांपैकीं अम्मय्यार ही एक आहे असें समजलें जातें. तामिळ शैवपंथीयांच्या अकराव्या प्रमाण ग्रंथांत ( तिरुमुरइ ) अम्मय्यारच्या कांहीं काव्यांचा समावेश केलेला आढळतो.

कोदइ ( आण्डाळ ):-विष्णुचित्त ऊर्फ पेरियाळ्वार या श्रीवल्लीपुत्तूरच्या ब्राह्मणानें मदुरेच्या वल्लभ पाण्डय राजाच्या राजधानींतील अनेकांशीं तत्वचर्चा करून स्वतःच्या विद्वत्तेची प्रचीती त्या काळच्या लोकांना आणून दिली होती. परमेश्वराशीं वात्सल्यभावानें एकरूप होऊन अनेक वेळां तो

देहभान विसरे. गोकुळांतील कृष्णाच्या वाल्लीला यशोदेच्या डोळ्यांनी तो पाही व त्यांत तासन् तास रममाण होई. त्यानें स्वतःची एक मोठी बाग तयार केली होती. गांवांतील मंदिरांतील देवांसाठीं माळा गुंफण्यांत तो दिवसाचा बहुतेक वेळ खर्च करी. एके दिवशीं बागेंत हिंडत असतांना तुळशीच्या रोपांत त्याला एक लहानसें मूल दिसलें. त्याचा चेहरा विलक्षण तेजस्वी होता. त्या मुलीला घरीं नेऊन विष्णुचित्तानें तिचें स्वतःच्या मुलीप्रमाणें पालन-पोषण केलें. या मुलीचें नांव त्यानें कोदइ ( गोदा ) असें ठेवलें. छोटी कोदइ पित्यावर आपल्या प्रेमानें इतकें प्रभुत्व गाजवूं लागली कीं आसपासचे लोक तिला आण्डाळ ( प्रशासक ) असें संबोधूं लागले. वडिलांचा भक्तिभाव तिच्यांतहि उतरला होता. तिनें आपलें तनमन रंगनाथापाशीं वाहून टाकलें होतें. कोणत्याहि पुरुषाशीं विवाहबद्ध होण्याची कल्पना तिला आवडेना. कारण तिचें चित्त रंगनाथानें ( विष्णूनें ) केव्हांच चोरलें होतें. वडिलांनी देव-देवतांसाठीं तयार केलेल्या रंगीबेरंगी फुलांच्या माळा ती घाली, ओठाला लाल रंग आणि भालप्रदेशीं कुंकुमतिलक लावून, आरशासमोर उभी राहून ती स्वतःशींच म्हणे, " कृष्णदेवानें अंगीकार करावा अशी माझी योग्यता नाहीं का ? " मग ती हळूंच सर्व पुष्पमाला काढून करंडींत ठेवी. मंदिरांत माळा नेत असतांना तिनें त्या अंगावर चढवून पाहिल्या असतील अशी कल्पनाहि तिच्या पित्याला कधीं आली नाहीं. परंतु एके दिवशीं विष्णुचित्त अचानक तिच्या खोलींत आला व त्यानें जेव्हां कोदईनें देवाचे हार अंगावर घातलेले पाहिलें तेव्हां त्याला आश्चर्याचा धक्काच बसला. मुकाट्यानें त्यानें पुन्हां बागेंत जाऊन फुलें तोडलीं व माळा करून तो मंदिरात घेऊन गेला. त्या रात्रीं रंगनाथ त्याच्या स्वप्नांत आला आणि त्याला म्हणाला, " कोदईच्या भक्तिभावानें पुनीत झालेल्या पुष्पमालाच मला अधिक प्रिय वाटतात. " आपल्या कन्येची खरी योग्यता विष्णुचित्ताला या प्रसंगानें कळली.

' शूदिकोडुत्तनाच्चैयार ' म्हणजे ' स्वतः वापरलेल्या पुष्पमाला देवास अर्पण करणारी ' असें नामाभिधान कोदईस प्राप्त झालें. वय वाढूं लागलें तसतशी कोदइ आपल्या भक्तिप्रेमाच्या जगांत अधिकाधिक रममाण होऊं लागली. श्रीविल्लीपुत्तूर म्हणजे गोकुळ, मंदिर म्हणजे कृष्णराजाचा राजवाडा आणि कृष्णाशीं क्रीडेंत देहभान विसरणारी वृंदावनांतील गोपी म्हणजे कोदइ, असें

तिचें जग होतें. मंदिरांत जाऊन मुरलीधराकडे एक दृष्टिक्षेप टाकतांच किती मधुर व सलज्ज भाव तिच्या चेहऱ्यावर उमटत! तिला त्याचे प्रेमळ शब्द ऐकूं येत आणि कितीतरी वेळ ती या संवादसुखाचा आस्वाद घेई. क्वचित् एखादे वेळीं जर कृष्णपरमात्मा बोलला नाहीं, तिच्या सन्निध असलेल्या ईश्वराचें अस्तित्व तिला भासलें नाहीं तर ती कष्टी होई आणि शेजारच्या फांदीवरील कोकिळेस सांगे, " कोकिळे, तूं तुझ्या जिवलगाच्या जवळ बसली आहेस आणि मी मात्र एकटी! माझ्या कृष्णसख्याला बोलाव कीं!" या कामगिरीबद्दल आपल्या पाळीव पोपटाला ती कोकिळेशीं गोष्टी करण्याकरितां पाठवी.

या परमेश्वररूपी प्रियकराला वश करण्यासाठीं कोदइ व्रतें व खडतर साधना करी. एका मार्गशीर्ष महिन्यांत सतत एकवीस दिवस ती व्रतस्थ राहिली होती. पहाटे मंदिरांतील घंटांचा मधुर नाद आसमंतात् भरूं लागण्यापूर्वी कोदइ व तिच्या बरोबरच्या इतर उपासिका उठत, स्नान करीत व देवाच्या सेवेसाठीं मंदिरांत हजर होत. कोदइ आपल्या सुरेल आवाजांत तीस भक्तिगीतें एकापाठोपाठ एक म्हणे. तामिळ भक्तिवाङ्मयांतील कोदईचीं हीं भक्तिगीतें ( तिरुप्पवै ) अजूनहि लोकांच्या ओठांवर घोळत राहिलेलीं आहेत.

दिवसेंदिवस कोदईचा भक्तिभाव वाढत होता. तिचें संपूर्ण जीवन कृष्णमय बनलें होतें. विष्णुचित्ताला मुलीचा अभिमान वाटे. पण त्याच्यापुढें एक गंभीर प्रश्न उभा होता, ' कोदईचें श्रीकृष्णाशीं लग्न कसें व्हावें!' या विचारांत तो पडला. पुन्हा श्रीकृष्ण त्याच्या स्वप्नांत आले व कोदईस श्रीरंगमला घेऊन येण्यास त्यांनीं विष्णुचित्ताला आज्ञा दिली. विष्णुचित्त श्रीरंगमला आला. कोदईनें वधूचा पोषाख चढविला व ती श्रीरंगासमोर आली. तिचा देह देवाच्या मूर्तीशीं एकरूप झाला अशी कथा प्रचलित आहे. हें दृश्य पाहून विष्णुचित्तानें असे उद्गार काढले, " मला ईश्वरभक्तीचें समाधान मिळविण्यासाठीं किती तपस्या करावी लागली! पण कोदईला मात्र आनुवंशिक संपत्तीसारखी अचानक विनायासें ही भक्तीची देणगी लाभली.

कोदइ ही विष्णूची अर्धांगी भूदेवी हिचा अवतार होती या कल्पनेनें दक्षिण भारतांत विष्णूच्या मंदिरांत एका बाजूला कोदईची प्रतिमा स्थापन करण्याची पद्धत आहे. तिनें विष्णूस अर्पण केलेली काव्यसुमनें तामिळ

'महादेवीयक्कन-पुराण' या नांवाचा तिच्या चारित्रात्मक ग्रंथ लिहिला गेला. आयुष्याच्या शेवटचा कांहीं काल चेन्नमल्लिकार्जुनाच्या विशेष उपासनेसाठीं ती श्रीशैल येथें जाऊन राहिली व तेथेंच इ. स. ११६६ मध्यें तिचें देहावसान झालें असें म्हणतात.

## इतर भक्त महिला

कोणत्याहि धर्मांत सिद्धावस्थेस पोंचलेल्या व्यक्ति थोड्याच असतात; परंतु अनेक परोपकाराचीं कृत्यें करून चर्या व क्रिया यांच्या द्वारें धर्माचरण करणारे स्त्रीपुरुष अनेक असतात. अशा धर्मकार्यांत सत्पुरुषांना दान करणें, गोरगरिबांसाठीं विहिरी, तलाव बांधणें आणि मंदिरें बांधणें या गोष्टींचा समावेश होतो. सुरुवातीस जीं बुद्धमंदिरें बांधलीं गेलीं त्यांवर बांधणारांचीं नांवें कोरलेलीं आहेत. या नांवांत कांहीं स्त्रियांचींहि नांवें आढळतात. गुंथूर-जवळ कृष्णेच्या कांठीं अमरावती या ठिकाणीं एक स्तूप प्रथम ख्रि. पू. २०० च्या सुमारास बांधला गेला. यानंतर इ. स.च्या दुसऱ्या शतकाच्या उत्तरार्धांत कांहीं महायानपंथीय लोकांनीं या स्तूपाच्या बांधकामांत इतके फेरबदल केले कीं, तो जणूं कांहीं नवीनच बांधला आहे असें वाटावें! या कालांत बांधलेला हा सर्वांत मोठा स्तूप होय. पुष्कळ ठिकाणीं राजे ब्राह्मणधर्मीय असूनहि त्यांच्या राण्या अमाप पैसा खर्च करून बुद्धस्मारकें उभारीत. अशा तऱ्हेचीं कांहीं प्रसिद्ध स्मारकें गुंथूरप्रमाणेंच नागार्जुनीकोण्ड या ठिकाणींहि आढळतात.

रंगपताका:—इ. स. ६०० च्या सुमारास दक्षिण भारतांत राजकीय व सांस्कृतिक क्षेत्रांत महत्त्वाचे बदल घडून येत होते. जुन्या हिंदु विचार-प्रणालींतून साधुसंतांच्या प्रेरणेनें वैष्णव व शैव भक्तिपंथ भराभराटीस येऊं लागले होते. या धर्मप्रवर्तनांतून नवीन शिल्पकलाहि उदयास येत होती, याचा पुरावा त्या काळच्या मंदिररचनेवरून मिळतो. लांकूड, विटा व चुना यांचा उपयोग बांधकामांत न करतां दगडांचें बांधकाम अगर कोरीवकाम यावर अधिक भर देऊन नवीन भव्य मंदिरें उभारलीं जात होतीं. कांचीच्या कैलास-नाथाच्या मंदिरानें अनेक मंदिरांच्या घडणीस स्फूर्ति दिलेली होती. कांचीचें हें सुप्रसिद्ध मंदिर उभारण्याच्या कामीं पल्लव राजसिंहाची एक राणी रंगपताका

वाङ्मयांत अमर झालीं आहेत आणि इतक्या शतकांनंतरहि त्यांच्याबद्दलची लोकांची अभिरुचि कायमच राहिली आहे.

अक्क-महादेवी :—श्रेष्ठतम अशा सुमारें साठ वीरवैष्णव अनुभूतिवादी साधूंच्यापैकीं एक अशी अक्क-महादेवी उर्फ महादेवीयक्क हिची ख्याति आहे. कर्नाटकांतील साहित्यिक स्त्रियांमध्यें हिच्या तोडीच्या स्त्रिया फार थोड्या आढळतात. अक्क-महादेवीचा जन्म मध्यम स्थितींतील एका सामान्य कुळांत उडुतडी येथें झाला ( इ. स. ११३० ). तिचे आईवडील शिवाचे परमभक्त होते. त्यांच्या संगतींत महादेवीयक्कहि ल्हानपणापासूनच शिवोपासिका बनली. तिच्या सौंदर्यावर खूप होऊन त्या गांवच्या प्रमुख कौशिकानें तिला लग्नाची मागणी घातली. परंतु तो शिवभक्त नसल्यानें तिनें त्याच्याशीं विवाह करण्यास नकार दिला. इतकेंच नव्हे तर, आजन्म अविवाहित राहून संसाराचा त्याग करणार असें तिनें या वेळीं जाहीर केलें. लिंगायत धर्माचा प्रमुख बसवेश्वर याचें शिष्यत्व पत्करून अक्क-महादेवीनें पद्धतशीर उपासनेस सुरुवात केली.

अगदीं ल्हान वयापासूनच अक्क-महादेवीच्या तोंडून बाहेर पडलेल्या प्रसंगोपात्त तत्त्वप्रचुर विचारांना तिच्या भाषेंत कायमचें स्थान मिळालें आहे. कन्फ्यूशिअसप्रमाणें मोजक्या शब्दांत महत्त्वपूर्ण विचार मांडण्याची तिची हातोटी विलक्षण होती. एखादा त्रिकालाबाधित सिद्धान्त सांगतांना दैनंदिन जीवनांतील वेंचक घटनेचा आधार देऊन ती आपलें म्हणणें काव्यपूर्ण भाषेंत मांडी. तिच्या प्रत्येक उतान्याच्या शेवटीं चेन्नमल्लिकार्जुनाचा उल्लेख केलेला आढळतो. तिनें रचलेल्या कानड भाषेंतील सुमारे एक हजार सुभाषितांपैकीं एका सुभाषिताचा अर्थ असा आहे, " हे चेन्नमल्लिकार्जुन देवा, या क्षणभंगुर जगांत जन्म घेतल्यानंतर सुखदुःख अगर रागलोभ यांपासून प्रत्येकानें आपलें मन अलिप्त ठेवावयास नको का ? डोंगरमाथ्यावर घर बांधल्यानंतर हिंस्र पशूंना भिऊन कसें भागेल ? समुद्रकांठीं घर बांधून लाटा आणि फेंसाला घाबरून कसें चालेल ? बाजारांत घर बांधून शांततेची अपेक्षा करणें वेडेपणाचें नव्हे का ? "

अक्क-महादेवीच्या नांवावर ( १ ) योगांगत्रिविधी, ( २ ) श्रीष्टटीय-वचन व ( ३ ) अक्कगळपीटिके हे तीन ग्रंथ आहेत. तिच्या मृत्यूनंतर

'महादेवीयक्कन-पुराण' या नांवाचा तिच्या चरित्रात्मक ग्रंथ लिहिला गेला. आयुष्याच्या शेवटचा कांहीं काल चेन्नमल्लिकार्जुनाच्या विशेष उपासनेसाठीं ती श्रीशैल येथें जाऊन राहिली व तेथेंच इ. स. ११६६ मध्यें तिचें देहावसान झालें असें म्हणतात.

## इतर भक्त महिला

कोणत्याहि धर्मांत सिद्धावस्थेस पोंचलेल्या व्यक्ति थोड्याच असतात; परंतु अनेक परोपकाराचीं कृत्यें करून चर्या व क्रिया यांच्या द्वारें धर्माचरण करणारे स्त्रीपुरुष अनेक असतात. अशा धर्मकार्यांत सत्पुरुषांना दान करणें, गोरगरिबांसाठीं विहिरी, तलाव बांधणें आणि मंदिरें बांधणें या गोष्टींचा समावेश होतो. सुरुवातीस जीं बुद्धमंदिरें बांधलीं गेलीं त्यांवर बांधणारांचीं नांवें कोरलेलीं आहेत. या नांवांत कांहीं स्त्रियांचींहि नांवें आढळतात. गुंथूर-जवळ कृष्णेच्या कांठीं अमरावती या ठिकाणीं एक स्तूप प्रथम खि. पू. २०० च्या सुमारास बांधला गेला. यानंतर इ. स.च्या दुसऱ्या शतकाच्या उत्तरार्धात कांहीं महायानपंथीय लोकांनीं या स्तूपाच्या बांधकामांत इतके फेरबदल केले कीं, तो जणूं कांहीं नवीनच बांधला आहे असें वाटावें ! या कालांत बांधलेला हा सर्वांत मोठा स्तूप होय. पुष्कळ ठिकाणीं राजे ब्राह्मणधर्मीय असूनहि त्यांच्या राण्या अमाप पैसा खर्च करून बुद्धस्मारकें उभारीत. अशा तऱ्हेचीं कांहीं प्रसिद्ध स्मारकें गुंथूरप्रमाणेंच नागार्जुनीकोण्ड या ठिकाणींहि आढळतात.

रंगपताका:–इ. स. ६०० च्या सुमारास दक्षिण भारतांत राजकीय व सांस्कृतिक क्षेत्रांत महत्त्वाचे बदल घडून येत होते. जुन्या हिंदु विचार-प्रणालींतून साधुसंतांच्या प्रेरणेनें वैष्णव व शैव भक्तिपंथ भराभराटीस येऊं लागले होते. या धर्मप्रवर्तनांतून नवीन शिल्पकलाहि उदयास येत होती, याचा पुरावा त्या काळच्या मंदिररचनेवरून मिळतो. लांकूड, विटा व चुना यांचा उपयोग बांधकामांत न करतां दगडांचें बांधकाम अगर कोरीवकाम यावर अधिक भर देऊन नवीन भव्य मंदिरें उभारलीं जात होतीं. कांचीच्या कैलास-नाथाच्या मंदिरानें अनेक मंदिरांच्या घडणीस स्फूर्ति दिलेली होती. कांचीचें हें सुप्रसिद्ध मंदिर उभारण्याच्या कामीं पल्लव राजसिंहाची एक राणी रंगपताका

हिनें पुढाकार घेतला होता हें तेथील संस्कृत शिलालेखावरून समजूनं येतें. रंगपताका सुमारें सातव्या शतकांत होऊन गेली.

**सेंबियन् महादेवी** :—कावेरी नदीच्या कांठीं चोल राजांनीं अनेक शिवमंदिरें उभारलीं. इसवी सनाच्या दहाव्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेलेला गंडरादित्य हा राजा अतिशय धार्मिक वृत्तीचा होता. त्यानें रचलेलीं कांहीं भक्तिपर कवनें ' तिरुविसैप्प ' या शैवपंथीयांच्या धर्मग्रंथांत समाविष्ट केलीं आहेत. गंडरादित्याची पत्नी सेंबियन् महादेवी ही मालव राजकन्या. ऐन तारुण्यांत वैधव्य आल्यामुळें महादेवी वृत्तीनें विरक्त बनली. शिवभक्तींत कालक्रमणा करीत असतां तिनें आपल्या संपत्तीचा विनियोग मंदिरें बांधणें व दानधर्म करणें यांसारख्या सत्कृत्यांत सुरूं ठेवला होता. पहिला राजराज गादीवर आला त्या वेळीं महादेवी वार्धक्यामुळें खूप थकली होती. तिला नातू पाहण्याचें भाग्य लाभलें. राजराजानें तिच्या नांवानें तिरुमुखडल् येथें एक मोठा दिवाणखाना बांधून त्याला तिचें नांव दिलें.

**कुंदवइ** :—चोल घराण्यांतील दुसरी ईश्वरभक्त राणी कुंदवइ ही राजराजाची वडील बहीण. तिचा बाप सुंदर चोल पुरांतक ( दुसरा ) हा अतिशय धार्मिक वृत्तीचा व न्यायी राजा होता. तिची आई वानवन् महादेवी ही मलयमान् राजकन्या पतिनिधनानंतर सती गेली. ब्रह्मदेशाच्या आसपासच्या प्रदेशाचा प्रमुख वंचदेव याच्याशीं कुंदवईचा विवाह झाला. या भागांत राजराजपुरम् येथें कुंदवईनें एक विष्णुमंदिर, एक शिवमंदिर व एक जैनमंदिर, अशीं तीन मंदिरें बांधून त्यांना मोठमोठ्या देणग्या दिल्या. दक्षिण अर्कोट जिल्ह्यांतील तिरुमलइ येथेंहि तिनें एक भव्य देवालय बांधून तें एका तीर्थंकराला अर्पण केलें. तंजावर येथें एक मो रुग्णालय बांधून त्याच्या खर्चासाठीं तिनें भरपूर रक्कम देऊं केली. कुंदवईनें आपला वृद्धापकाल आपला भाचा पहिला राजेंद्र याच्याजवळ पळैयारइ येथें घालविला. इ. स. १०१९ त ती मरण पावली.

**कुंकुम महादेवी** :—कन्नड प्रान्तांतील चालुक्य राजा विजयादित्य ( इ. स. ६९६–७३३ ) याची धाकटी बहीण कुंकुम महादेवी ही एक अतिशय धर्मनिष्ठ स्त्री होऊन गेली. तिनें धारवाड जिल्ह्यांतील लक्ष्मेश्वर ( पुरि-

गिरी ) येथें एक भव्य जैनमंदिर ( जिनभवन ) बांधलें. या मंदिराची व्यवस्था पाहणाऱ्या उपाध्यायास देवाच्या पूजेअर्चेसाठीं एका खेड्याचें उत्पन्न तोडून धावें असें तिनें आपल्या भावास सांगितलें. " हिरण्यगर्भ " नांवाचा एक धार्मिक समारंभ करून त्या वेळीं तिनें हत्ती, रथ अशा वस्तु दान केल्या. एका कोरीव लेखांत अशी माहिती दिली आहे कीं, कुंकुम महादेवी ही चित्रवाहन नांवाच्या आलुप राजाची राणी होती. चित्रवाहन या बनवाशीच्या राजानें चालुक्यांचें साम्राज्य आपल्या तरवारीच्या बळावर बरेंच वाढविलें.

लोकमहादेवी :– विजापूर जिल्ह्यांतील पट्टदकल् येथें विरूपाक्षाचें सुप्रसिद्ध देवालय जिनें बांधलें ती लोकमहादेवी ही वादामीच्या दुसऱ्या विक्रमादित्य राजाची पट्टराणी. मंदिरावर कलाकुसरीचें काम करणाऱ्या कारागिरांच्या कौशल्यावर खूप होऊन तिनें त्यांना कांहीं कर माफ केले. " हिंदुस्थानांतील कारागिरीचा एक उत्कृष्ट नमुना " असें ए. के. कुमारस्वामी यांनीं या मंदिराचें वर्णन केलें आहे. देवापुढें गाणाऱ्यांना आणि नृत्य करणाऱ्यांनाहि तिनें कांहीं खास सवलती दिल्या होत्या. यापैकीं अचला नांवाच्या नर्तकीनें स्वतःचा नवीन नृत्यसंप्रदाय स्थापन केला.

दानचिंतामणि अट्टिमब्बे :– ही सुप्रसिद्ध महिला चालुक्य राजा दुसरा तैल याच्या कारकीर्दींत इसवी सनाच्या दहाव्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेली. हिचें सर्वच कुटुंब विद्वत्तेसाठीं प्रसिद्ध होतें. हिचा पिता मल्लपय्या हा नामवंत योद्धा, विद्वान्, उत्कृष्ट शिक्षक व ज्योतिषशास्त्रज्ञ होता. दानचिंतामणि अट्टिमब्बे व तिची बहीण गुंडमब्बे या दोघींचा विवाह नागदेव नांवाच्या चालुक्य राजांच्या सेनापतीशीं झाला होता. नागदेवाचा पिता दल्लप हा मुख्य मंत्री होता. एका लढाईंत नागदेव मारला गेल्याचें कळतांच गुंडमब्बे सती गेली. अट्टिमब्बेचाहि सती जाण्याचा विचार होता. परंतु तिचा मुलगा अण्णिगदेव हा फारच लहान असल्यानें सर्वांनीं तिचें मन सती जाण्यापासून परावृत्त केलें.

अट्टिमब्बे ही जैन धर्माची एकनिष्ठ उपासिका होती. तिच्या काळांत या धर्माचा होत असलेला ऱ्हास थांबविण्यास हिचें कार्य बरेंच कारणीभूत

झालें. या कार्यासाठीं तिनें " शान्तिनाथ-पुराणा " च्या एक हजार प्रती मुद्दाम तयार करवून घेतल्या. जैन धर्माच्या प्रमुख तत्त्वांचें दिग्दर्शन करणारें हें पुराण राजकवि रत्नानें लिहिलेलें आहे. अत्तिमब्बेच्या आर्थिक साहाय्यामुळेंच रत्न ' अजित-पुराण ' हा महत्त्वाचा जैन ग्रंथ पुरा करूं शकला. तिच्या राज्यांतील प्रजाजन व स्वतः राजा तैल यांना अत्तिमब्बेबद्दल अतिशय आदर वाटे. तिच्या नांवावर पुष्कळ अद्भुत कथा प्रचलित आहेत.

जिनाच्या पंधराशें हिरे-मोती व सोन्याच्या मूर्ति घडवून त्या तिनें दान केल्यावरून तिचें नांव दानचिंतामणि असें पडलें होतें. धारवाड जिल्ह्यांत गदगजवळ लक्कुंडी येथें इ. स. १००७ चे जे दोन शिलालेख उपलब्ध झाले आहेत त्यांवरून असें दिसतें कीं तिनें अनेक जैनमंदिरें ( वस्ती ) उभारलीं. एका मंदिराच्या खर्चासाठीं सुरुकी नांवाचें खेडें तिनें तोडून दिलें.

रेव्वलदेवी :– राजघराण्याखेरीज इतरहि कांहीं दानशूर घराणीं या विभागांत होतीं. अकराव्या शतकाच्या शेवटीं चालुक्य घराण्यांतील त्रिभुवनमल्लदेव ( सहावा विक्रमादित्य ) या राजाच्या कारकीर्दींत रेव्वल्देवी या नांवाची एक ब्राह्मण स्त्री अतिशय धर्मनिष्ठ म्हणून सर्वतोमुखीं झालेली होती. तिनें आपल्या जन्मभूमीस ( हुविन-हड्गलि-बेल्लारी जिल्हा ) केशवदेवाचें एक भव्य देवालय बांधलें. रविदेव नांवाच्या शूर सेनानीची ही पत्नी. रविदेवहि दानशूर म्हणून प्रसिद्ध होता. रेव्वल्देवीनें या मंदिराच्या व्यवस्थेसाठीं पुरेशी रक्कम तर दिलीच, शिवाय ब्राह्मणांसाठीं एक कायमचें अन्नछत्रहि सुरू केलें. रेव्वल्देवी नुसतीच धर्मनिष्ठ नव्हती तर ती अतिशय विद्वान् आणि सात्त्विक होती.

शान्तला:–राजा बिट्टिग होसळ याच्यावर रामानुजांच्या व्यक्तिमत्त्वाची विलक्षण छाप बसल्यामुळें तो जैन धर्म सोडून वैष्णव बनला. त्यानें स्वतःचें नांव बदलून विष्णुवर्धन हें नवीन नांव धारण केलें. त्याची राणी शान्तला ही मात्र जैनच राहिली. शान्तलेचे वडील शैवसंप्रदायी होते व आई जैनपंथीय होती. शान्तला दिसावयास देखणी असून नृत्य, गायन, वादन वगैरे कलांत निपुण होती. इ. स. ११२३ मध्यें श्रवणबेळगोळ या सुप्रसिद्ध जैन क्षेत्रांत तिनें शान्त जिनाचें एक भव्य मंदिर उभारलें आणि दैनंदिन पूजे-अर्चेसाठीं एका गांवाचें उत्पन्न तोडून दिलें. साधूंसाठीं तिनें या ठिकाणीं एक अन्नछत्रहि चालू केलें. मंदिरांत एक मोठें तळें व सुंदर बगीचा तयार केला.

पतीच्या दानधर्मांत शान्तला मनापासून साहाय्य करी. विष्णुवर्धनानें बेद्दरला जीं देवाल्यें बांधलीं आहेत तीं होसळ कलेचा उत्कृष्ट नमुना म्हणून आजहि प्रसिद्ध आहेत. विशेषतः तेथील केशवाची मूर्ति तर अप्रतीम आहे. शान्तलेच्या प्रेरणेनें स्थापन झालेली विष्णूची एक भव्य मूर्ति या ठिकाणीं आहे. राजानें तिला बक्षिस दिलेल्या शान्तिग्राम नांवाच्या खेड्याचें उत्पन्न तिनें विद्वान् ब्राह्मणांच्या चरितार्थासाठीं दिलें. वैष्णव, शैव, जैन आणि बौद्ध धर्मांना आश्रय देणारी एक महान् दानशूर उपासिका म्हणून इतिहासांत ठिकठिकाणीं हिचा गौरव केलेला आढळतो.

इ. स. ११३१ मध्यें शान्तलेचें देहावसान झालें. दुःखानें वेड्या झालेल्या तिच्या मातेनें श्रवणबेळगोळ येथें सल्लेखन (आमरण उपोषण) करून देह ठेवला.

## कवयित्री

शंगम कालांतील (१ ते ४ शतकें) वाङ्मयांत जे काव्यसंग्रह आहेत त्यांत तामीळ संस्कृतीचें उत्कृष्ट प्रतिबिंब पडलेलें दिसून येते. या संग्रहांतील काव्यांत त्या काळचे राजे व लोकप्रमुख यांचीं चरित्रें व कामगिरी रेखाटलेली आहे. या काव्यांपैकीं कांहीं काव्यें राजपुत्र व राजकन्यांनीं रचलेलीं आहेत.

**आदिमंदी व वेल्लिविदी** :– आदिमंदी ही चोल घराण्यांतील करिकाल राजाची मुलगी व आट्टनूअट्टि या चेर राजाची पत्नी. आट्टनूअट्टि हा एकदां कावेरी नदीवर स्नानास म्हणून जो गेला तो परत आलाच नाहीं. आदिमंदी राजाच्या शोधार्थ कावेरीच्या कांठाकांठानें पायीं जात असतां शेवटीं ती समुद्रापाशीं येऊन पोंचली. आपला पति सागराच्या लाटांवर आरूढ झाल्याचा एक क्षण तिला भास झाला. यानंतर तिनें रचलेल्या काव्यांत तिची विरहावस्था स्पष्टपणें दिसते. शिलप्पदिकारमची नायिका कन्नकि हिनें एकूण सहा पतिव्रतांचा उल्लेख केला आहे. या सर्वजणी पतिविरहानें झुरून मेल्या. यांच्यापैकीं आदिमंदी ही दुसरी पतिव्रता होय.

याच काळांत होऊन गेलेल्या वेल्लिविदीच्या विरहगीतांतहि पति-पत्नी-वियोगाचें चित्रण फार परिणामकारक रीतीनें केलेलें आढळतें.

पूदपाण्ड्य राजाच्या पत्नीच्या नांवावर दोन गीतें दिलेलीं आहेत. राजाच्या मृत्यूनंतर हिनें त्याच चितेंत उडी घेऊन स्वतःचा शेवट करून घेतला. ती आपल्या गीतांत म्हणते, " वैधव्याच्या अग्निज्वाळांपासून मी दूर पळालें, कारण त्यांचा दाह मला सहन होईना. उलट पतीच्या चितेतून उठलेल्या ज्वाळा मला चंदनासारख्या शीतल वाटल्या. ही चिता मला एखाद्या आल्हाददायक झऱ्याप्रमाणें भासते. त्यांत आमच्या प्रेमाचीं सुंदर कमलपुष्पें फुललेलीं मला दिसत आहेत. "

अंगवै व शैंगवैः– वेळपारी नांवाचा एक नगरपिता अतिशय शूर व विद्वानांचा चाहता म्हणून प्रसिद्ध होता. ' पूरम् ' नांवाच्या काव्यसंग्रहांत पारीच्या अंगवै व शैंगवै नांवाच्या दोन मुलींच्या नांवावर एक काव्य दिलेलें आहे. त्याचा मथितार्थ असा, " आमचा शूर पिता पंदपित्तुरीला बळी पडला व असहाय स्थितींत शत्रूनें आम्हांला घराबाहेर काढलें. " या गीतांत त्यांनीं भोगलेल्या अनंत यातनांचें उत्कृष्ट शब्दचित्र रेखाटलें आहे. या दोघींनीं आपल्या पूर्वायुष्यांत परंबुनाद येथील राजवाड्यांत भोगलेल्या अनेक सुखांचेंहि मनोहर वर्णन केलें आहे.

अव्वइ :– तामीळ प्रान्तांतील व्यावसायिक भाट व स्तुतिपाठक समाजांतील खालच्या वर्गांतून आलेले होते असें दिसतें. ह्या व्यवसाय करणाऱ्यांना ' पाणर ' ( पाण् म्हणजे काव्य ) अशी संज्ञा दिलेली होती. अव्वइ ही एक नामवंत पाणर होती. तिच्या प्रखर बुद्धिमत्तेवरून अव्वइ म्हणजे बुद्धिमत्ता असें समीकरणच या भागेंत तयार झालें. रूढ कथेनुसार तिचा पिता ब्राह्मण व आई खालच्या जातींतील होती. अव्वईचा काव्यगुण पुल्वेलूरच्या एका पुढाऱ्याच्या प्रथम लक्षांत आला. बरींच वर्षे अव्वइ तगडूरचा अडिगइमान् नेता नेडुमानूअंजी याच्याकडे दरबार-भाट म्हणून होती. तोण्डइमण्डलमूच्या वकिलातीची प्रमुख म्हणूनहि अव्वइ कांहीं काळ काम पहात होती. अडिगइमानाच्या वीरमरणानें अव्वईच्या मनावर दुःखाची दाट छाया पसरली. त्याचा मुलगा एळिनी याच्या सान्त्वनार्थ ती कांहीं काळ त्याच्याजवळ राहिली. तिनें आपल्या धन्यावर रचलेल्या काव्यांतील ओज व भावनोत्कटता अतुलनीय आहे.

तगडूर सोडल्यानंतर ती चेर राजांच्या राज्यांत हिंडली. येथें राजापासून रंकापर्यंत सर्वांनीं तिचा सारखाच सन्मान केला. या प्रवासांत तिनें पेरुनरकिल्ली या चोल राजानें केलेल्या राजसूययज्ञास भेट दिली. तेथें अनेक चेर व पाण्ड्य राजांनीं तिचा बहुमान केला. या वेळीं अव्वईनें लिहिलेल्या आशीर्वादपर गीतांत सम्राटांनीं पुढें ठेवावयाचें आदर्श तिनें सांगितले आहेत. " शुभ्र छत्रचामरांनीं सुशोभित केलेल्या, ज्या पवित्र अग्नीचें ब्राह्मण अहोरात्र डोळ्यांत तेल घालून रक्षण करतात, त्या अग्नीप्रमाणें देदीप्यमान असलेल्या, राजचिन्हांनीं मंडित अशा रथांत विराजमान झालेल्या तामीळनाडच्या स्वर्गीय भूमीवर राज्य करणारे राजे कर्तव्यतत्पर, दानशूर व गरिबांचा प्रतिपाळ करणारे असावेत " असें तिनें म्हटलें आहे.

" तुमचीं सत्कृत्येंच फक्त मरणानंतर तुमच्याबरोबर येतील " हा सिद्धान्त तिनें आपल्या काव्यांत अनेक वेळां मांडला आहे.

चोल राज्यांतील महत्त्वाचीं स्थळें पाहिल्यानंतर ती तिरुकोवल्लूरला गेली व तेथील स्थानिक प्रमुखाचें मन वळवून त्याचा वेळपारीच्या मुलीशीं तिनें विवाह घडवून आणला.

सामान्य माणसांच्या दैनंदिन जीवनांतील अनेक घटना अव्वईनें आपल्या काव्यांत गुंफिल्या आहेत. राजप्रासादांतील सुखासीनतेपेक्षां कष्टाळू जीवनांतील लहानसहान सुखाच्या प्रसंगांनीं तिचें चित्त अधिक फुलतें. प्रमुख शंगम काव्यसंग्रहांत समाविष्ट केलेल्या ' नत्रिणै ', ' कुरुंतोगै ', ' नेडुंतोगै ' व ' पुरनानूरु ' या तिच्या काव्यांत तामिळी लोकांच्या जीवनाचें हुबेहूब प्रतिबिंब उमटलेलें दिसतें. कमींत कमी शब्दांत परिणामकारक शब्दचित्र रेखाटणें हा तिच्या काव्याचा विशेष म्हणून सांगतां येईल. जीवनाच्या नैतिक अधिष्ठानावर तिनें खूप भर दिलेला आहे. तिनें वापरलेलीं छोटीं छोटीं सुभाषितें आजहि तामीळ भाषेंत आबालवृद्धांच्या तोंडीं आढळतात. तामीळ काव्य व नीति या दोन्ही क्षेत्रांत अव्वईनें महत्त्वाचें स्थान प्राप्त करून घेतलें यांत शंका नाहीं.

वेण्णिकुयट्टि :— वेण्णिकुयट्टि ही वेण्णी येथील एक कुंभार जातीची स्त्री. चेर व चोल घराण्यांतील करिकाल राजांचें घनघोर युद्ध तिनें प्रत्यक्ष पाहिलें. आपल्या काव्यांत करिकाल राजाच्या शौर्याचें आणि विजयाचें वर्णन

तिनें जितक्या तन्मयतेनें केलें आहे तितक्याच सहानुभावानें तिनें चेर राजाच्या शौर्याचीहि तारीफ केली आहे. ती म्हणते, " समुद्रावर सफर करीत असतांना आप-या शिडांत वारे भरण्यास समुद्रासमुद्धां भाग पाडणाऱ्या महाभागाचा, हे करिकाल, तूं शूर वंशज शोभतोस ! या विजयानें तूं आपलें असामान्यत्व सिद्ध केलेंस हें जरी खरें असलें तरी पराभूत झालेल्या चेर राजाची थोरवीहि कमी नाहीं. तूं केलेल्या पराभवामुळें दु:खी होऊन ज्यानें कावेरीच्या काठावर वसलेल्या वेण्णींत आमरण उपोषण करून प्राण सोडला त्याचा अभिमान कौतुकास्पद नाहीं का ?

**नप्पशलइ :**– चोल राजा किल्लीवल्व यानें एका युद्धांत कुरूर शहर जमीनदोस्त केलें. या नाशाचें हृदयद्रावक वर्णन नप्पशलईच्या एका कवितेंत आढळतें. ती म्हणते, " ज्या चोल घराण्यांत आश्रयाला आलेल्या कबूतराचा प्राण वांचविणारा शिबि राजा होऊन गेला, त्या घराण्यांत जन्माला आलेल्या हे चोल राजा, तूं संतापानें बेभान झालेल्या शिपायांचें नेतृत्व पत्करून विषारी बाणांच्या साहाय्यानें केवढी घोर हानि केलीस ! एखाद्या पर्वताच्या दरींत जेथें सुंदर नाजूक वेलींना बहर आला आहे, अशा ठिकाणीं पांच फण्या आणि तीव्र विषारी दांत असलेल्या नागानें एकदम घुसून धुव्वा उडवावा; अगर वणव्यानें किंवा झंझावाती वादळानें जसा कहर करून टाकावा त्याप्रमाणें हें सुंदर शहर तूं बेचिराख करून टाकलेंस ! येथील राजाला महाबलाढ्य हत्तीदळाच्या साहाय्यानें वेढून, खोल खंदकांत शिपायांनीं सर्व बाजूंनीं वेढा घालून तूं या राजाला नामोहरम केलेंस. या शहराच्या रक्षणासाठीं रुंद व खोल खंदक खणलेले होते. त्यांतील भयानक कांसवें, रात्रीं गस्त घालणाऱ्या शिपायांनीं टाकलेल्या प्रकाशझोतांना पकडण्यासाठीं सारखी धडपड करीत. शहररक्षणासाठीं बांधलेल्या लोखंडी भिंती चकाकत. पण हें सर्व वैभव तुला पाहवलें नाहीं; म्हणून तूं हा सर्वनाश घडवून आणलास. "

नप्पशलइ ही पाण्ड्य प्रभुत्वाखालीं असलेल्या प्रदेशांतील दक्षिणेकडे वसलेल्या मारोकम् ह्या ठिकाणची रहिवासी. त्या काळच्या राजेरजवाड्यांना तिचें काव्य फार आवडे. किल्ली राजाच्या दानशूरत्वाचें, न्यायप्रियतेचें व पर- [illegible]चें वर्णन तिनें एका काव्[illegible] केलें आहे त्यांत ती म्हणते—

"कबुतराचा प्राण वांचविण्यासाठीं स्वतःचें मांस तोडून देणाऱ्या शिबि राजाच्या वंशांत जन्माला आल्यामुळें, हे राजा, दातृत्व हा तुझा अंगभूत गुणच झालेला आहे."

"शत्रु ज्या गगनभेदी किल्ल्यांकडे वांकड्या नजरेनें पहावयासहि धजणार नाहींत असे किल्ले तुझ्या पूर्वजांनीं जिंकून जमीनदोस्त केले हें पाहिलें म्हणजे शौर्य हा गुण तुझ्या रक्ताच्या अणुरेणूंत कसा भिनलेला आहे हें पटतें."

"राजसभेचें प्रमुख स्थान उरइयूर हें न्यायाचें मूर्तिमंत माहेरघरच आहे असें म्हटल्यानेंहि, हे राजा, तुझी विशेष स्तुति केल्यासारखें होणार नाहीं."

"हे द्रुत गतीच्या घोडेस्वारा, तुझे बाहू म्हणजे भक्कम लोखंडी गजच असे भासतात. तूं रागानें पाहूं लागलास कीं आसपासच्या प्रत्येक व्यक्तीचा थरकांप होऊं लागतो. अशा तुझ्या व्यक्तिमत्त्वाचें वर्णन तरी कोणत्या शब्दांत करावें?"

किल्लीच्या मृत्यूनंतर तिनें रचलेल्या शोकगीतांत राजाच्या असामान्य सामर्थ्याबद्दल तिला वाटणाऱ्या प्रौढीची एक विचित्र भावना प्रगट होते. या गीतांत ती मृत्यूला सांगते—

"तुझ्याबद्दल राजाच्या मनांत किंचित् जरी रोष असता किंवा त्यानें एखाद्या लहानशा हालचालींत जरी तुझ्याविषयीं राग दर्शविला असता, त्यानें तुला नुसता स्पर्श जरी केला असता तरी मग मात्र तुझी धडगत नव्हती. हे मृत्युदेवा, तूं राजाला नेलेंस तें तरी कसें! तर दबकत येऊन, नम्रतेनें त्याची स्तुति करून, हलक्या हातानें हळूंच त्याचा प्राण काढून घेतलास. ज्या या बळवान राजाला तू नेलेंस त्याच्या शौर्याची, तेजाची, सामर्थ्याची आणि ऐश्वर्याची तुला कल्पनाहि करतां येणार नाहीं."

काहीं जुन्या काव्यसंग्रहांतून शिकार करणाऱ्या भटक्यांचीं आणि परिचारिकांचीं काव्यें संगृहित केलेलीं आहेत.

संगम काव्यसंग्रहांत ख्रिस्त शतकापासून सुमारें चारशें वर्षांची संस्कृति चित्रित झालेली आहे. या काळात आर्य व तामीळ संस्कृतीचें मिश्रण कसें होत होतें याचीहि यावरून कल्पना येते. त्या काळच्या तामिळी लोकांचें

सामाजिक जीवन आणि गृहजीवन, आपापसांतील मतभेदांचें स्वरूप, त्यांचें धार्मिक विधिविधान आणि देवता यासंबंधीं अनेक कल्पना या संग्रहावरून समजून येतात. यांतील अनेक काव्यें मानवी जीवनाचा आविष्कार करतात. त्या काळच्या चालीरीति, रूढि व प्रत्यक्ष जीवनांतील घटना यांतूनच अनेक काव्यांचे विषय निवडलेले आहेत. काव्यगुणांत हीं काव्यें जगांतील कोणत्याहि भाषेंतील उत्कृष्ट काव्यसंग्रहाची बरोबरी करूं शकतील. भारतीय संस्कृतींत स्त्रियांच्या बुद्धिमत्तेनें केवढी भर घातलेली आहे याचें उदाहरण म्हणून या काव्यांचा निर्देश करतां येईल.

कन्नडप्रान्तीय स्त्रिया फार पूर्वीपासूनच अनेक क्षेत्रांत कामगिरी करतांना दिसतात. विजय महादेवी आणि विजय भट्टारिका यांचीं उदाहरणें मागील प्रकरणांत दिलेलींच आहेत.

**कान्ती (इ. स. ११००)**:– इतिहासास ज्ञात असलेली पहिली कन्नड कवयित्री कान्ती ही होसळ राजा पहिला वल्लाळ याच्या दरबारांत राजकवयित्री म्हणून होती. याच काळांत वल्लाळाच्या पदरीं नागचंद्र नांवाचा दुसरा एक कवि होता. तो स्वतःला "नूतन पंप" असें म्हणवीत असे. कन्नड भाषेंतील पहिला प्रसिद्ध कवि पंप याच्याइतकीच नागचंद्राची रचना उत्कृष्ट होती अशी तत्कालीन लोकांची समजूत होती.

कान्ती व नागचंद्र यांची काव्यरचनेंत सारखी चढाओढ चाले. नागचंद्रासारख्या असामान्य कवीशीं काव्यक्षेत्रांत कान्ती दोन हात करूं शके, यावरूनच कान्तीच्या प्रतिभेची कल्पना येते. कान्तीचा जन्म एका सामान्य कुळांत झाला होता. तरी तिनें आपल्या हुशारीनें वल्लाळाच्या दरबारांत मानाची जागा मिळविली होती. हिच्यासंबंधीं सविस्तर माहिती "कान्ति-हंपन-समस्येगळु" या ग्रंथांत मिळते. यांत एके ठिकाणीं असा उल्लेख आहे कीं, कान्तीबद्दल आपल्या काव्यगुणाचें कौतुक व्हावें ही नागचंद्राची सर्वांत मोटी महत्त्वाकांक्षा होती. परंतु तिनें त्याची अशी जाहीर स्तुति करण्याचें नेहमी टाळावें. कान्तीनें आपल्या स्तुतिपर काव्य करावें या उद्देशानें एकदां नागचंद्रानें स्वतःच्या मृत्यूची वार्ता सर्व शहरभर पसरविली. अपेक्षेप्रमाणें कान्तीनें आपला शोक एका गीताच्या द्वारें व्यक्त केला. यांत नागचंद्राला तिनें

" कवींचा राजा " असें संबोधिलें. हें गीत वाचून नागचंद्राची महत्त्वाकांक्षा पूर्ण झाली.

कान्ती व नागचंद्र यांच्यांत घडलेले काव्यात्मक सवाल-जबाब मोठे मनोरंजक आहेत. इ. स. १५६० मध्यें प्रसिद्धीस आलेल्या बाहुबली नांवाच्या कवीनें ठिकठिकाणीं कान्तीचा अतिशय गौरवपूर्ण उल्लेख केला आहे, यावरून कान्तीच्या असामान्यत्वाची साक्ष पटते. बाहुबलीनें एके ठिकाणीं तिचा उल्लेख " अभिनव वाग्देवी " असा केला आहे.

## राज्ञी व प्रशासिका

**शीला महादेवी** :— राष्ट्रकूट वंशांतील या स्त्रीला पतिसमवेत फार मोठ्या भूप्रदेशावर राज्य करण्याची संधि मिळाली होती. आठवें शतक हा शीला महादेवीचा भरभराटीचा काळ समजला जातो. राजा ध्रुवाची ही राणी. राष्ट्रकूट घराण्यांतील राजांची शौर्याबाबत अतिशय ख्याति होती. उत्तरेकडे विंध्य पर्वतापासून तों दक्षिणेकडे पल्लव राज्यापर्यंत या घराण्याचें आधिपत्य होतें. उत्तरेकडे राष्ट्रकूटांचें प्रभुत्व ध्रुवाच्या कर्तृत्वामुळेंच प्रस्थापित होऊं शकलें. यानें पल्लव व गंग राजांचा पराभव केला. एवढ्या मोठ्या सामर्थ्यवान् राजानें राज्यकारभारांत शीला महादेवीस बरोबरीनें हक्क दिले होते, यावरून शीला महादेवीहि राजाइतकीच बुद्धिमान् असली पाहिजे यांत शंका नाहीं. पतीप्रमाणें तिचा पिताहि एक महाराजा होता. त्याचें नांव विट्टरस. ' सर्व-लोकाश्रय ' व ' विष्णुवर्धन ' हीं त्याचीं बहुमानदर्शक उपनांवें त्याच्या लोक-मान्यतेचीं प्रतीकें असलीं पाहिजेत. ( विट्टरस म्हणजेच कदाचित् पूर्वेकडील चालुक्य घराण्यातील चवथा विष्णुवर्धन असावा. )

शीला महादेवीला विद्वान् ब्राह्मणांबद्दल अतिशय आदर वाटे. पतीच्या परवानगीखेरीज पाहिजे तेवढ्या देणग्या देण्याचाहि तिला अधिकार असे. वेदनिपुण दोन विद्वान् ब्राह्मणाना तिनें एक खेडें दान दिलें होतें. हें दानपत्र राज्यपाल व त्याच्याखालीं अनुक्रमानें असलेल्या अधिकाऱ्यांना उद्देशून लिहिलेलें आहे. याच्या शेवटच्या भागावरून हें दानपत्र राणी शीला महादेवी हिच्या आज्ञेवरूनच तयार केलें होतें याचा स्पष्ट पुरावा मिळतो. यामध्यें तिचा उल्लेख ' परमेश्वरी ' व ' परमभट्टारिका ' अशा रीतीनें केलेला आहे. या सर्व

पुराव्यांवरून राष्ट्रकूटांच्या साम्राज्यांत शीला महादेवीचें स्थान किती मानाचें होतें याची सहज कल्पना येईल.

संस्कृत कवयित्री म्हणून (नवव्या शतकांत) प्रसिद्ध असलेली शीला-भट्टारिका हिचा राजशेखरानें उल्लेख केला आहे. पांचाली पद्धतीच्या रचनेंत ती बाणाइतकीच निपुण होती असें समजलें जातें. धनदेवानें तिला विज्ञकाच्या उच्च श्रेणींत बसविलें आहे. भट्टारिका हें अभिधान जर राजकुलाचा अनुवंश सुचविणारें असेल तर कदाचित् शीला भट्टारिका म्हणजे शीला महादेवीच असण्याचा संभव आहे.

अक्कदेवी :– कर्नाटकांतील सुप्रसिद्ध, कर्तबगार व प्रशासक स्त्रियांत अक्कदेवीचा नंबर फार वर लागतो (इ. स. १०१०-१०६४). ह्या चालुक्य राजकन्येनें बनवासी, किसुकादु आणि मासवादी वगैरे भागांवर सुमारें अर्धशतक राज्य केलें. दशवर्मन् व भागल्देवी यांची ही कन्या. पांचवा विक्रमादित्य आणि दुसरा जयसिंह ह्या नामवंत चालुक्य घराण्यांतील बलाढ्य राजांची अक्कदेवी ही भगिनी. शिलालेखांतील तिच्या वर्णनांत ‘ भयानक चेहऱ्याची ’ आणि ‘ अनेक शत्रूंना लोळविणारी ’ अशीं वर्णनें आढळतात. तिच्या अंगीं कांहीं बहुमोल गुण होते. एकदां दिलेला शब्द ती केव्हांहि बदलीत नसे. तिच्या राज्यकारभाराचें मुख्य केंद्र विक्रमपूर हें होतें. (हल्लींचें विजापूर जिल्ह्यांतील अर्सीविडी हें गांव.)

अक्कदेवीचा विवाह कदंब घराण्यांतील मयूरवर्मन या नांवाच्या सरदाराशीं झाला होता. तिच्याबरोबरच तोहि बनवाशीचा कारभार पाही (इ. स. १०३७). त्यांच्या मुलाचें नाव तोयिमदेव. चालुक्य सम्राट् पहिला सोमेश्वर याचा अंकित या नात्यानें तोयिमदेवानें बनवासीचें राज्य कांहीं काल चालविलें (इ. स. १०६४). अक्कदेवीनें आपल्या अमदानींत अनेक देवालयें बांधलीं. शिक्षणाच्या प्रसारांतहि तिनें खूप लक्ष घातलें होतें. इ. स. १०२१ च्या एका शिलालेखांत अशी माहिती सापडते कीं, होतकरू व हुशार पांचशें विद्यार्थ्यांची सोय व्हावी एवढी इमारत बांधून त्यांच्या पोषणासाठीं मोठी जमीन तिनें देणगी म्हणून दिली होती. एका राजाची राणी म्हणून नव्हे तर स्वतंत्रपणें राज्य करणाऱ्या अक्कदेवीचें व्यक्तिमत्त्व अतिशय तेजस्वी असलें

पाहिजे. एका मागोमाग येणाऱ्या तीन चालुक्य सम्राटांनीं राज्यकर्त्री म्हणून तिच्यावर जो विश्वास टाकला यांतच तिच्या यशस्वी राजकारणाचें बीज सांठविलें आहे.

नायकुराल्लू :– अनेक तेलगू गाण्यांतून व लोककथांतून नायकुराल्लूचें वर्णन केलेलें आढळतें. ही अनाथ मुलगी नागम्म नांवाच्या शेतकऱ्याकडे वाढली. त्यानेंच तिचें नांव ठेवलें आणि मोठ्या प्रेमानें तिचें लालनपालन करून एका श्रीमंत माणसाशीं तिचा विवाह करून दिला. नागम्माच्या मृत्यु-नंतर त्याच्या अफाट संपत्तीचा वारसा तिजकडे आला. पतादचा राजा अनुबुराज याच्यावर तिची विलक्षण छाप पडल्यामुळें त्याच्या दरबारांत तिला फार महत्त्व प्राप्त झालें. अनुबुराजला तीन राण्या व पुष्कळ मुलें होतीं. नायकुराल्लूच्या वाढत्या महत्त्वाचा दोड्ड नांवाच्या प्रधानाला हेवा वाटूं लागला. दोड्डानें प्रधानकीचा राजिनामा देऊन स्वतःचा मुलगा ब्रह्म याला प्रधानपद दिलें. ब्रह्मानें अनुबुराजाचा खून केला व त्याच्या जागीं नलगम हा गादीवर आला. नलगमहि नायकुराल्लूला फार मान देत असे. प्रत्यक्षांत कारभाराचीं सर्व सूत्रें तिच्याच हातांत असत. ब्रह्मानें नलगमला राज्याच्या वांटण्या करण्यास भाग पाडलें. नलगमचा भाऊ मल्लीदेव हा एका विभागाचा प्रमुख बनून मचेर्ल येथें त्यानें नवी राजधानी स्थापन केली आणि ब्रह्माला आपला प्रधान म्हणून नेमलें. नलगमाचे इतर भाऊहि मल्लीदेवाकडे राहूं लागले.

राज्याचें हें विभाजन नायकुराल्लूस आवडलें नाहीं. तिनें एक बेत आंखला. मल्लीदेव व नलगम यांनीं कोंबड्यांची झुंज लावावी व ज्याचा कोंबडा मारला जाईल त्यानें आपलें राज्य दुसऱ्यास देऊन सात वर्षें वनवास पत्करावा. ठरल्याप्रमाणें झुंज लागली. ब्रह्माचा कोंबडा मारला गेला. मल्लीदेवासमवेत ब्रह्म नल्लगोंड येथील अरण्यांत निघून गेला. तेथें नायकुराल्लूनें त्याचा खूप छळ केला. सात वर्षें पूर्ण झाल्यावर मल्लीदेव व ब्रह्म परत येऊन राज्याची वांटणी मागूं लागले. परंतु नलगमनें त्याना नकार दिला. पुन्हां उभयतांत युद्ध जुंपलें. चिलखत व शिरस्त्राण घालून नायकुराल्लूनें नलगमच्या सैन्याचें आधिपत्य केलें. तिनें शौर्याची शिकस्त केली तरीहि दुर्दैवानें तिचा पराभव झाला. नलगमचे सर्व भाऊहि या युद्धांत मारले गेले. ब्रह्मानें उदार मनानें पुन्हां नलगमला

गादीवर बसविलें. या सर्व हकीकतीवरून नायकुराळू ही एक धुरंधर राजकारणी स्त्री होती असें दिसतें.

रुद्रांबा :— रुद्रांबा ही काकतीय राजा गणपतिदेव याची सर्वांत मोठी मुलगी. आपल्या बापाच्या मृत्यूनंतर तिनें सुमारें तीस वर्षें राज्य केलें. गणपतिदेवाला मुलगा नव्हता. त्याच्या दोन मुलींपैकीं पहिलीचें नांव रुद्रांबा व दुसरीचें नांव गणपांबा. या दोघीहि अतिशय कर्तृत्ववान् व बुद्धिमान् होत्या. आपल्यामागें आपल्याच घराण्याकडे राज्य रहावें या उद्देशानें गणपतिदेवानें रुद्रांबेला आपली वारस म्हणून जाहीर केलें आणि प्रशासकास योग्य असें शिक्षण तिला देण्यास सुरुवात केली. स्वतःच्या वृद्धापकाळांत राज्यांतील अनेक जबाबदारीचीं कामें त्यानें तिच्यावर टाकलीं.

इ. स. १२६२ मध्यें रुद्रांबा वडिलांच्या गादीवर आली. सम्राज्ञी म्हणून तिला मान्यता देण्यास दक्षिण आंध्रमधील कांहीं मांडलिक राजांनीं नकार दर्शविला. कारण तिच्या वडिलांनीं नुक्तेच त्यांना जिंकलें होतें. रुद्रांबा गादीवर आल्यावर तिच्याविरुद्ध बंड करून गेलेलें स्वातंत्र्य परत मिळ-विण्याचा त्यांनीं घाट घातला. या बंडखोरांचा प्रमुख राजा अंबदेव हा होता. वेल्लुरू या त्याच्या राजधानीच्या ठिकाणापासून सीमेच्या बऱ्याच मोठ्या भागावर तो प्रभुत्व गाजवी. अंतर्गत यादवीचा फायदा घेऊन याच वेळीं महादेव या देवगिरीच्या यादव राजानें पश्चिमेकडून काकतीय राज्यावर स्वारी कर-ण्याचा बेत केला. हाताखालचे सर्व अधिकारी प्रामाणिकपणें पाठीशीं राहि-ल्यानें रुद्रांबेला अंतर्गत बंडाळी तर मोडून काढता आलीच, शिवाय यादव राजाचाहि तिनें पूर्ण पराभव केला.

रुद्रांबा अतिशय लोकहितदक्ष असे. शांतता व समृद्धीसाठीं ती अहो-रात्र परिश्रम करी. पाटबंधारे बांधून व विहिरी खणून तिनें शेतीचा विकास घडवून आणला. अनेक सवलती देऊन व्यापार-उद्योगधंदे भरभराटीस आणले, रुग्णालयें बांधलीं, मोठमोठे धार्मिक फंड उभारले, देणग्या दिल्या व शिक्षणाच्या प्रसारासाठीं मोठमोठया संस्था उभारल्या. मार्कोपोलो हा सुप्रसिद्ध प्रवासी बहुधा याच काळांत आंध्रच्या किनाऱ्याच्या विभागांत आला असावा. त्यानें दिलेल्या

वर्णनांत व्यापार व उद्योगधंद्यांचा विशेष उल्लेख केलेला आहे. काकतीय प्रान्त हिऱ्यांच्या खाणीसाठीं या वेळेपासूनच प्रसिद्ध आहे.

**गणपांबा** :—रुद्रांबेची धाकटी बहीण गणपांबा ही तिच्याइतकी बुद्धिमान् नसली तरी हिचा उल्लेखहि एक यशस्वी प्रशासक महिला म्हणूनच करावा लागेल. गणपांबेच्या बाल्यपणाबद्दल फारच थोडी माहिती उपलब्ध आहे. गणपतिदेवानें रुद्रांबेप्रमाणेंच हिलाहि सर्व प्रकारचें शिक्षण दिलें असलें पाहिजे. गणपांबेचा विवाह कोट घराण्यांतील एका सरदाराशीं झाला होता. कृष्णा नदीच्या कांठीं वसलेल्या धरणीकोट या राजधानींत राहून ' सहा-हजार ' प्रान्तावर तो राज्य करीत असे. गणपांबेच्या विवाहामागें कदाचित् कांहीं राजकीय हेतु असावा. वेल्नाडू सरदारांचा पराभव करण्यासाठीं गणपतिदेवाला धरणीकोटच्या सरदाराशीं मित्रत्वाचें नातें जोडावयाचें होतें. म्हणून त्यानें कोट वंशांतील रुद्रदेवाचा मुलगा बेत याचा गणपांबेशीं विवाह घडवून आणून ही मैत्री साधली असावी.

बेताच्या राज्यकारभाराबद्दल विशेष कांहीं माहिती मिळत नाहीं. सासऱ्याबरोबर दक्षिणेकडे कांचीच्या स्वारीवर गेला असतांना बेत लढाईत मारला गेला असावा. पतीच्या मृत्यूनंतर गणपांबेनें अधिकारसूत्रें आपल्या हातीं घेऊन सुमारे ४० वर्षें ' सहा-हजार ' प्रान्ताचा कारभार पाहिला. राज्यप्रमुखास आवश्यक असणारे सर्व गुण गणपांबेत होते. तिच्या राजवटींत प्रजा सुखी व संपन्न होती. मार्कोपोलोनें दिलेल्या वर्णनांत रुद्रांबेपेक्षां गणपांबेचा उल्लेख असण्याचाच अधिक संभव आहे.

गणपांबा ही कट्टी शिवभक्त होती. तिनें पति व पिता यांचीं स्मारकें म्हणून दोन भव्य शिवालयें बांधलीं. अमरावतीच्या अमरेश्वर मंदिराच्या गोपुरांवर सोन्याचे कलश बसविले आणि ब्राह्मणांना अग्रहार सुरू केले. शिवाच्या भक्तींत तिनें आपला वृद्धापकाल समाधानांत घालविला.

**उण्णीयर्चे** :—उत्तर मलबार प्रान्तातील जुन्या काव्यात एका मुलीचें जीवन ग्रथित केलें आहे. या मुलीनें आपल्या गांवच्या सर्व स्त्रियांचे प्राण वांचवून दोन जमातींचें ऐक्य घडवून आणलें.

उण्णीयर्चे ही अरोमल चेवकर या शूर योद्धयाची बहीण. दुर्दैवानें तिचा विवाह कुन्हिरामन् नांवाच्या एका भ्याड माणसाशीं झाला. एके दिवशीं पति-समवेत गांवाबाहेरील अय्यप्पनाच्या दर्शनास जाण्याची परवानगी तिनें आपल्या सासूस विचारली. परंतु तिनें नकार दिला. उण्णीयर्चेनें आपली आवडती तल्वार कमरेस अडकवून पतीबरोबर ती अय्यप्पनाच्या मंदिरांत जाण्यासाठीं निघाली. तिला पाहतांच कांहीं यवनांनीं तिला पकडून नेण्याचा प्रयत्न केला. उणियर्चेनें कांहीं लोकांना कंठस्नान घातलेलें पाहतांच उरलेले लोक आपल्या नायकाकडे गेले व त्यांनीं त्याला उण्णीयर्चेसमोर उभे केलें. तिला पाहतांच यवनांच्या म्होरक्यानें ओळखलें कीं ती त्याच्या सरहद्दीपलीकडील बलाढ्य चेवकराची बहीण. नायकानें तिची क्षमा मागितली. खेड्यांतील एकाहि स्त्रीच्या केसास कधींहि धक्का लावणार नाहीं अशी हमी त्याच्याकडून घेतल्यानंतर उण्णीयर्चेनें आपली तरवार म्यान केली.

# प्रकरण १६ वें

---

## उत्तर हिंदुस्थानांतील नामवंत महिला

### ( इ. स. १२०१ ते १८०० )

चौदाव्या प्रकरणांत इ. स. ४०० ते १२०० पर्यंत होऊन गेलेल्या सुप्रसिद्ध महिलांची माहिती दिलेली आहे. त्या काळाप्रमाणेंच इ. स. १२०१ ते १८०० या शतकांतहि उत्तर हिंदुस्थानांत राजकीय, वाङ्मयीन व कला-क्षेत्रांत अनेक ख्यातनाम स्त्रिया होऊन गेल्या.

### शूर रजपूत महिला

संयोगिता :—बारा ते अठरा या शतकांतील राजस्थानच्या काव्यांत देशभक्ति आणि त्याग या भावनांना प्राधान्य मिळालेलें दिसतें. अनेक काव्यांतून देशभक्त व त्यागी वीर आणि वीरांगना यांचीं स्फूर्तिदायक चित्रें कवींनीं रेखाटलीं आहेत. मात्र हे नायक व नायिका प्रत्यक्ष इतिहासांत होऊन गेल्या कीं नाहीं हें सांगणें कठीण आहे. राजस्थानी काव्यांत अमर झालेल्या झुंझार महिलांपैकीं पहिली संयोगिता ही कनोजच्या गढवाल राजाची कन्या. स्वयंवर-मंडपांतून पृथ्वीराजाबरोबर शेंकडों राजांच्या डोळ्यांदेखत ती कशी निसटली याविषयींची कथा सर्वश्रुत आहे. ठाणेश्वरजवळ पृथ्वीराज व महंमद घोरीची दुसऱ्यांदा लढाई झाली त्या वेळीं पतीच्या अंगावर स्वतः सैनिकी वेष चढवून संयोगिता त्यास म्हणाली, " मरण हा माणसांचीच काय पण देवांचीहि प्रकृति आहे. वस्त्र जुनें झालें कीं प्रत्येकाला तें टाकावेसें वाटतें. ज्याला उत्तम मरण येतें तो अमर होतो. क्षणभंगुर देहाचा विचार करूं नका. अमरत्वाची कांस धरा. तुमच्या तरवारीनें शत्रु छिन्नविच्छिन्न होऊं द्या. तुमची अर्धांगी या नात्यानें मीहि आपलें कर्तव्य बजावीन. "

पृथ्वीराज प्राणपणानें लढला, पण शेवटीं शत्रूनें त्याला ठार केलें. संयोगिता त्याच्याच चितेंत उडी टाकून सती गेली.

कुर्मादेवी :–पाटणची राजकन्या कुर्मादेवी ही चितोडच्या समरसिंहाची पत्नी. शौर्याप्रमाणेंच प्रशासनाबद्दलहि तिची ख्याति होती. युधिष्ठिरसारखे नेतृत्वाचे गुण अंगीं असणारा वीर समरसिंह मोहिउद्दिन महंमदाशीं प्राणपणानें झुंजून धारातीर्थीं पडला ( इ. स. ११९२ ). या वेळीं त्याचा मुलगा करण हा अगदीं लहान होता. त्याची पालक या नात्यानें कुर्मादेवीनें राज्यकारभार पाहण्यास सुरुवात केली. कुतुबुद्दिनाशीं झालेल्या एका लढाईंत तिनें स्वतः सैन्याचें नेतृत्व केलें.

पद्मिनी :–सौंदर्याबाबत सुविख्यात असलेली पद्मिनी ही मेवाडचा राणा रतनसिंग याची पत्नी. टॉडनें आपल्या महाकाव्यांत हिला मानाचें स्थान दिलें आहे. मालिक महंमद जयसी यानें आपल्या 'पद्मावतां'त पद्मिनीची खूप स्तुति केली आहे. 'पद्मावत' हा हिंदी वाङ्मयांत एक विरळा ग्रंथ मानला जातो. पद्मिनीच्या सौंदर्यानें वेडा झालेल्या अल्लाउद्दिन खिल्जीनें चितोडवर स्वारी केली या गोष्टीवर आधुनिक इतिहासकार फारसा विश्वास ठेवीत नाहींत. कारण तत्कालीन लिखाणांत अगर कोरीव लेखांत अल्लाउद्दिनाच्या स्वारीचें हें कारण कोठेंहि नमूद केलेलें सांपडत नाहीं. नंतरच्या वाङ्मयांत कोणीतरी ही कथा घुसडलेली दिसते. एवढें मात्र खरें कीं, अल्लाउद्दिन चितोडवर चालून आला त्या वेळीं मेवाडच्या रजपुतांनीं शौर्याची शिकस्त केली आणि स्त्रियांनीहि आपली पतिनिष्ठा व देशप्रेम त्यास उत्कृष्टपणें सिद्ध करून दिलें. आठ महिने रजपुतांनीं अल्लाउद्दिनाला दाद दिली नाहीं. पण बादशहाचें सैन्य संख्येनें फार मोठें असल्यानें शेवटीं त्यांचा नाइलाज झाला. पुरुषवर्ग शरण जाण्यापूर्वीं पद्मिनीच्या नेतृत्वाखालीं अनेक स्त्रियांनीं जोहार केला. किल्ल्यावर अग्नि पेट-विल्यानंतर रजपुत राण्या, सरदार-जहागिरदारांच्या स्त्रिया आणि लहान मुलीसुद्धां भिरवणुकीनें तेथें येऊन दाखल झाल्या. तरीहि डोळ्याच्या पापी नजरेस न पडण्याची प्रत्येकजण कोशीस करीत होती. विटंबनेपेक्षां मानाचें मरण रजपूत स्त्री केव्हांहि अधिक पसंत करते हें चितोडच्या स्त्रियांनीं मुसल-मानांना दाखवून दिलें.

ताराबाई :–युद्धकलेंत निष्णात असलेली ताराबाई इसवी सनाच्या सोळाव्या शतकाच्या प्रारंभीं होऊन गेली. सोळंकी जमातींतील राव सूर्यन् या बेडनोरच्या सरदाराची ही कन्या. यांचे पूर्वज अनहिलवाडच्या चालुक्य घराण्यांतील. मुसलमानांच्या स्वाऱ्यांना कंटाळून हें घराणें मध्यभारतांत आलें. तोंक तोडा या ठिकाणीं या कुटुंबानें वास्तव्य केलें. तोडाहि मुसलमानांनीं घेतल्यानंतर ही मंडळी बेडनोरला आली. ताराबाईचें रजपूत रक्त या अपमानास्पद जीवनानें उसळून आलें. तिला आपल्या शूर पूर्वजांचें स्मरण झालें. घोड्यावर बसून तो भरधांव चालला असतांना भालाफेक करण्याचें कौशल्य तिनें हस्तगत केलें. तोडाच्या रक्षणासाठीं लढणाऱ्या सैनिकांत ती सामील झाली, परंतु तिचे सर्व प्रयत्न फुकट गेले. राणा रायमल्लाचा मुलगा जयमल्ल यानें तिला विवाहाची मागणी घातली. " तोडा मुक्त करा म्हणजे मी आपली मागणी मान्य करीन." असें त्यास ताराबाईनें कळविलें. तिच्या प्राप्तिसाठीं उतावीळपणें धडपडणाऱ्या पुत्राला एके दिवशीं रागानें रायमल्लानें ठार मारलें. जयमल्लाचा भाऊ पृथ्वीराज यानें भावाची प्रतिज्ञा पूर्ण करण्याचा निश्चय केला. तोडा परत जिंकून घेण्याची शपथ त्याच्याकडून घेववून ताराबाईनें लग्नास सम्मति दिली. पृथ्वीराज व ताराबाई यांच्या भाल्यांनीं मुसलमानी सैन्याचा अधिपति मारला गेला. नंतर बरीच दंगल उसळली. शेवटीं शांतता प्रस्थापित करून पृथ्वीराजानें तोडा ताराबाईच्या बापाच्या स्वाधीन केला. या सर्व हकीकतीवरून ताराबाईचें देशप्रेम व शौर्य अतुलनीय असलें पाहिजे हें सिद्ध होतें. पृथ्वीराज एका नातेवाइकाच्या विषप्रयोगामुळें ठार झाला. त्याच्याबरोबर ताराबाईहि सती गेली. मारवाडचा रस्ता जेथून फुटतो तेथें मामदेवीचें देवालय आहे. त्या देवालयासमोर पृथ्वीराज व ताराबाई यांची एक समाधि बांधलेली आहे.

राणी कर्णावती :–महाराणा संगाची पत्नी कर्णावती हिनें आपला पुत्र विक्रमजित् याच्या कारकीर्दींत मेवाडच्या राज्यांत माजलेला गोंधळ निस्तरण्यासाठीं खूप प्रयत्न केले. इ. स. १५३४–३५ मध्यें गुजराथचा सुल्तान बहादुरशहा यानें चितोडवर जेव्हां स्वारी केली तेव्हां रजपुत सैन्याचा स्वाभिमान जागृत करून, सर्वांना संघटित करून राणी कर्णावतीनें प्रतिकार केला. बहादुरशहाचा बीमोड करण्यासाठीं तिनें हुमायुनाची मदत

मागितली, पण त्यानें तिची निराशा केली. शत्रूच्या ताब्यांत चितोड जातांच शेकडों रजपूत स्त्रियांनीं राणी कर्णावतीच्या नेतृत्वाखालीं जोहार केला.

**राणी दुर्गावती :—** गोंडवनाची राणी दुर्गावती ही दुसरी शूर देशभक्त स्त्री महोबा नांवाच्या छंडेलच्या सरदाराची मुलगी. माळव्याच्या बाजबहादुराचा हल्ला तिनें आपल्या शौर्यानें आणि संघटनाकौशल्यानें परतवून गोंडवनाचें रक्षण केलें. इतकेंच नव्हे तर मोंगलांच्या जोरदार हल्ल्यालाहि तिनें यशस्वी रीतीनें तोंड दिलें. गोंडवनाची लांबी तीनशें फूट व रुंदी सत्तर फूट असून यांत सुमारें सत्तर हजार गांवें वसलेलीं होतीं. सधनतेंत या राज्याचा नंबर बराच वर लागे. चोहों बाजूंनीं आपल्या राज्याचा विस्तार करण्याच्या धोरणानुसार अकबरानें इ. स. १५६४ मध्यें पहिल्या असफखानास गोंडवनावर स्वारी करण्यास पाठविलें. या वेळीं वीर नारायण या आपल्या अल्पवयी मुलाच्या नांवानें राणी दुर्गादेवी मोठ्या हुशारीनें राज्यकारभार पहात होती. अबुल फजलनें आपल्या वृत्तांतांत असें नमूद करून ठेवलें आहे कीं राणीचें अगदीं बारीकसारीक गोष्टीकडेहि लक्ष असे. संकटांची पूर्वकल्पना करून त्यांना तोंड देण्याची तयारी करून ठेवण्याची तिची हातोटी असामान्य होती. बाजबहादुर व इतर शत्रूंना वारंवार तोंड दिल्यामुळें तिला युद्धविषयक अनुभवहि खूप मिळाला होता. तिच्या सैन्यांत वीस हजार उत्कृष्ट घोडेस्वार व एक हजार लढाऊ हत्ती होते. मांडलिक राजांकडून अमाप द्रव्य तिला मिळालें होतें. बंदूक व बाण मारण्यांतील तिचें कौशल्य वाखाणण्यासारखें होतें. शिकारीचा तिला विलक्षण नाद होता. आसमंतात वाघ आला आहे असें समजलें तर त्याला ठार केल्याखेरीज ती पाणीसुद्धां घेत नसे. पहिला असफखान चालून येत आहे असें समजतांच तिनें प्रतिकाराची जय्यत तयारी केली. शत्रूच्या सामर्थ्याची कल्पना जेव्हां तिच्या अधिकाऱ्यांनीं तिला दिली तेव्हां ती म्हणाली, "तो न्यायी बादशहा (अकबर) जर स्वतः आला असता तर मी त्याचा सन्मान करणें इष्ट ठरलें असतें. पण या यःकश्चित् सरदारापुढें नमणें मी कधींच मान्य करणार नाहीं. यापेक्षां धारातीर्थीं मरण आलेलें शतपटीनें बरें."

एवढें बोलून तिनें अंगावर चिलखत चढविलें आणि ती हत्तीवर स्वार

झाली. सैन्याचें नेतृत्व करणाऱ्या त्या शूर राणीकडे पाहून प्रजाजनांचें हृदय आदरानें भरून आलें. खानाच्या सैन्याचा तिनें लागोपाठ दोनदां बीमोड केला. तसाच रात्रभर पाठलाग चालू ठेवून त्याचा पूर्ण पराभव करावा असा तिचा विचार होता. पण तिचे अधिकारी या गोष्टीस कबूल होईनात.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं पुन्हां युद्ध सुरू होतांच दुर्गावतीचा मुलगा वीर नारायण जबर जखमी झाला. हें पाहून अनेक सैनिकांनीं रणक्षेत्रांतून पोबारा केला. राणीबरोबर फक्त तीनशें सैनिक उरले. तरीहि गर्ह व मंडल यांच्या मध्यपट्टींत येऊन तिनें शत्रूशीं मुकाबला केला. शेवटीं ती खूप जखमी झाली. तिच्या सेवकांनीं तिला सुरक्षित स्थळीं नेण्याचें ठरविलें, पण रणांगणांत मृत्यु अगर विजय याखेरीज तिसरा विचार तिला पसंत पडेना. ती आपल्या सेवकांना म्हणाली, "युद्धांत पराजय तर झालाच आहे. आणखी पळून जाण्याच्या अपकीर्तीची त्यांत भर कशाला? शत्रूच्या हातीं माझें नखहि लागतां कामा नये. हा भाला घ्या व माझ्या हृदयांत खुपसून मला वीरमरण द्या." अशा रीतीनें सुमारें १५।१६ वर्षें राज्य करून राणी दुर्गावतीनें देशासाठीं शेवटीं आपले प्राण वेंचले.

अनेक वर्षें या भागांत प्रशासक म्हणून काम केलेल्या स्लीमन्नें "रॅम्बल्स् ॲण्ड रीकलेक्शन्स् ऑफ् ॲन् इंडियन् ऑफीशिअल्" या नांवाचें एक पुस्तक लिहिलें आहे. राणी दुर्गावतीविषयीं त्यांत तो म्हणतो, "दोन टेकड्यांमधील चिंचोळ्या पट्टींत ज्या ठिकाणीं दुर्गावतीनें देह ठेवला तेथें तिची छोटीशी समाधि बांधलेली आहे. या समाधीशेजारीं दोहों बाजूंस दोन मोठ्या आकाराचे गोल दगड आहेत. प्रचलित लोककथेनुसार राणीच्या नौबतींनीच या दगडाचें रूप धारण केलें आहे. मध्यरात्रीच्या सुमारास येथून चौघड्यांचा आवाज येतो. आपल्या गतप्राण झालेल्या शेकडों योद्धयांना राणी जणूं या आवाजानें पुन्हां युद्धास उभे राहण्याचें आव्हान करीत असते. राणीच्या समाधीच्या बाजूनें जाणारे शेकडों भाविक लोक आसपासचे स्फटिकाप्रमाणें चकचकीत छोटे दगड उचलून मोठ्या आदरानें ते समाधीवर वाहतात. राणीच्या एकूण हकीकतीनें माझें मन इतकें भारावलें कीं, सोळा वर्षांपूर्वी समाधीच्या दर्शनास गेलों असतांना मीहि नकळत एक छोटासा स्फटिक हातांत

घेऊन तो समाधीवर वाहिला." राणी दुर्गावतीची स्मृति त्या भागांतील लोकांनीं शेकडों वर्षें अतिशय आदरानें जतन केली आहे.

**धात्री पन्ना :**— रजपूत इतिहासांत पन्नाचा वृत्तान्त त्यागाचें व स्वामिभक्तीचें एक असामान्य उदाहरण म्हणून सांगतात. महाराणा संगाच्या मृत्यूनंतर त्याची राणी प्रसूत होऊन तिला उदयसिंह नांवाचा मुलगा झाला. त्याला सांभाळण्यासाठीं पन्ना नांवाच्या दाईची नेमणूक करण्यांत आली होती. महाराणा संगाच्या मृत्यूनंतर मेवाडच्या गादीवर लागोपाठ राणा रतनसिंह व राणा विक्रमजित् हे त्याचे दोन मुलगे आले. विक्रमजिताचा चुलत भाऊ बनवीरसिंह यानें त्याचा खून केला. त्याच्या मनांतून उदयसिंहाचेंहि पारिपत्य करावयाचें होतें. ही बातमी पन्नाला समजतांच फळांच्या करंडींत उदयसिंहास घालून त्याची तिनें एका न्हाव्यामार्फत गडाच्याबाहेर सुखरूप रवानगी केली आणि त्याच्या रिकाम्या पाळण्यांत तिनें स्वतःच्या मुलाला निजवून ठेवलें. थोड्याच वेळांत बनवीरसिंह आपला दुष्ट हेतु साध्य करण्यासाठीं तेथें आला. पन्नेचा मुलगा म्हणजेच उदयसिंह असें समजून त्यानें त्याला ठार केलें. मुलासाठीं शोक करण्याइतकीसुद्धां पन्नेला फुरसद नव्हती. मोठ्या कष्टानें आपले अश्रु आवरून ती किल्ल्याबाहेर पडली. न्हावी चितोडच्या किल्ल्यापासून कांहीं अंतरावर उदयसिंहासह तिची वाट पहात थांबला होता. छोट्या उदयसिंहाला थारा देण्यास अनेकांनीं नकार दिला. शेवटीं पन्ना कुंभलमेर येथील प्रशासक आसा साह याजकडे गेली व उदयसिंहाचा सांभाळ करण्याची तिनें त्यास विनंती केली. कोणालाहि संशय येऊं नये म्हणून पन्ना तेथून निघून गेली. छोटा उदयसिंह हा आसा साह याचा पुतण्या आहे असें जाहीर करण्यांत आलें. कांहीं वर्षांनंतर मेवाडच्या सरदारांनीं उदयसिंहास ओळखलें आणि त्याला पुन्हां चितोडच्या गादीवर आणून बसविलें. नाइलाजानें त्याचा चुलतभाऊ बनवीरसिंह हा दक्षिणेकडे निघून गेला (इ. स. १५४१–४२).

## धर्मोपासिका

मध्ययुग हा राजकीय उलाढालींच्या दृष्टीनें जरी अस्थिर काल असला तरी धर्म, तत्त्वज्ञान व संस्कृति यांच्या दृष्टीनें हा नवनिर्मितीचा काल ठरला. या

युगांत होऊन गेलेल्या वल्लभाचार्य, रामानंद, चैतन्य, नामदेव, कबीर आणि नानक या नामवंत संतमंडळींनीं भारतांत भक्तीची ध्वजा उभारून सामान्य जनांचें श्रद्धाळु अंतःकरण भारून टाकलें. धार्मिक सुधारणेच्या दृष्टीनें पडलेलें हें पाऊल भारतीय इतिहासांत अत्यंत महत्त्वाचें होतें. सर्व धर्मांचें ऐक्य व परमेश्वराचें विश्वस्वरूप हे भक्तिमार्गाच्या तत्त्वज्ञानाचे महत्त्वाचे भाग होते. " हें विश्वचि माझें घर " अशी मति स्थिर करून सर्वांभूतीं परमेश्वर दिसूं लागल्यास मुक्ति दूर नाहीं हें या संतांनीं सर्वांस पटवून दिलें.

भक्तीचा प्रसार करण्यासाठीं या सर्व महंतांनीं लोकभाषेचा उपयोग करून ग्रंथरचना केली, यामुळें एतद्देशीय बोलीभाषांत मोलाच्या वाङ्मयाची भर पडली.

लल्ल :– या काळांत होऊन गेलेल्या विख्यात भक्तमहिलांनीहि लोकभाषेंत लिखाण केलें. चवदाव्या शतकाच्या अखेरीस काश्मीरमध्यें लल्ल या नांवाची एक उपासिका प्रसिद्धीस आली. पंधराव्या आणि त्यापुढील शतकांत झालेल्या रामानंद, कबीर वगैरे संतांनीं तयार केलेल्या राजमार्गाची आंखणी लल्लानेंच केली असें समजलें जातें. सर जॉर्ज ग्रिअरसन् यानें कांहीं एतद्देशीय पंडितांच्या साहाय्यानें लल्लाच्या अनेक काव्यांचें परिश्रमपूर्वक संशोधन करून त्यांत ग्रथित केलेलें तत्त्वज्ञान सुसूत्र मांडलें. संस्कृतांतील कांहीं भाषांतरें पाहून ग्रिअरसननें डॉ. एल्. डी. बारनेटच्या साहाय्यानें " लल्लवाक्यानि " या नांवाच्या एका पुस्तकाचें संपादन केलें. हें पुस्तक लंडनमधील रॉयल एशियाटिक् सोसायटीनें इ. स. १९२० मध्यें प्रसिद्ध केलें. या छापील काव्यांवरून तिची वैशिष्ट्यपूर्ण भूमिका आणि तत्कालीन काश्मिरी विद्वानांच्या मनावर तिनें पाडलेली छाप यांची चांगली कल्पना येते. फार पुरातन कालापासून काश्मीर हें शैवपंथीयांचें एक महत्त्वाचें केन्द्र म्हणून ओळखलें जातें. लल्लाचा गुरु हा एक सुप्रसिद्ध शिवोपासक होता. स्वतः लल्ल भिक्षेवर उदरनिर्वाह करणारी एक योगिनी होती. सर्व वासनांचा निरोध करून शेवटीं अनंतांत विलीन होण्यासाठीं योगसाधना केली पाहिजे अशी तिची दृढ श्रद्धा व शिकवण होती. मानवाचें भवितव्य सर्वस्वीं ईश्वरेच्छेवर अवलंबून आहे असा तिला

[illegible]

घडलेलें पाप हें दैववशात् घडलेलें असो अगर तें जाणीवपूर्वक घडो, त्याला होणारा दाम रक्षातुल्य असेल किंवा पुष्पासारखा आल्हाददायक असेल. एक गोष्ट मात्र खरी कीं तुझ्या इच्छेनुसारच प्रत्येकाच्या पदरीं तूं माप टाकतोस ! तुझी लीला अगाध आहे."

लल्लाच्या विचारसरणींत कोठेंहि अतिरेक अगर एकांतिकता नाहीं. ती मनानें उदार आहे. तिच्या शिकवणींत अनेक तत्त्वांचा समन्वय दिसून येतो. त्या काळांत काश्मीरमध्यें मान्यता पावलेल्या सूफी तत्त्वज्ञानाचा पगडाहि लल्लाच्या मनावर बसलेला दिसतो. सय्यद अली हमदानी व इतर कांहीं नामवंत मुसलमान तत्त्वज्ञांशीं तिचा परिचय घडून आला. सूफी तत्त्वज्ञानाकडे तिचें मन आकर्षित होण्याचें प्रमुख कारण म्हणजे या तत्त्वज्ञानाचें औपनिषदिक तत्त्वज्ञानाशीं असलेलें साम्य. " खरा संत हा मानवजातीचा एकनिष्ठ सेवक असून प्रेमानें जग जिंकण्यांत तो इतिकर्तव्यता मानतो " असें तिचें मत होतें. बाह्य उपचार आणि मूर्तिपूजा यावर तिचा फारसा भर नसे. निरपेक्ष कर्तव्यानें जीवनाचें खरें सार्थक होतें अशी तिची दृढ श्रद्धा होती. एका काव्यांत ती म्हणते—

" मी जीं जीं कर्में अंगीकारतें तीं तीं पुरीं करण्याची महान् जबाबदारी माझ्यावर येऊन पडते. इतरेजन मात्र या कर्मांचीं फळें मनमुराद चाखूं शकतात. पण स्वार्थाचा विचार न करतां करीत असलेलीं सर्व कर्में जर मीं परमेश्वरास अर्पण केलीं तर श्रद्धा व कर्तव्याच्या मार्गानें माझी एकसारखी प्रगतिच होत राहील. "

लल्लाचें काव्य नादमाधुर्यापेक्षां अधिक तत्त्वप्रचुर आहे. तिच्या शब्दाशब्दांत तिची धर्मभावना व जीवनादर्श प्रकट होतात. या दृष्टीनें तिच्या काव्याचें, तामीळ वैष्णव कवयित्री आण्डाळ किंवा महाराष्ट्रांतील मुक्ताबाई व जनाबाई यांच्या काव्यरचनेशीं साम्य दाखवितां येईल.

स्वामी असून त्याच्या सेवेसाठींच तिचा जन्म आहे. तिच्या वृत्तींत राजवैभवाचें आकर्षण नाहीं. नातेवाइकांच्या छळापुढें तिनें कधींहि मान तुकविली नाहीं. कृष्ण परमात्म्यावर असीम श्रद्धा ठेवून प्राप्त झालेलें खडतर जीवन ती आनंदानें जगली." साधुसंतांत ती मोकळेपणें वावरे. याबाबत होणाऱ्या जननिंदेची तिनें केव्हांच पर्वा केली नाहीं. आपल्या एका काव्यांत ती सांगते—

"माझ्यावर फक्त एका श्रीकृष्ण परमात्म्याचेंच प्रभुत्व आहे. त्याच्यासाठीं मी माझ्या मातापित्यांशीं व इतर सर्व प्रियजनांशीं वैर पत्करलें. साधुजन हेंच माझें जग. संतसंगासाठीं मीं जगाची लाज सोडली. संतसमागमासाठीं मीं आजपर्यंत पायपिटी केली. आसवांच्या खतपाण्यावर माझी भक्तिवेल वाढविली. सत्याच्या शोधांत मला अनेक साधु भेटले व शेवटीं परमेश्वरहि भेटला. ईश्वरी साक्षात्कार झाल्यानंतर नामस्मरण व संतसंग यांनींच माझा जीवनमार्ग प्रकाशित केला. ईशचरणीं लीन झालेल्या मीराला जगाची पर्वा करण्याचें काय कारण आहे ?"

आणखी अनेक ठिकाणीं तिनें हेंच सांगितलें आहे. देवासाठीं वाटेल त्या हालअपेष्टा भोगण्यास तिची सदैव तयारी आहे. भारतीय भक्तिवाङ्मयांत मीराबाईस फार मानाचें स्थान आहे. पदलालित्य, भावनोत्कटता व भक्ति हे तिच्या काव्यरचनेचे विशेष म्हणून सांगतां येतील. तिच्या मधुर गीतांनीं भारतीय मन भारून गेलें. तिच्या गीतांत बुद्धीची प्रखरता नाहीं अगर विचारांची गुंतागुंतहि नाहीं, परंतु तिच्या भक्तिपूर्ण हृदयांतून बाहेर पडलेल्या प्रत्येक शब्दाचें सहजसौंदर्य कांहीं आगळेंच आहे.

मीराबाईच्या नांवाभोंवतीं कालांतरानें अनेक दंतकथा गुंफिल्या गेल्या. तिचे जन्मसाल व मेवाडच्या घराण्याशीं आलेला तिचा संबंध या दोन्हींबद्दल विद्वानांत बराच मतभेद आहे. टॉड्च्या मतें मीराबाई ही मेवाडचा राणा कुंभ याची राणी. तिचा विवाह इ. स. १४१३ त झाला. 'राग-गोविंद' हें काव्य तिनें रचलें असून जयदेवाच्या 'गीत-गोविंदा'वर तिनें एक टीका लिहिली आहे असें कांहीं विद्वानांचें मत आहे. मेवाडमधील दोन कृष्ण-मंदिरांपैकीं एक मीराबाईनें व दुसरें राणा कुंभ यानें बांधलेलें आहे असें म्हणतात. पुष्कळसे आधुनिक इतिहासकार टॉड्शीं सहमत नाहींत. त्यांच्यामतें मीराबाई

ही मेरताच्या राव दूदाचा चौथा मुलगा राणा रतनसिंह याची मुलगी. हिचा जन्म पंधराव्या शतकाच्या अखेरीस अगर सोळाव्या शतकाच्या प्रारंभीं होऊन सुमारें इ. स. १५१६ त तिचा विवाह राणा संगाचा मुलगा भोजराज याच्याशीं झाला असावा. मथुरा व वृंदावन येथें संतमंडळींसमवेत कांहीं काळ घालविल्यानंतर ती द्वारकेस आली. इ. स. १५४६ मध्यें तिचा अंत झाला असें अनेकांचें मत आहे. तुलसीदास व मीराबाई यांच्यांत पत्रव्यवहार झाल्याबद्दलच्या आख्यायिकेस कोणताहि आधार मिळत नाहीं. अकबर तानसेनासमवेत मीराबाईच्या भेटीस गेल्याची कथाहि अशीच कपोलकल्पित असावी.

## इतर उपासिका

मीराबाईइतक्या प्रसिद्धीस न आलेल्या आणखीहि कांहीं भक्त-महिला या काळांत होऊन गेल्या. कबीराची समकालीन क्षेमा अगर क्षेमश्री या नांवाची एक गवळण होती. हिच्याशीं अध्यात्मांतील कांहीं प्रश्नांची चर्चा करून कबीराचें समाधान झालें असें म्हणतात. कबीराच्या कांहीं शिष्यांपैकीं त्याची मुलगी कमाली हीहि एक थोर भक्त होती. कबीराचें शिष्यत्व पत्करलेली गंगाबाई नांवाची आणखी एक उपासिका इतिहासास ज्ञात आहे. रामानंदांचें शिष्यत्व पत्करलेल्याहि कांहीं महिला होत्या. पीपा नांवाच्या त्यांच्या शिष्याची पत्नी सीता ही रामानंदांना गुरु मानी. उदार मतवादी विचारवंत म्हणून प्रसिद्ध असलेल्या दादूच्या दोन कन्या नानीबाई व मातावाई यांचाहि उल्लेख येथें करतां येईल ( इ. स. १६०३ ते १६६० ). चरणदासी पंथाचा संस्थापक चरणदास ( हा अठराव्या शतकाच्या मध्यांत होऊन गेला ) याच्या परिवारांत सहजोबाई आणि दयाबाई या नांवाच्या दोन शिष्या होत्या. या दोघींनीं धार्मिक विषयांवर ग्रंथलेखनहि केलेलें आहे. सहजोबाईच्या नांवावर ' सहज-प्रकाश ' व ' सोलह–तत्त्वनिर्णय ' हे दोन ग्रंथ व दयाबाईच्या नांवावर ' दया-बोध ' व ' विनय-मालिका ' हे दोन ग्रंथ उपलब्ध आहेत.

## कलावती व लेखिका

मध्ययुगापासून मिथिला नगरी ही कला व संस्कृतीच्या भरभराटीचें केन्द्र म्हणून प्रसिद्ध आहे. आपल्या प्रभावी काव्यानें मानवी अंतःकरणें भारून टाकणारा कवि विद्यापति मिथिलेंतच होऊन गेला. अशा या नामवंत नगरींत

तीन महिला निरनिराळ्या विद्याशाखेंत प्रसिद्धीस आल्या. यापैकीं ओइन्वार घराण्यांतील विख्यात महाराजा शिवसिंह याची पत्नी पहिली लखिमा उर्फ लछिमादेवी ही एक होय. विद्यापतीच्या पदावलींत हिचा वारंवार उल्लेख केलेला आढळतो. लखिमादेवी ही संस्कृत पंडिता असून तिनें या भाषेंत बरेंच काव्य केलें. नरसिंहदेवाची पत्नी धीरमति हिच्या आज्ञेनुसार विद्यापतीनें 'दान-वाक्यावलि' नांवाचा एक ग्रंथ लिहिला. नरसिंहदेवाचा मुलगा चंद्रसिंह याची पत्नी दुसरी लछिमादेवी हीहि विद्वंची भोक्ती होती. हिच्या प्रेरणेनें मिश्रुमिश्रानें 'विवाद-चन्द्र' व 'पदार्थ-चन्द्र' हे दोन ग्रंथ प्रसिद्ध केले.

या कालांत संगीतशास्त्राच्या अभ्यासाकडे कांहीं स्त्रियांनीं विशेष लक्ष घातलेलें दिसतें. पंडितलोचन कवीनें प्रसिद्ध केलेल्या 'राग-तरंगिणी' या गीतसंग्रहांत विद्यापतीची सून चंद्रकलादेवी हिनें रचलेलें एक गीत दिलें आहे. ग्वाल्हेरच्या राजा मानसिंगाची राणी मृगनयना हिला मिश्र रागांची विशेष अभिरुचि होती. पतीला प्रिय असलेल्या मिश्र रागदारींत तिनें गुजरी, बाबुल-गुजरी, मालगुजरी आणि मंगलगुजरी या चार रागांची केलेली रचना नंतरच्या कालांतहि लोकप्रिय झाली.

माळवची रूपमती उत्कृष्ट गीतरचना करी. शास्त्रीय संगीतांतील तिची गतिहि वाखाणण्यासारखी होती. हिचें जीवन मोठें शृंगारिक होतें. माळवच्या बाजबहादुराची ती प्रेयसी होती. मोगल सरदार आदमखान यानें माळव देशावर स्वारी केली त्या वेळीं जीव वचावण्यासाठीं बाजबहादूर राजधानींतून पळून गेला. शत्रूच्या हातीं पडून आपली विटंबना होऊं नये म्हणून या वेळीं रूपमतीनें आत्महत्या केली. माळव-हिंदींत रूपमतीनें रचलेलीं अनेक काव्यें लिहून ठेव-लेलीं नसलीं तरी तेथील गायकाच्या तोंडीं तीं पिढ्यान् पिढ्या घोळत आहेत.

---

# प्रकरण १७ वें



## दक्षिण भारतीय महिला

## (इ. स. १३०१ ते १८००)

### कवयित्री

विजयनगरच्या अमदानींत दक्षिण भारतांत बहुमोल वाङ्मय निर्माण झालें. या राज्यांतील अनेक संस्थानिकांनीं व सरदारांनीं विद्वानांना आश्रय देऊन त्यांच्याकडून संस्कृत, तेलगू व कन्नड भाषेंत पद, प्रबंध व नाट्य-शास्त्रांत उत्कृष्ट लेखन करविलें. 'यक्षगण' नांवाचें लोकनाट्यहि याच काळांत उदयास आलें. हीं नाटकें मोकळ्या जागेंत सर्वसामान्य लोकांसाठीं करण्यांत येत. अनेकदां या नाटकांना राजेलोक व सरदार मंडळीहि उप-स्थित रहात.

गंगादेवी :– इ. स. १३६१ मध्यें शंबुवरायास व इ. स. १३७१ त मदुरेच्या सुल्तानास जिंकून सेतुबंध रामेश्वरापर्यंत दक्षिणेकडील मुलूख विजय-नगरच्या आधिपत्याखालीं आणणारा शूर राजा दुसरा कम्पण (ऊर्फ कुमार कम्पण) याची गंगादेवी ही पत्नी. हिचे आईवडील व बालपण याबद्दल कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. एवढें मात्र निश्चित कीं, ती एक अतिशय बुद्धिमान् स्त्री होती. शंबुवराय व मदुरेचा सुल्तान यांच्यावर कुमार कम्पण चालून गेला तेव्हां गंगादेवीहि त्याजबरोबर होती. आपल्या पतीच्या शौर्याचें वर्णन करण्यासाठीं तिनें 'मधुरा-विजयम्' नांवाचें एक संस्कृत महाकाव्य रचलें. या काव्याच्या सुरुवातीस केलेल्या वंदनांत तिनें प्रामुख्यानें तेलगू प्रान्तांतील अगस्त्य, गंगाधर, विश्वनाथ वगैरे प्रख्यात संस्कृत कवींचा निर्देश केला आहे. विश्वनाथापाशींच तिचें संस्कृतचें अध्ययन झालेलें होतें. तिक्कय कवीचा उल्लेख करून ती सांगते, "याचें काव्य पौर्णिमेच्या धवल चंद्रप्रकाशा-

सारखें असून चकोराच्या अधीरतेनें सर्व कवि त्याचा रसास्वाद घेतात." हा तिक्कण म्हणजे तेलगू महाभारताची अठरांपैकीं पंधरा पर्वें रचणारा तिक्कन सोमयाजी ह्याच प्रसिद्ध कवि होय. यावरून निश्चितपणें असा निष्कर्ष निघतो कीं, विश्वनाथाची शिष्या व तिक्कन सोमयाजीविषयीं आदर बाळगणारी गंगादेवी ही तेलगू युवराज्ञी होती.

कम्पणाच्या राज्यविस्ताराचें सविस्तर वर्णन करणारें 'मधुराविजयम्' हें महाकाव्य एका दृष्टीनें ऐतिहासिक महत्त्वाचें ठरलें आहे. विजयनगरची माहिती देणारा एक प्रमाणग्रंथ म्हणून याचें महत्त्व कोणीहि नाकारूं शकणार नाहीं. कवयित्री या दृष्टीनें गंगादेवीचा क्रम बराच वर लागतो. दक्षिण भारतांत संस्कृत भाषेंत रचना करणारी ही एकच थोर महिला होऊन गेली. संपादकांनीं तिजविषयीं काढलेल्या गौरवपूर्ण उद्गारांतील कांहीं भाग येथें उद्धृत करणें उचित ठरेल. "गंगादेवीची रचना म्हणजे विदग्ध संस्कृत काव्याचा एक उत्कृष्ट नमुना होय. या काव्यरचनेंत रूढ काव्यरचनेच्या सर्व नियमांचें काटेकोर पालन केलेलें आढळतें. येथें ऋतूंचीं रसपूर्ण वर्णनें आहेत. संधिप्रकाशाचें काव्यमय वर्णन आहे आणि चंद्रोदयाचा आल्हाद आहे. संस्कृत काव्यांतील सर्व संकेतांचा आश्रय कवयित्रीनें कलापूर्ण दृष्टीनें केलेला आहे. लेखनाचा थाट वैदर्भी असून रचना अतिशय सुरस, सोपी आणि विलक्षण आकर्षक आहे. ठिकठिकाणीं बहारदार उपमा आहेत, निसर्गवर्णनें आहेत. शिवाय पुढील कालांतील व्याकरणप्रेमी कवींतील क्लिष्टता गंगादेवीच्या रचनेंत कोठेंहि जाणवत नाहीं. कालिदासाच्या अनेक उपमांचा व वर्णनप्रकारांचा तिनें आश्रय केला असला तरी यांतूनहि तिची वैशिष्ट्यपूर्ण मांडणी आणि स्वतंत्र प्रतिभा व्यक्त झाल्याखेरीज रहात नाहीं."

मोल्ला :– गंगादेवीप्रमाणें मोल्ला ही राजघराण्यांत जन्माला आलेली नव्हती. केशवशेट्टी नांवाच्या पेन्नारच्या डाव्या तीरावर वसलेल्या गोपवरमूच्या एका कुंभाराची ही मुलगी. मोल्ला ही तेलगू भाषेंतील पहिली नामवंत कवयित्री म्हणून ओळखली जाते. तिचा काल जरी अगदीं निश्चितीनें सांगतां आला नाहीं तरी राजा कृष्णदेवरायाच्या भरभराटीच्या कालांत किंवा थोड्या पूर्वीच्या कालांत मोल्ला होऊन गेली असावी. आपल्या रामायणाच्या प्रारंभीं

तिनें केलेल्या वंदनांत श्रीनाथ या चौदाव्या शतकाच्या उत्तरार्धांत व पंधराव्या शतकाच्या आरंभीं होऊन गेलेल्या नामवंत कवींचा उल्लेख आढळतो. मोल्लाच्या रामायणलेखनाखेरीज तिच्या व्यक्तिगत जीवनाबद्दल कांहींहि माहिती आज उपलब्ध नाहीं. हें रामायण पृष्ठसंख्येनें व्हान असलें तरी त्यांतील काव्यगुण वाखाणण्यासारखे आहेत. कित्येक वर्षें शाळांमधून तें मुलांना क्रमिक पुस्तक म्हणून शिकवीत आणि तोंडपाठहि करून घेत. मोल्लाच्या काव्यांत तन्मयता, ओघ आणि ओज हे गुण प्रामुख्यानें आढळून येतात. रामायणांतील सुन्दर-काण्ड फारच सरस उतरलें आहे. तिनें रेखाटलेलीं रावण, हनुमत् आणि सीता यांचीं शब्दचित्रें तेलगू वाङ्मयांत अमर झालीं आहेत. मोल्लानें आणखी कांहीं रचना केली कीं नाहीं तें सांगतां येत नाहीं, परंतु तिच्या एका रामायणानेंच तेलगू वाङ्मयांत तिला कायमचें मानाचें स्थान प्राप्त झालें आहे.

**ओदूव तिरुमलांवा :–** विजयनगरचा राजा अच्युतराय याच्या दरबारांत ओदूव तिरुमलांबा ही प्रथम नोकरीस होती. राजघराण्यांतील स्त्रियांना उत्कृष्ट गद्य व पद्य वाङ्मय वाचून दाखविणें व दरबारांतील मंडळींना काव्य ऐकविणें हें काम तिजकडे असे. ओदूव म्हणजे वाचन करणारी. यावरून तिला ओदूव तिरुमलांबा असें नांव पडलें. या अप्रतिम बुद्धिमान् महिलेचें संगीत, व्याकरण, भाषाशास्त्र, रचनाशास्त्र यांवरील प्रभुत्व वाखाणण्यासारखें होतें. भारतीय महाकाव्यें, नाट्य व तत्त्वज्ञान या शाखांत ती पारंगत होती. तिरुमलांबा अनेक भाषा बोले व लिही. या गुणांवर जणूं कळसच असें सौंदर्यहि तिला लाभलेलें असावें. तिच्याकडे आकर्षित होऊन अच्युतरायानें तिला ' राज-महिषी ' बनविलें. राजा अच्युतराय व पहिली राणी वरदांबिका यांच्या प्रेमपूर्ण वैवाहिक जीवनावर आधारित असा ' वरदांबिका परिणय-चम्पू ' या नांवाचा जो ग्रंथ तिरुमलांबेनें लिहिला, त्याच्या प्रस्तावनेंत तिच्या वैयक्तिक जीवनांतील हा भाग नमूद केला आहे. वरदांबिकेला पट्टराणीचा मान राजानें दिला होता. आपली मोठी सवत व राजा यांच्या प्रेममय जीवनाचें तन्मयतेनें वर्णन करणाऱ्या तिरुमलांबेकडे पाहून थोडें आश्चर्यच वाटतें. वरदांबेच्या प्रेमळ स्वभावामुळें आदर उत्पन्न होऊन कदाचित् तिरुमलांबेनें हें गद्यकाव्य रचलें असावें. तिरुमलांबेनें अनेक विद्वानांना आश्रय दिला होता. धर्मकार्यांत ती सढळ हातानें देणग्या देई. वरदांबेस झालेल्या पहिल्या पुत्राचेंहि वर्णन या

चम्पूंत केलें आहे. 'वरदांबिका-परिणयावर' दोन प्रकारचे अभिप्राय उपलब्ध आहेत. त्यांतील एक अतिशय स्तुतिपर आहे व दुसऱ्यानें या ग्रंथास सामान्य प्रत दिलेली आहे. असे असलें तरी तिरुमलांबा ही उच्चशिक्षित महिला होती व तिनें सुसंस्कृत समाजाच्या अभिरुचीस मान्य होण्यासारखें लिखाण केलें यांत वाद नाहीं. अच्युतरायानें केलेल्या एका दानसमारंभाच्या वर्णनावर आधारित 'आनंद-निधि' या शीर्षकाखालीं तिरुमलांबेनें दोन संस्कृत काव्यें केलीं. अनेक ठिकाणीं हीं काव्यें कोरलेलीं आहेत. इ. स. १५३३ मध्यें राजानें ब्राह्मणांना 'स्वर्णमेरू' चें (सुवर्ण) दान केलें. यावर राणीनें एक संस्कृत काव्य रचलें. कांचीपुरम् येथें अच्युतरायानें हिऱ्या-मोत्यांनीं आपली तुला केली. या प्रसंगावरहि तिरुमलांबेनें तीन काव्यें रचलीं.

होन्नम्मा :—भारतांत उच्च वाङ्मयीन अभिरुचि ही फक्त ब्राह्मण व क्षत्रिय वर्गापुरतीच मर्यादित होती असें नाहीं. कन्नड वाङ्मयांत होन्नम्मा ही शूद्र स्त्री एक उत्कृष्ट लेखिका म्हणून या काळांत प्रसिद्धीस आली. ही म्हैसूर राज्यांतील येळंदूर या गांवची असावी. म्हैसूरचा राजा चिक्कदेवराज याच्या राजवाड्यांत ती काम करी. राणी देवजम्मणी हिची ती अतिशय आवडती सेविका होती. 'मित्रविंद-गोविंद' नाटकाचा लेखक अळसिंगाराचार्य या वेद-वेदान्तनिपुण ब्राह्मणाच्या हाताखालीं राणीनें होन्नम्माच्या शिक्षणाची व्यवस्था केली. अळसिंगाराचार्य तिच्या बुद्धिमत्तेवर अतिशय खूप असत. त्यांनीं तिला 'सरस-साहित्यद वरदेवता' हें अभिदान दिलें. गुरूनें शिष्ये-बद्दल दाखविलेला आदर पाहून राजास आनंद झाला व त्यानें होन्नम्मास ग्रंथलेखन करण्याची सूचना दिली. राणीमार्फत राजाची इच्छा समजतांच विशुद्ध स्त्रीच्या कर्तव्यावर होन्नम्मानें 'हदिबदेय-धर्म' या नांवाचा ग्रंथ लिहिला. हीं काव्यें इतकीं लोकप्रिय झालीं कीं, आजहि तीं कन्नड स्त्रिया हौसेनें गातात. म्हैसूरच्या राजघराण्याची सातव्या शतकापर्यन्तची वंशावळी या ग्रंथांत होन्नम्मानें दिल्यामुळें इतिहासदृष्ट्याहि या ग्रंथास फार मोठें महत्त्व प्राप्त झालें.

चेलुवांबा :— होन्नम्मानंतरच्या काळांत कर्नाटकांत दोड्ड कृष्णराज याची राणी चेलुवांबा ही एक नामवंत कवयित्री होऊन गेली. 'वरनंदी-कल्याण' ह्या शीर्षकाखालीं केलेली काव्यरचना हिची आहे असें समजतात.

तिरुपतीचा वेंकटाचल व देवी अल्मेलुमंग यांच्या स्तुतिपर कांहीं अंगाईगीतेंहि चेलुवांबेनें रचलीं आहेत. ' तुला-कावेरी-माहात्म्य ' नांवाचा एक टीकात्मक ग्रंथ तिनें पतीच्या प्रेरणेवरून लिहिला असें तिनें स्वतः नमूद करून ठेवलें आहे. तिची सर्वच रचना आल्हाददायक व मधुर आहे. इ. स. १७२५ च्या सुमारास चेलुवांबा होऊन गेली असावी.

**हेळवनकट्टे गिरियम्मा** :– आतांपर्यंत उल्लेखिलेल्या सर्व स्त्रिया इतर जातींच्या होत्या, याचा अर्थ असा नव्हे कीं ब्राह्मण समाजांत एकहि नामवंत महिला तेरा ते अठरा या शतकांत होऊन गेली नाहीं. हेळवनकट्टे या ठिकाणीं गिरियम्मा नांवाची रंगनाथाची एक महान् ब्राह्मण उपासिका होऊन गेली. सीता-स्वयंवर, चंद्रहास, उद्दालक यांचीं आख्यानें, अशा पौराणिक कथांवर गिरियम्मानें जीं काव्यें रचलीं तीं अजूनहि अतिशय लोकप्रिय आहेत. या काव्यांचा आणखी एक विशेष असा आहे कीं, हीं काव्यें कोणत्या रागांत गावींत हेंहि गिरियम्मानें नमूद करून ठेवलें आहे. प्रत्येक कडव्याच्या शेवटीं येणाऱ्या ' हळवनकट्टे रंगय्य ' या शब्दांवरून गिरियम्माची रचना ओळखतां येते. हिची सर्व रचना कन्नड भाषेंतच आहे. सुमारें दोनशें वर्षांपूर्वी हरिहरनजिक कोनारमहळ्ळी या खेड्यांत गिरियम्मा होऊन गेली अशी लोककथा प्रचलित आहे.

**तरिगोंड वेण्गमांबा** :– या कवयित्रीनें आपल्या काव्यांत वारंवार केलेल्या नरसिंहाच्या उल्लेखांवरून ही चित्तूर जिल्ह्यांतील तरिगोंड या खेडेगांवची असावी असें दिसतें. कृष्णय्या नावाच्या ब्राह्मणाची ही कन्या. बालपणींच वैधव्य आल्यानें तिची वृत्ति देवधर्माकडे वळली. तत्त्वज्ञानांतील योगशास्त्राचा विशेष अभ्यास केल्यामुळें तिच्या लेखनांत योगप्रक्रियेचा प्राधान्यानें समावेश झालेला आढळतो. अठराव्या शतकाचा उत्तरार्ध हा वेण्गमांबाचा जन्मकाल असावा.

*वेण्गमांबाचें लिखाण या कालांत हिच्यापूर्वी होऊन गेलेल्या सर्व* लेखिकांपेक्षां अधिक आहे. तेलगू भाषेंत तिनें रचलेलें भागवत, राजयोग-सार व वेंकटचल-माहात्म्य हे तीन ग्रंथ आज उपलब्ध झाले आहेत. काव्यगुणांत वेण्गमांबा जरी मोल्ल किंवा मुद्दुपळणी ह्यांची बरोबरी करूं शकली नाहीं

तरी तिच्या काव्यांत अनेक गुण आहेत हें नाकबूल करतां येणार नाहीं. तिची भाषा मधुर व संयमपूर्ण असल्यामुळें इतर कवयित्रींच्या वर्णनांतील भडकपणा त्यांत आढळत नाहीं. 'राजयोग-सार' हा तिचा ग्रंथ तर फारच लोकप्रिय झाला. योगप्रक्रियेच्या अभ्यासकांना हा ग्रंथ चांगलाच मार्गदर्शक ठरला आहे.

तंजावरच्या नायक राजघराण्यांतील स्त्रिया सुशिक्षित व सुसंस्कृत होत्या. त्यांच्यापैकीं कांहींनीं संस्कृत व तेलगू भाषेंतून सुरस लिखाण केलें आहे. यांनीं निर्माण केलेली काव्य व नाट्य यांची परंपरा दक्षिणेकडील तेलगू वाङ्मयांत महत्त्वाची ठरली आहे. अनेक शतकें भारतीय संस्कृतीचें केन्द्रस्थान बनलेल्या तेलगू वाङ्मयांत स्वतःच्या लेखनपरंपरा निर्माण करणाऱ्या या महिलांची थोरवी कोणीहि नाकारूं शकणार नाहीं. मधुरवाणी आणि रामभद्रांबा या रघुनाथ नायकाच्या दोन्ही स्त्रिया सुप्रसिद्ध काळच्याच्या शिष्या होत्या. राजा विजय-राघवाची (इ. स. १६३३–७३) राणी रंगजम्मा हिचाहि उल्लेख या लेखिकांच्या जोडीची व तोडीची लेखिका म्हणून करावा लागेल.

मधुरवाणी :– हिनें लिहिलेल्या रामायणाच्या प्रस्तावनेंत हिच्या अंगच्या अनेक गुणांचा उल्लेख केलेला आहे. मधुरवाणी व्याकरण व छंदशास्त्रांत पारंगत होती. अर्धें काव्य ती सहज लीलेनें पुरें करी. एकाच वेळीं अनेक विषयांकडे अवधान पुरविण्याची कलाहि तिला साध्य झालेली होती. तिच्या वीणावादनावर राजा अतिशय खूष असे. मधुर आवाजाच्या तिला लाभलेल्या देणगीवरूनच राजानें तिचें नांव मधुरवाणी असें ठेवलें होतें. रघुनाथानंतर गादीवर आलेल्या विजयराघवानें लिहिलेल्या 'रघुनाथाभ्युदयम्' या ग्रंथांत मधुरवाणी हिला यक्षगणांत महत्त्वाचें स्थान देऊन 'आशुकवितावाणी' (शीघ्र कवयित्री) असा तिचा गौरव केला आहे.

मधुरवाणीनें संस्कृतमध्यें केलेल्या चौदा सर्गांचा रामायण हा ग्रंथ रघुनाथ नायकाच्या तेलगू काव्याचा अनुवाद असावा असें समजलें जातें. सध्यां हें तेलगू रामायण उपलब्ध नाहीं. मधुरवाणीची भाषा सुबोध व लालित्यपूर्ण आहे. अनेक ठिकाणीं तिनें कालिदासाच्या रघुवंशाच्या रचनाकौशल्याचें यशस्वी अनुकरण केलें आहे.

रामभद्रांबा :– रघुनाथ नायकाच्या राजकीय जीवनावर आधारित

' रघुनाथाभ्युदयम् ' नांवाचें चौदा सर्गांचें एक महाकाव्य रामभद्रांबेनें रचलें आहे. काव्यगुणापेक्षांहि विजयनगरच्या इतिहास सांगणारा ग्रंथ म्हणून याचें महत्त्व अधिक मानलें जातें. दक्षिण भारतांत घडून आलेली राजकीय क्रान्ति व त्यामुळें रामराजाची सत्ता खिळखिळी होऊन हें घराणें नामशेष कसें झालें याविषयींची हकीकत या ग्रंथांत सविस्तर दिलेली आहे. मधुरवाणीच्या काव्यांतील विशेष रामभद्रांबेच्या काव्यांतहि आढळून येतात. ऐतिहासिक विषयाची निवड केल्यामुळें या काव्यांत कथन-कौशल्य भरपूर आहे. विशेषतः लढायांचीं वर्णनें अतिशय बहारदार आहेत. रामभद्रांबेचीं शब्दयोजना वाखाणण्यासारखी असून तिची भाषा अखंड वाहणाऱ्या प्रवाहाप्रमाणें ओघवती आहे. भाषाशास्त्रावर प्रभुत्व मिळविलेलें असल्यामुळें तिच्या कल्पकतेंत नावीन्य आढळतें. ' रघुनाथाभ्युदयम् ' च्या पहिल्या दोन सर्गांत तंजावरच्या राजघराण्यांतील बुद्धिमान् महिलांची हकीकत आली असून त्यांच्या प्रतिभेचेंहि वेधक वर्णन यांत केलें आहे. यांपैकीं कांहींजणी आठ भाषांत काव्यरचना करूं शकत. कांहीं तत्त्वज्ञ स्त्रिया वैशेषिक तत्त्वपद्धतीवर उत्कृष्ट प्रवचन करीत. स्वतः रामभद्रांबा चोवीस मिनिटांच्या अवधींत ( घटिका ) तिला येणाऱ्या आठ भाषांपैकीं कोणत्याहि भाषेंत शंभर श्लोक करूं शकत असे ( शतलेखिनी ). हिच्या नांवावर ' विजय-विलासम् ' हें आणखी एक काव्य उपलब्ध आहे.

रंगजम्मा :– पसुपलेति वेंकटाद्रि आणि मंगबाबा यांची कन्या रंगजम्मा ही विजयराघव नायकाची ( इ. स. १६३३-७३ ) राणी. रामभद्रांबेप्रमाणेंच ही शतलेखिनी होती. हिच्या काव्यांत उत्तान भावनाविलास प्राधान्यानें आढळून येतो. रंगजम्मा राजकारणनिपुण होती. ' मन्नारुदास-विलासम् ' व ' उषा-परिणयम् ' हीं दोन काव्यें तिनें तेलगू भाषेंत लिहिलीं. याखेरीज तिच्या नांवावर ' रामायण-सारम् ', ' भारत-सारम् ' व ' यक्षगण ' हें नाटक इतके ग्रंथ आहेत. सर्वांत ' उषा-परिणयम् ' हा तिचा ग्रंथ उत्कृष्ट असून तेलगू वाङ्मयांतील प्रथमदर्जाच्या प्रबंधांत त्याची गणना होते. ' यक्षगणा ' ची भाषा ' विजयराघवां ' तील भाषेसारखीच असून एकूण मांडणी सुगम आहे. राजा विजयराघव रंगजम्माच्या बुद्धिप्रभावानें दिपून गेला. फुरसदीचा सर्व वेळ तो तिच्याच संगतींत घालवी. तिच्या विद्वत्तेचा बहुमान करण्यासाठीं त्यानें एकदां तिजवर अक्षरशः सोन्याची वृष्टि करविली ( कनकाभिषेक ).

**मद्दुपळणी :**— नायक राजांचा पराभव केल्यानंतर तंजावरचें राज्य भोसले राजांकडे गेलें. नायक घराण्याची विद्यावृद्धीची परंपरा याहि राजांनीं पुढें चालविली. इ. स. १७३९ ते १७६३ या काळांत गादीवर असलेल्या राजा प्रतापसिंहाच्या जनानखान्यांतील एका स्त्रीची मद्दुपळणी ही मुलगी. दक्षिणेकडील तेलगू वाङ्मयांत हिनें एक स्वतंत्र लेखनप्रणालि निर्माण केली. मद्दुपळणी ही अठराव्या शतकाच्या मध्यांत होऊन गेली असली पाहिजे. त्या काळच्या प्रथेनुसार हिचें संस्कृत व तेलगू भाषेचें बरेंच अध्ययन झालें होतें. तेलगू भाषेवर तर तिचें उत्कृष्ट प्रभुत्व होतें. नृत्य व संगीत यांमध्यें पारंगत म्हणून तिची ख्याति होती. वीणावादनांत तिची बरोबरी कोणीच करूं शकत नसे. तिचें काव्य आजहि लोक मोठ्या आवडीनें वाचतात.

मद्दुपळणीच्या नांवावर दोन ग्रंथ आहेत. एक 'राधिका-सांत्वन' ऊर्फ 'इळादेवीय' व दुसरा 'अष्टपदी'. यांपैकीं पहिल्यांत राधा-कृष्णांच्या भावजीवनाचें चित्रण तिनें केलें असून तेलगू भाषेंतील एक उत्कृष्ट ग्रंथ म्हणून याची वाखाणणी केली जाते. तिची भाषा अगदीं घरगुती, कल्पनाशक्ति तरल, रचना मधुर आणि मनाची पकड घेणारी आहे. 'अष्टपदी' हा जयदेवाच्या अष्टपदीचा तेलगू अनुवाद आहे. हा अनुवाद हुबेहूब मूळ काव्यासारखाच असून त्यावरून कवयित्रीच्या संगीतशास्त्रावरील प्रभुत्वाची चांगली कल्पना येते असें या शास्त्रांतील अनेक तज्ज्ञांचें मत आहे.

## राणी

**चेन्नम्माजी :**— विजयनगरचें बलाढ्य साम्राज्य विस्कळित झाल्यानंतर अनेक लहान लहान राज्यपाल स्वतंत्र झाले. यांत केळदीच्या नायक राजांचा प्रामुख्यानें उल्लेख करावा लागेल. या घराण्यांपैकीं भद्राप्पा नायक व सोमशेखर नायक हे दोघे सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांत बरेच प्रसिद्धीस आले. चेन्नम्माजी ही सोमशेखराची पत्नी. सुमारें १६६१ मध्यें हे दोघे भाऊ राज्यकारभार पहात होते. चेन्नम्माजी पतीबरोबरीनें राजकारणांत लक्ष घाली. पुढें सोमशेखर एकटाच सर्व राज्यकारभार पाहूं लागल्यानंतरहि त्यानें राणीवर अनेक जबाबदारीच्या कामगिऱ्या सोंपविल्या. यावरून राणीचें राजकारणपटुत्व

सिद्ध होतें. पतीच्या वार्धक्यांत तर त्याच्या नांवें राणीच सर्व राज्याची व्यवस्था पाही.

सोमशेखर इ. स. १६७७ सालीं मृत्यु पावला. त्यानंतर चेन्नम्माजीनें मोठ्या हुशारीनें सुमारें २५ वर्षें राज्य केलें. ' केळदीनृप-विजय ' या कानडी ग्रंथावरून आणि 'शिवतत्त्व-रत्नाकर' या संस्कृत ग्रंथावरून चेन्नम्माजी-विषयीं सविस्तर हकीकत मिळते. पैकीं ' शिवतत्त्व-रत्नाकर ' हा संस्कृत ग्रंथ हिरिय-बसप्पा नायक नांवाच्या राणीच्या दत्तक पुत्रानें लिहिला आहे. हे ग्रंथ व शिलालेख यांत दिलेल्या माहितीवरून राणीच्या कर्तृत्वाची व धाडसी वृत्तीची चांगलीच कल्पना येते. शिवाजीचा पुत्र राजाराम याचा औरंगजेब पाठलाग करीत असतां चेन्नम्माजीनें रायगडाहून निसटून आलेल्या राजारामाला आश्रय दिला. राजारामाला पकडण्यासाठीं जेव्हां औरंगजेबाची बलाढ्य सेना तिच्या राज्यांत शिरली तेव्हां कडवा प्रतिकार करून तिनें औरंगजेबाला पूर्ण फजीत केलें. यानंतर एक शूर राज्ञी म्हणून चेन्नम्माजीची कीर्ति चोहींकडे पसरली. बेडनूरपासून जिंजीच्या किल्ल्यापर्यंत सुखरूप जाण्यासाठीं चेन्नम्माजीनें राजारामास खूप मदत केली. मराठी राजाला मदत तर झालीच पण मोंगलां-पासून तिच्या राज्याचा बचाव होऊन राज्याचें स्वातंत्र्य अबाधित राहिलें. औरंगजेब चेन्नम्माजीच्या शौर्यानें आश्चर्यचकित झाला आणि राणीच्या सन्मानार्थ त्यानें तिला कांहीं मूल्यवान् देणग्या पाठविल्या. आणखी एका प्रसंगांत राणीचें शौर्य दिसून आलें. एकदां दळवाय् तिम्मप्पाच्या नेतृत्वाखालीं म्हैसूरचें मोठें सैन्य तिजवर चाल करून आलें. या सैन्याचा तिनें धुव्वा उडविला आणि तिम्मप्पाच्या मुलास कैद केलें.

पतीच्या स्मृतिप्रीत्यर्थ तुंगभद्रा नदीच्या कांठीं तिनें सोमशेखरपुर नांवाचें नवीन गांव वसविलें व तें वेदनिपुण ब्राह्मणांना दान दिलें. यावरून राणीच्या औदार्याचा व विद्याभिरुचीचा प्रत्यय येतो. ती अतिशय धार्मिक वृत्तीची होती. अनेक सार्वजनिक कार्यासाठीं तिनें स्वतःच्या नांवानें बनारस, रामेश्वर, तिरु-पती व श्रीशैल या ठिकाणीं निधि देऊन विश्वस्तांमार्फत त्यांचा विनियोग करण्याची प्रथा चालू केली. याखेरीज जैन तपस्व्यांसाठीं तिनें अनेक मठ स्थापन केले. द्वैती आणि अद्वैती दोन्ही संप्रदायांना तिनें सारखाच आश्रय

दिला. तिचा एकूण राज्यकारभार इतका वाखाणण्यासारखा असे कीं हिच्या-इतकी हुशार, शीलवती, उदार व एकनिष्ठ राज्यकर्ती स्त्री झालीच नाहीं असें लोक म्हणत.

**उमयम्मा** :– त्रावणकोरचा राजा आदित्यवर्मा याच्या मृत्यूनंतर आत्तिंगल्च्या राणीखेरीज गादीला कोणी वारसच उरला नाहीं. आत्तिंगल्च्या राजघराण्याचें आदित्यवर्माशीं नातें असलें तरी हीं दोन स्वतंत्र राज्यें होतीं. आठ नायर सरदारांच्या संयुक्त मंडळाच्या हातीं त्रावणकोरचीं सर्व राजकीय सूत्रें असत. त्यांनींच राजावर विषप्रयोग करून राजवाडा जाळून टाकला. उमयम्मानें तंजावरचीं राज्यसूत्रें हातीं घेतल्यानंतर या सरदारमंडळानें तिच्याशीं वरकरणीं एकनिष्ठता दाखविली, पण गुप्तपणें तिजविरुद्ध कट करण्याचा बेत केला. राणीच्या सहा पुत्रांपैकीं पाचांना पाण्यांत बुडून मृत्यु येईल अशी त्यांनीं व्यवस्था केली. उरलेल्या एका मुलाला घेऊन राणी पथेनूकोट्टहून नुडुमंगाड्ला पळाली. या अंदाधुंदीचा फायदा घेऊन मोगलांनीं तंजावरावर स्वारी केली व या सर्व सरदारांना पिटाळून लावून दक्षिण तंजावरांत मुसलमानी सत्ता स्थापन केली.

या प्रकारानें उमयम्माची देशभक्ति उसळून आली. उत्तर कोट्टायमचा युवराज केरळवर्मा याला मदतीस घेऊन तिनें मुसल्मानांवर स्वारी केली आणि त्यांचा तिखट्टार येथें पुरा धीमोड केला. सरदारमंडळाला व उपाध्याय-वर्गाला आपला अधिकार मान्य करण्यास तिनें भाग पाडलें. राणीनें सर्व सूत्रें हातीं घेऊन केरळवर्मास आपला सेनापति व प्रमुख सल्लागार म्हणून नेमलें. खजिन्याचा ताबा घेऊन तिनें लांचलुचपतीस आळा घातला. दुर्दैवानें केरळ-वर्मा थोड्याच दिवसांनीं निधन पावला. बहुधा त्याला विरोधकांनीं ठार केलें असावें.

आपला पुत्र रविवर्मा वयांत आल्यानंतर राणीनें त्याला गादीवर बसविलें. या वेळीं राज्यांत सर्वकडे सुस्थिति व सुबत्ता नांदत होती. हिनें १६७८ ते १६८४ पर्यंत राज्यकारभार केला. या वेळच्या सीलोनच्या व्हॅन् रीड् नांवाच्या राज्यपालानें आपल्या लिखाणांत उमयम्माचा ' अखिल तंजावरची सर्वश्रेष्ठ राणी ' असा उल्लेख केला आहे.

मंगम्मा :– चिन्नवेंकण्ण यांच्या टीकाल्लेखांतून मंगम्मासंबंधींची थोडी हकीकत उपलब्ध होते. चंद्रगिरीचा रहिवासी तुपाकुल्ल लिंगम नायक व तिरुवेल्लोरची गणिका वनवा यांची ही कन्या. व्यवसाय मिळविण्यासाठीं ती तंजावरचा राजा विजयराघव याच्या दरबारांत गेली. तिला आपल्या जनान्यांत दाखल करून घ्यावी असा राजानें येत केला. पण तेथून निघून जाऊन तिनें मदुरेच्या चोक्कनाथ नायकाशीं विवाह केला. पति व त्याच्यामागून इ. स. १६८९ मध्यें तिचा पुत्र रंगकृष्ण मुत्तुवीरप्पा नायक निवर्तल्यानंतर विजयरंग चोक्कनाथ नायक याची पालक या नात्यानें मंगम्मानें इ. स. १७०७ पर्यंत मदुरेचें राज्य केलें. हा काळ मदुरेच्या राज्यकर्त्यांच्या दृष्टीनें फार आणीबाणीचा होता. एका बाजूनें औरंगजेबाच्या दक्षिणेकडील मोंगल सैन्याचा धोका व दुसऱ्या बाजूनें म्हैसूर, तंजावर, रामनाड आणि त्रावणकोर या राज्यांकडून स्वारी होण्याची धास्ती. अशा कात्रींत नायक राज्य सांपडलें होतें. मदुरेचें राज्य सांभाळण्याचा एकच मार्ग मंगम्मापुढें होता व तो म्हणजे औरंगजेबाचें मांडलिकत्व पत्करणें. तिनें ठराविक वार्षिक खंडणी देण्याचें मान्य करून, मुसल्मान सरदारांना देणग्या व बक्षिसें देऊन सर्वांच्या सदिच्छा संपादन केल्या. इतर राजांशीं मात्र तिनें चढाईचें धोरण स्वीकारलें आणि त्यांचे वारंवार होणारे हल्ले यशस्वी रीतीनें परतविले. मंगम्माचा प्रधान नरसप्पैह हा मोठा धोरणी व कावेबाज होता. तो उत्कृष्ट वीणावादन करी. दक्षिण तामिळ प्रान्तांत मंगम्माचें नांव घरींदारीं सर्वतोमुखीं झालेलें आढळतें. तिनें बांधलेल्या अनेक धर्मशाळा व बगीचे अजूनहि वापरले जातात. त्रिचनापल्लीच्या किल्ल्याच्या आसपास तिनें बांधलेल्या अवाढव्य इमारतींचे अवशेष पडावयास सांपडतात. दानधर्म व ब्राह्मणांना दिलेले अग्रहार तिच्या धार्मिक व दानशूर वृत्तीची साक्ष पटवितात. ख्रिश्चन चर्चेना व मुसल्मानी दर्ग्यांनाहि तिनें खूप देणग्या दिल्या. त्रिचनापल्लीचे बाबानत्तर अवालिया यांच्या दर्ग्याला तर तिनें खेडीच्या खेडीं दान दिलीं. मनुसीनें तिच्या दातृत्वाची अतिशय तारीफ केली आहे.

मदुरेंत राहणाऱ्या सौराष्ट्रांतील कांहीं ब्राह्मण विणकरांनीं स्वतःच्या धार्मिक उत्सवास मागितलेली परवानगी प्रथम तिनें नाकारली. परंतु नंतर त्यांना सवर्ण-हिंदूंचें धार्मिक स्वातंत्र्य देण्यांत आलें.

तिचा शेवट कसा झाला याबद्दल परस्परविरोधी वृत्तान्त पहावयास सांपडतात. मंगम्माचा नातू वयांत आल्यानंतर त्याला गादीवर बसवून तिला तुरुंगांत ठेवण्यांत आलें व तेथेंच तिचा अंत झाला असें कांहींजण म्हणतात. कांहीं असलें तरी एक कर्तबगार राजकर्ती म्हणून मंगम्माचें महत्त्व इतिहासाला मान्य करावेंच लागेल.

# प्रकरण १८ वें

## महाराष्ट्रीय महिला

महदाइसाः—मराठी वाङ्मयाला ज्ञात असलेली महाराष्ट्रांतील पहिली मराठी कवयित्री महदांबा, महदाइसा उर्फ रूपाई या नांवानें ओळखली जाते. देवगिरीवर राज्य करणाऱ्या यादव राजांच्या काळांत तेराव्या शतकांत ही होऊन गेली.

गोदावरी नदीच्या दक्षिण तीरावर पुरी या गांवीं वामनाचार्य नांवाचा एक ब्राह्मण रहात असे. त्याची पत्नी महदाइसा ही वेदविद्यापारंगत होती. हीं दोघें पति-पत्नी राजघराण्यांतील सर्व धर्मकृत्यें करीत. एकदां कांहीं विद्वान् पंडित देवगिरीच्या राजाकडे आले होते. त्यांच्याशीं महदाइसेनें वाद करून त्यांना जिंकलें. हें पाहून राजा महादेव तिच्यावर खूप होऊन त्यानें तिला पांच गांवें इनाम दिलीं.

प्रस्तुत कवयित्री महादाइसा ही वामनाचार्यांची नात होय. लग्न झाल्यावर थोड्याच काळांत हिला वैधव्य प्राप्त झाल्यामुळें ती आपल्या वडिलांच्या घरीं रहावयास आली. महदाइसेची वृत्ति प्रथमपासूनच अतिशय धार्मिक होती. महानुभाव पंथाचा संस्थापक चक्रधर हा आपल्या पंथाच्या प्रसारासाठीं महाराष्ट्रांत आला त्या वेळीं महदाइसा त्याची शिष्या बनली. महदाइसा चक्रधराला त्याच्या जीवनासंबंधीं व त्याच्या तत्त्वज्ञानासंबंधीं अनेक प्रश्न विचारी. या सर्व माहितीचा समावेश 'इतिहास' आणि 'लीला-चरित्र' या दोन ग्रंथांत केलेला आहे. तिच्या लेखनामुळेंच चक्रधरासंबंधीं आज महत्त्वाचा वृत्तान्त उपलब्ध होऊं शकला आहे.

चक्रधर बद्रिकेदारच्या यात्रेला गेला होता. त्या वेळीं त्याचे गुरु गोविंदप्रभु यांची सेवा करण्यासाठीं महदाइसा त्यांच्याजवळ राहिली. चक्र-

धराच्या मृत्यूनंतर त्याचा शिष्य नागदेव याच्याकडे तिनें उर्वरित आयुष्य घालविलें. नागदेव महदाइसाचा चुलताच होता.

महदाइसा महानुभाव पंथाची कट्टी पुरस्कर्ती असल्यानें कृष्णाखेरीज इतर कोणत्याहि देवाची भक्ति तिनें केली नाहीं. ती एकदां आपला भाऊ आपले याजकडे गेली असतां तेथें इतर देवांची पूजा चाललेली पाहून ती तावडतोब परत फिरली.

मृत्यूपूर्वीच्या तिच्या आजारांत तिला एक मोठें गळू झालें. तें कापणें आवश्यक असल्याचें वैद्यकीय मत ऐकून ती नागदेवास म्हणाली, " माझ्या गुरूंना ही गोष्ट संमत होणार नाहीं. शिवाय आतां माझें वय झालें आहे. शस्त्रक्रिया करून बरें होण्यापेक्षां धर्मपालनांत मृत्यु आलेला काय वाईट ? " अखेरीस ती या दुखण्यांतच मेली. " ही वृद्ध स्त्री खऱ्याखुऱ्या अर्थानें धर्माचरणी होती " असे उद्गार या प्रसंगीं नागदेवानें काढले.

महदाइसानें रचलेल्या काव्यप्रकारास ' धवळे ' अशी संज्ञा आहे. विवाहाच्या शुभप्रसंगीं हीं काव्यें गावींत अशी प्रथा आहे. उतारवयांत गुरु गोविंदप्रभूंना एकदां लग्न करण्याची इच्छा झाली. वधू निवडली गेली. विवाहसमारंभाची सर्व तयारी झाली. विवाहविधि चालू झाल्यावर गुरूंनीं महदाइसास आज्ञा केली, " स्वतःचें एखादें कवन गा. " " मजजवळ कोठें रचनाचातुर्य आहे ! " ती नम्रपणें उत्तरली. " ' गुरु चक्रधर ( विष्णु ) यांचीं पाउलें माथ्यावर घेऊन ' ( श्रीसर्वेश्वराचे सीरीं धरुनिया चरण ) अशी सुरुवात कर म्हणजे पुढची रचना आपोआप स्फुरेल " ही गुरु गोविंदप्रभूंची सूचना ऐकतांच महदाइसानें काव्यांतच " मग धवळीं गाईन गोविन्दराणा " असें उत्तर देऊन गायनास सुरुवात केली. श्रीकृष्ण व रुक्मिणी यांच्या विवाहाच्या तयारीपासून तों समारंभापर्यंत सर्व कथाभाग तिच्या या उत्स्फूर्त काव्यांत तिनें गुंफला. ह्या धवळ्यांचा पहिला भाग मानला जातो. दुसरा भाग कांहीं कालानें तिनें पुरा केला. रुक्मिणी-स्वयंवरावरहि तिनें एक काव्य रचलें. त्यांतील प्रत्येक ओळीच्या सुरुवातीचें अक्षर देवनागरी लिपीच्या अनुक्रमानें घेतलें आहे. अशा रीतीनें महदाइसाला मराठी भाषेंतील पहिली कवयित्री होण्याचा मान मिळाला.

मुक्ताबाई :–" निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, एकनाथ, नामदेव, तुकाराम " ही नामावळि तन्मयतेनें सतत मुखांतून आल्यास मोक्ष मिळतो, देवत्व प्राप्त होतें. पंढरपूरच्या विठ्ठलाचा प्रत्येक भक्त आपल्या दैनंदिन भजनांत या संतमंडळींचा नामोच्चार करीत असतो. वारकरी संप्रदाय निर्माण करणाऱ्या श्रेष्ठ महंतांत मुक्ताबाईला ( इ. स. १२७९ ते १२९७ ) वैशिष्ट्यपूर्ण स्थान कसें प्राप्त झालें आहे हें वरील उल्लेखावरून समजून येईल. मुक्ताबाईचें जीवन ज्ञानदेवाच्या जीवनाशीं एकरूप झालेलें असल्यानें तिचा स्वतंत्र जीवनवृत्तान्त उपलब्ध नाहीं. गोदावरीच्या तीरावर वसलेल्या पैठणजवळच्या आपेगांवचे रहिवासी विठ्ठलपंत कुलकर्णी यांच्या चार मुलांपैकीं मुक्ताबाई ही सर्वांत धाकटी मुलगी. विठ्ठलपंतांचा विवाह आळंदीच्या सिद्धोपंत कुलकर्णी यांच्या मुलीशीं झाला होता. विवाहानंतर विठ्ठलपंतांच्या पत्नीचें नांव रखमाबाई असें ठेवण्यांत आलें. या दांपत्यास वरींच वर्षें संततिसुख नव्हतें. विठ्ठलपंतांची जात्याच विरक्त वृत्ति संसाराला विटली. अनंताचा शोध लावण्याची त्यांच्या जीवाला ओढ लागली. एके दिवशीं मुकाट्यानें त्यांनीं घर सोडून थेट वाराणशी गांठली. तेथें त्यांच्या सुदैवानें त्यांना रामानंद नांवाचे सद्गुरु भेटले. सामान्यतः संन्यासाश्रम स्वीकारण्यापूर्वीं पत्नीची अनुज्ञा घेण्याची प्रथा आहे. परंतु " मला पत्नीच नाहीं " असें विठ्ठलपंतांनीं सांगितल्याकारणानें रामानंदांनीं त्यांना संन्यासाश्रमाची दीक्षा दिली व त्यांचें चैतन्यानंद असें नवीन नांव ठेवलें.

रखमाबाई आळंदींतच पतीची वाट पहात काळ कंठीत होती. सुमारें बारा वर्षांनीं रामेश्वरच्या यात्रेस निघालेल्या रामानंदांनीं वाटेंत आळंदीस मुक्काम केला. तेथें त्यांनीं एक स्त्री पिंपळाला प्रदक्षिणा घालीत असतांना पाहिली. ती पुढें झाली आणि तिनें त्यांना नमस्कार केला. " अष्टपुत्रा सौभाग्यवती भव " असा रामानंदांनीं तिला आशीर्वाद देतांच ती खिन्नपणें हंसली. यावर रामानंदांनीं सहानुभूतीनें तिची अधिक चौकशी केली. त्यावरून त्यांची अशी खात्री झाली कीं, बारा वर्षांपूर्वीं ज्या चैतन्यानंदास आपण संन्यासाची दीक्षा दिली होती, त्याचीच ही पत्नी असावी. ताबडतोब ते रखमाबाई व सिद्धोपंतांना घेऊन काशीस परतले. सर्व चौकशी करून त्यांनीं विठ्ठलपंतांस परत गृहस्थाश्रम स्वीकारण्याची आज्ञा केली. ती शिरसामान्य करून विठ्ठलपंत आळंदीस येऊन पुन्हां संसारी बनले.

यथाकालीं विठ्ठलपंत व रखमाबाई यांना चार मुलें झालीं. पहिल्या तीन मुलांचीं नांवें निवृत्ति, ज्ञानदेव व सोपान अशीं ठेवलीं व चवथ्या मुलीचें नांव मुक्ति असें ठेवण्यांत आलें. ब्राह्मणांच्या मुलांना जेवढें शिक्षण हवें तें सर्व विठ्ठलपंतांनीं त्यांना दिलें. परंतु आळंदीकर ब्राह्मण त्यांना आपल्यांत घेईनात. त्यांना जातिबाह्य लेखण्यांत येई. संन्याशाला पुन्हां गृहस्थाश्रम स्वीकारतां येत नाहीं व विठ्ठलपंतांनीं ही चूक केलेली असल्यानें त्यांच्या मुलांच्या मुंजी करतां येणार नाहींत असा निर्णय आळंदीच्या ब्राह्मणांनीं दिला. प्रायश्चित्ताची विचारणा करतांच 'देहान्ताशिवाय या अपराधास दुसरें प्रायश्चित्त नाहीं' असें त्यांनीं विठ्ठलपंतांना सांगितलें. समाजाच्या बहिष्कारामुळें विठ्ठलपंत जीवनास पुरे विटलेलेच होते. म्हणून तीं दोघें पतिपत्नी प्रयागला गेलीं व त्यांनीं आपले देह गंगेस अर्पण केले. हीं चार भावंडें भोंवतालच्या सहानुभूतिशून्य समाजांत पोरकीं झालीं. ही घटना घडली तेव्हां मुक्ताबाई फक्त सहा वर्षांची होती. निवृत्ति व ज्ञानदेव गांवांत भिक्षेसाठीं जात व सोपान मुक्ताबाईस घरीं सोबत करी. ज्ञानदेवांनीं पुन्हां एकदां आळंदीच्या ब्राह्मणांस उपनयनाची परवानगी देण्याची विनंती केली, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. त्या काळचें धर्माचें एक प्रमुख पीठ या दृष्टीनें या मुलांनीं पैठण येथील विद्वान् ब्राह्मणांची उपनयनासाठीं परवानगी आणावी, असा त्यांना सल्ला मिळाला. त्यानुसार तीं चारी भावंडें पैठणास गेलीं. ब्रह्मवृंदाची सभा भरली. खूप चर्चा झाली. पण निर्णय मात्र नकारार्थीच झाला. निवृत्ति-ज्ञानदेवादि भावंडांस ब्राह्मणत्व मिळण्याची थोडीफार आशा वाटत होती तीहि धुळीस मिळाली.

सद्गुणी आणि ईश्वरभक्त आईवडिलांच्या पोटीं जन्म झाल्यामुळें ज्ञानी व विरक्त वृत्तीच्या वडिलांकडून या भावंडांना मिळालेलें शिक्षण सामान्य मुलांच्या शिक्षणाहून कितीतरी उच्च प्रतीचें होतें. समाजाच्या निर्दय वागणुकीनें पोळलेल्या या भावंडांनीं, विशेषतः ज्ञानदेवानें आव्हानाची भूमिका स्वीकारली. एकदां विनोदानें ब्राह्मणांनीं त्यांना म्हटलें, "तुम्हांला शुद्धीची काय गरज आहे? ब्राह्मण या नांवांतच तुमचें मोठेंपण सांठविलेलें आहे!" यावर ज्ञानेश्वर उत्तरले, 'अगदीं बरोबर. सर्वांचा आत्मा एकच असल्यामुळें मानव, पशु आणि शूद्रेंसुद्धांहि सारखींच श्रेष्ठ समजण्यास कांहींच हरकत नाहीं." यानंतर पराभूत ब्राह्मणांनीं ज्ञानदेवांना चमत्कार करून दाखविण्यास सांगितलें

व खरोखरच हीहि शक्ति त्यांच्यांत आहे असें आढळतांच जे ब्राह्मण त्यांचा द्वेष व छीथू करीत होते त्यांचीं मस्तकें ज्ञानदेवापुढें आदरानें नम्र झालीं. ज्ञानेश्वरांच्या दैवी सामर्थ्याबद्दल अनेक कथा पुढें रूढ झाल्या. पैठणच्या ब्राह्मणांनीं आळंदीकरांना पत्र देऊन असें कळविलें कीं, " निवृत्ति-ज्ञानदेवादि भावंडें अलौकिक आहेत. त्यांना शुद्धीची मुळींच गरज नाहीं." यानंतरचें या सर्वांचें आळंदींतील वास्तव्य बरेंच सुखाचें झालें.

वेद व इतर तत्त्वज्ञानशास्त्रांचा अभ्यास पुरा करून ज्ञानेश्वरांनीं एक नामवंत आचार्य म्हणून ख्याति मिळविली. नंतर त्यांनीं भगवद्गीतेवरील आपली सुप्रसिद्ध टीका ' ज्ञानेश्वरी ' हा ग्रंथ लिहिला. पुराणांवर ते सुरस प्रवचनें करीत व यात्रेच्या वेळीं नियमितपणें पंढरपूरला जाऊन नामदेव व इतर संतमंडळींत कालक्रमणा करीत.

प्रथमपासून शेवटपर्यंत मुक्ताबाईनें आपल्या भावंडांबरोबरच सर्व तऱ्हेचीं दुःखें भोगलीं. इतरांप्रमाणें तीहि एक सुविख्यात तत्त्वज्ञ व विदुषी म्हणून समाजांत आतां मान्यता पावली होती. मुमुक्षूंना स्वतंत्रपणें ती मोक्षमार्गाची दीक्षा देत होती. आध्यात्मिक गुरु म्हणून तिच्यासंबंधीं अनेक कथा प्रचलित आहेत.

एक कथा अशी सांगतात कीं, एकदां मुक्ताबाई ज्ञानेश्वरादि भावंडांबरोबर पंढरपुरास गेली होती. सर्वजण विठ्ठलमंदिरांत गेलीं असतां त्यांनीं नामदेवास नेहमींप्रमाणें विठ्ठलाजवळ बसलेला पाहिला. ज्ञानेश्वरांनीं विठ्ठलापाठोपाठ नामदेवासहि अभिवादन केलें. पण मुक्ताबाईनें मात्र नामदेवापुढें मस्तक नम्र केलें नाहीं. कारण तिनें आपल्या अंतर्ज्ञानानें त्याचा अहंभाव जाणला होता. "नुसतें देवाच्या सान्निध्यांत राहून कोणालाहि देवत्व प्राप्त होत नाहीं" असा आपला स्पष्ट अभिप्राय तिनें व्यक्त केला. "नामदेवानें अजून औपचारिकरीत्या कोणालाहि गुरु केलें नाहीं म्हणून त्याच्यांत जरूर तेवढें पूर्णत्व आलेलें नाहीं" असें तिचें मत होतें. थोडी चर्चा झाल्यानंतर असें ठरलें कीं, नामदेवानें आळंदीस गोराकुंभाराकडे जाऊन स्वतःच्या पूर्णत्वाबद्दलचें शिफारसपत्र मिळवावें. सर्वजण आळंदीस आले. कीर्तनाचा फड उभा राहिला. आपल्या हातांतील थापटण्यानें गोरानें प्रत्येकाच्या पक्केपणाची

चांचणी केली. ते नामदेवाजवळ जातांच नामदेव रागावले. ताबडतोब गोरानें निर्णय दिला, " नामदेवाचें मडकें कच्चें आहे, त्याला गुरूचीच आवश्यकता आहे. " यानंतर ज्ञानदेवांचा एका काळचा प्रतिस्पर्धी पण नंतर त्यांचा शिष्य बनलेल्या विसोबा खेचराकडे नामदेवास पाठविण्यांत आलें. स्वतःच्या वैशिष्टयपूर्ण पद्धतीनें विसोबानें नामदेवास पटवून दिलें कीं, देव सर्व विश्वांत भरून राहिलेला आहे. पंढरपूरच्या विठ्ठलाचा सतत सहवास घडतो म्हणून नामदेवानें फुशारकी मानण्याचें कारण नाहीं. जरूर ती आध्यात्मिक पूर्णता प्राप्त झाल्यावरच मुक्ताबाईनें नामदेवास वंदन केलें.

तापी नदीच्या तीरावर वास करणाऱ्या चांगदेव वटेश्वरासहि तिनें मार्गदर्शन केल्याबद्दलची एक कथा उपलब्ध आहे. चांगदेवाचा शिष्यवर्ग खूप मोठा होता. परंतु त्याला स्वतःला गुरु नव्हता. ज्ञानदेवांची कीर्ति ऐकून त्यांना गुरु करावें अशी चांगदेवास इच्छा झाली. त्यांनीं ज्ञानेश्वरांना तशी विनंती केली तेव्हां त्यांनीं ही कामगिरी मुक्ताबाईवर सोंपविली. चांगदेवाच्या पुष्कळशा अभंगांत मुक्ताबाईचा गुरु म्हणून उल्लेख केलेला आढळतो.

मुक्ताबाई ही एक प्रतिभासंपन्न कवयित्री होती. आपणापर्यंत तिची फारच थोडी रचना येऊन पोंचली असल्यामुळें तिनें एकूण किती रचना केली तें नक्की समजण्यास मार्ग नाहीं. तिचे 'ताटीचे अभंग' अतिशय प्रसिद्ध आहेत. असें सांगतात कीं, एकदां ज्ञानेश्वर समाजाच्या अन्याय्य वर्तनामुळें अतिशय त्रस्त झाले व दार लावून घरांत रुसून बसले. मुक्ताबाईनें त्यांची समजूत घालण्यासाठीं ज्या अभंगांची रचना केली तेच पुढें 'ताटीचे अभंग' म्हणून प्रसिद्ध झाले. " जगाच्या असमंजस वर्तनानें चिडून जाणें अगर रागावणें खऱ्या संतांस शोभत नाहीं " असा या अभंगाचा आशय आहे. ती ज्ञानेश्वरास सांगते,

" योगी पावन मनाचा । साहे अपराध जनाचा ॥ १ ॥
विश्व रागें झालें वन्हीं । संतीं सुखें व्हावें पाणी ॥ २ ॥
शब्दशास्त्रें झाले क्लेश । संतीं मानावा उपदेश ॥ ३ ॥
विश्व-पट ब्रह्म-दोरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥ ४ ॥ "

ज्ञानदेवांच्या असामान्यतेविषयीं आणखीहि अनेक कथा उपलब्ध

आहेत. या वर्णांतून मुक्ताबाईच्या असामान्यत्वाचीहि साक्ष पटते. परंतु यांतील खरेंखोटें निवडून काढणें कठीण आहे. अतिशयोक्ति सोडून दिली तरी एवढें निश्चित सांगतां येईल कीं, बंधूंच्या मोठेपणांत भर घालण्याइतकी बौद्धिक कुवत व आध्यात्मिक पूर्णत्व मुक्ताबाईजवळ होतें.

गुलाबाच्या फुलाप्रमाणें मुक्ताबाईचें जीवन अल्पकालीन ठरलें. वयाच्या केवळ अठराव्या वर्षी अंगावर वीज पडून हिचा अंत झाला.

**जनाबाई :–** पंढरपुरांत विठ्ठलमंदिराच्या पायरीवर रडत बसलेली एक लहानशी अनाथ मुलगी दामाशेट्टीनें पाहिली. दामाशेट्टी जवळच्या एका खेड्यांत शिंप्याचा धंदा करीत असे. मुलीच्या पाठीवरून प्रेमानें हात फिरवीत दामानें तिची विचारपूस केली. " दिवस मावळून अंधार पडूं लागला. तुझे आईवडील कोठें आहेत ? " त्यानें तिला विचारलें. " मला आई-वडील नाहींत " असें तिनें रडतच दिलेलें उत्तर ऐकून दामाशेट्टीला तिची दया आली. " मग आम्हीच तुझे आईवडील होऊं " असा धीर देऊन दामाशेट्टीनीं तिला घरीं नेऊन बायकोच्या स्वाधीन केलें.

ही घटना सुमारें ६०० वर्षांपूर्वी घडली. कार्तिकीच्या उत्सवासाठीं म्हणून दामाशेट्टी पंढरपूरला गेला असतां जी पोरकी मुलगी त्याला भेटली, ती पुढें महाराष्ट्रांत एक श्रेष्ठ संत कवयित्री म्हणून प्रसिद्धीस आली.

जनाबाईच्या खाजगी जीवनाबद्दल फारच थोडी माहिती उपलब्ध असली तरी अनेक कथा मात्र प्रचलित आहेत. तिची अभंगरचना इतकी मधुर आहे कीं ती सर्वांच्या तोंडीं आजहि घोळते. कीर्तन-प्रवचनांत हिचे अभंग नेहमीं म्हटले जातात आणि तिच्या व्यक्तिगत जीवनांतील अनेक गोष्टी अति-शयोक्तिपूर्ण रीतीनें सांगितल्या जातात.

महिपतीनें आपल्या ' भक्तिविजयांत ' जनाबाईचें त्रोटक चरित्र कथन केलें आहे. त्याच्यामतें जनीच्या वडिलांचें नांव दामा व आईचें नांव करुंड. हें कुटुंब अस्पृश्य जातीचें होतें. गंगाखेड नांवाच्या गांवाहून तीं सर्व-जण पंढरपुरास विठोबाच्या दर्शनासाठीं गेलीं होतीं. छोट्या जनीस विठोबा इतका आवडला कीं ती तेथून परत जाण्यास तयारच होईना. नामदेवाचा

पिता दामाशेट्टी हा परभणी जिल्ह्यांत नरसीब्राह्मणी या गांवीं रहात असे. वारकरी संप्रदायानुसार कार्तिकी एकादशीची वारी करण्यासाठीं तो पंढरपुरास गेला होता. तेथें जनी दामाशेट्टीस भेटली. कालांतरानें दामाशेट्टीच्या घरांत जनीचा ' कामकरी मुलगी ' म्हणून प्रवेश झाला. भक्त नामदेवाच्या संगतींत जनी वाढत होती.

यथाकाल नामदेवाचा विवाह झाला व त्याला दोन मुलेंहि झालीं. वडील वारल्यानंतर नामदेवानें त्यांचा शिंपीव्यवसाय पुढें चालू ठेवला. पण त्याची खरी तंद्री अभंगरचनेंत सारखी लागलेली असे. तो मंदिरासमोर नेमानें कीर्तन करी. त्या वेळीं तो अनेक अभंग स्वतः रचून म्हणे. नामदेवानें संकल्प केलेल्या अभंगरचनेची संख्या फार मोठी असल्यानें त्यानें आपल्या कुटुंबांतील सर्व मंडळींना अभंग रचण्यास सांगितलें. नामदेवगाथेंत त्याची आई, पत्नी, जनाबाई आदि सर्वांच्या रचनेचा समावेश झालेला आढळतो. या सर्वांत जनीची रचना अतिशय सरस असे. विठोबाच्या अखंड सान्निध्याची कल्पना तिच्या सर्व अभंगांत प्रामुख्यानें दिसून येते.

जनाबाई कोणतेंहि काम करीत असली तरी विठोबा तिच्या आसपास वावरत असतो व तिला कामांत मदतहि करतो अशी तिची श्रद्धा होती. पहाटेच्या वेळीं जनाबाई दळूं लागली कीं देव स्वतः तिला दळूं लागे असें सांगतात. जनीच्या झोंपडींत कोणीतरी बोलत आहे अशी नामदेवाच्या आईला शंका येतांच तिनें जनीला त्याबद्दल जाब विचारला. नामदेवाच्या आईनें जनीच्या झोंपडींत डोकावून पाहिलें तों तेथें एक बाई जनीबरोबर दळीत असल्याचें तिला दिसलें. जनीनें तिचें नांव ' विठाबाई ' असें सांगितलें. जनीला मदत करणारा ' विठोबा ' च असला पाहिजे अशी खात्री होतांच तिच्याबद्दल व्यर्थ संशय घेतल्याचा नामदेवाच्या आईस पश्चात्ताप झाला.

दुसऱ्या एका दंतकथेनुसार नाम्देवाबरोबर विठ्ठल नेहमीं जेवत असे. एकदां जनी रानांत गोंवऱ्या लावण्यासाठीं गेली होती, त्यामुळें जेवणांत देवाला रुचि वाटेना. लगेच जनीला बोलावणें पाठविण्यांत आलें. ती आल्यावर सर्वांनीं मोठ्या आनंदानें भोजन केलें.

या कथांत कांहीं तथ्य असो वा नसो, एवढें खरें कीं आपल्या दया-

तींतच जनाबाईची ' एक महान् भक्त ' म्हणून सर्वकडे कीर्ति पसरली आणि आजवागायत ती कायम आहे. तिनें स्वतः किती अभंग रचले हेंहि आज निश्चित ठरविणें कठीण झालें आहे. कालांतरानें कांहीं अभंगांत शाब्दिक बदल केले गेले असतील, तर कांहीं इतरांनीं करून तिच्या नांवें दडपलेले असतील. कांहीं असलें तरी जनाबाईची अभंगरचना इतकी मधुर आहे कीं, आजहि वारकऱ्यांच्या रोजच्या भजनांत तिच्या अनेक अभंगांचा समावेश करण्यांत आलेला आहे.

कान्होपात्राः—पंढरपुराजवळच असलेल्या मंगळवेढें गांवांत श्यामा नांवाची एक नर्तिका रहात होती. तिला कान्होपात्रा नांवाची एक मुलगी होती. लवकरच कान्होपात्रेच्या असामान्य सौंदर्याची ख्याति आसमंतात् पसरली. आईनें तिला नृत्य आणि संगीतांत तरबेज केलें. तिच्या या कलांवर आपण अमाप पैसा मिळवूं अशी तिला आशा वाटूं लागली. पण कलेच्या जिवावर अनेकांशीं संबंध जोडून जीवनाचा बाजार मांडण्याची कल्पना कान्होपात्रेस रुचेना. " माझ्यासारखा रूपसंपन्न एकच तरुण आयुष्याचा सोबती म्हणून मी निवडीन " असा आपला मानस तिनें आईला सांगितला. अनेकजण येऊन गेले पण कान्होपात्रेच्या पसंतीस कोणीच उतरेना.

एके दिवशीं श्यामाच्या घरावरून कांहीं वारकरी मंडळी जात असतांना कान्होपात्रेनें पाहिली. त्यांचें भजन ऐकून तिनें त्यांना विचारलें, " तुम्ही कोणाचें गुणगान करीत आहांत ? " "विठ्ठलाचें" वारकरी उत्तरले. " पंढरपुरचा हा विठोबा अतिशय सज्जन, उदार आणि प्रेमळ आहे ! " मोठ्या आतुरतेनें कान्होपात्रेनें पुन्हां त्यांना विचारलें, " मी त्याला भेटायला आलें तर माझा स्वीकार तो करील का ?" " जरूर " वारकऱ्यांनीं ग्वाही दिली. लगेच कान्होपात्रा त्यांच्याबरोबर निघाली. मंदिरांतील विठोबाची मूर्ति पाहतांच तिचें देहभान हरपलें. देवाच्या सेवेंत उर्वरित आयुष्य व्यतीत करण्याचा तिनें निश्चय केला. रोज आपल्या गीतनृत्यानें ती विठोबाची सेवा करूं लागली.

हळूहळू बेदरच्या बादशहाच्या कानांवर तिच्या सौंदर्याची कीर्ति गेली. आपल्या जनान्यांत अशी कलावंत सुंदरी असावी या इच्छेनें त्यानें तिला आणण्यासाठीं कांहीं सैनिक पाठविले. जरूर पडल्यास दंडाचाहि उपयोग

करावा अशी त्यानें सैनिकांना सूचना देऊन ठेवली. नेहमीप्रमाणें देवापुढें गात बसलेली असतांना कान्होपात्रेस बेदराच्या सैनिकांनीं घेरलें. प्रतिकाराचा उपयोग नाहीं हें जाणून भोंवतालची सर्व मंडळी स्तब्ध होती. "मी तुमच्याबरोबर येतें, पण निघण्यापूर्वी एकदां देवदर्शन घेण्याची मला परवानगी द्या" असें कान्होपात्रा सैनिकांस म्हणाली. तिची ही विनंती मान्य करून सैनिक मंदिराबाहेर जाऊन थांबले आणि कान्होपात्रा मंदिराच्या गाभाऱ्यांत शिरली. विठोबावर अश्रूंचा अभिषेक करीत ती त्याला म्हणाली, "देवा, तुझ्या एकनिष्ठ भक्ताला एका जुलमी राजाच्या लहरीसाठीं बंदिखान्यांत पडावं लागणं हें तुला रुचतं कां ? तुझ्या मोठेपणाला हें आव्हान आहे. तें तूं स्वीकारणार ना ?" असें म्हणून कान्होपात्रेनें विठ्ठलचरणीं प्राणार्पण केलें. बाहेर तिची वाट पहात थांबलेले सैनिक शेवटीं कंटाळले व जबरीनें गाभाऱ्यांत शिरले. पाहतात तों कान्होपात्रा मरून पडलेली. सर्वजण मुकाट्यानें तेथून परतले व त्यांनीं ही हकीकत राजाच्या कानांवर घातली. राजा अतिशय संतापला. उपाध्याय मंडळींच्या आर्जवावरून त्यानें स्वतः मंदिरांत येण्याचें ठरविलें. विठ्ठलाला पहातांच त्याची वृत्ति पालटली आणि तोहि त्याचा भक्त बनला.

कान्होपात्रा पंधराव्या शतकांत होऊन गेली. तिनें किती अभंगरचना केली हें निश्चित सांगतां येत नाहीं. पिढ्यान् पिढ्या गाइले गेलेले तिचे कांहीं अभंगच फक्त आज उपलब्ध आहेत. यांपैकीं एका अभंगांत ती सांगते,

" विठ्ठला, शेवटचा उपाय म्हणून मी तुझ्याकडे आलें. कारण मी अतिशय पापी आणि दीन आहे. मला जात-कुळी नाहीं. मला कसं वागावं हेंहि समजत नाहीं. तुझ्या कृपेस मी पात्र नाहीं याची मला पूर्ण जाणीव आहे. पण या तुझ्या दासीला तूं आपल्या पायापाशींहि स्थान देणार नाहींस का ?"

दीन पतित अन्यायी । शरण आलें विठाबाई ॥ १ ॥
मी तों आहे यातीहीन । नकळे कांहीं आचरण ॥ २ ॥
मज अधिकार नाहीं । भेट देई विठाबाई ॥ ३ ॥
ठाव देई चरणापाशीं । तुझी कान्होपात्रा दासी ॥ ४ ॥

बहिणाबाई :– इ. स. १६२८ ते १७०० या काळांत होऊन गेलेल्या बहिणाबाई या संत कवयित्रीनें आपला स्वतःचा वृत्तान्त उपलब्ध करून

संपतां संपतां तुकाराममहाराज माझ्यासमोर आले आणि त्यांनीं आपला वरदहस्त माझ्या डोक्यावर ठेवून मला काव्यरचना करण्याचा आदेश दिला. हें सत्य कीं स्वप्न कोण जाणें; पण त्या भेटीनें माझें मन अतिशय उल्हसित झालें. मी उठलें आणि नदीवर जाऊन स्नान केलें. स्नान आटोपून बाहेर येतांच काव्यरचना माझ्या मुखांतून आपोआप स्रवूं लागली. ”

बहिणाबाईस एक मुलगा व एक मुलगी अशीं दोन अपत्यें होतीं. तुकाराम ह्यात असेपर्यंत ती देहूंतच राहिली. यानंतरच्या तिच्या जीवनाबद्दल तिनें कांहीं उल्लेख केलेला आढळत नाहीं. आपल्या मुलाला दिलेल्या शेवटच्या काव्यमय संदेशांत तिनें आपल्या पूर्वजन्मांचा उल्लेख केला आहे. तिच्या मरणकालाचीहि तिला पूर्ण कल्पना असावी असें दिसतें.

वेणाबाई :– रामदासांची शिष्या वेणाबाई ही बहिणाबाईची समकालीन असून तिचें पूर्वायुष्य कोल्हापुरांतच गेलें. दोघींच्या जीवनांत आमूलाग्र बदल याच ठिकाणीं घडून आला. इ. स. १६२७ ते १६७८ हा वेणाबाईचा काल, इ. स. १६३० ते १६८० या शिवाजीच्या कालाशीं जवळजवळ तंतोतंत जुळतो.

बालपणींच वैधव्य प्राप्त झालेली वेणाबाई ही देशपांड्यांची मुलगी. तिच्या आईवडिलांच्या घराण्यांत रामाची भक्ति परंपरेनें चालत आलेली होती. बालपणींच ‘ अध्यात्मरामायण ’ ती तोंडपाठ म्हणे. रामदास व त्यांचा महाराष्ट्रांत नुकताच उदयास येत असलेला संप्रदाय याबद्दलहि या घराण्यांत अतिशय आदर होता. अशा रीतीनें घराण्यातून चालत आलेली रामभक्ति वेणाबाईच्या रक्तांतच होती. वैधव्यामुळें तिची विरक्ति वाढीस लागण्यास मदतच झाली.

सुमारें वीस वर्षांची असतांना वेणाबाई आपल्या सासूजवळ राहत असे. एकदां ती भागवत वाचीत बसलेली असतांना रामदास नेहमींच्या भिक्षेसाठीं दाराशीं येऊन उभे राहिले. एवढी लहान मुलगी भागवत वाचीत बसलेली पाहून त्यांना आश्चर्य वाटलें. त्यांनीं वेणाबाईस विचारलें, “ तूं वाचीत आहेस त्यांतलें तुला कांहीं समजतें आहे का ? ” “ समजत नाहीं पण समजावून घेण्याचा मी प्रयत्न करीत आहें ” असें उत्तर देऊन वेणा-

वाईनें जीव आणि शिव यांच्यासंबंधीं कांहीं प्रश्न रामदासांना विचारले. उत्तरार्थी एक श्लोक रचून तो रामदासांनीं वेणाबाईस दिला, तो पाठ करण्यास सांगितलें आणि ते निघून गेले. नंतर वेणाबाई जेव्हां कोल्हापुरास आईवडिलांकडे आली तेव्हां रामदास कोल्हापुरांत कीर्तनें करीत होते. तीं ऐकून रामदासांबद्दल तिला अतिशय आदर वाटूं लागला. लोक मात्र वेणाबाईबद्दल नाहीं नाहीं त्या कुशंका घेऊं लागले. आईवडिलांनीं तिला खूप सांगून पाहिलें व शेवटीं घराण्याच्या अब्रूसाठीं तिजवर विषप्रयोगहि करण्यांत आला. रामदासांनीं प्रगट होऊन एक काठी अलगद तिच्या शरीरावरून फिरविली. तेव्हां ती वांचली पण तिची कातडी मात्र काळीठिक्कर पडली.

या घटनेनंतर वेणाबाईनें घर सोडलें. रामदासांचें शिष्यत्व पत्करून सुमारें सहा वर्षे तिनें कीर्तन-पुराणांच्या श्रवणानें आपलें अध्ययन चालू ठेवलें. तिच्यामध्यें सुप्त असलेली प्रतिभा जागृत होऊन ती आतां काव्यरचना करूं लागली. तिची आध्यात्मिक प्रगति पाहून रामदासांनीं तिला आपल्या पंथांत दाखल होण्याची परवानगी दिली. ती कीर्तनहि करूं लागली. नंतर रामदासांनीं मिरजेस मठस्थापना करून तिला रामदासी पंथाचा प्रचार करण्यासाठीं पाठवून दिलें.

एकदां काशीचा सुप्रसिद्ध ब्राह्मण गागाभट्ट हा रामदासांशीं तत्त्वविषयक चर्चा करण्यासाठीं पंढरपुरास आला. रामदासांनीं वेणाबाईस बोलावून घेतलें व दासबोधाच्या साहाय्यानें एक विश्वतत्त्वाची कल्पना गागाभट्टास स्पष्ट करून सांगण्यास तिला आज्ञा दिली. वेणाबाईच्या विद्वत्ताप्रचुर विवेचनानें गागाभट्ट खूप झाला व त्याला रामदासांची योग्यताहि पटली.

शिवाजीच्या राज्याभिषेकानंतर सर्व समर्थपंथीयांचा एक मेळावा सिंहगडावर भरला होता. त्या प्रसंगीं स्वत: शिवाजी व रामदासहि हजर होते. प्रत्येकाचें एकेक कीर्तन झालें. वेणाबाईचें सर्व काव्य रामस्तुतिपर आहे. त्यापैकीं ' सीता-स्वयंवर ' हें काव्य सर्वांत अधिक लोकप्रिय झालेलें आहे. त्याच्या खालोखाल ' कौल ' या काव्याचा क्रम लागतो.

मिरजेच्या मठाची धुरा वेणाबाईनें सतत वीस वर्षें वाहिली. विषप्रयोगानंतर तिची प्रकृति फारशी चांगली कधींच झाली नाहीं. सालाबादप्रमाणें ती सज्जनगडास गेली असतांना रामदासांनीं तिला विशेष उत्तम येत

टेवला आहे, हें या महाराष्ट्रीय कवयित्रीचें वैशिष्ट्य आहे. कोरीव लेण्यांसाठीं प्रसिद्ध असलेल्या वेरूळच्या पश्चिमेस देवगांव या ठिकाणीं इ. स. १६२८ मध्यें बहिणाबाईचा जन्म झाला. हिचा बाप औदेव कुलकर्णी हा कारकून होता. आईचें नांव जानकीबाई. बरींच वर्षे संतानप्राप्ति न झाल्यानें तीं दोघें संततीसाठीं अनेक व्रतवैकल्यें करीत. एके दिवशीं औदेवाच्या स्वप्नांत एक ब्राह्मण आला व त्यानें औदेवास एक कन्या व दोन पुत्रांची प्राप्ति होईल असें सांगितलें. यानंतर बहिणीचा जन्म झाला. बहिणी पांच वर्षांची होतांच आईवडिलांनीं रत्नाकर पाठक नांवाच्या तीस वर्षांच्या विद्वान् विधुर ब्राह्मणाशीं तिचा विवाह करून दिला. हा त्यांचा दूरचा नातेवाईकच होता.

थोड्याच दिवसांत कौटुंबिक विरोधामुळें व भांडणामुळें बहिणीच्या आईवडिलांना गांव सोडून जाणें भाग पडलें. औदेवाच्या विनंतीनुसार बहिणीचा पतीहि त्यांच्याबरोबर गेला. ऐन मध्यरात्रीं सर्व मंडळी घराबाहेर पडली. निवारा शोधतां शोधतां शेवटीं कोल्हापूरच्या बहिरंभट नांवाच्या विद्वान् ब्राह्मणानें त्या सर्वांना आपल्या ओसरीवर राहण्यास परवानगी दिली. या कुटुंबानें जेवढीं गांवें पाहिलीं त्यांपैकीं पंढरपूर बहिणीस विशेष आवडलें. विठ्ठलाच्या मूर्तीनें तिचें अंतःकरण वेधून घेतलें. तुकारामाचे अभंग ऐकतांच तर सर्व दुःखहि ती विसरली. याच सुमारास बहिरंभटास दान मिळालेली गाय व गोन्हा स्वप्नातील आदेशानुसार त्यानें औदेवास दिलीं. बहिणी गाईचें दूध काढी व दोघांना चारापाणी देई. वासराला तर बहिणीचा इतका लळा लागला कीं तें सारखें तिच्या मागेंच असे. याच वेळीं जयरामस्वामींचा मुक्काम कोल्हापुरास पडला. ते रोज कीर्तनें करीत. बहिणी आपल्या आईवडिलांबरोबर हीं कीर्तनें ऐकावयास जाई. त्याच्याबरोबर वासरूंहि जाई. कीर्तन ऐकावयास येणाऱ्या कांहीं मंडळींना वासरूं तेथें आलेलें न रुचून त्यांनीं त्याला एक दिवस बाहेर हाकललें. वासरूं मोठमोठ्यानें हंबरडे फोडूं लागलें. बहिणीहि रडूं लागली. हें पाहून जयरामस्वामींना कळवळा येऊन त्यांनीं वासराला आंत आणविलें. वासरूं व बहिणी दोघांनाहि त्यांनीं जवळ घेऊन त्यांच्या पाठीवरून हात फिरविला. ही सर्व हकीकत बहिणीच्या पतीच्या कानावर जातांच बायकोविषयीं साशंक होउन त्यानें तिला कडक शासन केलें. ही गोष्ट जयरामस्वामींना समजतांच त्यांनीं रत्नाकराला बोलावून सांगितलें, " बहिणी-

सारखी पत्नी महत् भाग्यानें तुला प्राप्त झाली आहे. ती ' योगभ्रष्ट ' देवता असून अत्यंत धार्मिक व कर्तव्यदक्ष आहे. तूं तिचा पतीच असल्यानें तुला मी अधिक काय सांगूं ? "

पतीच्या शिक्षेमुळें बहिणी तीन दिवस बेशुद्ध होती. चवथ्या दिवशीं शुद्धीवर आल्यानंतर तिनें आईवडील व पति जवळ बसलेलीं पाहिलीं. परंतु उठून बसण्याइतकीहि ताकद तिच्यांत नव्हती. तीन दिवसांच्या या बेशुद्धा-वस्थेंत विठ्ठलानें तिला दर्शन दिलें व तुकारामानेंहि येऊन तिला धीर दिला होता. यथाकाल ती बरी होऊन हिंडूं-फिरूं लागली. पण तिच्या वृत्तींत मात्र आमूलाग्र बदल घडून आला. ती विरक्त मनानें राहून एकसारखें भजन-पूजन करी.

हळूहळू तिची कीर्ति आसमंतात् पसरून अनेक लोक तिच्या दर्शना-साठीं येऊं लागले. तिच्या लोकप्रियतेचाहि पतीला मत्सर वाटूं लागला व त्यानें घर सोडून दूर अरण्यांत जाण्याचा निश्चय केला. हें समजतांच बहिणाबाईस अतिशय दुःख झालें. पति खरोखरच निघून गेल्यास स्वतःचा शेवट करून घेण्याचा विचार तिनें पक्का केला. रत्नाकरानें प्रयाणाचा दिवस मुक्रर केला. परंतु आदल्याच दिवशीं त्याची प्रकृति एकाएकीं खूप बिघडली. बहिणीनें मनोभावें शांत चित्तानें त्याची सेवा केली. संत-सज्जनांची निंदा केल्यामुळें तर आपल्याला हा देहदंड झाला नसेल ना, अशा भावनेनें रत्ना-कराला पश्चात्ताप झाला. पुढें त्याची प्रकृति सुधारली. नंतर हें सर्व कुटुंब देहूस राहावयास गेलें. बहिणी व तिचा पति दोघेहि नित्यनेमानें तुकारामाच्या कीर्तनास हजर रहात. देहूस आल्यानंतरहि या दोघांचा बराच छळ झाला. ब्राह्मण असून तुकारामाचें शिष्यत्व पत्करल्यामुळें गांवांतील ब्राह्मण मंडळींचें वैर त्यांना पत्करावें लागलें. परंतु या वेळीं पतीनेंच बहिणाबाईस पाठिंबा दिल्यामुळें तिजबद्दलचा इतरांचा आदर दुणावला. पद्धतशीर मार्गदर्शन मिळा-लेलें नसलें तरी तिला योगसाधनेची फार आवड होती. एकदां पति पुण्यास गेला असतांना आईच्या परवानगीनें ती एका ओंवरींत जाऊन बसली. तेथें सतत तीन दिवस तिनें ईश्वरचिंतन केलें. या तिच्या अनुभूतीबद्दल ती स्वतः सांगते, " तीन दिवस मी समाधिसुखाचा अनुभव घेतला. हा कालावधि

असणारे पदार्थ भोजनासाठी तयार करावयास सांगितलें. भोजनानंतर कीर्तन झालें. कीर्तनाच्या अखेरीस तिनें रामदासांच्या चरणीं मस्तक नम्र केलें आणि तेथेंच तिचा आत्मा अनंतांत विलीन झाला.

अक्काबाई:— ज्या ज्या वेळीं रामदासांच्या शिष्यिणींचा उल्लेख केला जातो त्या त्या वेळीं वेणाबाईबरोबर अक्काबाईचेंहि नांव हटकून घेतलें जातें. तिच्या वडिलांचें नांव रुद्राजीपंत देशपांडे. हे कऱ्हाडचे राहणारे. तिचें खरें नांव चिमणाबाई. असें असलें तरी सर्वांत मोठी मुलगी या दृष्टीनें तिचें अक्का हेंच नांव सर्वतोमुखीं झालें. ही बालविधवा होती. वेणाबाईप्रमाणेंच तिच्यांत विरक्त-वृत्ति अंगभूतच होती. रामदासांनीं आपल्या प्रचारकार्याच्या सुरुवातीस सातारा, कोल्हापूर व कऱ्हाड या भागांत दौरा काढला असतांना कऱ्हाडास अक्काबाईनें रामदासांचीं प्रवचनें ऐकलीं. रामदासांच्या रामभक्ति-प्रसाराची कल्पना तिला अतिशय आवडली व आजन्म याच कार्याला वाहून घेण्याचा तिनें निश्चय केला. पंथांत प्रवेश देण्यापूर्वी तिची चांचणी करण्या-साठीं, रामदासांनीं तिला एक मंत्र सांगून तो म्हणून तीन दिवस मानेपर्यंत खोल नदीच्या पाण्यांत उभें राहण्यास सांगितलें. या परीक्षेंत ती उतरली. नंतर आपल्या शिष्यसमुदायांत तिचा समावेश करून रामदासांनीं तिला चाफळास ठेवलें व स्वयंपाकघराची देखरेख तिजकडे सोंपविली. मठवासीयां-साठीं ती नियमितपणें भिक्षा मागे. थोड्याच काळांत चाफळ व परळी या दोन्हीं ठिकाणच्या मठांची ती प्रमुख झाली. रामदासांच्या वैयक्तिक गरजांकडे जी निवडक मंडळी लक्ष पुरवीत त्यांपैकीं अक्काबाई ही एक होती. रामदासांच्या मरणसमयींहि ती त्यांच्याजवळ होती. नंतरहि बरीच वर्षे अक्काबाई जगली.

रामदासांच्या मृत्यूनंतर महाराष्ट्रात कठीण दिवस आले. मराठे व औरंगजेब यांचे वारंवार खटके उडूं लागले, संभाजीचा अमानुष वध झाला. संरक्षणासाठीं राजारामास जिंजीस पळून जावें लागलें. चाफळ व परळीच्या मठांवरहि मुसल्मानांची वक्रदृष्टि वळली. सुरक्षिततेसाठीं मठांतील रामाच्या मूर्ति हलवून लपवून ठेवाव्या लागल्या. अशा अवघड काळांत तीन मठांची चोख व्यवस्था अक्काबाईनें तीस वर्षें पाहिली. यावरून तिची योग्यता केवढी होती याची कल्पना येईल.

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर शाहू पुन्हां दक्षिणेकडे आला व त्यानें राज्याची संघटना करण्यास सुरुवात केली. चाफळला स्वतः जाऊन त्यानें अक्काबाईची भेट घेतली व रामदासांनीं शिवाजीला (आपल्या आजोबांना) ज्याप्रमाणें मदत केली त्याचप्रमाणें तिनें आपल्याला करावी अशी विनंती केली. शाहूचा योग्य आदरसत्कार करून सर्व प्रकारच्या मदतीचें आश्वासन तिनें त्यास दिलें. म्हातारपणामुळें मठांची व्यवस्था पाहण्याची तिला फार दगदग होई. म्हणून शाहूनें मठांची व्यवस्था करावी अशीहि तिनें त्यास विनंती केली. त्याप्रमाणें शाहूनें रामदासांचा पुतण्या गंगाधरपंत यांची मठव्यवस्थेसाठीं नेमणूक करून ती पिढ्यान् पिढ्या त्याच घराण्याकडे रहावी असेंहि ठरवून दिलें. यानंतर दहा वर्षें अक्काबाई परळीसच राहिली. इ. स. १७२१ मध्यें तिचा अंत झाला.

## राजकारणी व प्रशासक महिला

जिजाबाईः-(इ. स. १५९४ ते १६७४) देवगिरीच्या यादव राजांच्या वंशांतील लखूजी जाधव यांची जिजाबाई ही कन्या. अहमदनगरच्या निजामशहाच्या दरबारांतील एक शूर सरदार म्हणून लखूजींची ख्याति होती. मालोजी नांवाच्या दुसऱ्या एका सरदारास निजामशहानें पुणें व सुपें प्रांत आणि शिवनेरी व चाकण हे किल्ले जहागीर म्हणून दिले होते. याचा मुलगा शहाजी याच्याशीं जिजाबाईचा इ. स. १६०५ मध्यें विवाह झाला. विवाहानंतर या उभयतांचीं कांहीं वर्षें सुखाचीं गेलीं. पण नंतर शहाजी व जाधवराव यांचें कांहीं कारणानें वैमनस्य आलें. जाधव दिल्लीच्या औरंगजेबास मिळाले. शहाजी मात्र निजामशहाशीं एकनिष्ठ राहिला. शहानें शहाजीस आपला प्रमुख सल्लागार व सेनापति नेमलें. 'पति कीं पिता' असा यक्षप्रश्न जिजाबाईपुढें उभा राहिला. कर्तव्यबुद्धीनें भावनेवर मात करून जिजाबाईनें माहेराचे पाश कायमचे तोडून टाकले. या कौटुंबिक विरोधांत जिजाबाईच्या धैर्याचा, निश्चयाचा व बाणेदारपणाचा चांगलाच कस लागला. हेच गुण पुढें शिवाजींतहि पुरेपूर उतरले.

शहाजी व जाधवराव यांच्यांत एकदां युद्ध झालें. पराभूत झालेल्या

शहाजीला पळण्यावांचून गत्यंतर उरलें नाहीं. या वेळीं जिजाबाईहि त्याच्या-बरोबर होती. तिचे प्रसूतीचे दिवस भरत आले होते. सासरा आपला शत्रु असला तरी जिजाबाईचा तो पिता असल्यानें तिला कोणताहि धोका पोंचणार नाहीं अशी खात्री वाटल्यामुळें शहाजीनें जिजाबाईला तेथेंच ठेवून तो निघून गेला. जाधवरावानें जिजाबाईस घरीं बोलाविलें. पण तिनें त्यास नकार देऊन शिवनेरीस मुक्काम केला. महाराष्ट्रावर एका बाजूनें मोंगल व दुसऱ्या बाजूनें दक्षिणेकडील मुसलमान राजे यांच्या एकसारख्या स्वाऱ्या होऊन मराठ्यांची जी दैना होत होती ती पाहून जिजाबाईचें मन अतिशय विव्हल होई. तिनें देवी शिवाईला विनविलें, " मला असा पुत्र होऊं दे कीं तो हीं परचक्रें निवारून मराठ्यांचें स्वतंत्र राज्य महाराष्ट्रांत स्थापन करील. " देवीनें तिच्या हांकेस ओ दिली. तिला जो मुलगा झाला त्याचें नांव तिनें शिवाजी असें ठेवलें.

आजपर्यंत इतिहासानें अनेकदां असें सिद्ध केलें आहे कीं, थोर पुरुषांच्या माता त्यांच्याहूनहि अधिक थोर असतात. शिवाजीनें स्वराज्य-स्थापनेची प्रेरणा आपल्या मातेकडूनच घेतली. मराठ्यांच्या स्वतंत्र राज्याचें चित्र त्याच्यापुढें तिनें उभें केलें व या महत् कार्यासाठीं जरूर असलेली चिकाटी, सहनशीलता, न्यायनिष्ठुरता वगैरे गुणांची जोपासनाहि तिनें केली. शिवाजींत सैतानाचा जुल्मीपणा न येतां तो प्रजाहितदक्ष व गरिबांचा कनवाळू राजा व्हावा यासाठीं तिनें आपल्या सर्व शक्ति वेंचल्या.

या सुमारास शहाजी विजापूरच्या अलीअदिलशहाचा मुख्य प्रधान म्हणून काम पहात होता. मुसलमानांचें वर्चस्व झुगारून देण्याच्या शिवाजीच्या कल्पनेमुळें शहाजीला आपली नोकरी नीट बजावणें कठीण होऊं लागलें. म्हणून त्यानें शिवाजीस पुण्यास जिजाबाईकडे पाठविलें. पुण्याची जहागिरीची व्यवस्था पाहतां पाहतांच शिवाजीनें राज्यकारभाराचें शिक्षण जिजाबाईकडून घेतलें.

प्रतापगडावर शिवाजीनें अफजलखानाचा वध केला त्या वेळीं शिवाजीच्या जिवाला केवढा धोका होता याची जिजाबाईस कल्पना होती. म्हणून सर्व कार्य निर्विघ्नपणें पार पडेपर्यंत ती एकसारखी देवीची प्रार्थना करीत बसलेली होती. शिवाजी यशस्वी झालेला ऐकतांच तिला अतिशय आनंद झाला.

तेथें हजर असलेल्या अज्ञानदास कवीस तिनें या प्रसंगावर एक पोवाडा रचण्यास सांगितलें.

एकदां शिवाजी व जिजाबाई बुद्धिबळें खेळत होतीं. जिजाबाईनें डाव जिंकला. त्यावर शिवाजीनें जिजाबाईस विजयाबद्दल बक्षिस मागण्यास सांगितलें. मोठ्या मार्मिकपणें जिजाबाईनें सांगितलें, " पुण्यापासून सोळा मैलांवर दिसत असलेला कोंडाणा तूं मोंगलांकडून जिंकून घ्यावास हेंच माझें बक्षिस." लगेच तानाजीला बोलावणें पाठविण्यांत आलें. तानाजी हा शिवाजीचा जिगरदोस्त. जिजाबाईहि त्याच्यावर पुत्रवत् प्रेम करी. याच वेळीं तानाजीनें आपल्या मुलाचें लग्न काढलें होतें. परंतु तें बाजूला सारून तो कोंडाणा सर करण्यासाठीं निघाला. या लढाईत गड आला पण सिंहासारखा शूर तानाजी मात्र गेला.

इ. स. १६६६ मध्यें शिवाजी आग्र्यास गेला असतांना आपल्या राज्याचे सर्वाधिकार त्यानें जिजाबाईकडे सोंपविले.

स्त्रियांचा योग्य मान राखून त्यांना आदरानें वागविण्याची शिकवण जिजाबाईनेंच शिवाजीला दिली होती. हा नियम प्रत्येक मराठा वीरानें काटेकोरपणानें पाळलाच पाहिजे अशी सर्वांना सक्त ताकीद होती. धर्मसहिष्णुताहि शिवाजीनें जिजाबाईकडूनच उचलली होती.

एखाद्या हिंदूचें जबरीनें धर्मांतर करण्यांत आलें तर त्याला परत हिंदु होण्याची शक्यता नसे. ही कल्पना जिजाबाईस पटेना. बजाजी निंबाळकर नांवाच्या सरदारास तिनें पुन्हां हिंदु करून घेऊन त्याच्याशीं आपल्या नातीचें ( सखूबाईचें ) लग्न करून दिलें. अशा रीतीनें धर्मांतरासंबंधींची एक खुळी समजूत सुधारण्याचा तिनें प्रयत्न केला.

जिजाबाई ऐंशी वर्षें जगली. मराठी राज्याचा सर्व विस्तार तिनें पाहिला. शिवाजीला राज्याभिषेक झाल्यानंतर रायगडलगतच्या पाचाड या गांवीं सुखासमाधानांत ती मरण पावली.

**ताराबाई** :–( इ. स. १६७५ ते १७६१ ) ताराबाई ही हंबीरराव मोहित्यांची कन्या. हिचा विवाह शिवाजीचा मुलगा राजाराम याच्याशीं झाला होता. त्या काळच्या स्वातंत्र्याच्या चेतनेनें तिचेंहि मन भारावलेलें होतें.

मोंगलांचा पाडाव करण्याच्या कार्यांत तिनें हिरीरीनें भाग घेतला. कांहीं मुसलमान लेखकांच्या मतें तिच्यांत राजारामापेक्षांहि जास्त कर्तृत्व होतें.

तिची राजकारणनिपुणता सर्वजण मान्य करतात. सर्व इतिहास-लेखकांनीं एकमुखानें असा अभिप्राय व्यक्त केला आहे कीं, राजारामाच्या मृत्यूनंतर सात वर्षे मुसलमानांना आपली सत्ता दक्षिणेंत स्थापन करतां आली नाहीं. याचें सर्व श्रेय ताराबाईसच द्यावें लागेल. तिनें सैन्याचा ताबा घेऊन किल्ल्या-किल्ल्यावरून प्रतिकाराच्या अशा योजना आंखल्या कीं त्यामुळें मुसलमान अगदीं हतबुद्ध होऊन गेले.

राजारामाच्या मरणानंतर संभाजीचा मुलगा गादीचा वारस ठरावा यासाठीं ताराबाईनें खूप खटपट केली. यामुळें अंतःस्थ कलहास पुष्टि मिळाली. सर्व घडामोडींचा परिणाम असा झाला कीं, पुण्याप्रमाणेंच कोल्हापूरला मराठी राज्याची दुसरी गादी निर्माण झाली.

अहल्याबाई :–( इ. स. १७३५ ते १७९५ ) "मुली, अहल्या मेली आणि खंडू जिवंत आहे असें मी समजेन, पण तूं सती जाऊं नकोस. माझं ऐक." हृदयाचें पाणी करणाऱ्या ह्या शब्दांनीं मल्हारराव पुत्रनिधनानंतर आपल्या सुनेची समजूत घालीत होता. ही गोष्ट इ. स. १७५४ मध्यें घडली. पेशव्यांचा भाऊ राघोबा ( रघुनाथ ) यानें कुंभेरीचा किल्ला घेतला. या मोहिमेंत मल्हारराव त्याच्या मदतीस गेला होता. लढाईंत मल्हाररावाचा मुलगा मारला गेला. या वेळीं अहल्याबाईहि त्याच्यावरोबर होती. खंडूजी हा मल्हाररावाचा एकुलता एकच मुलगा असल्यामुळें त्याला पुत्रनिधनाचा फार मोठा धक्का बसला. या वेळीं अहल्याबाईचें वय अवघें वीस वर्षांचें होतें. त्या काळच्या परिपाठानुसार पतीमागोमाग सती जाण्याची तिनें तयारी केली. पण मल्हाररावाला दुसरा कोणाचाच आधार नसल्यानें त्यानें तिला सती न जाण्याची विनंती केली.

अहल्याबाई ही औरंगाबाद जिल्ह्यांतील चौंढे या गांवच्या माणकोजी शिंद्यांची मुलगी. इ. स. १७४३ मध्यें एकदां पेशव्यांच्या सैन्याचा तळ या खेड्यांत पडला होता. मल्हाररावहि सैन्यासहित या वेळीं पेशव्यांबरोबर होता. पेशव्यांनीं आठ वर्षांच्या चिमुरड्या अहल्येस सहज पाहिलें आणि तिच्या-

बद्दल त्यांचें मत अतिशय अनुकूल झालें. ही सुस्थळीं पडावी असें वाटून त्यांनीं आपले सरदार मल्हारराव होळकर यांना खंडूजीशीं तिचा विवाह करावा अशी सूचना केली. लग्न ठरलें. विवाहसमारंभ मोठ्या थाटाचा झाला.

दुर्दैवानें खंडूजी अतिशय आळशी, सुखासीन व बेजबाबदार वृत्तीचा निघाला. त्यानें अहल्याबाईस छळलें नाहीं पण तिच्या गुणांचीहि कदर केली नाहीं. उलट वयोमानानें अहल्याबाई अतिशय कर्तृत्ववान् व कर्तव्यदक्ष बनली. मल्हारराव तिच्यावर राज्यांतील जबाबदारीचीं कामें निर्वेधपणें सोंपवी. सारावसुली, पत्रव्यवहार व सैन्याच्या व्यवस्थेचीं सर्व कामें मल्हाररावानें तिला शिकविलीं. कित्येक वेळां तो तिला युद्धावरहि आपल्याबरोबर नेई. अहल्याबाईस दोन मुलें झालीं—मालेराव व मुक्ताबाई. ह्यांच्या सहवासांत तिची वैवाहिक जीवनांतील उदासीनता बरीच कमी झाली. पण तिच्या शेवटच्या आयुष्यांत मुलांनींहि तिला दुःखच दिलें.

सती न जाण्याचा विचार पक्का केल्यानंतर तिनें आपलें शक्तिसर्वस्व राज्यकारभारांतच खर्च करण्याचें ठरविलें. तिची जात्याच असलेली धार्मिक वृत्ति आयुष्यांतील दुःखामुळें वाढतच गेली. दिवसाचा बराच वेळ ती पूजा-अर्चा, ध्यान, चिंतन व पुराणश्रवण यांत घालवी. मल्हारराव मेल्यानंतर मालेरावाकडे औपचारिकरीत्या सुभेदारी आली. परंतु त्याच्या अंगांत कुवत नसल्यानें प्रत्यक्षांत सर्व राज्यकारभार अहल्याबाईच पाही. पेशव्यांना तिच्या वकुबाची पूर्ण कल्पना असल्यामुळें मालेरावाच्या मरणानंतर त्यांनीं संस्थानची प्रमुख म्हणून अहल्याबाईलाच मान्यता दिली. तिचा दत्तकपुत्र तुकोजीराव हा फक्त सेनापति म्हणून काम करी.

उत्तम प्रशासक व न्यायी म्हणून अहल्याबाईची ख्याति होती. तडजोड व मार्दव हे गुण जरी तिच्यांत भरपूर असले तरी जरूर तेथें ती वज्रापेक्षांहि कठोर होऊं शके. तिच्या अमदानीच्या सुरुवातीसच चंद्रावत नांवाच्या रजपूत जमातीनें बंडाळी सुरू केली. त्यांच्या पुढाऱ्यानें आपलें राज्य इंदूरच्या राज्यास जोडण्यासाठीं मल्हाररावाकडे सुपूर्त केलें होतें. परंतु मल्हारराव मेल्याबरोबर आपलें स्वतंत्र राज्य स्थापन करण्याचा या लोकांनीं प्रयत्न केला. या वेळीं तुकोजी उत्तर हिंदुस्थानांत एका मोहिमेवर गुंतला होता.

परंतु त्याच्यासाठीं अहल्याबाई थांबून बसली नाहीं. असलेल्या मुल्की अधिकाऱ्यांसह स्वत: जाऊन तिनें या बंडाचा बीमोड केला. ह्या घटनेचा राज्यांतील लोकांवर इतका परिणाम झाला कीं, परत तिला त्रास देण्याचा त्यांनीं कधींहि प्रयत्न केला नाहीं.

अनंत फंदी हा प्रसिद्ध मराठी शाहीर एकदां सातपुड्यांतून प्रवास करीत असतां भिल्लांनीं त्याला अडविलें. परंतु आपण अहल्याबाईकडे जात आहोंत असें सांगतांच भिल्लांनीं त्याला रक्षण देऊन सुखरूप पोंचविलें.

मुलांबाबतहि अहल्याबाई अतिशय दुर्दैवी ठरली. मालेराव मनानें फार कमकुवत होता. पुढें त्याचें डोकें फिरलें व त्यांतच त्याचा अंत झाला. या दु:खांत अहल्याबाई असतांनाच राघोबा (पेशव्यांचा चुलता) इंदूरजवळ आला होता. राज्यांत पुरुष वारस नाहींत असें दिसतांच स्वारी करण्याचा त्यानें बेत केला. अहल्याबाईस ही गोष्ट समजतांच तिनें स्त्रियांचा एक सैन्य-विभाग तयार केला व राघोबास असें कळविलें कीं, " माझी व आपली रणांगणांतच भेट व्हावी अशी आपली इच्छा दिसते. या गोष्टीस माझी मुळींच हरकत नाहीं. माझा पराभव झाला तरी मी स्त्रीच आहे. पण जर का उलट झालें तर मात्र आपली काय अवस्था होईल याचा विचार करून मग युद्धास सज्ज व्हावें. " या संदेशांतील मर्म ओळखून राघोबानें आपला बेत बदलला व " आपल्या सान्त्वनार्थ मी आपणांस भेटूं इच्छितों " असा त्यानें अहल्याबाईस निरोप पाठविला.

यापुढचा काल शांततेंत गेला. म्हातारपणीं जांवई मेला व तिची एकुलती एक मुलगी सती गेली. ह्या प्रसंगानें तिला इतका जबर धक्का बसला कीं तीन दिवस ती अन्नास शिवली नाहीं व तिच्या तोंडांतून एक शब्दहि निघाला नाहीं. पुढें शेवटपर्यंत तिनें अतिशय खडतरप्रकारें जीवन कंठलें. १३ ऑगस्ट १७९५ सालीं अहल्याबाई मरण पावली.

स्वत:च्या सूक्ष्म निरीक्षणानें मराठी राज्याचा इतिहास लिहिणाऱ्या सर जॉन् माल्कमनें अहिल्याबाईसंबंधीं असें म्हटलें आहे कीं, " हिची अंतर्गत राज्यव्यवस्था आश्चर्य वाटावें इतकी नमुनेदार होती. तिच्या मर्यादा लक्षांत घेऊन असें म्हणावेंसें वाटतें कीं ती एक विशुद्ध मनाची व आदर्श राज्यकर्ती होती."

अहल्याबाईचें स्मारक तिनें बांधलेल्या अनेक विहिरी, धर्मशाळा, पूल, रस्ते, घाट व देवळें यांच्या स्वरूपांत झालेलें दिसतें. कलकत्ता ते बनारस हा रस्ता तयार करून सौराष्ट्रांत सोमनाथाचें, गयेला विष्णूचें व काशीला विश्वेश्वराचें अशीं नामांकित देवाल्यें तिच्या धार्मिक वृत्तीची व दातृत्वाची आजहि साक्ष देत आहेत.

---

# प्रकरण १९ वें

## गुजराथ व सौराष्ट्रांतील महिला

### तीन असामान्य महिला

मयणल्ला:—मयणल्ला ऊर्फ मीनल्देवी ही कर्नाटकांतील कदंब वंशांतील राजा जयकेशिन् याची मुलगी. उत्तर गुजरायमधील अनहिल्लपाटण या *ठिकाणीं चालुक्य घराण्यांतील ज्या सिद्धराज जयसिंहानें राज्य केलें* (इ. स. १०९४—११४३) त्याची मीनलदेवी ही आई. सिद्धराजाचा पिता पहिला कर्ण (इ. स. १०६४ ते १०९४) वारला त्या वेळीं सिद्धराज अगदींच ल्हान होता. तो वयांत येऊन गादीवर बसेपर्यंत अनुभवी सल्लागारांच्या मदतीनें मयणल्लानें अतिशय हुशारीनें राज्यकारभार पाहिला. सिद्धराज गादीवर आल्यानंतरहि तो तिच्या सल्ल्यानेंच सर्व गोष्टी करी. आजहि गुजरायमध्यें मयणल्ला ही एक आदर्श प्रशासक व न्यायी राजमाता म्हणून प्रसिद्ध आहे. तिनें अनेक उत्कृष्ट स्मारकेंहि बांधलीं आहेत.

सिद्धराज जयसिंह हा गुजरायेंत एक अतिशय लोकप्रिय राजा होता. अनेक लोकगीतांतून व लोकनाट्यांतून आज शेकडों वर्षे याचें गुणगान केलें जात आहे. भारतीय संस्कृतीचें प्रतीक म्हणून विक्रम व भोज राजांप्रमाणेंच सिद्धराजाचें नांव अजरामर झालें आहे. तो मोठा लढवय्या होता. त्यानें गुजरायचें एक महान् साम्राज्य बनविलें. अनेक भव्य स्मारकें बांधण्यांत यानें आईची बरोबरी केली. तो विद्येचा चाहता होता. सिद्धराजांत आदर्श राजाचे गुण यावेत म्हणून मयणल्लेनें फार काळजी घेतली असली पाहिजे. तिच्याच स्फूर्तीनें राजानें अनेक मोठमोठ्या लढाया जिंकल्या असल्या पाहिजेत. राजशेखरसूरीनें इ. स. १३४९ मध्यें *लिहिलेल्या 'प्रबंध-कोशांत'* नमूद केलेल्या एका घटनेवरून या विधानाला पुष्टि मिळते.

माळ्वा प्रान्त जिंकून सिद्धराज परत राजधानींत आल्यावर भाटांनीं स्तुतिपर कवनें म्हटलीं. तीं ऐकून उद्वेगानें राजा म्हणाला, " आईच्या मृत्यू-नंतर मोठमोठे विजय संपादन करणाऱ्या पुत्रास मातेनें जन्मच देऊं नये."

स्वतः राज्यकारभार पहात असतांना मयणल्लेनें दोन उत्कृष्ट तलाव बांधले. एक विरमगांवजवळ मीनलसर ऊर्फ मन्सर हा व दुसरा अहमदाबादमध्ये धोल्का या ठिकाणीं माल्व या नांवानें ओळखला जातो.

माल्व तलाव बांधण्याच्या वेळची एक कथा अशी सांगतात कीं, तलावाच्या जागीं एका गणिकेचा महाल होता. मयणल्लेनें तिला जागा खाली करून दिल्यास मोबदल्यांत मोठी रक्कम देण्यांत येईल असा निरोप पाठविला. परंतु आपला महाल राणीच्या ताब्यांत देण्यास गणिकेनें नकार दिला. उलट तिनें मयणल्लेस कळविलें, " आपल्या तलावामुळें माझी प्रसिद्धि अधिक होईल ! मनांत आणलें असतें तर मयणल्लेनें त्या यःकश्चित् गणिकेस केव्हांच हांकलून लावलें असतें. पण मयणल्लेनें तिच्या मालमत्तेस स्पर्श न करतां तलावाचें काम पुरें केलें. यावरून गुजराथींत अशी म्हण पडली कीं, न्याय कसा असतो हें पाहावयाचें असेल तर धोल्काजवळचा माल्व तलाव पाहून या."

सोमनाथास जाणाऱ्या यात्रेकरूंना मयणल्लानें कर माफ केला. सोमनाथ हे मध्ययुगीन भारतांतील शैवपंथीयांचें एक मोठें पवित्र ठिकाण म्हणून मानलें जातें. दरवर्षी हजारों यात्रेकरू या ठिकाणीं दर्शनास लोटत. 'प्रबंधचिंतामणि' या ग्रंथांत नमूद केल्याप्रमाणें हा यात्राकर बहात्तर लाख रुपये जमा होत असे.

या प्रबंधांत अशी एक हकीकत दिलेली आहे कीं, एकदां मयणल्ला सोमनाथाचें दर्शनास चालली असतांना बाहुलेदि येथें कर जमा करणारे अधिकारी कांहीं शैव साधूंना छळीत असल्याचें तिला समजलें. हे साधु यात्राकर देण्यास असमर्थ होते, म्हणून त्यांना त्रास देण्यांत येत होता. सोम-नाथाच्या द्वारापासून परत फिरलेल्या साधूंचे अश्रूंनीं डबडबलेले डोळे तिनें पाहिले व देवदर्शन न घेतां खिन्न मनानें तीहि परत फिरली. वाटेंत तिला सिद्धराज भेटला व त्यानें तिला सोमनाथाच्या दर्शनास येण्याची विनंती केली. तेव्हां ती म्हणाली, " देवाच्या यात्रेचा कर सर्वांना जर माफ झाला तरच मी देवदर्शनास येईन." हें ऐकतांच सिद्धराजानें करमाफीचे हुकूम ताबडतोब सोडले. नंतर राजा व राजमाता सोमनाथाच्या दर्शनास गेलीं.

त्या काळच्या वाङ्मयांतहि मयणल्लेविषयीं उल्लेख आढळतात. यशश्चंद्र नांवाच्या एका लेखकानें 'मुद्रित-कुमुदचंद्र-प्रकरण' नांवाचें नाटक लिहिलें आहे. त्यांत त्यानें श्वेतांबर व दिगंबरपंथीय जैनांच्या वादविवादाचा एक प्रसंग घातला आहे. श्वेतांबर नेता वादी देवसूरी हा आणि दिगंबर नेता कुमुदचंद्र हा होता. सिद्धराज या सभेचा अध्यक्ष होता. 'स्त्रिया मोक्षार्स पात्र असतात का?' हा एक महत्वाचा प्रश्न सभेपुढें चर्चेसाठीं आलेला होता. स्त्रियांना मोक्ष नाहीं असें मत दिगंबरपंथीयांनीं मांडलें तर श्वेतांबरपंथीयानीं स्त्रियांच्या मोक्षसाधनेची तरफदारी केली.

सीतेसारख्या ज्या स्त्रियांत सात्विक गुणाचें आधिक्य असेल त्यांनाच मोक्षप्राप्ति होणें शक्य आहे असा मुद्दा देवसूरीनें मांडला. सीतेसारख्या सत्त्वशील स्त्रियांबरोबर त्या काळांत वावरणाऱ्या मयणल्लाचाहि 'असामान्य स्त्री' म्हणून उल्लेख करण्यांत आला असें या नाटकांत दिलें आहे. यावरून मयणल्लाची थोरवी सिद्ध होते.

नाइकीदेवी:–(इ. स. ११७६-११७८) अनहिल्लवाड पाटणचें राज्य करणारा राजा मूलराज याच्या आईचें नांव नाइकीदेवी. 'प्रबंध-चिंतामणि'-तील उल्लेखानुसार नाइकीदेवी ही परमर्दिक राजाची मुलगी. परमर्दी ऊर्फ शिवचित्त या नांवानें कदंब वंशांतील जो राजा ओळखला जातो तोच राजा परमर्दिक असावा. नाइकीदेवीसंबंधीं एकच घटना इतिहासांत नमूद केलेली आहे, पण तेवढ्यावरूनहि हिची थोरवी निर्विवाद सिद्ध होते. मूलराजाला लावलेल्या 'बाल' या विशेषणावरून तो लहान असतांना नाइकीदेवीकडेच राज्यव्यवस्था असावी असें दिसतें. या वेळीं गुजराथ राज्यावर शत्रूचा हल्ला झाला. हा हल्ला कोणी केला याबद्दल निश्चित उल्लेख जरी राज्याच्या दप्तरीं केलेला नसला तरी हें युद्ध महंमद घोरीशींच झालें असावें असें उपलब्ध पुराव्यावरून दिसतें. राणीनें मुलाला घेऊन गाडराघाट्ट नांवाच्या खिंडींत महंमदाशीं निकराचें युद्ध करून त्याचा पराभव केला. ही खिंड अगदीं निश्चितीनें कोठें आहे तें सांगतां आलें नाहीं, तरी अबूच्या पहाडाच्या पायथ्याशीं कोठेंतरी ती असून गुजराथच्या उत्तर सीमेवरील अत्यंत महत्त्वाची संरक्षण-सीमा म्हणून तिचें महत्त्व असावें असें वाटतें. मुसल्मानी दप्तरांत अशी नोंद केलेली आढळते कीं, नहरवालाचा (अनहिल्लवाड) राजा अगदीं लहान असला

तरी सैन्यांत खूप हत्ती व सैन्य अतिशय बलवान् असल्यामुळें मुसल्मानांना पराभव पावून परत जावें लागलें. या नोंदींत मूळराजाचें नांव भीमदेव असें दिलें आहे. परंतु या युद्धानंतर मूळदेव लवकरच वारल्यानें व त्याच्यानंतर दुसरा भीमदेव गादीवर येऊन त्यानें चौसष्ट वर्षें राज्य केल्यामुळें नांवांत हा गोंधळ झाला असल्याची शक्यता आहे. नाइकीदेवीच्या उज्ज्वल चारित्र्याची अधिक सविस्तर नोंद केली गेली नाहीं ही मात्र दुर्दैवाची गोष्ट होय.

**अनुपमाः**–( तेराव्या शतकाचा पूर्वार्ध ) वस्तुपाल व तेजपाल हीं दोन नांवें गुजरायच्या इतिहासांत विशेषत्वानें उल्लेखिलेलीं आहेत. प्राग्वाट जमातींतलि एका जैन कुटुंबांत यांचा जन्म झाला. अनहिल्लवाड पाटणच्या भीमदेवाचें मांडलिकत्व मान्य करणाऱ्या धोल्काच्या वीरधवल राजाकडे हे दोघे मंत्री होते. हे दोघे बंधु शूर व राजकारणनिपुण होते इतकेंच नव्हे तर ते अतिशय धार्मिक वृत्तीचे व विद्येचे भोक्ते होते. अबू व गिरनार या ठिकाणचीं मंदिरें त्यांच्या दातृत्वाची साक्ष देतात. तेजपाल या धाकट्या भावाच्या पत्नीचें नांव अनुपमा. अबूच्या पायथ्याशीं वसलेल्या चंद्रावली नगरांत राहणाऱ्या धरणीग नांवाच्या व्यापाऱ्याची ही मुलगी. सर्व महत्त्वाच्या प्रश्नांत दोघे भाऊ तिचा सल्ला मानीत. कलाकुसर व कोरीव कामासाठीं अद्वितीय गणलेलें अबूचें देलवारा मंदिर तेजपालानें अनुपमेच्या प्रेरणेनेंच बांधलें.

राजशेखरसूरीच्या ' प्रबंध-कोशां ' त अशी हकीकत दिली आहे कीं, वस्तुपाल, तेजपाल व अनुपमा एकदां सौराष्ट्रांतील जैन मंदिरें पाहण्यासाठीं निघालीं. वाटेंत हडालक ( अहमदाबाद जिल्ह्यांतील धंधुकाजवळचें हडाला ठिकाण ) येथें आपल्याजवळची सुमारें एक लाख रुपयांची धनदौलत जमिनींत पुरून ठेवण्याचें त्यांनीं ठरविलें. खणतां खणतां त्याना बरेंच धन मिळालें. " या सर्व संपत्तीचें काय करावें ? " असें त्यांनीं अनुपमेस विचारतांच तिनें उत्तर दिलें, " ही सर्व संपत्ति पर्वतशिखरावर सुखरूप ठेवावी म्हणजे यापुढें तरी ती कोणाच्या हातीं लागणार नाहीं." लगेच अबू व गिरनारच्या मंदिरांचीं बांधकामें हातीं घेण्यांत आलीं. शत्रुंजयाच्या दर्शनाला जाणाऱ्या यात्रेकरू संघांसाठीं मार्गहि बांधले गेले.

अनुपमेचें भाकित खरें ठरलें. वस्तुपाल आणि तेजपाल यांनीं उभ्या

केलेल्या शेकडों इतर स्मारकांपैकीं अबू व गिरनारच्या मंदिरांखेरीज कोणत्याहि स्मारकाचे अवशेष आज शिल्लक राहिलेले नाहींत. अबूच्या मंदिराचें बांधकाम चालू असतांना अनुपमा त्यावर सतत देखरेख करी. तिच्या सूचनेवरूनच तेथील कामगारांना खाण्यापिण्याच्या व निवाऱ्याच्या अनेक सुखसोयी करून मिळाल्या. अबूच्या मंदिरास जुन्या दप्तरानुसार ' लुणवसति ' असें नांव देण्यांत आलें होतें. याचें कारण हें मंदिर वस्तुपालाचा वडील भाऊ लुणग याच्या स्मरणार्थ बांधलें गेलें. परंतु प्रत्यक्ष मंदिरांत कोरलेल्या माहितीवरून असें दिसतें कीं, हें मंदिर अनुपमा व तिचा पुत्र लुणसिंह यांच्या आध्यात्मिक समाधानासाठीं बांधलें गेलें.

अनुपमेला वाङ्मय व तत्त्वज्ञान या दोन शाखांची खूप अभिरुचि वाटे. सर्व विद्वानांकडून तिला ' षड्दर्शन-माता ' असें संबोधलें जाई. कारण सर्वांना तिचा सारखाच आधार मिळे. ' कंकण-काव्य ' हें अनुपमेनें रचलेलें आहे असें समजलें जातें (पुरातन-प्रबंध-संग्रह पान ६३). पुराणांतील कथा-गायनाचा व्यवसाय करणारीं पिप्पलाचार्य या नांवाचीं दोन माणसें होतीं. ह्यांनीं चंदनबाला हिच्या चरित्राचें तेजपाल व अनुपमा यांच्यासमोर गायन केलें. त्याबद्दल अनुपमेनें त्यांना बक्षिस म्हणून खूप मोठी रक्कम देऊं केली.

प्रबंधांतील व इतर वाङ्मयांतील उल्लेखांवरून असें दिसते कीं, या दोघां भावांनीं अनुपमेच्या स्मरणार्थ ' अनुपमा-सर ' नांवाचें सरोवर बांधलें. इ. स. १३१५ च्या सुमारास अंबदेवसूरीनें रचलेल्या ' समरा-रासू ' या काव्यांत शत्रुंजयाच्या यात्रेचें वर्णन केलें आहे. या वर्णनांत या सरोवराचाहि उल्लेख केलेला आहे.

अनुपमा पतीपूर्वी निधन पावली. या संबंधांत ' प्रबंध-चिंतामणी ' त एक प्रसंग दिला आहे. अनुपमेच्या निधनामुळें तेजपाल दुःखसागरांत बुडून गेला. त्याचे गुरु आचार्य विजयसेन हे त्याच्या सान्त्वनार्थ आले होते. आत्यंतिक दुःखावेगांतून थोडा भानावर आलेल्या तेजपालास आचार्य म्हणाले, " तुझी ही लबाडी पाहण्यासाठींच मुद्दाम आम्ही येथवर आलों ! " आश्चर्यानें वस्तुपालानें गुरुजीस विचारलें, " म्हणजे काय आचार्य ? " आचार्य उत्तरले, तेजपाल लहान होता त्या वेळीं धरणिगानें आपल्या अनुपमेचा त्याच्याशीं

विवाह करावा म्हणून मींच सुचविलें. सर्व बोलणीं पक्कीं झालीं. कोणीतरी तेजपालाला सांगितलें कीं अनुपमा देखणी नाहीं. चंद्रप्रभ जिनाच्या मंदिरांतील क्षेत्रपालाला खूप लांच देऊन तेजपालानें हें लग्न मोडण्याची बरीच धडपड केली. पण अखेर हा विवाह घडून आलाच. ज्या अनुपमेशीं त्याला लग्न कर्तव्य नव्हतें त्याच अनुपमेसाठीं आज तेजपाल इतका शोक करीत आहे. या दोहोंतील खरें कोणतें ?" ही हकीकत ऐकतांच तेजपालानें शोक आवरला.

अनुपमेच्या स्तुतिपर असा एक संस्कृत श्लोक 'पुरातन-प्रबंध-संग्रहां'त दिलेला आढळतो. त्याचा आशय असा—" लक्ष्मी ही धनदेवता चंचल आहे. शिवाची प्रेयसी चंडी ही भयप्रद आहे. इन्द्रपत्नी शचि हिला सवत आहे. गंगेला अधोगति आहे तर सरस्वतीला फक्त वाचेचा वर आहे. परंतु या सर्वांशीं तुलना केल्यास अनुपमा ही मात्र खऱ्याखुऱ्या अर्थानें अद्वितीय ( जिला कोणाचीहि उपमा देतां येणार नाहीं अशी ) आहे."

## कांहीं संत-कवयित्री

**कृष्णाबाई:**—ही एक नागर ब्राह्मण जातीची स्त्री होती. हिच्या काव्याचें नांव ' सीताजीनी कांचळी ' ( सीतामाईची काचोळी ) आहे. ह्या काव्याची रचना रामायणांतील एका प्रसंगावर आधारलेली आहे. याखेरीज श्रीकृष्ण-चरित्रावरहि तिनें कांहीं स्फुटकाव्य लिहिलें आहे.

**शर्वरीबाई:**—ही नागर ब्राह्मण जातीची स्त्री डुंगरपूरची रहिवासी. हिचा जन्म इ. स. १७५९ मध्यें झाला. वयाच्या ५।६ व्या वर्षी तिचा विवाह झाला. परंतु थोड्याच काळांत तिला वैधव्य आलें. यानंतर तिनें आपलें सर्व जीवन ज्ञान व भक्ति यांच्या साधनेंत वेंचलें. तिनें अनेक कविता लिहिल्या आहेत. तिच्या सुमारें ६५२ कवितांचा एक हस्तलिखित संग्रह उपलब्ध झाला आहे असें सांगतात. मात्र यांपैकीं फारच थोड्या कविता प्रसिद्ध झाल्या आहेत. ज्यानें या हस्तलिखिताचा उल्लेख केला आहे त्यानेंच असेंहि म्हटलें आहे कीं, मध्ययुगात गुजरायेंत अतिशय सुप्रसिद्ध अशी ही एकच कवयित्री होऊन गेली.

पुरीबाई :– हिच्याबद्दल जवळजवळ कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. हिच्या नांवावर ' सीता-मंगल ' नांवाचें एक काव्य आहे. कांहीं जमातींतील गुजराथी स्त्रिया अजूनहि विवाहप्रसंगीं हें काव्य गातात.

दिवालीबाई :– बडोदें शहराजवळ असलेल्या डभोर या गांवीं एक ब्राह्मण रहात होता. इ. स. १७८१ मध्यें या भागांत मोठा दुष्काळ पडला. तेव्हां स्वतःच्या मुलीचा प्रतिपाळ करणें अशक्य झाल्यानें त्यानें तिला एका साधूच्या स्वाधीन केली. ही मुलगी म्हणजेच पुढें ख्यातनाम कवयित्री म्हणून प्रसिद्धीस आलेली दिवालीबाई. साधूनें तिला सर्व प्रकारचें उत्कृष्ट शिक्षण दिलें. विशेषतः रामायणानें तिच्या मनाची अतिशय पकड घेतली व ती एक कट्टी रामोपासिका बनली. पुढें ती बडोद्यासच स्थायिक झाली. तिचा जन्म व मृत्यु हे दोन्ही काळ निश्चित सांगतां येत नाहींत. तिनें रामाचा जन्म, बाल्यपणांतील क्रीडा, विवाह, राज्याभिषेक वगैरे प्रसंगांवर अनेक कवनें रचलीं आहेत.

राधाबाई :– बडोद्यांत स्थायिक झालेली ही एक महाराष्ट्रीय ब्राह्मण महिला होती. अवधूतनाथ नांवाच्या महंताचें शिष्यत्व तिनें पत्करलें होतें (इ. स. १८३४). हिच्या भक्तिकाव्यांत गुजराथी, मराठी व हिन्दी या तिन्ही भाषांचें मिश्रण आढळतें.

जनीबाई :– मिथु महाराज या नावाचें एक महान् शाक्तपंथीय साधु गुजराथेंत इ. स. १७३८ ते १७९१ या काळांत होऊन गेले. जनीबाई ही त्यांची शिष्या. इ. स. १८०२ मध्यें तिनें ' नवनायिकादर्शन ' नांवाचें एक काव्य लिहिलें. ' नाथजी-प्राकट्य ' या तिच्या काव्यांत तिनें आपल्या गुरूच्या दैवी जन्माची कहाणी निवेदन केली आहे. इ. स. १८१२ त जनीबाई मृत्यु पावली. शासन, तत्वज्ञान व गूढवाद तिनें उत्तम रीतीनें आत्मसात् केला होता. मिथु महाराज व जनीबाई या दोघांच्या लिखाणावरून गुजराथेंतील शाक्तपंथाच्या प्रसाराची चांगली कल्पना येते.

# प्रकरण २० वें

## पूर्व भारतांतील महिला

**विश्वासदेवी :–** तिरहुतचा राजा शिवसिंह याच्या निधनानंतर त्याचा धाकटा भाऊ पद्मसिंह हा गादीवर आला. ही घटना सुमारें १४५० मध्यें घडली. या कालांत आपल्या असामान्य व्यक्तिमत्वाची सर्वांवर छाप पाडणारी राणी विश्वासदेवी ही पद्मसिंहाची पत्नी. हिची बुद्धिमत्ता व प्रशासनकौशल्य या दोन्ही गोष्टी वाखाणण्यासारख्या होत्या. पतीच्या हयातींत तिनें राज्यकारभारांतील बरीच जबाबदारी आपल्या शिरावर घेतलेली होती. विश्वासदेवीनें गंगेच्या स्तुतिपर ' गंगा-वाक्यावलि ' या नांवाचा एक प्रबंध लिहिला. तिच्या विनंतीनुसार विद्यापति नांवाच्या दरबार कवि-पंडितानें या ग्रंथाला कांहीं प्रमाणभूत अवतरणांचें परिशिष्ट जोडलें. राणीच्या प्रेरणेनें विद्यापतीनें ' शैव-सर्वस्व-हार ' या नांवाचें एक खंडकाव्य लिहिलें. या काव्याच्या सुरुवातीच्या श्लोकांत विद्यापतीनें एक आदर्श प्रशासक, प्रेमळ पत्नी, भाविक व उदार स्त्री, अशा शब्दांत विश्वासदेवीचा गौरव केला आहे.

**चाउचिंग :–** मध्ययुगाच्या शेवटच्या कालांत उत्तर ईशान्य व पूर्व भारतांतील समाजांत स्त्रियांचा दर्जा भारतांतील इतर भागांतील स्त्रियांपेक्षां पुष्कळच समाधानकारक होता. एक सैनिकी शिक्षण सोडलें तर इतर बहुतेक सर्व क्षेत्रात पुरुषाच्या बरोबरीनें स्त्रिया काम करीत. सोळा ते अठरा या शतकांत या भागांत काहीं स्त्रिया राज्यकर्त्या होत्या तर काहीं राजप्रतिनिधि आणि प्रशासक म्हणून कामें करीत होत्या. चाउचिंग ही आसामी लोकांच्या इतिहासांतील अगदीं पहिली राजकारणी स्त्री. छटियाच्या पराभूत पुढाऱ्याची ही मुलगी. इ. स. १५६२ च्या सुमारास आसामवर राज्य करणारा राजा सुक्लेंमुंग याची चाउचिंग ही पत्नी. ती जात्याच अतिशय हुशार व धोरणी होती. राजाचें निवासस्थान गारगांव या ठिकाणाभोंवतीं एक खंदक खणावा

असें तिनें सुचविलें. पुढें लवकरच या चतुर सूचनेचा उपयोग राजाच्या प्रत्ययास आला. अद्योम राजांनी आपल्या सल्लागार मंडळांत आणखी एका वरपात्राची नेमणूक करावी हीहि चाउचिंगची सूचना राजानें तावडतोब अंमलांत आणली.

आराकान प्रांतांत वडिलांच्या संपत्तीवर मुलें व मुली दोघांचा सामायिक वारसाहक्क असे. सतराव्या शतकांत होऊन गेलेल्या अतॉल नांवाच्या कवीनें असें नमूद करून ठेवलें आहे कीं, राजा थदो-मिंतार वारल्या-नंतर त्याचा मुलगा व मुलगी हीं दोघें गादीवर आलीं. या दोघांत मुलगी वयानें मोठी असल्यानें सर्वाधिकार तिच्याच हातीं होते. अतॉल ज्याचा आश्रित होता तो मगन ठाकूर राणीचा मुख्य प्रधान होता.

**चंद्रप्रभा**:—सर्वसामान्य भारतीयांना अज्ञात असलेली चंद्रप्रभा ही इतिहासांतील एक अत्यंत विलोभनीय महिला होऊन गेली. अठराव्या शतकाच्या अखेरच्या काळांत कछरवर राज्य करणारा राजा ताम्रसिंह याच्या पत्नीचें नांव चंद्रप्रभा. ही अतिशय रूपसंपन्न असून तिचे केस लांबसडक व काळेभोर होते.

आसामचा राजा रुद्रसिंह यानें ताम्रसिंहाचा कांहीं मुलूख जिंकून घेतला. जयंतिया जमातीचा प्रमुख रामसिंह याच्याशीं मैत्रीचा करार करून ताम्रसिंहानें आपल्या उरलेल्या राज्याचें रक्षण केलें व आसामी सैन्याचे अनेक हल्ले यशस्वी रीतीनें परतविले. चंद्रप्रभेच्या लोभानें रामसिंहानें ताम्रसिंहास पकडून कैदेंत ठेवलें. खासपूर येथें आपलें राजधानीचें ठिकाण हालवून तेथून राज्यकारभार पाहण्यास चंद्रप्रभेनें सुरुवात केली. पण पतीविषयीं कांहींच वृत्त तिला कळेना. आसामच्या राजाची मदत घेऊन पतीची सुटका करावी असा तिनें विचार केला. तिचा निरोप आल्यानंतर रुद्रसिंहानें आपल्या सर्व सरदारांस बोलाविलें व चंद्रप्रभेच्या मदतीस कोण जावयास तयार आहे तें विचारलें. वैरागी बरबरुआ नांवाच्या सरदारानें राणीच्या साहाय्यास जाण्याची तयारी दर्शविली. यात्रेचें निमित्त पुढें करून रामसिंहाची राजधानी जयंतीपुरा येथें बरबरुआनें आपल्या सैन्याचा तळ ठोकला. आसामच्या राजकन्येसाठीं वर शोधण्याच्या कामगिरीवर आपण निघालों आहोंत अशी अफवाहि त्यानें

पसरविली. या बतावणीनें रामसिंह फसला. तो आपला मुलगा व ताम्रसिंह यांच्यासमवेत बरबरुआच्या निवासस्थानीं आला. ताबडतोब त्या सर्वांना कैद करण्यांत आलें. ताम्रसिंहानें आसामच्या राजाचें वर्चस्व मान्य केलें व बरबरुआच्या मदतीनें तो खासपूरला सुखरूप पोंचला. पुन्हां गादीवर बसल्यानंतर ताम्रसिंह फार दिवस जगला नाहीं. ताम्रसिंहानंतर त्याचा मुलगा शूरदर्प हा गादीवर आला. परंतु निदान कांहीं वर्षे तरी चंद्रप्रभेनेंच कछरच्या सर्व राज्याची जबाबदारी सांभाळली होती असें दिसतें.

चंद्रप्रभेला विद्या व कला दोहोंची विशेष अभिरुचि होती. तिच्या प्रोत्साहनानें तिच्या राज्यांतील विद्वान् पंडित भुवनेश्वर वाचस्पति यानें 'नारदीय-रसामृत' या नांवाचा एक ग्रंथ लिहिला. मूळ बंगाली काव्यात्मक नारदीय पुराणाचें हें रूपांतर आहे. कछरमध्यें संस्कृतप्रधान संस्कृतीच्या प्रसारास मुख्यतः चंद्रप्रभाच कारणीभूत होती असें दिसून येतें.

**राणी भवानी** :– अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत राणी भवानीचें नांव प्रशासन व औदार्य याबाबत बंगालमध्यें सर्वतोमुखीं झालें होतें. उत्तर बंगालमधील नाटोर जहागिरीच्या संस्थापकांचे चिरंजीव व वारस रामकान्त याची राणी भवानी ही पत्नी. जहागीर सांभाळण्याइतकी बौद्धिक कुवत रामकान्तांत नसल्यानें तो सर्वस्वीं आपल्या पत्नीवरच अवलंबून असे. जहागीर हातीं आल्यापासून लग्न होईपर्यंत त्यानें बरींच संपत्ति व जमीन गमाविली. विवाहानंतर राणी भवानीनें जहागिरीचा सर्व कारभार आपल्या हातीं घेतला व पुन्हां तिला ऊर्जितावस्था आणली. रामकान्त इ. स. १७४७ मध्यें वारला. परंतु त्यापूर्वी बरींच वर्षें राणी भवानीचा जहागिरीवरील वारसाहक्क मान्य करण्यांत आला होता. रामकान्ताच्या मृत्युसमयीं त्याला तारा या नावाची एकुलती एक मुलगी होती. तिचा विवाह रघुनाथ लाहिरी नांवाच्या गृहस्थाशीं झाला होता. रामकान्तानंतर रघुनाथ इस्टेटीचा वारस ठरला. इ. स. १७५१ मध्यें रघुनाथ निधन पावला. पुन्हां सर्व कारभार राणी भवानीकडे आला. वाढतां वाढतां भवानीची प्रशासक म्हणून सर्व बंगालमध्यें कीर्ति पसरली व बऱ्याच मोठ्या जमिनींची ती मालकीण होऊन तिचें वार्षिक उत्पन्न दीड कोटीच्या घरांत गेलें. भवानी वयाच्या ७९ व्या वर्षीं निधन पावली. तिच्यानंतर तिचा दत्तकपुत्र रामकृष्ण हा जहागिरीचा मालक झाला.

राणी भवानीचें जीवन अतिशय शिस्तबद्ध होतें. वैधव्यानंतर मरेपर्यंत तिच्या दिनक्रमांत कधींहि फरक पडला नाहीं. पहांटेपासून तों सकाळपर्यंत तिचा वेळ पूजा-अर्चा व ध्यानधारणेंत जाई. नंतर स्वतः स्वयंपाक करून ती रोज दहा ब्राह्मणांना भोजन देई. मध्यान्हीस स्वतः थोडें खाऊन ती कामास बसे. सध्याकाळपर्यंत कारभारविषयक सर्व कामें आटोपून नंतर भवानी पुराणश्रवणास बसे. पुराण संपल्यानंतर हाताखालचा कारभारी जरूर तें सर्व कागदपत्र तयार करून घेऊन येई. त्यावर सह्या करून राणी नदीकांठीं फिरावयास जाई. या वेळीं तुपाचा दिवा पाण्यावर सोडण्याची तिची पद्धत असे. घरीं परत आल्यावर अल्पोपाहार करून पुन्हां ती कामास लागे. हा वेळ भेटीगांठीसाठीं असे. अनेक लोक आपल्या तक्रारी व मागण्या या वेळीं तिच्यापुढें मांडीत. रात्रीं साधारण दहा वाजेपर्यंत हें काम आटोपल्यावर ती घरांतील सर्व मंडळींची विचारपूस करून मग झोंपावयास जाई.

राणी भवानीचें नांव सर्वतोमुखीं होण्यास तिचें दातृत्व प्रामुख्यानें कारणीभूत झालेलें होतें. गंगेच्या कांठावरील अनेक खेड्यांतील विद्वान् ब्राह्मणांना तिनें तोडून दिलेल्या जमिनींचीं उत्पन्नें ते पिढ्यान् पिढ्या खात होते. तिनें अनेक मंदिरें बांधलीं, अमाप पैसा धर्मादायखातीं खर्च केला आणि अनेक देवतांच्या यात्रा परत उत्साहानें सुरू केल्या. काशींतील कांहीं प्रमुख मंदिरें व घाट राणी भवानीनें बांधले. यात्रेचें एक महत्त्वाचें ठिकाण या दृष्टीनें काशीक्षेत्रास आज जें महत्त्व प्राप्त झालें आहे, त्याचें पुष्कळसें श्रेय या श्रद्धाळू महिलेस द्यावें लागेल.

## वैष्णव उपासिका

सचीदेवीः—श्रीचैतन्यांची माता सची ही एक महान् आत्मनिष्ठ व कर्तृत्ववान् महिला बंगालमध्ये होऊन गेली. तिचें कुटुंब उत्तरेच्या बाजूनें बंगालमध्यें येऊन नदिआ या ठिकाणीं स्थायिक झालें होतें. हिचे वडील नीलांबर चक्रवर्ती हे या भागांत फार वजनदार गृहस्थ म्हणून ओळखले जात. जगन्नाथ ऊर्फ पुरंदर मिश्र नांवाच्या एका गरीब व नीतिमान् विद्वान् पंडिताशीं सचीचा विवाह झाला होता. तिला लागोपाठ आठ कन्या होऊन सर्वजणी मृत्युमुखीं पडल्या. यामुळें संसाराबाबत उदास होऊन सचीनें शान्तिपूरच्या प्रसिद्ध अद्वैत आचार्यांकडून

परमार्थाची दीक्षा विधिपूर्वक घेतली. यानंतर तिला विश्वरूप नांवाचा पुत्र झाला. तरुणपणींच विश्वरूपानें संन्यास घेतला. या वेळीं तिचा दुसरा पुत्र विश्वंभर (श्रीचैतन्यांचें पूर्वाश्रमींचें नांव) अगदींच लहान होता. विश्वरूपाच्या संन्यास-ग्रहणानें वडिलांना मोठा धक्का बसला व लवकरच त्यांना मृत्यु आला. सचीनें धीमेपणानें सर्व दुःख गिळलें व आपला धाकटा बाळ मोठा होऊन नांवलौकिक कमावील आणि आपल्याला सुखी करील अशी आशा तिनें बाळगली. विश्वंभरानें थोड्याच दिवसांत आपल्या आकर्षक रूपानें आणि गुणांनीं भोंवतालच्या समवयस्क तरुणांचें नेतृत्व संपादन केलें. पण सचीस गृहसौख्य डोळे भरून पाहण्याचें भाग्य फार दिवस लाभलें नाहीं. आपली तरुण पत्नी व वृद्ध माता यांच्याकडे दुर्लक्ष करून विश्वंभरानें (चैतन्यानें) वयाच्या २४ व्या वर्षी संन्यास घेतला. सचीचें असामान्यत्व या वेळीं दिसून आलें. मुलाची परमार्थाकडील ओढ पाहून तिनें त्यास संन्यास घेण्याची परवानगी दिली. तिनें दाखविलेली त्यागी वृत्ति अतुलनीय होती. ईश्वरेच्छेवर तिची दृढ श्रद्धा होती. चैतन्य निघून गेल्यानंतर या वृद्ध मातेची व तरुण पत्नीची स्थिति किती असहाय झाली असेल, त्यांच्या मनाची अहोरात्र कशी तगमग झाली असेल याची वाचकांना सहज कल्पना करतां येईल. क्रूर दैवानें सचीला येथेंच सोडलें नाहीं. तिच्या डोळ्यासमोर अट्टेचाळीस वर्षांच्या चैतन्याचा मृत्यूहि तिला पहावा लागला. सर्व बळ एकवटून वादळांत उभ्या राहिलेल्या वृक्षाप्रमाणें सचीनें या प्रसंगास तोंड दिलें.

विष्णुप्रिया:–चैतन्याची प्रथम पत्नी लक्ष्मी सर्पदंशानें वारल्यानंतर आईच्या आग्रहास्तव त्यानें विष्णुप्रिया नांवाच्या स्त्रीशीं पुन्हां विवाह केला. विष्णुप्रियेचा पिता सनातन हा एक नामांकित पंडित होता. गृहिणी या दृष्टीनें विष्णुप्रियेंत कोणतीच उणीव नव्हती. पण दिवसेंदिवस चैतन्याची वृत्ति उदासीन होत जाऊन शेवटीं त्यानें संन्यास घेतल्यानंतर या मुलीवर वृद्ध सासूचा सांभाळ करण्याची सर्वच जबाबदारी येऊन पडली. दिवसाचा बहुतेक वेळ विष्णुप्रिया पति व परमेश्वर यांच्या चिंतनांत घालवी. तिचा स्वभाव मूळचाच अतिशय लाजाळू, त्यांतून पतीनें संन्यास घेतल्यामुळें आपण संसारास अपात्र

उभी राही. फक्त तिचीं पावलें इतरांना दिसूं शकत. तिची दिनचर्या अतिशय खडतर असे. जितक्या वेळा देवाचें नांव तोंडून येईल तेवढेच मोजून ठेवलेले तांदळाचे दाणे घेऊन तेच शिजवून ती खाई. यावरून ही संन्याशाची पत्नीहि कसें समर्पणशील जीवन जगे याची कल्पना येते.

जान्हवाः— पालांच्या राज्यांत तांत्रिक बौद्ध संप्रदायांतील आचार्या (स्त्री-शिक्षिका) पूर्व भारतांत सर्वांना सुपरिचित झालेल्या होत्या. ओरिसा-मधील राणी लक्ष्मींकरा व सहजयोगिनी (चिंता) यांचा येथें प्रामुख्यानें उल्लेख करावा लागेल. या सुमारास मुसलमानांच्या जुलमामुळें स्त्री-कार्यकर्त्यांना घराबाहेर पडून कांहीं कार्य करण्याची संधि क्वचितच मिळे. या वेळीं या भागांत प्रसार पावत असलेल्या चैतन्य संप्रदायानें कृष्णापेक्षांहि राधेला महत्त्वाचें स्थान दिल्यामुळें एकप्रकारें स्त्रीजातीचा समाजांत अधिक गौरव झाला होता. या पार्श्वभूमीवर सोळाव्या शतकाच्या मध्यांत आध्यात्मिक क्षेत्रांत अनेक महिला आचार्या व मार्गदर्शिका म्हणून बंगाली वैष्णव समाजांत प्रसिद्धीस आल्या. चैतन्याचे दोन शिष्य नित्यानंद व अद्वैत यांच्या पत्न्यांना आचार्या म्हणून सर्व महिलांत अग्रेसरत्व प्राप्त झालें.

नित्यानंदाच्या निधनानंतर त्याचा मुलगा वीरचंद्र हा लहान असल्यामुळें त्याच्या सावत्र आईकडे—जान्हवेकडे—नेतृत्व आलें. जान्हवेचें व्यक्तिमत्त्व अतिशय प्रभावी होतें. भागवत पुराणावरील तिचें प्रभुत्वहि वाखाणण्यासारखें होतें. सनातन, रूप व जीव या वृंदावनांतील गोस्वामींशीं मोठ्या चातुर्यानें जान्हवेनें आपले स्नेहसंबंध प्रस्थापित केले. या स्नेहसंबंधांमुळें बंगालमधील वैष्णवांत निर्माण होऊं पहात असलेली दुही तात्पुरती तरी टळली व जान्हवेचे हात अधिक बळकट झाले. ज्या ज्या जाहीर समारंभांना प्रमुख वैष्णव गोस्वामींना निमंत्रण असे त्या त्या ठिकाणीं जान्हवा आवर्जून जाई. तिच्या स्नुषेनें तिच्यावर एक स्तुतिपर काव्य संस्कृतमध्यें रचलें आहे.

सीताः— अद्वैताची पत्नी सीता ही मोठी कर्तृत्ववान् स्त्री होती. चैतन्याच्या जन्माच्या वेळीं सची व जगन्नाथ यांच्या घरीं सीता गेली होती व तिनेंच त्याचें नांव निमाई असें ठेवलें. चैतन्य व त्याचा भाऊ तिला आई-प्रमाणें मानीत. संन्यस्त जीवनांत सीतेलाच फक्त चैतन्याची गांठ घेतां येई.

अद्वैताचार्यास पुष्कळ मुलें होतीं. परंतु त्यांच्यापैकीं सर्वांत मोठा मुलगा एकटाच चैतन्याचा अनुयायी बनला. चैतन्य जन्मला त्या वेळीं अद्वैताचें वय पन्नाशीजवळ होतें आणि मरणसमयीं तो शंभर वर्षांवर होता. अद्वैताच्या मृत्यूपूर्वीं बरींच वर्षे सीताच त्याच्या शिष्यगणाचें नेतृत्व करी. तिचे स्वतःचे अनुयायीहि बरेच होते. पैकीं नंदिनी आणि जंगली या तिच्या दोन सेविकांनीं साधनेंत बरीच प्रगति केलेली होती. तिच्या ह्यातींत लिहिल्या गेलेल्या दोन-तीन चरित्र-ग्रंथांत सीतेच्या योग्यतेचें यथातथ्य वर्णन आलेलें आहे. एकंदरीनें पाहतां बंगाली वैष्णवांत एक सिद्ध महिला म्हणून सीतेचें स्थान फार मोठें आहे, यांत शंका नाहीं.

इच्छादेवीः—यापुढील काळांत बंगाली वैष्णव संप्रदायांत, विशेषतः नित्यानंद, अद्वैत, श्रीनिवास, श्यामानंद वगैरे गोस्वामींच्या कुटुंबांत अनेक महिला धर्मगुरु म्हणून प्रसिद्धीस आल्या. श्यामानंद हे एक अतिशय साधे व धर्मभोळे गोस्वामी होते. त्यांचा शिष्य रसिकानंद (ऊर्फ रसिकमुरारी) हा बंगालमधील एका नामवंत घराण्यांतील असल्यामुळें त्याच्या साहाय्यानें समाजाच्या फार मोठ्या भागांत अहिंसा व भक्ति यांचा प्रसार होऊं शकला. रसिकानंदाची पत्नी इच्छादेवी हीहि त्याला साजेशीच होती. नरहरी चक्रवर्तीनें रचलेल्या भक्तिरत्नाकरावरून असें दिसून येतें कीं, बंगालींत काव्यरचना करणारी इच्छादेवी ही पहिलीच महिला होती.

हेमलताः—सतराव्या शतकाच्या सुरुवातीस 'एक थोर वैष्णव महिला' म्हणून हेमलतेचें नांव सर्वतोमुखीं झालेलें होतें. हेमलता ही श्रीनिवास आचार्यांची कन्या व हुगळी नदीच्या कांठच्या बुधइपारा गावचे रामकृष्ण चट्ट यांची पत्नी. दुर्दैवानें या दंपतीस संतानसुख लाभलें नाहीं. श्रीनिवास आचार्यांची आध्यात्मिक वारस म्हणून हेमलतेला त्यांचा शिष्यवर्ग फार मान देई. हेमलतेच्या शिष्यवर्गांत यदुनंदन हा तिचा नोकरहि होता. हा पुढें एक नामवंत कवि म्हणून प्रसिद्धीस आला. यानें 'विदग्ध-माधव', 'गोविंद-लीलामृत' आणि 'कृष्ण-कर्णामृत' या तीन संस्कृत ग्रंथांचा बंगालींत काव्यमय अनुवाद केला आहे.

वैष्णव पंथांतील गूढ व तांत्रिक भागांकडे हेमलता विशेष आकृष्ट

झाली. तिच्या शिष्यांपैकीं एकानें यांवर प्रबंधहि लिहिले आहेत. तिच्या नांवावर एक अनुभूति-वर्णनपर काव्यहि देण्यांत येतें. पण हें हेमल्तेनेंच रचलेलें आहे किंवा नाहीं याविषयीं शंका वाटते.

## लेखिका

सोळाव्या व सतराव्या शतकांतील वैष्णव कुटुंबांतील स्त्रिया बहुधा सुशिक्षित असत. कांहींचें संस्कृतवरहि चांगलें प्रभुत्व असे. बंगाली व संस्कृत-मध्यें कांहीं स्त्रियांनीं केलेलें लिखाणहि उपलब्ध आहे. वैष्णवपंथीय स्त्रियांव्यतिरिक्त इतर कोणी लिखाण केलेलें नाहीं असें नाहीं. इतिहासानें मात्र फार थोड्या लेखिकांची नोंद ठेवली आहे.

चंद्रावतीः—जुन्यांत जुन्या लेखिकांत चंद्रावतीचें नांव प्रामुख्यानें आढळतें. मैमनसिंगच्या वंशीदास (ऊर्फ वंशीवदल) चक्रवर्तीची ही एकुलती एक कन्या. 'मनसामंगल' या काव्याचा कर्ता व गायक म्हणून चक्रवर्तीचें नांव सुप्रसिद्ध होतें. सतराव्या शतकाची अखेरी किंवा अठराव्या शतकाची सुरुवात हा वंशीदासांचा काल समजण्यांत येतो. वडिलांची काव्यप्रतिभा चंद्रावतींतहि उतरली होती. सर्पांची देवता ' मनसा ' हिच्यावर वडिलांनीं रचलेल्या काव्यांपैकीं कांहीं भाग हिच्या मदतीनें केला असावा असें दिसतें. चंद्रावतीनें अशा रीतीचें काव्य स्वतंत्रपणें रचलें असण्याचीहि शक्यता आहे. या काव्याचा काहीं भाग आज 'चंद्रपति' या नांवावर उपलब्ध आहे. 'चंद्रपति' चंद्रावतीचें अपभ्रष्ट रूप असावें. चंद्रपतीप्रमाणें नारायणरावदेव आणि विजयगुप्त यांचींहि नांवें या काव्यांत येतात. रामचरित्रावर आधारित व विवाहप्रसंगीं गातां येण्यासारखें एक छोटेंसें काव्य चंद्रावतीनें रचलें आहे. यांतील कांहीं भाग सध्यां उपलब्ध झालेला आहे. यांत तिनें आपल्या घराण्यांतील कांहीं पिढ्या व घराण्याची निकृष्ट परिस्थिति यांचा उल्लेख केलेला आहे.

मैमनसिंगमध्यें प्रचलित असलेल्या लोककथांवरून चंद्रावतीचें जीवन शृंगारिक पण दुःखी होतें असें दिसतें. जयानंद नांवाच्या आपल्या बाल-पणापासूनच्या मित्राशीं तिनें विवाह ठरविला. पण विवाह घडून येण्यापूर्वींच जयानंदाला मोठा अपघात झाला. एका मुसल्मान कुटुंबानें यांतून त्याला

वाचविला. परंतु नंतर बरींच वर्षें तो घरीं परत येऊं शकला नाहीं. तो परत आला त्या वेळीं त्याला जातिबाह्य समजण्यांत आल्यामुळें चंद्रावतीचा विवाह त्याच्याशीं घडून येण्याची शक्यताच उरली नाहीं. यामुळें चंद्रावती शेवटपर्यंत कुमारिका राहिली असा तर्क करण्यास हरकत नाहीं.

**आनंदमयी व गंगामयी :–** अठराव्या शतकांतहि फारच थोड्या स्त्रियांनीं थोडेंफार लिखाण केलें असावें. परंतु याविषयीं फारसा कोठें उल्लेख आढळत नाहीं. फरीदपूरच्या वैद्य कुटुंबांतील दोन बहिणींची माहिती थोडीफार मिळते. इ. स. १७७२ मध्यें जयनारायण रे यानें 'हरि-लीला' या नांवाचें काव्य लिहिलें. त्या वेळीं आनंदमयी ह्या त्याच्या पुतणीनें त्याला मदत केली.

**गंगामणि:–** अठराव्या शतकाच्या अखेरीस अनेक स्त्रियांनीं कीर्तनाचा पेशा पत्करलेला दिसतो. या स्त्रियांबद्दल समाजांत अतिशय आदरभाव असे. यांच्यापैकीं कांहीं महिला स्वतः काव्य करीत. भरद्वाजमर्धील गोपीमोहन चक्रवर्ति ह्या सुप्रसिद्ध कवि आणि कीर्तनकाराची मुलगी गंगामणि ही एक अशीच नामवंत कवयित्री व कीर्तनकर्ती म्हणून प्रसिद्ध होती. तिच्या एका काव्याचा आशय असा आहे–

"त्या कदंब वृक्षाखालीं उभी असलेली सावळी बालमूर्ति कोणाची? शरद् ऋतूंतील चंद्राचें सौम्य तेज तिच्या तोंडावर विलसत आहे. मी यमुनेच्या पाण्यांत उतरते तेव्हां पाण्यांतहि हेंच तेज मला दिसतें. या पावलाच्या तेजानें पाण्याचा सर्व पृष्ठभाग जणुं प्रकाशित होतो व एखादें सुंदर कमळ पाण्यावर तरंगत आहे असा भास होतो."

**हटी विद्यालंकार :–** अठरावें शतक भारताच्या इतिहासांतील अंधार-युगच समजलें जातें. परंतु या काळांत एक महिला संस्कृत-विदुषी म्हणून ख्यातनाम झाली. इतकेंच नव्हे तर 'चतुष्पाठी' या नावानें तिचें स्वतंत्र शिक्षणकेन्द्र तिनें स्थापन केलें. या ठिकाणीं संस्कृतांतील सर्वश्रेष्ठ वाङ्मय-प्रकारांचा अभ्यास केला जाई. हिचें नांव हटी विद्यालंकार. बरद्वानच्या पश्चिमेस असलेल्या सोनार गांवात अनेक नामवंत विद्वान् ब्राह्मणकुटुंबें रहात. हटीहि याच गांवची रहिवासी. हिच्या कुटुंबियांबद्दल कांहींच माहिती

मिळत नाहीं. ही बालविधवा असून कट्टी वैष्णवधर्मी होती. उतार वयांत ती काशीला गेली. तेथें तिनें कांहीं काल अध्यापन केलें. नंतर ती वृंदावनास आली व ईश्वरचिंतनांत तिनें आपलें उरलेलें आयुष्य घालविलें. या वेळीं तिनें रचलेलीं भक्तिगीतें आजहि व्रज भाषेंतील उत्कृष्ट काव्याचे नमुने म्हणून समजलीं जातात.

---

# प्रकरण २१ वें

---

## भारतीय मुसलमान महिला

पूर्वेकडील ज्या भारतीय प्रदेशावर बरींच वर्षे मुसल्मानांचें अधिराज्य होतें त्या भागांतील महिलांचा उल्लेख मुसल्मान इतिहासकारांनीं क्वचितच केलेला दिसतो. पुरुषाची प्रत्येक क्षेत्रांतील कामगिरी मात्र त्यांनीं अगदीं तपशीलवार वर्णिली आहे. अनेक संत व तत्त्वज्ञ मुसल्मानांच्या लिखाणांतून 'स्त्रीचें एकमेव कार्यक्षेत्र म्हणजे घर' अशा प्रकारची विचारसरणी पुन:पुन्हां मांडलेली आढळते. सर्वसाधारण मुसल्मानी समाजांतहि स्त्री व गृहक्षेत्र यांचें समीकरण बनविलेलें आढळतें. मात्र याचा अर्थ असा नव्हे कीं इस्लामनें स्त्रियांना पुरुषांहून कमी लेखलें. मुसल्मानी समाजानें स्त्रियांच्या बौद्धिक अगर सामाजिक न्यूनतेचा सिद्धान्त कधींच मान्य केला नाहीं. स्त्रियांचें कर्तृत्व व गुणांचें सविस्तर वर्णन करण्याचें आपले इतिहासकार टाळतात, याचें मुख्य कारण त्यांचें स्त्रीदाक्षिण्य. मुसल्मानांच्या दृष्टीनें "स्त्रिया म्हणजे समाजाचा पवित्र ठेवा. याचा नीट सांभाळ करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. त्यांचीं चरित्रे कितीहि उदात्त असलीं तरी प्रदर्शनीय नसतात. त्यांचें कर्तृत्व हें त्यांच्या नातेवाइकांच्या लाभापुरतेंच मर्यादित असतें."

ह्या कल्पना नंतरच्या काळांत इतक्या परमावधीस पोंचल्या कीं, कोणत्याहि स्त्रीच्या नांवानें उल्लेखसुद्धां करूं नये अशी प्रथा पडली. कोणाहि थोर स्त्रीबद्दल कांहीं सांगावयाचें झाल्यास 'इस्मत् पनाह' व 'इफत् मान्' अशा तऱ्हेचे शब्दप्रयोग करीत. यामुळें मुसल्मानी अमदानींत स्त्रियांनीं घराबाहेरच्या निरनिराळ्या क्षेत्रांत कोणती कामगिरी बजावली तिचा आढावा घेणें अशक्यच होऊन बसलें आहे. मुसल्मान स्त्रियांनीं आपल्या कुटुंबियांसाठीं केलेला त्याग आणि पुरुषाच्या आध्यात्मिक व ऐहिक सुखासाठीं दिलेली साथ यासंबंधींच्या कथा अकथित राहिल्या अगर त्रोटक स्वरूपांत सांगितल्या गेल्या.

इतकें असूनहि या काळांत मुसलमानी समाजांत कांहीं स्त्रिया अशा होऊन गेल्या कीं रूढिबद्ध इतिहासकारांनाहि त्यांचा उल्लेख टाळतां आला नाहीं. या तुरळक माहितीवरूनहि मध्ययुगांत भारतीय मुसलमान समाजांतील कांहीं स्त्रियांनीं केलेल्या कामगिरीची कल्पना येऊं शकते.

भारतावर राज्य करणाऱ्या राजांपैकीं सय्यद लोदी व सूर हीं घराणीं सोडलीं तर बाकीचे सर्व राजे तुर्क अगर मोंगलवंशीय होते. या राजांनीं भारतांत आपल्या मध्य आशियांतील भटक्या पूर्वजांचे अनेक रूढिविशेष आणले. या भटक्या जमातींत स्त्रियांची स्वतंत्र राहणी अशक्यच असे. त्यामुळें तुर्की स्त्रियांच्या वागण्यांत जो मोकळेपणा आढळतो तो इतर कोणत्याहि त्या काळच्या जमातींत आढळत नाहीं. या स्त्रिया शांततेच्या अगर युद्धाच्या काळांत सर्व बाबतींत पुरुषांच्याबरोबरीनें वागत. त्या तलवार व धनुष्यबाणांचाहि उपयोग करीत. पुरुषवर्गावर त्यांचें खूप वजन असे. सर्व महत्त्वाच्या बाबतींत पुरुष स्त्रियांचा सल्ला घेत. मोठमोठ्या खानांच्या राण्या दरबार कसे भरवीत व पाहुण्यांचें स्वागत कसें करीत याबद्दल इब्नबतूत यानें आपल्या प्रवासवर्णनांत सविस्तर माहिती दिली आहे. बाबरानें आपल्या वडिलांचें गेलेलें राज्य परत मिळवितांना ज्या महत्त्वाच्या लढाया केल्या त्या वेळीं त्याची आई कुतलुक निगार व त्याची बहीण खानझादे बेगम या दोघी त्याच्या प्रमुख सल्लागार असत. हुमायूनहि आपल्या घरांतील स्त्रियांचा सल्ला वारंवार घेई. त्यानें यासाठीं आठवड्यांतून तीन दिवस मुक्रर केलेले असत. विचारविनिमयासाठीं स्त्रियांच्या सभा घेतल्या जात. या पुढच्या काळांत नूरजहान व जहान आरासारख्या राजकारणी स्त्रिया बऱ्याच प्रसिद्धीस आल्या.

मुसलमान समाजांत विशेषत: श्रीमंत घराण्यांत बहुपत्नीकत्वाची पद्धति सरसहा रूढ असे. परंतु सवतींचे संबंध प्रेमाचें असत. या पद्धतीच्या गुण-दोषांची त्यांना क्वचितच जाणीव होई. एकदरींत त्या सुखी व समाधानी होत्या. आपल्या पतीनें अधिक लग्नें केल्यामुळें आपल्या स्वाभिमानास अगर सामाजिक दर्जास बाध येतो अशी भावना त्यांच्यांत निर्माण होत नसे. उलट आपल्या पतीच्या ऐश्वर्यांत आपण सहभागी आहोंत यांतच त्या खूप असत. भारतांत आल्यावर मुसलमानी समाजाचा संस्कृतिदृष्ट्या अगदीं भिन्न अशा समाजाशीं

संबंध आला आणि कौतुकाची गोष्ट अशी कीं, भारतीय समाजांतील चांगल्या गोष्टी मुसल्मानी समाजानें बरोबर हेरल्या. विशेषतः हिंदु स्त्रियांची त्यागी व सेवावृत्ति त्यांना विलोभनीय वाटली. कालांतरानें हिंदी व मुसल्मान संस्कृतींचा सुंदर संगम होत गेला. असें संस्कृति-मीलन जगांतील इतर कोणत्याहि समाजांत आढळून येत नाहीं.

या ग्रंथाच्या मर्यादा लक्षांत घेऊन फक्त कांहीं नामवंत स्त्रियांची त्रोटक माहिती येथें देतां येईल. या सर्व राजघराण्यांतील होत्या. सर्वसामान्य जीवन जगणाऱ्यांतहि पुष्कळ अलौकिक स्त्रिया होऊन गेल्या असतील. परंतु आज त्यांच्याविषयीं कांहींच माहिती उपलब्ध नसल्यानें या ठिकाणीं त्यांच्याबद्दल कांहीं सांगतां येणार नाहीं. राजघराण्यांतील स्त्रियांव्यतिरिक्त इतर दोन-तीन स्त्रियांचा या ठिकाणीं उल्लेख केला आहे. या स्त्रियांनीं दिल्लीच्या सुल्तानशाहींत कामगिरी केली नाहीं, पण धर्म व अध्यात्म या दोन क्षेत्रांत काम करणाऱ्यांचें जीवन त्यांनीं घडविलें.

## राणी व युवराज्ञी

रझिया सुलतान :– ही अल्तमश राजाची मुलगी होती. रझिया ही एकच महिला अशी होती कीं जिला दिल्लीच्या गादीवर बसण्याचा मान मिळाला. ग्वाल्हेरच्या लढाईवरुन परत आल्यानंतर अल्तमशानें औपचारिकरीत्या ती राणी झाल्याचें जाहीर केलें. अनेक सरदारानीं रझियाला राज्यप्रमुख म्हणून मान देण्यास विरोध दर्शविला, पण अल्तमशानें आपला निर्णय बदलला नाहीं. रझियाचें फक्त कुराणावर प्रभुत्व होतें इतकेंच नव्हे तर तिला अनेक शास्त्रांचा परिचय होता. प्रशासनांत तर ती चांगलीच तरबेज होती. वडिलांबरोबर अनेक मोहिमांत तिनें प्रत्यक्ष भाग घेतल्यामुळें तिचें धैर्य निर्विवाद सिद्ध झालेलें होतें. फरिश्तानें तिजसंबंधीं असे उद्गार काढले आहेत कीं, नीरक्षीरविवेकबुद्धीच्या लोकांना रझिया स्त्री आहे या व्यतिरिक्त तिच्यांत राज्ञी म्हणून कोणतीच कमतरता दिसत नसे. राज्यकारभाराच्या अल्प कालानंतर तिचा जो दुःखद शेवट झाला त्यावरूनहि फरिश्ताचीच वाणी खरी ठरली.

इ. स. १२३६ त अल्तमश मरण पावला. कांहीं तुर्की सरदारांनीं त्यांची इच्छा झुगारून देऊन अल्तमशाचा मुलगा रुक्नुद्दिन फिरोजशहा याला

गादीवर बसविलें. त्याचा स्वभाव सौम्य पण मुखासीन असल्यानें आपली आई शाही तुर्कान् हिच्या हातीं कारभाराचीं सूत्रें देऊन तो चैनींत दिवस घालवूं लागला. शाही गुलाम घराण्यांतील एक महत्त्वाकांक्षी मुलगी होती. तिनें इतर राण्यांना पद्धतशीर रीतीनें छळण्यास सुरुवात केली. कांहींना तिनें ठार मारलें. अल्तमशचा सर्वांत धाकटा मुलगा सुल्तान कुतुबुद्दिन याचे डोळे फाडून त्याला तिनें आंधळे केलें. अशा प्रकारच्या पाशवी कृत्यांनीं सर्व सरदार चिडले व रुक्नुद्दिनला पदच्युत करून त्यांनीं दिल्लीच्या सुल्तानपदीं रझिया आल्याची घोषणा केली.

रझिया इ. स. १२३६ त गादीवर आली. पडद्यांतून बाहेर पडून वडिलांच्या राजवाड्यांत सर्व सरदारांची तिनें प्रकट सभा घेतली. पण रझिया-पुढें कठीण कामगिरी होती. शमसी सरदारांना ताब्यांत ठेवणें अल्तमशलाहि फार अवघड झालें होतें. त्यांनीं आतां उघड उघड रझियाला विरोध करण्यास सुरुवात केली. यांच्यापैकीं कांहीं जणांनीं तिच्याविरुद्ध बंड उभारलें. सर्वांच्या संयुक्त सैन्याशीं तिनें सामना दिला. या वेळीं औंधच्या मालिक नसिरुद्दिनला तिनें आपल्या मदतीस बोलाविलें. मालिकच्या सैन्यास वाटेंतच बंडखोरांनीं गांठून त्यांचा पराभव केला व मालिकला पकडलें. रझियानें शौर्याची शिकस्त करून बंडाचा बीमोड केला. या बंडखोरांपैकीं मालिक कूछीला पकडून तिनें जबर शिक्षा ठोठाविली. अल्लाउद्दिन शेरखानी याला ठार केलें व तिसरा सरदार सिरमॉरला पळून गेला. थोड्याच दिवसांनीं त्याचा अंत झाला.

हें बंड मोडल्यानंतर रझियाला थोडें स्वास्थ्य लाभलें. आतां प्रत्येक गोष्टींत स्वतः लक्ष घालण्यास तिनें सुरुवात केली. कारभार सुरळीत चालण्या-साठीं शमसी सरदारांचें महत्त्व कमी झालें पाहिजे ही गोष्ट तिनें हेरली होती. यासाठीं याकुब नांवाच्या एका ॲबिसीनियन् गुलामाला तिनें खूप संपत्ति देऊन अश्वशाळेचा प्रमुख म्हणून त्याची नेमणूक केली. शमसी सरदार व याकुब यांच्या-मध्यें चुरस निर्माण व्हावी हा तिचा हेतु यामुळें सिद्धीस गेला. पण यांतून एक अशी दुर्दैवी घटना घडली कीं, याकुबबाबत तिनें दाखविलेल्या कृपेची इतर सर्वच अमीरउमरावांना चीड आली. लाहोरच्या मालिक अझुद्दिन कबीरस्वामी या सरदारानें तर याबद्दल उघड उघड बंडच पुकारलें. पुन्हां एकदां रझियानें

आपलें शौर्य व प्रसंगावधान प्रकट करून या बंडाचा बीमोड केला. लागोपाठ भाटिंड्याचा मालिक अल्तुनीय यानें बंड उभारलें. त्याचा बीमोड करण्यासाठीं राणी गेली असतांना राजधानींत शमसींनीं संधि साधून याकुबचा खून केला. रझियाला एकनिष्ठ सेवक एकहि राहिला नाहीं. बंडखोर तुर्की सरदारांनीं रझियाला कैद करून भाटिंड्याच्या किल्ल्यांत ठेविलें, अल्तुनियाशीं तह केला आणि रझियाचा भाऊ बहराम शहा हा दिल्लीचा सुलतान झाल्याचें जाहीर केलें.

रझिया अजूनहि निराश झालेली नव्हती. अल्तुनियाचें मन तिनें आपल्या बाजूनें वळविलें. अल्तुनियाशीं लग्न करून या दोघांनीं आसपासच्या जमीनदारांचें सैन्य जमा केलें व दिल्लीवर स्वारी करण्यासाठीं तीं दोघें निघालीं. परंतु विरुद्ध बाजूचा सेनापति अल्तमशचा जांवई मलिक जलालुद्दिन बल्बन याचें सैन्य संख्येनें फार मोठें असल्यानें कैथल येथें झालेल्या घनघोर युद्धांत रझियाचा पूर्ण पराभव झाला. पतीला घेऊन ती भाटिंड्यास परत गेली. राज्य मिळविण्याचा शेवटचा आणखी एक प्रयत्न करून पहावा म्हणून तिनें सैन्याची जमवाजमव केली. दुर्दैवानें याहि वेळीं तिचा पराभव झाला. रणांगणांतून परत येत असतांना कांहीं जमीनदारांनीं त्या दोघांचा खून केला (इ. स. १२४०). अशा रीतीनें साडेतीन वर्षांत रझियाची कारकीर्द संपली. तिला जें अपयश आलें त्याला ती जबाबदार नसून तिचे सरदारच जबाबदार धरावे लागतील. खुश्रूनें असें म्हटलें आहे कीं, तिच्या अमदानींत तिची एकहि चूक कोणाला दाखवितां आली नाहीं. जुन्या दिल्लींत बुल्बुलीखाना या ठिकाणीं तिची एक छोटीशी कबर बांधलेली आहे. भारताच्या या थोर व कर्तृत्ववान् कन्येची एवढीच स्मृति पुढील पिढ्यांनीं जतन करून ठेवली आहे.

**गुलबदन बेगमः**—बाबराची पत्नी दिल्दार बेगम हिला इ. स. १५२५ मध्यें झालेली कन्या म्हणजेच गुलबदन बेगम. हुमायुनाची आई राणी माहम बेगम हिनें गुलबदनला सांभाळली होती. तिचें बालपण व तारुण्य राजकीय धामधुमींत प्रथम उत्तर हिंदुस्थान व नंतर काबुलांत गेलें असले तरी तिला उत्तम प्रकारचें शिक्षण मिळालें होतें. हिचा विवाह खिद्र ख्वाज याच्याशीं झाला

होता. गुलबदनची एकुलती एक कन्या रुकय्य सुल्तान हिचा विवाह अकबर बादशाहाशीं झाला. पतीच्या विरोधास न जुमानतां गुलबदननें अतिशय कठीण अशा मक्केच्या यात्रेस इ. स. १५७५ त सुरवात केली. मक्केस पोंचण्यास तिला दोन वर्षें लागलीं. हिजसूला तीन वर्षें राहून तिनें खूप दानधर्म केला. पुन्हां तो खडतर प्रवास करून ती सुखरूप परत आली. यानंतरचें सर्व आयुष्य तिनें परमेश्वरचिंतनांत व परोपकारांत व्यतित केलें व वयाच्या ऐंशीव्या वर्षी ती मृत्यु पावली. अकबर व त्याची आई हीं दोघें महत्त्वाच्या सर्व प्रश्नांवर नेहमीं तिचा सल्ला घेत. तिच्या अंतिम यात्रेस अकबर फक्त हजरच राहिला नाहीं तर त्यानें स्वतः शवपेटिकेस खांदाहि दिला.

गुलबदन बेगमनें हुमायूनच्या कारकीर्दीवर आधारित लिहिलेला हुमायुननामा या नांवाचा एक ग्रंथ नुकताच सांपडला आहे. या ग्रथाची पर्शियन भाषा अगदीं सोपी असून त्यांत तुर्की शब्दांचें बरेंच मिश्रण झालेलें आहे. वाङ्मयाच्या दृष्टीनें नव्हे, पण हुमायुनाच्या कौटुंबिक जीवनाचें यथातथ्य चित्र रेखाटणारी कृति या दृष्टीनें या ग्रंथाचें महत्त्व फार आहे. गुलबदन एक प्रतिभावंत कवयित्री होती. पण दुर्दैवानें तिचें एकहि काव्य आज उपलब्ध नाहीं.

**नूरजहान बेगमः**–एका पर्शियन सरदाराची ही मुलगी बापाची फार लाडकी होती. दिल्लीची सर्वश्रेष्ठ राणी होण्याचा मान तिला लाभला. नूरजहानची शृंगारिक जीवनकथा अतिशय चित्तथरारक आहे. तिचा बाप मिर्झा गयास बेग हा एका नामवंत पर्शियन कुलांतील होता. दुर्दैवानें या कुटुंबाची स्थिति इतकी खालावली कीं, पर्शियात स्वाभिमानाचें जीवन जगणें त्यास अशक्य झालें. मलिक मसूद या नांवाचा एक श्रीमान् व्यापारी आपला माल या वेळीं भारताकडे पाठविण्याच्या बेतांत होता. या व्यापारी तांड्याबरोबर मिर्झा आपल्या पत्नीला व मुलांना घेऊन भारतांत येण्यास निघाला. तो आग्र्यास येऊन पोंचला. त्या वेळीं अकबर बादशहा होता. मलिकच्या ओळखीनें मिर्झा व त्याचे दोन मुलगे अकबरानें नोकरीस लावून घेतले. छोटी नूरजहान आपल्या आईबरोबर वारंवार राजवाड्यांत जाई. हळूं हळूं ती तेथील सर्व स्त्रियांची अतिशय आवडती झाली.

राजवाड्यातील बागेंत युवराज सलीमशीं ( जहांगीर ) तिची झालेली

भेट, त्या वेळीं तिच्या चातुर्याची व सौंदर्याची त्याच्यावर पडलेली मोहिनी व त्यानें तिच्याशींच लग्न करण्याचा धरलेला हट्ट, या सर्व घटना ऐतिहासिक दृष्टीनें खऱ्या असतील अगर नसतील, पण एवढें खरें कीं, नूरजहानच्या सौंदर्याची व चुणचुणीतपणाची छाप इतरांप्रमाणें जहांगीरवरहि प्रथमपासूनच पडली असावी. वयाच्या सतराव्या वर्षी तिचा विवाह अली कुलीखान ऊर्फ शेर अफगाणखान या बरद्वानच्या राज्यपालाशीं झाला व कांहीं काल ती जहांगीरच्या आयुष्यांतून दूर गेली. इ. स. १६०५ मध्यें जहांगीर गादीवर आल्यावर त्या दोघांना एकत्र येण्याचा पुन्हां योग आला. शेर अफगाणखान जहांगीरविरुद्ध कट करीत असल्याचा त्याला संशय येतांच आपला भाऊ कुतुबुद्दिन (बंगालचा राज्यपाल) याला त्यानें शेर अफगाणखानास दिल्लीस पाठवून देण्यास सांगितलें. कुतुबुद्दिन बरद्वानजवळ येतांच शेर अफगाणखान त्याच्या भेटीस गेला. आपल्याभोंवतीं सैन्याचा गराडा पडलेला पाहतांच रागानें शेर अफगाणखानानें कुतुबुद्दिनावर तलवारीनें वार केला. हें पाहतांच कुतुबुद्दिनाच्या सैनिकांनीं हल्ला करून शेर अफगाणखानास ठार केलें व नूरजहानला कैद करून जहांगीरपुढें उभें करण्यांत आलें.

या घटनेनंतर सुमारें चार वर्षांनीं नूरजहानचा वयाच्या चौतिसाव्या वर्षी जहांगीरशीं विवाह झाला. प्रथम तिला 'नूर महाल' (राजवाड्यांतील प्रकाश) हा किताब देण्यांत आला व नंतर 'नूर जहान' (जगाचा प्रकाश) हें अभिधान तिला प्राप्त झालें. आतां तिच्या कर्तृत्वाला फार मोठें क्षेत्र मिळालें. खाद्य पदार्थांच्या निरनिराळ्या तऱ्हा शोधून काढण्यापासून तों वेगवेगळ्या शस्त्रांचा वापर करण्यापर्यंत अनेक क्षेत्रांत तिनें आपल्या बुद्धीची चमक दाखविली. एवढ्या मोठ्या साम्राज्याचा कारभार सुमारें अकरा वर्षे तिनें अतिशय चातुर्यानें केला. जहांगीरवर तिची विलक्षण छाप असल्यामुळें तिच्या सल्ल्यावांचून तो एकहि महत्त्वाची गोष्ट करीत नसे. पतीच्या मनावर पत्नीची एवढी छाप असल्याचें दुसरें उदाहरण भारतीय इतिहासांत क्वचितच आढळेल. राज्यांतील कारभारविषयक सर्व कामें नूरजहानकडे सोंपवून जहांगीर आरामांत राही. सर्व महत्त्वाचीं फरमानें हिच्याच सहीनें निघत. नाण्यांवर तिचीच मुद्रा असे. यासंबंधीं अशी एक हकीकत सांगतात कीं, नूरजहानची मुद्रा असलेल्या सुवर्णाच्या नाण्याची किंमत सर्वश्रेष्ठ मानावी असा जहांगीरचा हुकुम

असे. नूरजहान राणी झाल्यावर तिच्या बापाला मोठ्या हुद्दयाची जागा मिळाली. तो मुख्य मंत्री झाला. 'इतिमादउद्दौला' हा बहुमानाचा किताब त्याला देण्यांत आला. नूरजहानच्या भावांनाहि हुद्दयाच्या जागा देण्यांत आल्या.

इतिहास आणि दंतकथा यांची नूरजहानच्या चरित्रांत फार मिसळ झाली आहे. गुलाबाचें अत्तर तिनें शोधून काढलें असें सांगतात. खरें पाहतां या कल्पनेचें श्रेय तिच्या आईस द्यावयास हवें. राजा बरोबर असतांना एकदां नूरजहाननें बंदूक व भाल्याच्या साहाय्यानें चार वाघ मारले. तें पाहून जहांगीर फार खूष झाला. त्यानें तिला एक लाख रुपये किंमतीची हिऱ्याची अंगठी दिली व गोरगरिबांना हजार मोहरा वाटल्या. तिनें अशाच एका वेळीं सहज सोडलेल्या बाणामुळें एक धोबी मारला गेला. त्याची पत्नी जहांगीरकडे नूरजहानविरुद्ध तक्रार घेऊन गेली असतां जहांगीरनें पत्नीची एखाद्या सामान्य कैद्यासारखी जाहीर चौकशी कशी केली यासंबंधींची कथा सर्वश्रुत असल्यानें तिची येथें पुनरुक्ति करण्याची आवश्यकता नाहीं.

एवढ्या बलाढ्य साम्राज्याच्या राणीचीं शेवटचीं वर्षें मात्र सुखांत गेलीं नाहींत. जहांगीरचा ज्येष्ठ पुत्र शहाजहान (खुर्रम) हा वास्तविक पाहतां गादीचा कायदेशीर वारस होता. शहाजहानची पत्नी मुमताजमहाल हिचा बाप आसफखान याचा शहाजहानला जोरदार पाठिंबा होता. परंतु खुर्रम गादीवर आल्यावर आपलें महत्त्व पूर्वीप्रमाणें राहणार नाहीं या कल्पनेनें त्याला राज्य देणें नूरजहानला पटेना. तिचा सर्वांत लहान मुलगा शहारियार हा गादीवर यावा अशी तिची इच्छा होती. आपल्या प्रथम पतीपासून झालेल्या मुलीचा विवाह तिनें शहारियारशीं लावून दिला. शहारियार आपल्या मुठींत राहील अशी तिची खात्री होती. खुर्रमला नूरजहानच्या या बेताचा सुगावा लागतांच त्यानें बंड केलें. पण काबूलचा राज्यपाल महाबतखान याच्या मदतीनें राणीनें हें बंड मोडून काढलें. पुढें महाबतखानाबद्दलच जहांगीरला शंका आल्यामुळें त्यानें त्याला भेटीस बोलाविलें. या वेळीं जहांगीर काबूलला निघाला होता. राजाचा मुक्काम झेलमच्या तीरावर असतांना अचानक महाबतखाननें त्याच्याभोंवती निवडक रजपूत सैनिकांचा गराडा घालून त्यास पकडलें. नूरजहाननें मोठ्या शिताफीनें आपली सुटका करून घेतली. परंतु राजाची

सुटका तिला करतां आली नाहीं. स्वतः हत्तीवर स्वार होऊन तिनें महाबतखानावर निकराचा हल्ला केला. पण शेवटीं ती स्वतःच पकडली गेली. स्त्रीसुलभ युक्तीनें शक्तीवर मात केली. राजाराणी कैदेंतून सुटून पळाली, पण जहांगीर यानंतर फार दिवस जगला नाहीं. दारूच्या व्यसनामुळें त्याचें शरीर जर्जर झालेलें होतें. काश्मीरहून लाहोरला येतांना वाटेंतच तो इ. स. १६२७ मध्यें मरण पावला. नूरजहाननें स्वतः तयार केलेल्या बागेंत राजाची कबर बांधण्यांत आली. शहादरा या लाहोरच्या विभागांत असलेली ही कबर म्हणजे मुसलमानी स्थापत्यकलेचा एक उत्कृष्ट नमुना आहे.

जहांगीर बादशहाच्या मृत्यूनंतरचें नूरजहानचें जीवन एकाकी पण स्वास्थ्याचें गेलें. गत आयुष्यातील ऐश्वर्याच्या व सुखाच्या क्षणांचीं स्मृतिचित्रें रंगवीत बसणें हा या काळांतील तिचा आवडता छंद होता. शहाजहाननें पूर्वीचा कडवटपणा न ठेवतां नूरजहानला सन्मानानें वागविलें. पतीमागें नूरजहान एकोणीस वर्षे जगली. वयाच्या ७२ व्या वर्षी इ. स. १६४६ मध्यें ती मृत्यु पावली. जहांगीरच्या जवळच तिची एक छोटीशी कबर आज दिसते. एवढ्या मोठ्या कर्तृत्ववान् महिलेच्या स्मृतीविषयीं पुढील पिढ्या किती बेफिकीर व उदासीन आहेत, त्याची कल्पना या कबरीवरून करतां येते. कबरीवरचा बोलका लेख नूरजहानच्या मरणसमयींच्या मनःस्थितीची यथातथ्य कल्पना देतो. या लेखांत ती म्हणते—

"आमच्या कबरीवर गुलाब फुलणार नाहीं, कोकीळ येथें बसून अधूनमधून गायन करणार नाहीं, एकहि स्नेहदीप ह्या कबरी उजळून काढणार नाहीं, त्यामुळें एखादा पतंग आपले पंख जाळून घेईल अशीहि शक्यता नाहीं."

असें असलें तरी नूरजहान हजारों भारतीयांच्या स्मृतींत चिरंतन राहील. तिचें अनुपम सौंदर्य आणि त्या वेळच्या अनेक पुरुषोत्तमांच्या मनांवर तिनें पाडलेली छाप या दोन गोष्टी तिच्या अद्वितीयत्वाची साक्ष देण्यास पुरेशा आहेत.

**जहान आरा बेगम :**– ( इ. स. १६१३ ते १६८१ ) बादशहा शहाजहान व मुमताजमहाल यांची जहान आरा ही मुलगी. सौंदर्य व बुद्धिमत्ता यांचा सुरेख संगम जहान आरांत झालेला होता. आईच्या मृत्यूनंतर वडील

हिच्या शब्दाबाहेर जात नसत. सर्व मुसल्मान महिलांत 'बेगमसाहिबा' हा सन्मानदर्शक किताब फक्त जहान आरालाच दिला गेला. जहान आराचें यद्‌येक आयुष्य दुःखी बापाच्या व महत्त्वाकांक्षी भावांच्या सेवेंत गेलें तरीमुद्धां ती गोरगरिबांना कधीं विसरली नाहीं. तिच्या संपत्तीचा बराच मोठा भाग गरीब मुलींना लग्नांत हुंडा देण्यासाठीं व सेवानिवृत्त सेवकांस मदत करण्यासाठीं राखून ठेवलेला असे. तिचा भाऊ दारा शुकूहप्रमाणें तिचा कल प्रतीतिवादाकडे होता. लहानपणापासूनच साधू-संतांच्या जीवनाबद्दल तिला विलक्षण ओढ वाटे. विशेषतः ख्वाजा मुईउद्दीन याच्या जीवनाचा तिनें जिव्हाळ्यानें अभ्यास केला होता. तिच्या आदराचें प्रतीक म्हणून तिनें मुईउद्दीनच्या कबरीसमोर एक मोठा शोभिवंत सभामंडप बांधला. कांहीं संतांच्या जीवनावर टिप्पणीवजा लिखाण करून तें 'मूनीस् अल-अर्वाह्' या नांवानें तिनें गृहीत केलें. या कार्याचा सर्वांनीं अतिशय गौरव केला. इतर अनेक मुसलमान युवराज्ञींप्रमाणें जहान आराहि अविवाहित राहिली. तिला मुलें भारी आवडत. दाराची मुलगी जहान झिन् बेगम हिचें संगोपन करून तिचा, औरंगजेबाचा मुलगा आझमबरोबर जहान आरानें मोठ्या थाटानें विवाह केला. इ. स. १६४४ मध्यें तिच्या एकतिसाव्या वाढदिवसानिमित्त उत्सव चालू असता तिच्या सुगंधी कपड्यांनीं अचानक पेट घेतला. ती बरीच भाजली. तिची प्रकृति सुधारेपर्यंत शहाजहान अतिशय चिंतातुर असे. शहाजहानचें आपल्या कन्येवरील निरतिशय प्रेम व जहान आराची पितृनिष्ठा ही मोंगल इतिहासांतील एक चिरस्मरणीय घटना आहे.

दारा व त्याचे भाऊ यांच्यांत राज्यासाठीं यादवी सुरू झाली तेव्हां जहान आरानें दाराचें जोरदार समर्थन केलें व औरंगजेबानें मोठ्या भावाच्या कायदेशीर हक्कांवर गदा आणूं नये असें त्यास परोपरीनें सांगितलें. पण आपल्या पाशवी सामर्थ्याच्या जोरावर औरंगजेब विजयी झाला व त्यानें आपल्या वृद्ध पित्यास आग्र्याच्या किल्ल्यांत बंदिस्त करून ठेवलें. जहान आराला त्यानें 'बादशहा बेगम' हा बहुमानाचा किताब व वार्षिक सतरा लाख रुपयांची जहागीर देऊं केली. परंतु तिचें मन सर्व राजकारणास विटलें होतें. शेवटपर्यंत ती आपल्या पित्याची सेवा करीत त्याच्याजवळच राहिली. शहाजहान इ. स. १६६६ सालीं मरण पावला व त्याच्यामागून सोळा वर्षांनीं वयाच्या सत्त-

राव्या वर्षी जहान आरा मरण पावली. मरणसमयीं तिची जिंदगी तीन कोटि रुपये भरली. ही सर्वच्या सर्व रक्कम ख्वाजा मोईउद्दीनच्या स्मारकासाठीं खर्च करावी अशी तिची इच्छा होती. परंतु धर्मकार्यासाठीं त्या वेळच्या नियमाप्रमाणें एक तृतीयांश म्हणजे एक कोटि रुपये, औरंगजेबानें मंजूर केले. निझामुद्दिन अवलियाच्या स्मारकाच्या आवारांत तिनें स्वतःच एक सुंदर नक्षीकाम केलेली स्फटिकाची खोली बांधवून घेतली होती. त्या ठिकाणीं तिचे अवशेष पुरण्यांत आले. "माझ्या कबरीवर हिरवळ वाढो. कोणाहि मर्त्य माणसाच्या दृष्टीपासून दूर राहण्यासाठीं हें हिरवळीचें आच्छादन पुरेसें आहे." असा मजकूर कबरीवर लिहिलेला आहे.

मोठमोठ्या कलाकुसरपूर्ण इमारती बांधणें व उद्यानें तयार करणें याचा वडिलांप्रमाणेंच जहान आराला फार शौक होता. आग्र्याची जामी मशीद हा तिनें बांधून घेतलेला उत्कृष्ट इमारतीचा एक नमुना आहे. दुसरी एक अशीच कलापूर्ण मशीद काश्मीरमध्ये तिनें बांधविली आहे. दिल्लींतील व आग्र्यांतील अनेक उद्यानें हीं तिच्याच कल्पकतेचीं प्रतीकें आहेत.

झीबुन्निसा :— सर्व नामवंत मोंगल युवराज्ञींत व राज्ञींत औरंगजेबाची मुलगी झीबुन्निसा हिचा नंबर पहिला लावला तरी गैर ठरणार नाहीं. तिचें सौंदर्य तर अप्रतिम होतेंच, पण त्याहीपेक्षां तिची बुद्धिमत्ता व कलात्मक दृष्टि असामान्य होती. तिच्यामुळेंच औरंगजेबाच्या दरबारांत अनेक लेखकांना, कवींना व शास्त्रज्ञांना मानाचें स्थान प्राप्त झालें. ल्हानपणींच तिनें सर्व कुराण तोंडपाठ केलें होतें. अरेबिक व पर्शियन भाषांवरील तिचें प्रभुत्व वाखाणण्यासारखें होतें. अनेक शास्त्रांचाहि तिनें सखोल अभ्यास केला होता. उत्कृष्ट हस्ताक्षराचें तंत्र तिनें अभ्यासलें होतें. 'दिवाण-इ-आखफी' या शीर्षकाखालीं तिचा एक काव्यसंग्रह प्रसिद्ध आहे. तिच्या प्रोत्साहनानें त्या काळच्या अनेक कवींनीं आपलें काव्य प्रकाशित करून तें तिला अर्पण केलें आहे. तिच्या संग्रहीं अनेक अमूल्य ग्रंथ होते. दिवसाचा बहुतेक वेळ ती वाचन-लेखनांत घालवी. घराण्याच्या प्रथेनुसार ती अविवाहित राहिलेली होती. परंतु तिचें चारित्र्य अत्यंत विशुद्ध व निष्पाप होतें. झीबुन्निसा इ. स. १७०१-१७०२ या सुमारास मृत्यु पावली. दुर्दैवानें तिच्या कबरीची निश्चित जागा आजपर्यंत कोणालाच ठरवितां आलेली नाहीं.

## धर्माचरणी महिला

**बीबी फातिमा साम**:– मोंगल साम्राज्यशाहींत एकीकडे तृष्णा, खून, रक्तपात यानीं सामान्य जनाला हैराण केलेलें होतें तर दुसरीकडे एकनिष्ठ भक्तमंडळी या लोकांना धर्म म्हणजेच नीतिप्रधान पारमार्थिक समाधानाचा मार्ग दाखविण्यासाठीं अहोरात्र झटत होती. या संत मंडळींत बीबी फातिमा साम हिचें नांव प्राधान्यानें आढळतें. सुप्रसिद्ध महंत निझामुद्दिन अवलिया याच्या संप्रदायांत फातिमाचा अत्यंत आदरपूर्वक उल्लेख वारंवार केला जातो. फरिदुद्दिन गंजशकर व नजिबुद्दिन अल्-मुतवक्किल् या दोघां बंधूंनी हिला आपली बहीण मानलेली होती. फातिमा कवयित्री होती. पर्शियन भाषेंत तिनें कांहीं चांगलीं काव्यें रचलीं आहेत. 'अखबार-अल्-अखयार्' या ग्रंथाच्या कर्त्यानें तिच्या कवितेंतील दोन पंक्ति उद्धृत केल्या आहेत. त्यांचा आशय असा आहे–" तूं भक्ति आणि जीवन दोन्हींची अपेक्षा करतोस, पण कोणालाहि या दोन्ही गोष्टी प्राप्त होऊं शकत नाहींत." शुद्ध चारित्र्यावर तिचा फार भर असे. ती म्हणे, " दहा हजार उपवास आणि प्रार्थना करणाऱ्यापेक्षां भाकरीचा तुकडा व पेलाभर पाणी देणाऱ्यावर लोक अधिक खुष होतात आणि त्याला सर्व ऐहिक व पारमार्थिक सुखें प्राप्त होवोत असे तोंडभर आशीर्वाद देतात."

जुन्या दिल्लींत एके काळीं जेथें गुरांचा बाजार भरे तेथें बीबी फातिमाची एक छोटीशी कबर बांधलेली आहे. फातिमाला बीबी शाम विविसाइम असेंहि संबोधण्यात येतें. फातिमाच्या हयातींत तिची व निजामुद्दिन अवलियाची गांठ पडली होती. त्याच्यावर तिच्या व्यक्तिमत्त्वाची अतिशय छाप पडली असें त्यानें नमूद करून ठेवलें आहे.

**बिबी झलिखा**:– सुप्रसिद्ध महंत निझामुद्दिन अवलिया याला साधक बनविण्याचें श्रेय त्याची आई बिबी झलिखा हिलाच प्रामुख्यानें द्यावें लागेल. बूदान येथील लहानशा घरांत आपल्या मुलाला घेऊन तिनें अतिशय कष्टांत दिवस काढले. मुलाचें शिक्षण व संगोपन नीट व्हावें यासाठीं ती रात्रंदिवस कष्ट करी. या दोघा मायलेकरांसंबंधीं एक कथा उपलब्ध आहे तीवरून मुलाचा आईच्या आध्यात्मिक बळाविषयींचा विश्वास व आईचें मुलावरील निरतिशय प्रेम या दोन्ही गोष्टी समजून येतात. अल्लाउद्दिन खिल्जीनंतर त्याचा दुर्व्यसनी

व दुराचरणी पुत्र कुतुबुद्दिन मुबारक हा दिल्लीच्या गादीवर आला. निझामुद्दिनच्या स्वाभिमानी स्वभावामुळें कुतुबुद्दिनास त्याचा फार राग येई. त्यानें असा हुकूम सोडला कीं, पुढच्या महिन्याच्या पहिल्या रात्रीं निझामुद्दिननें राजासमोर हजर झालें पाहिजे. स्वेच्छेनें तो न आल्यास बळजबरीनें त्याला आणण्यांत येईल. प्रत्येक महिन्याच्या सुरवातीच्या दिवशीं आईच्या दर्शनास जाण्याचा निझामुद्दिनचा नियम असे. कुतुबुद्दिनचा हुकूम ऐकतांच त्याला वाटलें, "पुढली भेट ही आपल्या आयुष्यांतील मातेच्या दर्शनाची शेवटची वेळ ठरणार." ठरल्या वेळीं निझामुद्दिन मातेच्या दर्शनास गेला व तिला म्हणाला, "यापुढें तुझे पाय मला कायमचेच अंतरणार." यावर तिनें उत्तर दिलें, "तूं मुळींच घाबरूं नकोस. कांहींहि अशुभ घडणार नाहीं." योगायोग असा कीं, निझामुद्दिनच्या जिवाला अपाय करावयास निघालेल्या कुतुबुद्दिनाचा त्याच रात्रीं खून झाला व निझामुद्दिनवरील संकट टळलें. नंतर पुढील महिन्यांत नेहमींप्रमाणें मातेच्या दर्शनास गेलेल्या निझामुद्दिनास आईनें विचारलें, "यापुढें तूं कोणाच्या पायाचें दर्शन घेशील?" आई स्वतःच्या मरणाचा उल्लेख करीत असलेली पाहून निझामुद्दिन दुःखी झाला. "मला कोणाच्या हवालीं करून तूं जाणार?" असें त्यानें सद्गदित कंठानें आईस विचारलें. आई उत्तरली, "आजची रात्र तूं आपल्या मावाजवळ रहा. उद्यां सकाळीं मी तुझ्या प्रश्नाचें उत्तर देईन." सर्व रात्र अतिशय अस्वस्थतेंत घालवून पहाट झाल्याबरोबर निझामुद्दिन आईच्या बिछान्याजवळ गेला. त्याचा हात आपल्या क्षीण हातांत घेऊन ती म्हणाली, "परमेश्वरा, माझ्या या पुत्राला मी तुझ्या स्वाधीन करीत आहें." यानंतर लगेच तिचें प्राणोत्क्रमण झालें. या शेवटच्या प्रसंगाचा निझामुद्दिनवर अतिशय परिणाम झाला. पुढच्या सर्व आयुष्यांत जेव्हां जेव्हां त्याच्यावर संकटें आलीं तेव्हां तेव्हां आईच्या या शब्दांनीच त्याच्या मनास धीर येई व तो त्यांतून निभावून जाई. झलिखाचा मृत देह तिच्या मुलाच्या घरात दिल्लींतील घयासपूर या भागांत पुरण्यांत आला.

## शूर महिला

**चांदबिबी** :– (इ. स. १५४७ ते १५९९) सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धांत सर्व मुसलमानी समाजात चांदबिबी आघाडीवर होती असें म्हटल्यास अयोग्य ठरणार नाहीं. अहमदनगरच्या हुसेन निझामशाहाची ही कन्या इ. स.

१५४७ मध्यें जन्मली व विजापूरचा अली अदीलशहा याच्याशीं तिचा विवाह झाला. विजयनगरच्या राजाशीं सामना देण्यासाठीं अहमदनगर व विजापूरचे राजे कांहीं काल मित्र बनले होते. सोलापूरचा किल्ला त्यांत बापानें चांदबिबीला हुंडा म्हणून दिला होता. त्याचा पुढें तिच्या नवऱ्याला खूप उपयोग झाला. तिची कुशाग्र बुद्धिमत्ता पाहून अली अदीलशहा प्रत्येक महत्त्वाच्या प्रश्नांत तिचा सल्ला घेई. सैन्याची पाहणी करण्यासाठीं पतीबरोबर चांदबिबी घोड्यावरून नेहमीं जाई. त्याचप्रमाणें तो कोणत्याहि मोहिमेवर निघाला तरी त्याजबरोबर राहून ती त्याला मदत करी. इ. स. १५८० मध्यें एका सेवकानें अली अदील-शहाचा खून केला. त्याच्यामागून त्याचा अल्पवयी पुतण्या इब्राहिम अदील-शहा हा गादीवर आला. त्याची पालक म्हणून चांदबिबी सर्व कारभार पाहूं लागली. दक्षिणेकडील एक उमराव कमीलखान हा तिचा मुख्य मंत्री बनला. युवराजाचें शिक्षण व राज्यांतील सुधारणा याकडे यापुढील कांहीं वर्षें राणीनें खूप लक्ष पुरविलें.

चांदबिबीच्या वाढत्या लोकप्रियतेचा हळूहळू कमीलखानास मत्सर वाटूं लागला. त्यामुळें नाइलाजानें त्याला दूर करणें तिला भाग पडलें. कीश्वर-खान नांवाच्या उमरावाच्या साहाय्यानें तिनें कमीलखानास पदच्युत केलें व कीश्वरखानास मुख्य प्रधान नेमलें. यानेंहि चांदबिबीशीं विश्वासघात केला व सर्व सत्ता बळकाविण्याचा प्रयत्न केला. आणखी कांहीं सरदारांचीं मनें वळवून सर्वांनीं मिळून चांदबीबीस विजापूर सोडून जाण्यास सांगितलें. या गोष्टीला तिनें नकार देतांच तिला गुलाम सेविकांच्या साहाय्यानें राजवाड्याबाहेर काढून बळेंच पालखींत घालून साताऱ्याच्या किल्ल्यांत कैद करून ठेवण्यांत आलें. परंतु सर्वांना या कृत्याचा पश्चात्ताप होऊन चांदबिबीस मुक्त करण्यांत आलें. कीश्वरखानाचा पाठलाग सुरू झाल्याबरोबर तो गोवळकोंड्यास गेला व तेथेंच मारला गेला. कैदेंतून सुटून आल्यानंतर चांदबीबीनें इखलासखान नांवाच्या ॲबिसीनिअन् सरदारास आपला मुख्य प्रधान नेमलें. चांदबिबी इतर प्रान्तीय लोकांना जास्त सवलती देई. म्हणून इखलासखानास राग येऊं लागला. त्यानें कट करून अफझलखान शिराझी व एक ब्राह्मण प्रधान पंडित रासू यांचे खून केले. तावडतोब चांदबिबीनें ऐनुल मुल्कच्या मदतीनें इखलासखानास कैदेंत टाकलें. कांहीं वर्षांनीं त्याला मोकळें केल्यानंतर गोवळकोंड्याच्या कुतुब-

शाहीविरुद्ध त्यानें अनेक लढाया जिंकून मोठा पराक्रम गाजविला. चांदबिबीनें सतत परिश्रम करूनहि विजापूर व अहमदनगर विभागांत अतिशय अनवस्था माजत चालली होती. याचें मुख्य कारण दक्षिणी व ॲबिसीनियन् सरदारांतील भांडणें होत. या भांडणांचा शेवट अहमदनगरचा राजा इब्राहिम निझामशाहा याचा खून होण्यांत झाला. चांदबिबीच्या इच्छेला न जुमानतां मिआन मंझू या नांवाच्या सरदारानें अहमदनगरला अहमदशाहा नांवाच्या तरुण राजपुत्रास गादीवर बसविलें. दुःखित अंतःकरणानें चांदबिबीनें विजापूरचा रस्ता धरला. मंझूला स्वतःसंबंधीं असुरक्षितता वाटूं लागल्यामुळें त्यानें मुरादची मदत मागितली. मुराद् आपली अफाट सेना घेऊन लगेच गुजरायेतून निघून अहमदनगरला आला. आतां मंझूला आपली चूक उमगली. तो चांदबिबीला शरण गेला व तिनें येऊन अहमदनगरचें रक्षण करावें अशी त्यानें तिला विनंती केली. या वेळीं वयोमानानुसार तिची प्रकृति खूप खालावली असून सुद्धां ती आपल्या मायदेशाच्या रक्षणार्थ धावली. मोठ्या चातुर्यानें व हिकमतीनें तिनें मुरादला व त्याचा उजवा हात खान-इ-खानान यास बरेच महिने थोपवून शेवटीं त्यांना वेढा उठविण्यास तिनें भाग पाडलें. वेढा उठविण्यापूर्वी मुरादच्या सैन्यानें तटाला एक मोठें भगदाड पाडलें. हें समजतांच कांहीं निवडक सैनिक बरोबर घेऊन स्वतः हातांत तलवार घेऊन चांदबिबी बाहेर आली व रातोरात तिनें तटाची भिंत बांधवून घेतली. तिचें हें धाडसी कृत्य पाहून मुराद तिच्या शौर्यावर खूष झाला व त्यानें तिला 'चाद सुलतान' हा किताब बहाल केला. अहमदनगरपर्यंत येण्याबद्दल त्यानें वऱ्हाड हा प्रान्त चादबिबीकडून बक्षिस घेऊन अहमदनगर सोडलें.

इतकी धडपड करूनहि अहमदनगरमधील अंतर्गत यादवी चालूच राहिली. पुढें अकबर जेव्हां वऱ्हाडपुरास आला तेव्हां त्यानें परिस्थिति बरोबर हेरून आपला मुलगा दानिअल याला खान-ई-खानानबरोबर अहमदनगर जिंकण्यास पाठविलें. अकबराच्या बलाढ्य फौजेबरोबर या वेळीं मुकाबला करणें अशक्य आहे हें चादबिबीस समजून आलें. म्हणून दानिअलशीं सन्माननीय तह घडवून आणण्याचा आपला बेत तिनें जीतखान नांवाच्या एका सरदाराजवळ बोलून दाखविला. हा देशद्रोह होईल अशा कल्पनेनें काहीं सरदारांनीं चांदबिबीस पकडून तिला देहान्त शासन केलें (इ. स. १५९९). आपलें

स्वातंत्र्य टिकविण्यासाठीं जी आपल्या हयातींत प्राणपणानें झगडली, त्या शूर राणीला तिच्या प्रजाजनांच्या हातून असा मृत्यु आला. शेवटीं दानिअलनें स्वारी करून सर्व अहमदनगर बेचिराग करून टाकलें. चांदबिबी हा सर्वनाश बघण्यास वांचली नाहीं हें तिचें एकपरी सुदैवच म्हणावें लागेल.

पुढील पिढ्यांतील इतिहासकारांनीं चांदबिबीचा भरपूर गौरव केला आणि तो सर्वथैव योग्य असाच आहे. ती फक्त राजकारणपटु प्रशासक होती असें नाहीं तर अरबी व पर्शियन भाषेवर तिचें चांगलें प्रभुत्व होतें. दक्षिण भारतांतील अनेक भाषा ती अस्खलित बोले. विद्वानांची चाहती व परदेशांतून भारतांत नशीब काढण्यासाठीं आलेल्यांची पाठीराखी अशी तिची चोहीकडे कीर्ति पसरलेली होती. तिचा शेवट जरी दुःखद झाला तरी तिची हयात चांगली गेली. तिला खरें मोठें दुःख एकच होतें व तें म्हणजे तिला स्वतःला मूलबाळ नव्हतें.

साहिबजीः— शहाजहानच्या पदरीं असलेल्या अलीमर्दानखानाच्या मुलीचें टोपण नाव साहिबजी असें पडलें होतें. अली प्रथम लाहोरचा व नंतर काश्मीरचा राज्यपाल म्हणून काम पहात असे. साहिबजीचा पति अमीरखान याची राज्यपाल म्हणून औरंगजेबानें इ. स. १६७८ मध्यें नेमणूक केली. या वेळीं या प्रान्तांत खूप बंडाळी व अस्थिरता माजलेली होती. अमीरखानानें आपल्या कुशल व तडजोडीच्या धोरणानें शान्तता प्रस्थापित केली. अफगाण लोकांवर त्याची अशी छाप होती कीं त्याच्या वीस वर्षांच्या दीर्घ कारकीर्दींत या भागांत एकदाहि बंडाळी झाली नाहीं. अमीरखानाच्या या यशाचा मोठा वांटा साहिबजीस द्यावा लागेल. ती अतिशय समयसूचक व कल्पक होती. अमीरखान बऱ्याच वेळां तिचा सल्ला प्रमाण मानीत असे. अमीरखान मेल्यानंतर वायव्य सरहद्दीचें रक्षण कसें होईल अशी बादशहास काळजी पडली. या वेळीं त्याच्या अशादिखान नांवाच्या एका निकटवर्ती अधिकाऱ्यानें असे उद्गार काढले, " महाराज, अमीरखान गेला असेल, पण त्याची पत्नी साहिबजी हयात असेपर्यंत वायव्य सरहद्द प्रान्ताच्या रक्षणाची चिंता करण्याचें बिलकुल कारण नाहीं. " या उद्गारानुसार शहा अल्म येऊन कारभाराचा ताबा घेईपर्यंत हिनें सर्व व्यवस्था चोख ठेवली. अमीरखान मेला

तेव्हां त्याचे सैनिक सर्व काबूल मार्गांत विखुरलेले होते. कडव्या अफगाणांनीं त्यांचा केव्हांच पाडाव केला असता. या सर्व सैनिकांना राजधानींत सुखरूप परत आणण्याची अतिशय अवघड कामगिरी साहिबजीनें यशस्वी रीतीनें पार पाडली. पतीच्या मृत्यूची बातमी कांहीं काळ गुप्त ठेवून त्याच्यासारख्या दिसणाऱ्या दुसऱ्या एका माणसास त्याचा वेष देऊन ती त्याला घेऊन स्वतः सैनिकांच्या सुटकेसाठीं निघाली. पालखींत बसलेली व्यक्ति अमीरखानच आहे असें समजून सर्व अफगाणांनीं त्याला अभिवादन केलें व सैनिकांना जाऊं दिलें. परत आल्यावर तिनें आपल्या पतीचा मृत्यु जाहीर केला. तिच्या सान्त्वनासाठीं जे अफगाण सरदार व अमीर आले होते त्यांची साहिबजीनें उत्तम बरखास्त ठेवली.

या सरदारांशीं बोलतांना मात्र तिनें सांगितलें, " तुम्ही सर्वजण जर बादशहाशीं एकनिष्ठ रहाल तर तुमचे तनखे कायम राहतील, पण जर आपला मतभेद असेल तर आतांच या प्रश्नांची स्पष्ट चर्चा व्हावी. वेळ पडल्यास तुम्हां सर्वांशीं दोन हात करण्याचीहि माझी तयारी आहे. " या कर्तृत्ववान् शूर स्त्रीशीं लढणें सोपें नाहीं ही गोष्ट सर्व अफगाण जाणून होते. त्यांनीं बादशहाची सत्ता मान्य करण्याचें अभिवचन दिलें. याप्रमाणें साहिबजीनें दोन वर्षें अफगाणिस्थानांत शान्तता राखली. बऱ्हाणपुरास औरंगजेबास ती भेटली. बादशहानें तिचा खूप सन्मान करून तिच्या सावत्र मुलांना चांगल्या नोकऱ्या दिल्या व मक्का-मदिनेच्या यात्रेस जाण्यास परवानगी दिली. मक्केच्या शेरिफानें व इतर अरब सरदारांनीं तिचें भव्य स्वागत केलें. दानधर्मांत तिनें बरीच संपत्ति येथें खर्च केली. तेथून आल्यावर परमेश्वर-चिंतनांत तिचें उर्वरित आयुष्य शांततेंत गेलें.

---

# प्रकरण २२ वें

## एकोणिसाव्या शतकांतील नामवंत महिला

गौरी पार्वतीबाई :– इ. स. १८१० ते १८२९ या कालांत त्रावणकोरचें राज्य लागोपाठ गादीवर आलेल्या दोन राण्यांनीं सांभाळलें होतें. गौरी लक्ष्मीबाई (इ. स. १७९१ ते १८१४) ही इ. स. १८१० ते १८१४ हीं चार वर्षे गादीवर होती. हिच्या अमदानींत कर्नल मन्रो हा या संस्थानचा रेसिडेंट व राणीचा मंत्री म्हणून काम पाही. याच्या सल्लामसलतीचा तिला फार उपयोग होई. गौरी लक्ष्मीबाईच्या काळांत त्रावणकोरमध्यें पुष्कळ सुधारणा झाल्या.

गौरी पार्वतीबाई हिचा जन्म इ. स. १८०२ मध्यें झाला. त्रावणकोरची राणी होण्यासाठीं तिला इ. स. १८१४ मध्यें पाचारण करण्यांत आलें. त्या वेळीं तिचें वय अवघे तेरा वर्षांचें होतें. वरवर पाहणाऱ्यास गौरी पार्वती अतिशय सौम्य वाटली, तरी ती फार चतुर व धोरणी होती. मन्रोनें आपल्या सरकारला लिहिलेल्या एका पत्रांत तिच्या उदार परंतु सावधान वृत्तीचा गौरव केला आहे.

गौरी पार्वतीबाईच्या कारकीर्दींत त्रावणकोर राज्याच्या हद्दींत इडपल्ली, पुंजर व पंयलम् या विभागांचा समावेश करण्यांत आला. वसुलीचा निश्चित आराखडा व पद्धति ठरविण्यांत आली. डाळीच्या निर्यातीवरील निर्बंध उठविण्यांत आल्यामुळें शेतकऱ्यांची स्थिति सुधारली.

ख्रिश्चन मिशनऱ्यांच्या कार्याबाबत राणीचा दृष्टिकोन अतिशय सहानुभूतीचा होता. त्यामुळें या काळांत त्यांच्या बऱ्याच शाळा व देवळें त्रावणकोरमध्यें बांधलीं गेलीं. मात्र राज्याच्या कायद्याच्या कक्षेंतच त्यांनीं आपलें कार्य केलें पाहिजे यावर तिचा कटाक्ष असे. यामुळें नागरी जीवनांत या लोकांना अवास्तव सवलती मिळेनाशा झाल्या. " सौजन्य व प्रस्थापित राजसत्तेपुढें विनम्र वृत्ति हे दोन खऱ्या ख्रिश्चन माणसाचे गुण आहेत " असें एका सरकारी पत्रकांत तिनें स्पष्टपणें नमूद केलें होतें.

गौरी पार्वतीबाईचें कर्तृत्व सामाजिक सुधारणांबाबत तर याहून अधिक प्रकर्षानें दिसून येतें. मानधामानवांत भेदभाव करणें तिला पसंत नसे. सार्वजनिक जीवनांत अशा प्रकारचा फरक होऊं नये व खालच्या लोकांवर वरच्या लोकांकडून जुलूम-जबरदस्ती होऊं नये याविषयीं ती सतत दक्षता घेई. मध्ययुगांत भारतीय समाजांत रूढ झालेली सामाजिक विषमता आपल्या राज्यांत तरी तिनें नाहींशी केली. त्रावणकोरमधील कोणत्याहि दर्जाचा मनुष्य सोनें व चांदी वापरूं शके व कौलारू घर बांधूं शके. पूर्वी या दोन्ही गोष्टी फक्त श्रीमान् वर्गातील लोकांनींच उपभोगाव्यात असा रिवाज असे. सर्वांवर सारखे कर बसविण्याची पद्धति तिनें बंद केली. श्रीमान् जमीनदार नंबुद्रि ब्राह्मणसुद्धां हुंड्यासाठीं इनाम जमिनी विकून पैसा उभा करतात हें तिनें पाहिलें. तेव्हां तिनें शंभर रुपयांच्यावर कोणीहि हुंडा घेऊं नये असा जाहीरनामा काढला.

सामान्य लोकांना शिक्षण मिळाल्याखेरीज सामाजिक सुधारणा यशस्वी होणार नाहींत असें गौरी पार्वतीबाईस दिसून येतांच तिनें शिक्षणखात्यावर जरूर तेवढा खर्च वाढवून सर्वसामान्य माणसांस शिक्षणाच्या सर्व संधि उपलब्ध करून दिल्या. अशा शिक्षणविषयक सुधारणा करणारी त्रावणकोरमध्येंच नव्हे तर अखिल भारतांत गौरी पार्वतीबाई ही पहिलीच प्रशासक महिला होती असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. त्रावणकोर राज्याचा साक्षरतेंत आज पहिला नंबर लागतो त्याचें सर्व श्रेय एकोणिसाव्या शतकांतील राणी गौरी पार्वती हिलाच द्यावें लागेल. वयाच्या सत्ताविसाव्या वर्षी हिनें आपला पुतण्या राम वर्मे स्वाति तिरुवाळ् याच्याकडे सर्व राज्याधिकार सोंपवून ती इ. स. १८२९ सालीं निवृत्त झाली. शेवटपर्यंत महत्त्वाच्या गोष्टी करतांना राम वर्मे गौरी पार्वतीचा नेहमीं सल्ला घेत असे.

**राणी लक्ष्मीबाई** :— एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत अनेक मोठमोठ्या राजकीय व सामाजिक उलाढाली घडल्या व उत्तरार्ध नवीन सामाजिक व राजकीय घडी बसविण्यांत खर्च झाला. दोन्हीं विभागांत कार्य करणाऱ्या स्त्रियांच्या व्यक्तिमत्त्वांत व कर्तृत्वांत कालानुरूप फरक दिसून येतात. राणी लक्ष्मीबाईनें पहिलें अर्धशतक आपल्या अद्वितीय गुणांनीं गाजविलें. हिचा जन्म १८ नोव्हेंबर १८३५ मध्यें बनारस येथें झाला. इ. स. १७४३ मध्यें पेशव्यांनीं निर्माण

पतीची एक प्रेयसी ( जी तिच्यासारखाच वेष करी व नेहमीं तिच्याजवळ राही ) व सुमारें ४०० घोडेस्वार सरपत घेत बसले असतांना ब्रिटिश सैन्य चालून येत असल्याची बातमी तिला मिळाली. लागोपाठ ५० निवडक आयरिश घोडेस्वार बंदुकीच्या फैरी झाडीत जवळ येऊन ठेपले. राणीजवळ फक्त १५ स्वार थांबले, बाकीचे घाबरून पळून गेले. राणी पटकन् घोड्यावर स्वार झाली. पण ओढ्यावरून उडी मारण्यास घोडा बावरूं लागला. इतक्यांत तिच्या बरगडींत एक गोळी येऊन घुसली. लगेच एका ब्रिटिश सैनिकानें तिच्या डोक्यावर जोराचा वार केला. तशाहि स्थितींत ती थोडी पुढें गेली व धाडकन् खालीं पडून तिचें प्राणोत्क्रमण झालें. शेजारीं असलेल्या लोकांनी तेथेंच तिचें दहन केलें." अशा रीतीनें ही शूर महिला घरापासून, आपल्या नातेवाइकांपासून दूर युद्धभूमीवर शत्रूशीं दोन हात करतां करतां मरण पावली.

**महाराणी केम्पनजम्माणि अवरू** :— इ. स. १८९४ मध्यें म्हैसूर राज्यावर एक मोठें संकट आलें. राजा दहावा चामराज वाडियार एकाएकीं गंभीर दुखणें होऊन डिसेंबरच्या २८ तारखेस मरण पावला. या वेळीं त्याचा मुलगा अवघा दहा वर्षांचा होता. या आणीबाणीच्या वेळीं धीरानें राणी केम्पनजम्माणि पुढें आली व तिनें राज्यकारभाराची जबाबदारी पत्करली. मुलगा वयांत येईपर्यंत मुख्य मंत्री शेषाद्रि अय्यर यांच्या साहाय्यानें तिनें उत्कृष्ट रीतीनें कारभार चालविला.

महाराणीच्या अमदानींत अनेक चांगल्या सुधारणा घडून आल्या. मारिकणइव्ह् धरण, मुलींसाठीं महाराणी कॉलेज व बंगलोर आणि म्हैसूर येथील वसतिगृहें तिच्याच प्रयत्नानें उभारलीं गेलीं.'इन्डियन् इन्स्टिटयूट ऑफ् सायन्स्' या संस्थेस मुबलक जमीन व आर्थिक मदत तिनें देऊं केली. शिवसमुद्रम् येथें ' हायड्रो इलेक्ट्रिक केन्द्र ' सुरू करण्याचें श्रेयहि महाराणीलाच द्यावें लागेल. हें भारतांतील अशा रीतीचें पहिलें केन्द्र आहे. लॉर्ड कर्झननें तिच्या कारकीर्दीविषयीं असे उद्गार काढले आहेत—

" चौथा कृष्णराज वाडियार गादीवर येईपर्यंत राज्यांत सुव्यवस्था राखण्याची कामगिरी राणीनें उत्कृष्ट रीतीनें बजाविली. खाजगी व सार्वजनिक जीवनांत चारित्र्याचें महत्त्व काय असतें हें तिनें आपल्या उदाहरणानें सिद्ध

करून दिलें. कुटुंबियांच्या व प्रजाजनांच्या आदरास पात्र होण्याचें भाग्य तिला लाभलें. राणीच्या गुणांचा गौरव म्हणून तिला नेहमीं १९ तोफांची सलामी देण्यांत यावी अशी बादशहास मी शिफारस केली होती व ती त्यांनीं राणीचा खास हक्क म्हणून मान्य केली ''

## लेखिका व समाज कार्यकर्त्या

**तोरू दत्त** :-(इ. स. १८३६-१८७७) कलकत्त्यांतील रामबागानच्या सुप्रसिद्ध दत्त कुटुंबांतील गोविन् चंदर दत्त यांच्या सर्वांत धाकट्या मुलीचें नांव तोरू दत्त असें होतें. ज्या काळांत पाश्चिमात्य संस्कृतीच्या तेजानें अगतिक भारत मूढ बनलेला होता त्या काळांतील ही एक नामवंत सुसंस्कृत लेखिका होती. तोरूचा पिता गोविन् हा इंग्रजींत गद्य व पद्य लिखाण करणारा प्रसिद्ध लेखक होता. हें घराणें श्रीमंत पण पुराणमतवादी म्हणून नांवाजलेलें होतें. गोविन्च्या कुटुंबांतील त्याच्यासकट पांच भावंडांनीं येशू ख्रिस्ताचा पंथ स्वीकारला होता. त्याच्या लिखाणांत विशाल दृष्टिकोन व जीझसवर निरतिशय भक्ति हे दोन विशेष प्रामुख्यानें दिसून येत. तोरू स्वतः असामान्य बुद्धिमती होती हें तर खरेंच, पण गोविन्नें तिच्यावर जे संस्कार केले त्यांचाहि तिच्या व्यक्तिमत्त्वावर खोल ठसा उमटला होता. '' मला असा पिता लाभला नसता तर मी कशी झालें असतें कोण जाणे '' असे उद्गार तिनें स्वतःविषयीं काढले आहेत.

तोरूचें बालपणापासून सर्व शिक्षण इंग्रजींतच झालें. स्वतःच्या बंगाली भाषेंत तिला आपलें नांवसुद्धां व्यवस्थित लिहितां येत नस. इंग्रजी भाषेवरील तिच्या प्रभुत्वाबद्दल व त्यांतून उपलब्ध झालेल्या इंग्रजी समाजाच्या अंतरंगाविषयीं मिळविलेल्या तिच्या ज्ञानाबद्दल तिच्या पित्याच्या इंग्रज मित्रांनासुद्धां अचंबा वाटे. वयाच्या चौदाव्या वर्षी ती जेव्हां इंग्लंडला गेली त्या वेळीं तिनें शेक्स्पिअरचा सखोल अभ्यास केलेला होता व पॅरॅडाइज लॉस्ट् संपूर्ण वाचलेलें होतें. शेवटपर्यंत कादम्बरी-वाचनाचा तिला विलक्षण छंद होता. फ्रेंच व जर्मन भाषा तिला अवगत होत्या. परदेशांतील एकूण चार वर्षांच्या वास्तव्यापैकीं बराच काल तिनें इंग्लंडमध्यें घालविला. कांहीं महिने फ्रान्स-मधील नीस या ठिकाणीं एका फ्रेंच स्कूलमध्यें ती शिकली. केंब्रिजमधील तिच्या अभ्यासांत तिनें प्रामु-

येल्लेल्या झांशी संस्थानचे प्रमुख सुभेदार गंगाधरराव यांच्याशीं तिचा विवाह झाला. मूलबाळ होण्यापूर्वींच इ. स. १८५३ मध्यें सुभेदार वारल्यानंतर त्या वेळच्या गव्हर्नर-जनरलनें लक्ष्मीबाईस दत्तक पुत्र घेण्याची परवानगी नाकारली. कंपनी सरकारविरुद्ध दावा लावण्यासाठीं राणीनें जॉन् लँग् याला आपला वकील नेमलें. लँगनें राणीचें वर्णन पुढील शब्दांत केलें आहे— " मध्यम बांध्याची अतिशय सुदृढ अशी ही स्त्री होती. माझ्या मतें तिचा चेहरा सौंदर्यदृष्टीनें विचार केल्यास जरा जास्त गोल होता. एवढी गोष्ट सोडल्यास या वयांतहि तिच्या चेहऱ्यांत भरपूर आकर्षण आहे. तरुणपणीं तिची गणना सौंदर्यवती स्त्रियांत होत असली पाहिजे. तिच्या चेहऱ्यावरून कोणीहि तिच्या कुशाग्र बुद्धीची कल्पना करूं शकेल. तिच्या नाकाची ठेवण व टपोरे आणि बोलके डोळे हे तिच्या सौंदर्याचे विशेष म्हणून सांगतां येतील."

राणीनें इंग्लंडच्या कोर्टांत लावलेला दावा निष्फळ ठरला व झांशी राज्य विलीन करून राणीला महिना पांच हजार रुपये पेन्शन देण्याचें ठरलें. पूर्वीचा लवाजमा बाळगून इतमामानें जगण्यास ही रक्कम अगदींच अपुरी होती. राणीच्या स्वाभिमानी स्वभावास हीं निर्बंधें दिवसेंदिवस असह्य होऊं लागलीं. " मी माझी झांशी सोडणार नाहीं " या एकाच वाक्याचा जप करीत राणी आतल्या आंत धुमसत होती. पण बराच काळ तिला कांहींहि करतां आलें नाहीं.

इ. स. १८५७ च्या मेच्या १० तारखेस मिरत व दिल्ली या ठिकाणीं फौजेंतील कांहीं शिपायांनीं ब्रिटिश सरकारविरुद्ध बंड पुकारलें. हळूहळू हा वणवा सर्व उत्तर भारतांत पसरला. जूनच्या पांच तारखेस झांशी बंडांत सामील झाली आणि नऊ तारखेस सर्व संस्थानांत राणीची सत्ता प्रस्थापित झाल्याचें जाहीर करण्यात आलें. या दिवसापासून ४ एप्रिल १९५८ पर्यंत सर ह्यू रोजशीं राणीनें यशस्वी रीतीनें सामना देऊन झांशीचें स्वातंत्र्य टिकविलें. शत्रुसैन्यापुढें टिकाव धरणें अशक्य झालें तेव्हां ब्रिटिश सैन्याची फळी फोडून ती निसटली. वाटेंत बुंदेलखंडांत काल्पी व कूंच येथें ब्रिटिश सैन्याशीं तिनें घनघोर संग्राम केला. यानंतर तिची तात्या टोपेशीं गांठ पडली. दोघांनीं परत सैन्याची जमवाजमव सुरू केली. रजपूत व ब्राह्मण सैनिकांचें

पायदळ व रोहिले आणि मुसलमान यांचीं घोडदळें सज्ज झालीं. सैनिकांच्या-बरोबरीनें सर्व कष्ट राणीनें हंसतमुखानें सहन केले व स्वतः युद्धांत भाग घेतला. तिच्या एका नोकरानें ग्वाल्हेरच्या मेजर मॅक्फर्सनला यासंबंधीं सांगतांना असें म्हटलें आहे कीं, "राणीची अशी पद्धतच असे कीं स्वतः घोडदळाचें नेतृत्व करायचें ! किरमिजी रंगाची विजार, त्याच रंगाचें जाकीट आणि पांढरा फेटा बांधून ती घोड्यावर चढली कीं 'हा पुरुष कीं स्त्री ?' हें कोणालाहि ओळखतां येत नसे."

२३ मे १९५८ ला ग्वाल्हेरच्या पूर्वेस १०० मैलांवर असलेले यमुनेच्या कांठावरील काल्पी हें ठिकाण जनरल रोझनें जिंकलें. तात्या टोपे व राणी लक्ष्मीबाई यांनीं जंगलाचा आश्रय घेतला. ह्यू रोझला वाटलें कीं बंडाचा बीमोड झाला. म्हणून त्यानें सैन्याला रजा दिली. परंतु राणी व तात्या टोपे यांनीं अचानक छापा घालून जूनच्या ४ तारखेस ऐन उन्हाळ्यांत ग्वाल्हेरचा प्रसिद्ध किल्ला जिंकला. ग्वाल्हेरचा राजा किल्ल्यांतून पळाला व बहुतेक सर्व सैनिक राणीच्या बाजूला येऊन मिळाले. या वेळच्या मध्यभारतांतील परिस्थितीचा आढावा घेतांना सर ह्यू रोझनें असें म्हटलें आहे कीं, "राणीची उच्च कुलीनता, सैनिकांना ती दाखवीत असलेलें औदार्य आणि तिचें धैर्य यामुळें ती एक प्रबळ व धोकेबाज शत्रु बनली आहे. ग्वाल्हेरच्या सैन्यांत उत्कृष्ट शिस्तीचे व शिक्षण घेतलेले शूर शिपायी असल्यानें या प्रथम श्रेणीच्या सैन्यानिशीं राणीचा पाडाव करणें ही अत्यंत कठीण कामगिरी होऊन बसलेली आहे."

ग्वाल्हेरच्या किल्ल्याजवळ मोरार या ठिकाणीं जनरल रोझ जूनच्या १६ तारखेस येऊन पोंचला. कॅंपचा कांहीं भाग व दारूगोळ्याचा सांठा त्यानें आपल्या ताब्यांत घेतला. दुसऱ्या दिवशीं ब्रिटिश सैन्यानें मोरार-ग्वाल्हेर रस्ता फूलबाग येथें ओलांडून राणीच्या घोडदळावर हल्ला केला. ब्रिटिश सैनिकांजवळ आधुनिक पद्धतीच्या तोफा व बंदुका होत्या. त्यामुळें तरवारी व जुन्या पद्धतीच्या बंदुकांनीं सज्ज अशा राणीच्या सैन्याचा पाड लागेना. राणी स्वतःच लढाईचें नेतृत्व करीत होती. तिनें शौर्याची शिकस्त केली, पण दुर्दैवानें ती या लढाईंत मारली गेली. लढाई प्रत्यक्ष पाहिलेल्या एका माणसानें असें लिहून ठेवलें आहे कीं, "राणी, तिच्या

ह्यानें पूर्व व पश्चिमेकडील विचारप्रवाहांचें व जीवनाचें सूक्ष्म निरीक्षण केलें. तोरूच्या वडिलांनीं आपल्या मुलींना इंग्लिश व फ्रेंच भाषा शिकविण्यासाठीं खास शिक्षक नेमले होते. मुलींच्याबरोबर तोहि विद्यार्थी बने. गोविन् आपल्या विद्वान् परदेशी मित्रांना वारंवार आपल्या घरीं बोलावी. या वेळीं जे वाङ्मयीन परिसंवाद होत त्यांत तोरूच्या बुद्धीची चमक चांगलीच दिसून येई. पदार्थ-संग्रहालयें, ग्रंथालयें, लेखकांचीं आणि कवींचीं स्मारकें अशा ठिकाणीं कटाक्षानें सर्व भगिनी जात. केम्ब्रिजला असतांना तोरूनें कांहीं फ्रेंच कवितांचें इंग्रजींत रूपान्तर केलें. यांतील कांहीं कविता ' Sheaf ' या संग्रहासाठीं निवडलेल्या दिसतात.

इ. स. १८७३ च्या शेवटच्या तिमाहींत दत्त मंडळी भारतांत परतली. येथें आल्यावरहि तोरूचा व्यासंग चालूच राहिला. मात्र तिला युरोपच्या मोकळ्या वातावरणांत परत जाण्याची सतत ओढ वाटे. आयुष्याच्या अखेरच्या काळांत तिनें संस्कृतचा अभ्यास सुरू केला. तिनें लिहूं घातलेले कांहीं ग्रंथ पुरे करण्याकडे तिनें अधिक लक्ष या काळांत पुरविलें. मुख्यत्वेंकरून "A Sheaf Gleaned in French Fields" हा ग्रंथ तिला पुरा करावयाचा होता. कौटुंबिक विपत्ति, स्वतःचा आजार अगर कलकत्याची दमट हवा यांपैकीं कोणत्याहि कारणानें तिच्या कार्यांत व्यत्यय आला नाहीं. तिचा हा ग्रंथ इ. स. १८७६ मध्यें प्रसिद्ध झाला व त्याचें इंग्लंड व भारत दोन्ही ठिकाणीं उत्कृष्ट स्वागत झालें. फ्रेंच टीकाकार आन्द्रे थ्यूरिअट् व इंग्लिश टीकाकार एडमंड् गॉस् यांचें या ग्रंथाकडे सुदैवानें लक्ष वेधलें. गॉस् या ग्रंथाविषयीं लिहितो—

"हें काव्य वाचतांना मला जें आश्चर्य व आकर्षण वाटलें त्याचें शब्दांत वर्णन करणें अशक्य आहे. काव्यगुण भरपूर असल्यानंतर रुव्हेअरनें हें पुस्तक सुंदर कागदावर छापलें काय किंवा भवानीपूरच्या एखाद्या सामान्य छापखान्यानें अस्पष्ट स्वरूपांत छापलें काय, वाचकांस या दोहोंतील फरक जाणवणारच नाहीं."

नवीन साठ रूपान्तरित काव्यांची भर घालून या पुस्तकाची तिसरी आवृत्ति केगन् पॉल आणि कंपनीनें काढली. हा काव्यसंग्रह अतिशय आकर्षक व वाचनीय झाला आहे. तिनें इंग्रजींत लिहावयास घेतलेली एक कादंबरी

अर्धीच राहिली. कदाचित् तिनेंच ती अपुरी सोडली असेल ! फ्रेंच भाषेंत तिनें एक कादंबरी लिहिली आहे. " Ancient Ballads and Legends of Hindustan " या शीर्षकाखालीं तिचा एक काव्यसंग्रह तिच्या मृत्यूनंतर तिच्या पित्यानें प्रसिद्ध केला. या संग्रहांतील बऱ्याच कविता तिनें स्वतंत्रपणें रचल्या आहेत व कांहीं रूपान्तरित आहेत. तोरूच्या काव्यगुणाचा प्रत्यय देणारा हा एकच संग्रह आज उपलब्ध आहे. वयाच्या अवघ्या एकविसाव्या वर्षी तिला काळानें ओढून नेलें नसतें तर या महिलेचें विपुल मौलिक वाङ्मय भारतीयांना आज वाचावयास मिळालें असतें. मेरी मार्टिन नांवाच्या केम्ब्रिजच्या आपल्या मैत्रिणीस तिनें जीं पत्रें लिहिलीं आहेत, त्यांवरून तिच्या लाघवी स्वभावाची आणि ज्ञानसाधनेची कल्पना येते.

तोरूच्या " A Sheaf Gleaned in French Fields " या काव्य-संग्रहाबद्दल एटमंड गॉसनें दुसऱ्या एका ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, " हा संग्रह अनेक दृष्टींनीं अपूर्ण असला तरी तो अतिशय मनोरंजक झाला आहे. बल आणि दुर्बलता, संकटांवर मात करूं पाहणारी बुद्धिमत्ता आणि अननुभवी प्रतिभा यांचें सुंदर मिश्रण हिच्या काव्यरचनेंत आढळतें. इंग्रजी काव्याचे संकेत कांहीं ठिकाणीं व्यवस्थित पाळले आहेत तर कांहीं ठिकाणीं कोणताच नियम पाळलेला दिसत नाहीं. एकंदरीत हीं काव्यें अप्रतिम आहेत. "

गॉसचे हे उद्गार प्रमाणभूत आहेत. Sheaf मधील अपूर्णता " Ancient Ballads and Legends of Hindustan " या संग्रहांत राहिलेली नाहीं. रचना आणि तंत्र या दोन्ही उणीवा कवयित्रीने बऱ्याच प्रमाणात भरून काढल्या आहेत. भाषांतराची मर्यादित वाट संपल्यामुळें या स्वतंत्र रचनेंत प्रतिभेचा पूर्ण विलास आढळून येतो. गॉसच्या मताप्रमाणें तिचा हा दुसरा काव्यसंग्रह म्हणजे पुढील पिढ्यांना मिळालेला मोठाच ठेवा आहे.

फ्रेंच कादंबरी-लेखनांतहि ती बरीच यशस्वी झाली आहे. जेम्स् दारमेस्तेतर नांवाच्या फ्रेंच पंडितानें असें म्हटलें आहे कीं, " फ्रेंच भाषा अतिशय थोड्या अवधींत आत्मसात् करून व फ्रान्समध्यें फक्त कांहीं महिने वास्तव्य करून एकोणीस वर्षांच्या या तरुणीनें ही कादंबरी लिहिणें हा एक अद्वितीय विक्रमच आहे. बेकफोर्डच्या 'Vathek' या एकाच कादंबरीशीं

तोरुच्या कादंबरीची तुलना करतां येईल." पण एका अर्थी ही तुलना अयोग्य होईल. कारण अठराव्या शतकांत फ्रेंच म्हणजे लोकांची दुसरी मातृभाषाच असे. कवयित्री मादाम दि सॅफे हिनें या कादंबरीसंबंधी असें म्हटलें आहे कीं, " लेखिकेनें अनेक थोर बुद्धिमंतांना मागें सारलें आहे. हें पुस्तक लिहितांना ती जणूं एक फेंच स्त्रीच बनली आहे. आमच्यासारखेच विचार आणि आमच्यासारखीच भाषा वापरल्यानें ती आमच्यांतलीच एक वाटते. " आपल्या वाङ्मयी कार्यानें तोरू दत्तनें एकोणिसाव्या शतकांतील नामवंत भारतीयांत स्वतःस मानाचें स्थान प्राप्त करून घेतलें आहे. अनेक इंग्रज लोक या दुर्दैवी देशाच्या मदतीस धांवून आले. भारतीयांनीं आपला उद्धार करावा व संस्कृतीचें शिखर गांठावें अशी त्यांची प्रामाणिक तळमळ होती. या तळमळीस ज्या थोड्या भारतीयांनीं साद दिली, ज्या थोड्या व्यक्तींनीं परकीयांच्या आकांक्षा सुफल केल्या, त्यांच्यापैकीं तोरू ही एक होती. भारतांत परकीय संस्कृति रुजविणें म्हणजे एक निरर्थक उद्योग आहे असा गैरसमज करणाऱ्यांना, तोरूसारखी रत्नें निर्माण करून या इंग्रज मित्रांनीं एकप्रकारचें आव्हानच दिलें होतें. हिचा येशू ख्रिस्तावर जबरदस्त विश्वास होता. तिची नैतिक पातळी अत्युच्च होती. शास्त्र सोडून इतर विषयांत युरोपिअनांनीं दाखविलेलें बुद्धिवैभव तिजजवळ होतें. इतकें सांगितल्यानंतरहि मनांत अशी शंका येते कीं, इंग्रजी किंवा फ्रेंच वाङ्मयांत तोरू दत्तला मानाचें स्थान दिलें जाईल का? भारतीयांची तर ती अतिशय लाडकी आहेच, परंतु तिच्या व्यक्तिमत्त्वाच्या घडणींत खास भारतीय असें काय होतें तें सांगणें मात्र कठीण आहे. तिनें स्वतः आपली असामान्य बुद्धिमत्ता जर प्रगट केली नसती तर भारताला हें भूषण मिरवितां आलें नसतें. भारताची ही थोर कन्या धवल कमलाप्रमाणें पवित्र व सुगंधित गुलाब पुष्पाप्रमाणें गोड होती.

पंडिता रमाबाई:– एकोणिसाव्या शतकांत भारतानें ज्या थोर कन्या निर्माण केल्या, त्यांपैकीं पंडिता रमाबाई ही एक होय. हिच्या वडिलांचें नाव अनंतशास्त्री डोंगरे. शास्त्रीबुवांनीं आपल्या पत्नीला-लक्ष्मीबाईला-संस्कृत शिकविलें म्हणून त्या वेळच्या रूढिप्रिय समाजाचा त्यांच्यावर रोष होऊन समाजानें त्यांना वाळींत टाकलें. मंगळोरपासून तीस मैलांवर असलेल्या गंगामूळ अरण्यांत एक झोपडी बांधून अनंतशास्त्री राहूं लागले. लवकरच या पर्णकुटींत एक

चतुष्पाठी ( संस्कृत पाठशाला ) वसली. न तिवाइकांच्या कारवायांमुळें हें निवासस्थानहि उद्ध्वस्त होऊन अनंतशास्त्री यांना पत्नी व तीन मुलांसह काय चा यात्रेकरूचा पेशा पत्करावा लागला. या वेळीं रमाबाई फक्त कांहीं महिन्यांची होती. आईच्या मांडीवर बसल्या बसल्या रमानें पाणिनीचीं अनेक सूत्रें व भागवताचे पुष्कळसे श्लोक पाठ केले. विशीच्या आंत तिनें मराठी व संस्कृत भाषांवर प्रभुत्व मिळविलें. ती अस्खलित संस्कृतांत संभाषण करूं शके. या तिच्या संस्कृत विद्येचा पुढील आयुष्यांत तिला खूप उपयोग झाला.

अनंतशास्त्री ज्या ज्या ठिकाणीं जात तेथें तेथें त्यांच्या विद्वत्तेची लोकांवर छाप पडून ते त्यांना अतिशय आदरानें वागवीत व त्यांच्या कुटुंबाच्या गरजा पुरवीत. पण इतर बाबतींत अतिशय पुराणमतवादी असलेले अनंतशास्त्री ज्या वेळीं मुलींच्या शिक्षणाबद्दल व लग्नाच्या वयाबद्दल आपलीं मतें हिरीरीनें मांडूं लागत तेव्हां आसपासचे लोक चिडून त्यांना गांव सोडण्यास भाग पाडीत. अशा तऱ्हेनें आज येथें तर उद्यां तेथें असें भटकणारें हें कुटुंब आपोआपच संन्यस्त वृत्तीचें बनलें.

आईचा कष्टाळूपणा, संसारदक्षता व त्यागी वृत्ति यांचा रमाबाईच्या हळुवार मनावर खोल ठसा उमटला. इ. स. १८७४ सालच्या दुष्काळांत, आधींच अतिशय हलाखींत जगत असलेल्या या कुटुंबांतील तीन माणसें कांहीं महिन्यांच्या अंतरानें मृत्युमुखीं पडलीं. मरेपर्यंत आपल्या आईवडिलांवर हिंदु समाजानें जो अन्याय केला, त्यांचा जो अनन्वित छळ केला, त्यामुळें रमाबाईचें मन हिंदु धर्माला व समाजाला पुरें विटलें.

रमाची धार्मिक वृत्ति तिनें आपल्या पित्याकडून घेतली होती. सर्व धार्मिक आचार विधिपूर्वक काटेकोर पाळल्यास एक दिवस ईश्वरी साक्षात्कार होईल, अशी अनंतशास्त्री यांची श्रद्धा होती. वडिलांनीं सुरू केलेली महायात्रा रमाबाई व तिचा भाऊ श्रीनिवास यांनीं पुढें चालू ठेवली. पंजाबमध्यें असतांना थंडीचा इतका कडाका पडला कीं तीं दोघें मरणाच्या पंथास लागलीं. कशीतरी तीं कलकत्त्याला येऊन पोंचलीं. येथें सामाजिक सुधारणेस प्रारंभ झालेला होता. रमाबाईनें हिंदु धर्मावर केलेली टीका येथें स्वागतार्ह ठरली. तिचें संस्कृतावरील प्रभुत्व पाहून तिला लोकांनीं ' पंडिता ' व ' सरस्वती ' अशा दोन पदव्या बहाल केल्या.

कलकत्याचें अनुकूल वातावरण पाहून, उच्चवर्णीय हिंदु स्त्रियांना शिक्षण देऊन त्यांच्यावर होत असलेले सामाजिक अन्याय दूर करण्याचें ध्येय रमाबाईनें निश्चित केलें. बंगाल आणि आसाम भागांत तिनें व्याख्यानांचा एक दौरा काढला. तिचें नांव या सुमारास सर्व भारतीयांस सुपरिचित झालें. महाराष्ट्रांतहि तिची कीर्ति पसरली.

रमाबाईचा भाऊ इ. स. १८८० त वारला. मरणापूर्वी त्यानें रमाबाईस बिपिन बिहारीदास मेधावी या सुशिक्षित शूद्र गृहस्थाशीं विवाह करण्यास अनुमति दिली. एका छोट्या कन्येसह संसारसुखाच्या शिखरावर असतांना दुर्दैवानें इ. स. १८८२ त रमाबाईचा पति निवर्तला. पदरांत एक ल्हान मूल, अशा निराधार स्थितींत रमाबाईस चरितार्थासाठीं कांहींतरी काम करणें भाग पडलें. तिनें इंग्रजी शिकण्यास सुरुवात केली. पतीनें दिलेलें 'सेंट ल्यूकचा संदेश' हें पुस्तक वाचीत असतां तिला ख्रिश्चन धर्माविषयीं विलक्षण ओढ वाटूं लागली.

यानंतर रमाबाई आपल्या मुलीसह पुण्यास आली. रानडे, भांडारकर वगैरे समाजसुधारकांच्या मदतीनें तिनें स्त्रियांच्या उद्धारासाठीं 'आर्य महिला समाज' नांवाची एक संस्था काढली. या कार्यांत तिला पैशाची अडचण सतत भासे. पुणें व आसपासच्या ठिकाणीं ख्रिश्चन मिशनरी कार्यकर्ते काम करीत असतांना तिनें पाहिलें. स्त्रियांच्या उद्धारासाठीं आपण जें कार्य हातीं घेणार, त्यासंबंधीं योग्य तें शिक्षण मिळविण्यासाठीं इंग्लंडला जावयास मिळाल्यास फार चांगलें होईल, अशी कल्पना या वेळीं रमाबाईच्या मनांत येऊं लागली. इ. स. १८८३ सालीं मुलीसह रमाबाई वर्कशायर येथील वँटेज् या केन्द्रात पोंचली. त्या ठिकाणच्या ख्रिश्चन सेविकांनीं तिचें हार्दिक स्वागत केलें. या चर्चमध्यें तिनें इ. स. १८८३ मध्यें ख्रिश्चन धर्माची विधिपूर्वक दीक्षा घेतली. एक वर्षाचें इंग्रजीचें प्राथमिक शिक्षण पुरें केल्यानंतर रमाबाईनें चेल्टनहॅम येथील स्त्रियांच्या कॉलेजांत प्रवेश मिळविला. येथें ती इतरांना संस्कृत शिकवी व स्वतः इंग्रजी, शास्त्र व गणित या विषयांचें अध्ययन करी.

इ. स. १८८६ च्या सुरुवातीस रमाबाई अमेरिकेस गेली. तिनें फ्रॉयबेल्च्या बालोद्यान शिक्षणपद्धतीचा अभ्यास येथें केला. प्रत्येक सुटीत ती

स्थापन केलेल्या या संस्था कर्तबगार माणसांकडे सोंपवून पंडिता पुन्हां १८९८ त अमेरिकेस गेली. बोस्टनला स्थापन केलेल्या संस्थेस रमाबाईनें भारतांत केलेल्या कामगिरीचा अहवाल सादर करणें हा या भेटीमागील मुख्य उद्देश होता. ऑगस्टमध्यें ती भारतांत परत आली आणि त्यानंतर खिस्तानें दिलेली आज्ञा म्हणून आपलें कार्य तिनें एकतानतेनें सुरू केलें.

पुण्याचें शारदासदन कांहीं कालानें केडगांवास हलविण्यांत आलें. मुक्तिसदनांत उच्च शिक्षणाचीहि व्यवस्था करण्यांत आली. इ. स. १९०० सालीं पुन्हां एकदां दुष्काळ पडला आणि रमाबाईच्या स्वप्नांतहि नव्हतें एवढें मोठें सेवाकार्य करण्यास ईश्वरानें तिला साद घातली. गुजराथ व काठेवाड या भागांतील लोकांना या दुष्काळाचा विशेष तडाखा जाणवला. या वेळीं रमाबाईस स्वत: जाणें अशक्य झाल्यानें तिनें आपल्या वीस सेविका गुजराथेंत पाठविल्या व शेंकडों असहाय स्त्रिया व मुलें आश्रमांत आणविलीं. मुक्तिसदनांत राहणाऱ्या मंडळींची संख्या ९०० च्या वर गेली. सुमारें १०० गुरेंहि आश्रयार्थ येथें आणण्यांत आलीं होतीं.

इ. स. १९०० ते १९२२ हीं वर्षे हृदयाशीं बाळगलेल्या समाजकार्याच्या आकांक्षा सफल झालेल्या रमाबाई पहात होती. तिच्यांतील निर्मायक बुद्धिमत्ता या कालांत प्रकट झाली. सुदैवानें जरूर तेव्हां जरूर तेवढी मदतहि तिला मिळत गेली. कार्यकर्ते व पाहुणे म्हणून अनेक देशांतील मंडळी केडगांवास येत. हें धकाधकीचें काम करीत असतांनाच रमाबाईस परम शान्तीचा अंतर्यामीं एक अननुभूत आनंद होत होता. इ. स. १९२१ मध्यें तिची एकुलती एक मुलगी मनोरमा वारली. तरीसुद्धा तिच्या चेहऱ्यावरची शान्ति ढळली नाहीं. रात्रंदिवस प्रार्थना केल्यानंतर तिला असें उमगलें कीं, मानवतेची सेवा करण्यांत खिस्ताकडे तिचें पुरेसें लक्ष राहिलें नव्हतें. पवित्र आत्म्याची कृपा आतां तिच्यावर झाली होती. तिच्यांत अंतर्बाह्य फरक दिसूं लागला होता. ती आतां फक्त भारतीय राहिली नाहीं व समाजाची फक्त सेविकाहि राहिली नाहीं. येशूची सेविका त्याच्या संदेशानुसार सेवाधर्म आचरीत होती. सतत प्रार्थनेनें तिला ही अनुभूति प्राप्त झालेली होती.

हा सर्व वृत्तान्त लक्षांत घेऊन रमाबाईच्या मुक्तिसदनांतील कार्याचें

मूल्यमापन करावयास हवें. दिवसाच्या कोणत्याहि क्षणीं पाहिलें तरी ती स्वतः काम करतांना, इतरांचें काम पाहतांना, कोणा दुःखिताचें सान्त्वन करतांना किंवा आश्रमवासीयांसाठीं येशूची प्रार्थना करतांना आढळे. आश्रमवासीयांच्या नैतिक व धार्मिक विकासासाठींहि ती अविश्रांत धडपडे. येशूनें स्वतः लक्ष घातल्यामुळेंच जणू कांहीं सर्व सुरळीत चाललें होतें. उच्च वर्णीय स्त्रियांना शिक्षण देण्यासाठीं मनोरमानें गुलबर्ग्यास एक शाळा इ. स. १९१३ मध्यें काढली. हा भाग त्या वेळीं निजाम सरकारच्या हद्दींत मोडे. अशा रीतीनें इतरांसाठीं अहर्निश परिश्रम करीत दमलेली पण थमल्याची मुळींच जाणीव नसलेली ही आदर्श महिला दि. ५ एप्रिल १९२२ च्या सकाळीं झोपेंतच परलोकवासी झाली.

**स्वर्णकुमारी देवी**:– (इ. स. १८५५ ते १९३२) मात्रिक वृत्तीच्या देवेंद्रनाथ टागोरांच्या १४ मुलांपैकीं स्वर्णकुमारी देवी ही दहावी मुलगी. हिनें बंगाली वाङ्मयांत फार मोठी मोलाची भर घातली.

अगदीं बालपणापासून स्वर्णकुमारी सुसंस्कृत व विद्याभिलाषी नातेवाईक मंडळींत वाढली. घरांतील सर्व मोठी मंडळी लहान मुलांच्या व्यक्तिविकासाकडे लक्ष पुरवीत. आपल्या खानदानी घराण्यास योग्य असें शिक्षण मुलांना मिळालें पाहिजे याबाबत सर्वांचाच कटाक्ष असे. संगीत, चित्रकला, भाषा, इतिहास व इतर शास्त्रें यांच्या अभ्यासांत घरांतील मुलांची जणूं चढाओढ लागे. क्रमिक पुस्तकांव्यतिरिक्त अनेक पुस्तकें वाचून स्वतंत्र रीतीनें स्वतःचा दृष्टिकोन बनविण्याची संवय मुलांना प्रथमपासूनच लावण्यात आलेली होती. शिवाय पौर्वात्य ज्ञानाची पाश्चिमात्य ज्ञानाशीं तुलना करण्याची अभिरुचिहि घरातील आधुनिक वातावरणामुळें मुलांच्या ठिकाणीं दिसून येई. या सर्व गोष्टींचा उपयोग मुलांचें ज्ञान सखोल व सर्वंकष होण्याकडे झाला. अल्पश्या वयाच्या इतकीच बुद्धीची चमक स्वर्णकुमारीनें दाखविली. वयाच्या तेराव्या वर्षीच आपलें कार्यक्षेत्र निश्चित करून तिनें लेखनास सुरुवात केली. वयाच्या एकविसाव्या वर्षी ती एक प्रथितयश लेखिका म्हणून ख्यातनाम झाली. "The Light Goes Out" या अर्थाची बंगाली भाषेंत लिहिलेली तिची पहिली कादंबरी अनेकांनी गौरविली आहे.

स्वर्णकुमारीचें सर्व शिक्षण घरींच झालें. पिताजी, मोठे भाऊ व इतर सुप्रसिद्ध विद्वान् तिला गुरुजन म्हणून लाभले. टागोरांच्या घरांत पडदापद्धति होती. स्वर्णकुमारीचें लग्न वयाच्या तेराव्या वर्षी झालें. घराण्याच्या रूढीनुसार स्त्रिया फारशा घराबाहेर पडत नसत. हिंदु स्त्रियांच्या उच्च शिक्षणाआड येऊं शकणाऱ्या सर्व गोष्टी टागोर कुटुंबांतहि होत्या. असें असून तिला उत्कृष्ट शिक्षण मिळूं शकलें. बंगालींतील दुसऱ्या क्रमिक पुस्तकांबरोबर तिच्या संस्कृतच्या अभ्यासास सुरुवात झाली. विवाहानंतर ती जेव्हां मुंबईस आपल्या भावाकडे गेली तेव्हां तिच्या इंग्रजी शिक्षणास सुरुवात झाली. या भाषेचा बराचसा अभ्यास तिनें स्वतःच केला. भोंवतालीं इंग्रजी वाङ्मयाचा अभ्यास केलेली व त्या वाङ्मयांतील संस्कृति आत्मसात् करून नीरक्षीरन्यायानें त्यांतील चांगलें तेवढेंच उचलून हिन्दी आकांक्षांशीं आणि जीवनाशीं समरस झालेली मंडळी सतत वावरत असल्यामुळें, स्वर्णकुमारीस इंग्रजी भाषेबरोबरच इंग्रजांचा जीवनविषयक दृष्टिकोन समजावून घेतां आला. तिच्या माहेरचें वातावरणच असें होतें कीं, त्यांतून तिच्या स्वतंत्र प्रतिभेस स्फूर्ति मिळावी. स्त्रियांचीं मंडळें व समाज स्थापन करून त्यांच्यावर होत असलेले अन्याय दूर करण्याची संधि स्वर्णकुमारीस मिळूं शकली. तिच्या पित्याचें घर म्हणजे एक कलाविलासाचा महाल नव्हता तर देवाच्या लेकरांचें जीवन समृद्ध व्हावें यासाठीं झटणाऱ्या श्रमिकांचें तें घर होतें. घरांतल्या घरांत वडिलांनीं अनेक धार्मिक व सामाजिक सुधारणा केलेल्या तिनें पाहिल्या होत्या. रूढिविरुद्ध समारंभास फाटा देऊन त्या ठिकाणीं उपनिषदांतील वचनानुसार धर्मविधि या घरांत होत. सूफी विचारांची छाप देवेंद्रनाथांवर विशेष होती. स्वर्णकुमारीनें 'सखी-समिति' या नांवाची एक संस्था काढून विधवा व अविवाहित मुलींच्या शिक्षणासाठीं बरेच परिश्रम केले. भोंवतालची परिस्थिति अनुकूल असल्यानें तिच्या बुद्धिमत्तेस कीर्ति व यशाच्या रोखानें भराभर पावलें टाकतां आलीं.

स्वर्णकुमारीनें कादंबरी, नाटक, काव्य, लघुकथा, प्रहसन वगैरे अनेक वाङ्मयप्रकार यशस्वी रीतीनें हाताळले. इ. स. १९२१ सालीं झालेल्या बंगीय साहित्य संमेलनास रवींद्रनाथ टागोर आमत्या वेळीं कांहीं कारणानें उपस्थित होऊं शकले नाहींत. तेव्हां जमलेल्या सर्व साहित्यिकांनीं एकमतानें

स्वर्णकुमारीची अध्यक्षपदीं निवड केली. तिचें लिखाण, गुण आणि वैचित्र्य दोन्ही दृष्टीनें समृद्ध आहे. क्रमिक पुस्तकें सोडून सुमारें सत्तावीस ग्रंथ तिच्या नांवावर उपलब्ध आहेत. भारती मासिकाच्या संपादक मंडळाची ती एक सदस्य होती. प्रत्येक महिन्याच्या अंकांत तिचें लिखाण असे. स्वतःच्या लेखनशैलीबद्दल तिला भरपूर आत्मविश्वास होता.

तिची लेखनशैली आकर्षक होती. घरगुती भाषा, संस्कृत भाषेंतील शब्दांचा बंगालींत उपयोग आणि कोणत्याहि घटनेकडे पाहण्याचा स्त्रीसुलभ भावनात्मक दृष्टिकोन या सर्व गुणांमुळें तिची शैली इतकी स्वतंत्र झालेली आहे कीं, तसें लिखाण बंगालींत दुसरें कोणीहि अजून करूं शकलेलें नाहीं. किंबहुना या शैलीचें मर्मच बंगाली लेखकांना फारसें उमगलेलें नाहीं. बोली भाषा सोडल्यास कल्पित कथांना साजेशी भाषाशैली बंगालींत अजून निर्माण झालेली नाहीं. स्वर्णकुमारी नवनवीन शब्द बनवी. या तिच्या वैशिष्ट्याची रवींद्रनाथांच्या उत्तर आयुष्यांतील लिखाणाशीं तुलना करतां येईल. लेखनांत तिची भूमिका समाज-सुधारकाची आहे. पण वस्तुस्थितीवर ती विनोदाची शाल अशा खुबीदार रीतीनें पसरते कीं, वाचकाला वाचतांना कांहीं खुपल्यासारखें न होतां गुदगुल्याच होतात. स्वर्णकुमारीचें नांव फक्त बंगालपुरतें कार्यान्वित कां राहिलें याचें कारण उघड आहे. परंतु यामुळेंच बंगाली कीर्तिमंदिराच्या बैठकींत मानाचें स्थान ती मिळवूं शकली.

कामिनी रॉय :–(इ. स. १८६४ ते १९३३) चंडी चरण सेन नांवाच्या लेखकाच्या या कन्येनें विद्यापीठाच्या सर्व परीक्षांत उच्चांक गांठला होता. प्राथमिक शालान्त परीक्षेंत सर्व विभागांत कामिनी पहिली आली. गणित विषयांत तिनें मिळविलेल्या श्रेष्ठ गुणांवरून तिला ' लीलावती ' हें अभिधान देण्यांत आलें. कॉलेजच्या पहिल्या वर्षांत तिनें संस्कृतांत पहिला क्रमांक मिळविला व तोच विषय घेऊन ती बी. ए. (ऑनर्स) पास झाली. पण कामिनीचें हें शिक्षण गृहशिक्षणापुढें अगदींच फिकें पडलें. तिचे वडील रोज सकाळीं तिला अभ्यास नेमून देत. या अभ्यासांत वायबलसारख्या ग्रंथांचा समावेश केलेला असे. हा स्वतंत्र अभ्यास तिच्या बहुगामी तीव्र बुद्धिमत्तेस अधिक उपकारक ठरला. कांहीं वर्षांनंतर ती स्वतंत्रपणें आपल्या वडिलांच्या

ग्रंथालयाचा उपयोग करूं लागली. तत्त्वज्ञान हा कामिनीच्या विशेष आवडीचा विषय. वडिलांच्या संग्रहीं या विषयावर उत्कृष्ट पुस्तकें होतीं.

चंडी चरण सेन, केशवचंद्र सेनांच्या ब्राह्मो समाजाचे अनुयायी होते. त्यामुळें मानवधर्माची येग्यची शिकवण तिला प्रथमपासून मिळाली आणि हिंदु धर्माच्या सामाजिक व धार्मिक परंपरेचा तिचा अभिमानहि कायम राहिला. खिश्चन औदार्य व सुखी जीवनाचा तिच्या मनावर खोल ठसा उमटला. पण धर्मानें मात्र ती हिंदुच राहिली. वयाच्या अठराव्या वर्षांत जेव्हां कामिनींत काव्यगुण प्रकट होऊं लागला तेव्हां वडिलांनीं तिला बंगाली भाषेंतील रामायण व महाभारत हे ग्रंथ आणून दिले. तिला संस्कृत वाङ्मयाची अतिशय अभिरुचि असल्यामुळें पदवी परीक्षेच्या वेळीं तिनें गणित सोडून संस्कृतची निवड केली. संस्कृतांतील काव्य व जीवनविषयक कल्पनांचा तिच्या जीवनावर खोल ठसा उमटला.

तिच्या जीवनांत एक महान् ध्येय आहे याची जाणीव तिचे वडील तिला सतत देत असत. इ. स. १८८९ त ती जेव्हां शिक्षिका बनली त्या वेळीं हें ध्येय तिनें निश्चित केलें. इ. स. १८८९ मध्यें 'प्रकाश व छाया' या अर्थाच्या शीर्षकाखालीं तिचा पहिला काव्यसंग्रह प्रसिद्ध झाला. पुस्तकावर कवयित्रीचें नांव छापलें नाहीं. परंतु त्या काळचे एक ख्यातनाम कवि हेमचंद्र बानर्जी यांनीं या संग्रहास प्रस्तावना लिहिल्यामुळें, बंगालच्या कोनाकोपऱ्यापर्यंत या कवितासंग्रहाचें हार्दिक स्वागत झालें. कामिनीचें ध्येयहि निश्चित झालें.

सुमारें पांच वर्षें कामिनीनें चांगलें लिखाण केलें. वयाच्या तिसाव्या वर्षी तिचा विवाह झाला. यानंतर पंधरा वर्षें तिनें फारच तुरळक लेखन केलें. तिनें लेखन थांबविल्यावद्दल तिच्या एका मित्रानें जेव्हां तिला दूषण दिलें तेव्हां तिनें त्यास असें उत्तर दिलें कीं, "हीं माझीं गोजिरवाणीं बाळें म्हणजे मीं निर्माण केलेलीं सजीव काव्येंच नव्हेत का?" यावरून मातृत्वाच्या कर्तव्यास ती किती महत्त्व देत होती याची कल्पना येते.

पंधरा वर्षांच्या सुखी वैवाहिक जीवनानंतर तिच्यावर एकेक मोठ्या आपत्ति येण्यास सुरुवात झाली. इ. स. १९०९ मध्यें तिचा पति निवर्तला व पाठोपाठ चार वर्षांनीं तिचा मोठा मुलगाहि मृत्युमुखीं पडला. पुन्हां एकदा

तिनें लेखणी हातीं धरली. तिच्या दुःखाला वाचा फुटली. हृदयाची व्यथा काव्यांत ग्रथित झाली. शेकडों दुःखीं स्त्रियांचीं अंतःकरणें या काव्यांतून तिनें व्यक्त केलीं. इ. स. १९३३ सालीं कामिनी मृत्यु पावली. त्या वेळीं बंगालींतील एक सुविख्यात कवयित्री म्हणून तिचें नांव सर्वतोमुखी झालेलें होतें.

कामिनी रॉयच्या काव्याचें मूल्यमापन करतांना एक गोष्ट ध्यानांत ध्यावी लागेल. ज्यांनीं आपल्या प्रभावी लिखाणानें बंगाली वाङ्मयांत सुमारें पन्नास वर्षे दिगंत कीर्ति प्रस्थापित केली त्या टागोरांच्या कालांतच कामिनी वावरली. असें असूनहि कामिनीची छोटीशी काव्यज्योत स्वतंत्र तेजानें तेवत होती. रवींद्रांची भाषा एखाद्या धबधब्याप्रमाणें होती. भावना कोणतीहि असो, ती व्यक्त करतांना तिला ते उपमा-रूपकांचा असा कांहीं साज चढवीत कीं या फुलोऱ्यातच वाचक भ्रमरासारखा 'गुरफटून राही. फारच थोडे वाचक या भाषेपलीकडील भावनेचा अनुभव घेण्याइतके खोल जाऊं शकत. याच्या उलट कामिनीची रचना साधी व सरळ होती. तेथें नटलेली भाषा नाहीं. परंतु या साध्या पण रसाळ वाणींत जोश आहे, उत्कटता आहे, भावनेचा प्रभावी आविष्कार आहे. तिच्या पवित्र भावनांना ती जिवापाड जपते. शब्दांच्या आवरणांनीं ती झांकून जाऊं नये अशीच तिची इच्छा आहे. अगदीं मोजक्या शब्दांत उत्कट भावना प्रगट करण्यांत, रवींद्रांच्या तुलनेनें तिचें स्वतंत्र यश आहे. दुःखाप्रमाणें ती सुखाचेंहि वर्णन करते; पण तिची मनोरचनाच अशी आहे कीं, तिचा प्रत्येक शब्द तिच्या हृदयांत खोल दडलेलें औदासीन्य व पावित्र्य प्रगट करतो.

एकोणिसाव्या शतकांतील तिची रचना उत्कृष्ट या सदरांत घालतां येणार नाहीं. 'आलो ओ छाया', 'निर्माल्य' व 'पौराणिकी' यांपैकीं एकहि काव्य तिचा खरा काव्यगुण दाखवीत नाहीं. या सर्वांचा प्रकाशन-काल इ. स. १८८९ ते १८९७ हा आहे. असें असूनहि तिच्या पहिल्या काव्यानें तिला खूपच प्रसिद्धी मिळाली. तिचें सर्वोत्कृष्ट काव्य 'माल्य ओ निर्माल्य' हें इ. स. १९१३ त प्रसिद्ध झालें. फक्त टीकाकार वगळल्यास सामान्य बंगाली माणसाच्या दृष्टीनें 'आलो ओ छाया' या काव्यानेंच ती इतकी प्रसिद्ध झाली.

सरोजिनी नायडू :–( इ. स. १८७९ ते १९४९ ) अतिशय प्रति-

मान् व उत्साही अशी ही महिला एक स्वप्नाळू व ध्येयवादी कवयित्री म्हणून जशी प्रसिद्ध आहे तशीच ती राजकारणपटु म्हणूनहि भारतीयांना परिचित आहे. निझाम कॉलेजचे संस्थापक विख्यात शास्त्रज्ञ डॉ. अघोरनाथ चट्टोपाध्याय यांची सरोजिनी ही कन्या. हिचा जन्म इ. स. १८७९ मध्यें फेब्रुवारीच्या तेरा तारखेस झाला. हें कुटुंब संमिश्र स्वरूपाचें असलें तरी आचारांत फारसें सुधारणावादी नव्हतें. सरोजिनीला शिक्षण मात्र आधुनिक प्रकारचें मिळालें. स्वतःच्या पित्याविषयीं सरोजिनी लिहिते—

"माझे वडील अतिशय स्वप्नाळू वृत्तीचे होते. त्यांच्या अंगच्या अद्वितीय गुणांच्या मानानें त्यांना आयुष्यांत यश मिळालें नाहीं. अध्ययनांत त्यांची बरोबरी फारच थोडे भारतीय करूं शकतील, त्यांच्यासारखा प्रेमळ पुरुषहि विरळा. त्यांनीं आपली सर्व संपत्ति गरिबांना मदत देण्यांत व सोन्यांत परिणत होणाऱ्या मूळ धातूंच्या संशोधनांत खर्च केली."

इ. स. १८९३ मध्यें सरोजिनी इंग्लंडला गेली. लंडनच्या किंग्ज् कॉलेजमध्यें व केम्ब्रिजच्या गर्टन् कॉलेजमध्यें तिचें शिक्षण झालें. विलायतेहून परत आल्यानंतर इ. स. १८९८ मध्यें जात व प्रान्त दोहोंचीं बंधनें तोडून गोविंदराजलु नायडू नांवाच्या गृहस्थाशीं सरोजिनीनें विवाह केला.

एडमंड् गॉस् आणि आर्थर सायमन्स् या दोन विद्वानांच्या प्रेरणेनें सरोजिनीचा काव्यगुण इंग्लंडात असतांनाच प्रकट होऊं लागला. भारतीय निसर्गसौंदर्य, सामान्य माणसांचें जीवन, मोंगल राजे व राण्या या सर्वांवर तिनें काव्यें रचलीं. त्याचप्रमाणें पारतंत्र्याच्या दुःखांनाहि या काव्यांत तिनें वाचा फोडली. राजकीय दृष्ट्या पराभूत जीवन जगत असतांनाहि ती दैववादी राहिली. भारत स्वतंत्र होईल व देशाचा भविष्यकाळ उज्ज्वल होईल असा दुर्दम्य आशावाद तिच्या काव्यांत ठायीं ठायीं व्यक्त झालेला आहे. उदा. खालील ओळी पहा—

"The solace of faith to the lips that falter,
The succour of hope to the hands that fail,
The tidings of joy when peace shall triumph,
When truth shall conquer and love prevail."

सौष्ठव, नादमाधुर्य व रसरसलेली जीवनप्रेरणा हे सरोजिनीच्या काव्याचे विशेष म्हणून सांगतां येतील. तरल भावनांनीं भारलेल्या तिच्या गीतांत एक भारतीय कल्पना प्रामुख्यानें आढळते आणि ती म्हणजे "स्थिरचर व्यापुनि अवघा तो जगदात्मा दशांगुळें उरला" ही. उदाहरणार्थ खालील काव्य पहा—

"Lord of the universe, Lord of our being,
Father eternal, ineffable Om !
Thou art the seed and the scythe of our harvests.
Thou art our hands and our heart and our home,
We bring thee our lives and our labours for tribute,
Grant us thy succour, thy councel, thy care,
O life, of all life and all blessing, we hail thee,
We praise thee, O Brahma, with cymbal and prayer."

भगवान् बुद्धावर तिनें रचलेल्या काव्यांत जीवनाचें क्षणभंगुरत्व आणि आभास व त्याचप्रमाणें निरंतर सत्याच्या शोधाची तळमळ व्यक्त झाली आहे. ती म्हणते—

"Lord Budha, on thy lotus-throne,
With praying eyes and hands elate,
What mystic rapture dost thou own,
Immutable and ultimate ?
What peace, unravished of our ken,
Annihilate from the world of men ?
The wind of charge for ever blows,
Across the tumult of our way,
To-morrow's unborn griefs depose
The sorrows of our yesterday,
Dream yields to dream, strife follows strife
And death unweaves the webs of Life."

काव्यमय जीवनांत रमलेली सरोजिनी नायडू हळूहळू भारतीय स्त्रियांच्या चळवळींत व पुढें महात्माजींच्या राजकीय चळवळींत ओढली गेली. तिनें

सर्व भारतांत दौरा काढून लोकांना सरकारशीं असहकाराची, अस्पृश्योद्धाराची व हिंदु-मुसल्मान ऐक्याची शिकवण दिली. तिच्या प्रभावी वक्तृत्वानें जनसमुदाय अक्षरशः मंत्रमुग्ध होई. इंडियन नॅशनल कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीची ती अनेक वर्षे सभासद होती. इ. स. १९२५ मध्यें ती कॉंग्रेसची अध्यक्ष झाली. इ. स. १९४७ पासून उत्तर प्रदेशाची ती पहिली महिला राज्यपाल झाली. शेवटपर्यंत ती हेंच जबाबदारीचें काम पहात होती. एक देशभक्त व झुंझार महिला म्हणून भारतीयांना सरोजिनी इतकी सुपरिचित आहे कीं येथें त्या सर्व वृत्तांताची पुनरावृत्ति करण्याची गरज नाहीं.

---

# प्रकरण २३ वें

## स्वामी रामकृष्णांच्या थोर शिष्या

**राणी रासमणी** :— ज्या महिलांच्या कर्तृत्वानें भारतीय इतिहास घडविला त्यांपैकीं राणी रासमणी ही एक आहे. हिच्या नांवाचा आदरणीय व कौतुकास्पद उल्लेख अनेक भारतीयांकडून केला जातो. रासमणीचा जन्म अगदीं सामान्य कुळांत झाला होता. परंतु वयाच्या मानानें तिच्या बुद्धीची असामान्य वाढ होऊन लवकरच तिनें आपल्या कर्तृत्वानें दिगंत कीर्ति संपादन केली.

बंगालमधील प्रत्येक घरांत जिचें नांव दुमदुमलें त्या रासमणीचा जन्म इ. स. १७९३ च्या सप्टेंबर महिन्यांत झाला (बंगाली कालगणना १२००, बुधवार, आश्विन दि. ११). कलकत्त्याच्या उत्तरेस असलेल्या चोवीस परगणे जिल्ह्यांतील कोना नांवाच्या खेड्यांत हरेकृष्णदास या नांवाचा एक मजूर आपली पत्नी रामप्रिया हिच्यासमवेत रहात होता. रामचंद्र व गोविंद या दोन मुलांच्या पाठीवर बऱ्याच वर्षांनीं त्यांना एक कन्या झाली. ती वर्षाची झाल्यापासूनच तिची आई तिला कौतुकानें राणी या नांवानें संबोधी. पुढें पुढें तिच्या रासमणी या नांवाला ' राणी ' हें उपपद कायमचें लागलें व या नांवानें प्रतीत होणारी थोरवीहि तिच्या बालक्रीडांत प्रकट होऊं लागली. रामायण व महाभारत तल्लीनतेनें ऐकत बसणारी एक विलक्षण मुलगी म्हणून आसपासच्या सर्व लोकांस तिचें नांव प्रथम परिचित झालें. वैष्णव भक्ताचीं बाह्य चिन्हेंहि तिनें आपल्या अंगावर धारण केलीं. रासमणी अवघी सात वर्षांची असतांना रामप्रिया अचानक मृत्युमुखीं पडली. या घटनेचा तिच्या कोमल मनावर फार परिणाम झाला. अशा परिस्थितींत सुमारें तीन वर्षे गेलीं या कालांत दैवानें रासमणीच्या पुढील भाग्याची आखणी करून ठेवली.

प्रीतीराम दास नांवाच्या हौरा जिल्ह्यांतील घोशालपूर येथें राहणाऱ्या एका

माणसानें आपल्या बुद्धीनें व कष्टानें कलकत्यांत व्यापार करून खूप धनसंचय केला होता. गांवांतील मोफत-विद्यालय-रस्त्यावरील आपल्या प्रासादतुल्य घरांत तो रहात असे. प्रीतिराम म्हातारा झाल्यावर त्याचा मुलगा राजचंद्र यानें कुटुंबाची सर्व जबाबदारी आपल्या अंगावर घेतली. राजचंद्रानें दोनदां विवाह केला, पण दोन्ही वेळां त्याच्या बायका फार थोड्या अवधींत निवर्तल्या. तिसऱ्या खेपेस तो विवाहास फारसा अनुकूल नव्हता. एकदां हुगळी जिल्ह्यांतील त्रिवेणी या ठिकाणीं गंगास्नानासाठीं बोटीनें जात असतां कोना खेड्यांतील घाटावर त्यानें रासमणीस स्नान करतांना पाहिलें. तिच्या सौंदर्यानें राजचंद्र मोहित झाला. घरीं गेल्यानंतर तिच्याशीं विवाह करण्याची आपली मनीषा त्यानें आपल्या पित्याजवळ बोलून दाखविली. ताबडतोब वडिलांनीं विवाहाची तयारी करून रासमणीशीं राजचंद्राचा विवाह इ. स. १८०४ मध्यें मोठ्या थाटामाटानें कलकत्यांत घडवून आणला. आर्थिक परिस्थितीच्या दृष्टीनें रासमणीच्या जीवनांत जरी क्रान्तिकारक बदल घडून आला तरी त्यामुळें तिचा साधेपणा व धार्मिक वृत्ति बिलकुल बदलली नाहीं.

रासमणीच्या पायगुणानें त्यांच्या घराकडे संपत्तीचा ओघ वाहूं लागला. तिच्या रोजच्या दिनक्रमांत सासुसासऱ्यांच्या सेवेला प्रमुख स्थान असे. शिवाय इतर अनेक घरगुती गोष्टींत ती स्वतः लक्ष घाली. तिच्या समतोल निर्णय-बुद्धीचा राजचंद्रावर इतका परिणाम झाला कीं प्रत्येक महत्त्वाच्या बाबतींत तो तिचा सल्ला घेऊं लागला.

इ. स. १८१७ मध्यें वयाच्या चौसष्टाव्या वर्षी प्रीतिचंद्र मरण पावला. या वेळीं त्यानें लाखो रुपयांची दौलत राजचंद्रासाठीं ठेवली होती. त्यामुळें कलकत्यांतील एक वजनदार गृहस्थ म्हणून लोक त्याला ओळखूं लागले होते. इ. स. १८२१ मध्यें राजचंद्रानें स्वतःसाठीं एक नवी इमारत बांधविली. त्यांत एकूण तीनशें खोल्या व सात स्वतंत्र विभाग होते. या बांधकामासाठीं त्यानें पंचवीस लाख रुपये खर्च केले. चोख व हिशेबीवृत्ति आणि औदार्य या दोन गुणांमुळें राजचंद्राबद्दल सर्वांना आदर वाटे. अशा राजशाही ऐश्वर्यांत राणी रासमणी विसावलेली असतांना इ. स. १८२३ मध्यें तिचा पिता कालवश झाला. या वर्षी बंगालमध्यें मोठा दुष्काळ पडला. शेंकडों निराधार कुटुंबांना

रासमणीनें आधार दिला. त्यांच्या घराजवळ गंगेचा घाट व रस्ता मोडकळीस येऊन अगदीं धोक्याचा बनला होता. इ. स. १८३० मध्यें पतीची संमति घेऊन रस्तादुरुस्ती करून तिनें नवीन घाट बांधविला. हा घाट व हा रस्ता अजूनहि ' बाबू घाट ' व ' बाबू रस्ता ' या नांवानें ओळखला जातो.

यानंतर राणीचे सुखाचे दिवस संपुष्टांत आले. इ. स. १८३६ च्या जूनमध्यें वयाच्या एकूणपन्नासाव्या वर्षीं राजचंद्र एकाएकी आजारी पडून त्यांतच त्यांचा अंत झाला. या वेळीं त्यांच्या तिन्ही मुलींचे विवाह झालेले होते. पतिनिधनाचा असह्य धक्का रासमणीस फार जाणवला. तीन दिवस तिनें तोंडांत पाणीहि घातलें नाहीं. राजचंद्राचें श्राद्ध तिनें इतक्या इतमामानें केलें कीं त्या वेळीं जो जें मागेल तें तिनें देऊं केलें. धार्मिक विधि संपत आला असतांना एक वैरागी तेथें आला. त्यानें पूर्वीं एकदां त्यांच्याकडे येऊन राजचंद्राला रघुनाथजीची मूर्ति पूजेसाठीं देऊं केली होती. वैरागीबोवांनीं कांहीं देणगीचा स्वीकार करावा अशी रासमणीनें विनंती केली. तेव्हां पाण्याचा एक तांब्या व एक ब्लँकेट या दोनच वस्तु त्यानें स्वीकारल्या. रघुनाथजीचें दर्शन घेऊन रासमणीस त्यानें आशीर्वाद दिला व तो निघून गेला. या घटनेचा तिच्यावर फार गंभीर परिणाम झाला.

स्वतःची निवृत्ति वाढत होती तरी कौटुंबिक कर्तव्याची रासमणीनें कधींहि हेळसांड केली नाहीं. पतीनंतर त्यानें ठेवलेल्या अफाट संपत्तीची व्यवस्था तिनें अतिशय दक्षतेनें ठेवली. तिचा जांवई मथुरानाथ विश्वास हा सर्व व्यवहारांत तिला मदत करी. तिचें औदार्य आणि दातृत्व यांचा सर्व बंगालमध्यें बोलबाला झाला होता. इ. स. १८५० मध्यें ती पुरीच्या जगन्नाथाच्या दर्शनास गेली असतांना ६०,००० रु. किंमतीचे हिरे बसविलेले तीन मुकुट तिनें देवांसाठीं दिले. याशिवाय सर्व उपाध्यायांना भरपूर दक्षिणा वांटण्यांत आली. श्रीचैतन्यांची जन्मभूमि नवद्वीप येथील यात्रेस रासमणी गेली असतांना तिनें निरनिराळ्या विद्वानांना २०,००० रु. देणग्या दिल्या. ग्रहणाच्या मुहूर्तास सुमारें सहा हजार रुपये तिनें दानांत खर्च केले.

रासमणीनें केलेल्या लोकोपयोगी कामात सुवर्णरेखा नदीपलीकडील पुरीच्या रस्त्याच्या दुरुस्तीचा उल्लेख करता येईल. मधुमति आणि नवगंगा या

नद्यांना जोडणारा एक कालवा खोदवून त्या भागांतील शेतींत तिनें सुधारणा घडवून आणली. तिनें गंगेवर तीन मोठमोठे घाट बांधवून देतले, जेथें रासमणीचा जन्म झाला त्या कोना खेड्यांतहि तिनें एक घाट बांधविला.

राजचंद्राच्या मृत्यूनंतर तिनें आपलें वैयक्तिक जीवन हिंदु रीति-रिवाजानुसार पूर्ण संन्यस्त स्वरूपाचें केलें. सर्व प्रकारचे धार्मिक सण व उत्सव तिच्या घरीं फार मोठ्या प्रमाणावर साजरे होत. समारंभप्रसंगीं तीनशें खोल्यांचा तो गजबजलेला प्रासाद एखाद्या स्वतंत्र गांवासारखा भासे.

धार्मिक उत्सवाबाबत राणीचा उत्साह किती असे याचें आणखीहि एक उदाहरण देतां येईल. इ. स. १८३८ च्या रथयात्रेच्या पूर्वी देवांची चांदीच्या रथांतून मिरवणूक काढावी अशी कल्पना रासमणीस सुचली. कांहीं भारतीय कारागिरांकडे ही कामगिरी सोंपविण्यांत आली. गाडी तयार झाली व त्यांतून कालीची एक प्रचंड मिरवणूक काढण्यांत आली. स्नानयात्रेच्या दिवशीं गाडीचा यथोचित अर्पणविधि करण्यांत आला. या हौसेसाठीं राणीनें सुमारें सव्वा लाख रुपये खर्च केला. दरवर्षी दुर्गापूजेसाठीं ती पन्नास ते साठ हजार रुपये खर्च करीत-असे. अशाच एका दुर्गोत्सवाच्या प्रसंगीं शेंकडों ब्राह्मण मंडळीं वाजत गाजत गंगास्नानासाठीं निघाली. राणीच्याच बाजूला राहणाऱ्या एका गोऱ्या साहेबानें या वाद्यवादनाविरुद्ध कोर्टांत तक्रार केली. राणीच्या लोकांनीं दुसऱ्या दिवशीं आणखी वाद्यें वाजविलीं. राणीवर याबाबत आणखी एक खटला भरण्यांत आला. त्यांत ती हरली व तिला ५० रु. दंड भरावा लागला.

रासमणीच्या सूचनेवरून तिचें निवासस्थान व बाबूघाट यांच्यामध्यें एक लांकडी भिंत उभी करण्यांत आली. अधिकारीवर्गानें हरकत घेतांच तिनें कळविलें कीं तो रस्ता राणीनें स्वखर्चानें तयार केलेला असल्यानें त्यावर तिचाच अधिकार पोंचतो. शेवटीं तिची बाजू सिद्ध होऊन तिचा दंड परत करण्यांत आला.

राणीनें आपल्या हयातींत कांहीं दूरदूरच्या धोक्याच्या यात्रा केल्या. इ. स. १८५० मध्यें बोटींतून पुरीस जात असतांना वाटेंत चंदरनगरजवळ तिला दरोडेखोरांनीं वेढलें. बारा हजार रुपयें देण्याचें मान्य करून राणीनें

आपली सुटका करून घेतली. घरीं आल्यावर तिनें दिलेल्या शब्दाप्रमाणें पैसे पोंचते केले. यात्रेंत आलेल्या अनेक अनुभवांनीं तिची ईश्वरावरील श्रद्धा अधिक दृढ झाली.

राणी रासमणीच्या धैर्याविषयीं व प्रसंगावधानाविषयीं कांहीं कथा प्रसिद्ध आहेत. कलकत्ता शहराच्या आसपास कांहीं कोळी मच्छीमारीचा उद्योग करीत असत. त्यांच्यावर ईस्ट इंडिया कंपनीनें जबर कर बसविला. या बाबतींत अनेक अर्ज करण्यांत आले. परंतु त्यांची दखल घेतली जाण्याचा संभव दिसेना. कोळ्यांचें एक शिष्टमंडळ राणीस भेटलें व तिनें त्यांच्या न्याय्य हक्काचें रक्षण करावें अशी त्यांनीं तिला विनंती केली. कंपनी सरकारला धडा शिकविण्यासाठीं राणीनें घुसुरी मेतिआबुझ्रं या दोन टोंकांमधील गंगेच्या प्रवाहाचा प्रदेश कंपनीला १०,००० रु. देऊन लीजनें घेतला व दोन्ही बाजूस प्रवाहांत मोठे अडथळे उभे करून बोटी व जहाजे यांचा मार्ग रोखून धरला. अर्थातच कंपनीनें राणीवर नोटीस बजाविली व वाहतुकींतील अडथळे तावडतोब दूर करण्यास सांगितलें. राणीनें उत्तर दिलें कीं, बोटींच्या वाह-तुकीनें मासे घाबरतात व त्यांच्या उत्पत्तीवर विपरीत परिणाम झाल्यानें या परिसरांतील कोळ्यांचें धंद्याच्या दृष्टीनें फार नुकसान होतें. कंपनी सरकारला या चतुर उत्तरापुढें नमतें घ्यावें लागलें. मच्छीमारीवरील कर रद्द करण्याचें सरकारकडून आश्वासन घेतल्यानंतरच राणीनें वाहतुकींतील अडथळे दूर केले.

शिपायांचें बंड मोडून काढल्यानंतर कांहीं गोरे शिपाई मोफत विद्यालयाच्या इमारतींत वास्तव्य करीत होते. ते रात्रीं दारू पिऊन सर्व रस्त्यांवर धिंगाणा घालून लोकांना त्रास देत. हें पाहून राणीच्या पहारे-कऱ्यांनीं कांहीं गोऱ्या शिपायांना बेदम ठोकलें. दुसऱ्या दिवशीं गोरे शिपाई सुसज्ज होऊन त्यांनीं राणीच्या घरावर हल्ला चढविला व बरीच नासधूस केली. रक्षणासाठीं राणीनें आपल्या सर्व मंडळींना दुसरीकडे पाठविलें व ती स्वतः हातीं तरवार घेऊन रघुनाथाच्या रक्षणासाठीं उभी राहिली. सुदैवानें एका वरच्या गोऱ्या अधिकाऱ्यास ही वार्ता कळतांच तो तेथें आला व त्यानें सर्व शिपायांना तेथून परत फिरविलें.

निळा रंग तयार करण्यासाठीं वनस्पतीची लागवड करणारा डोनाल्ड्

या नांवाचा एक मोठा व्यापारी होता. हे व्यापारी त्यांच्या कुळांची पिळवणूक करण्याबाबत फार प्रसिद्ध असत. रासमणीच्या मालकीच्या मकिमपूर भागांत राहणारीं कुळें डोनाल्ड्च्या छळाला अगदीं विटलीं होतीं. त्यांनीं राणीकडे तक्रार गुदरली. राणीनें कांहीं तालिमबाज जवान पाठवून डोनाल्ड्वर अशी जरब बसविली कीं, त्यानें परत राणीच्या कुळांना त्रास देण्याचें धाडस कधींहि केलें नाहीं. राणीविरुद्ध कोर्टांत तक्रार गुदरण्याचा त्याचा प्रयत्नहि यशस्वी झाला नाहीं.

जगन्नाथपूरच्या राणीच्या मालकीच्या जमिनीभोंवतीं चारी बाजूंनीं जेसोरच्या बलाढ्य जमीनदाराची भूमि होती. राणीच्या जमिनीचें हरण करण्यासाठीं त्यानें तेथील कुळांना त्रास देण्यास सुरुवात केली. हें समजतांच राणीनें आपले निवडक लोक पाठवून जमीनदाराच्या लोकांचा पराभव केला. या प्रसंगानें जमीनदारानें राणीची इतकी धास्ती घेतली कीं परत तिच्या मालकीच्या भूमींत त्यानें कधींच पाऊल टाकलें नाहीं.

यानंतर राणी रासमणीच्या जीवनांत अशा कांहीं घटना घडल्या कीं, त्यामुळें तिच्या जीवनाची दिशा पार बदलून गेली. काशीला जाऊन विश्वेश्वराचें व अन्नपूर्णेचें एकदां दर्शन घ्यावें अशी फार दिवसांपासून तिची इच्छा होती. प्रयाणाचा काल निश्चित झाला. सर्व सामग्री भरून गंगेच्या कांठावर बोटी सज्ज झाल्या. दुसऱ्या दिवशीं पहाटेस मंडळी निघणार तों रात्रीं रासमणीस एक स्वप्न पडलें. दुर्गादेवी स्वप्नांत येऊन तिनें राणीस सांगितलें कीं, " काशी यात्रेचा बेत रद्द करून माझ्यासाठीं गंगाकिनारीं एक देऊळ बांध. तेथें माझी स्थापना करून तूं पूजाअर्चा सुरू केल्यास मला फार समाधान वाटेल. " उठल्याबरोबर तिनें आपला बेत रद्द झाल्याचें जाहीर केलें. इ. स. १८४७ मध्यें गंगेच्या पूर्वकांठीं दक्षिणेश्वर येथें राणीनें एक घर व वीस एकर जमीन खरेदी केली. हें ठिकाण कलकत्त्यापासून चार मैल अंतरावर आहे. या जमिनीची ठेवण चंद्रकोरीप्रमाणें असल्यानें येथें देऊळ बांधणें अतिशय सोयीचें होतें. देऊळ बांधण्यांत अनेक अडचणी आल्या, पण त्या सर्वांस तोंड देऊन राणीनें हें बांधकाम सात वर्षांत पूर्ण केलें.

देवळांत बसविण्यासाठीं कालीमातेची मूर्ति घडविण्यास सुरुवात झाल्या-

पासून राणी अतिशय व्रतस्थ राहूं लागली. मूर्तीच्या स्थापनेचा दिवस कधीं उजाडतो अशी उत्कंठा तिला लागून राहिली होती.

इ. स. १८५५ मे ची ३१ तारीख हा स्नानयात्रेचा दिवस मूर्तीच्या स्थापनेसाठीं निश्चित करण्यांत आला. अगदीं शेवटच्या क्षणाला एक अनपेक्षित संकट आलें. रासमणी जातीनें शूद्र असल्यामुळें कोणीहि ब्राह्मण हा स्थापना-विधि करून तिच्या हातचा प्रसाद देवीस अर्पण करण्यास तयार होईना. ती डगमगली नाहीं. भारतांतील सर्व महत्त्वाच्या धर्मपीठांना याबाबत सल्ला देण्या-साठीं तिनें पत्रें रवाना केलीं. झामापुकूर चतुष्पादी विद्वान् रामकुमार चटो-पाध्याय नांवाच्या एकाच ब्राह्मणानें या मूर्तिस्थापनेस अनुकूल मत दिलें. राणीनें देवळास व मूर्तीच्या नेहमीच्या खर्चासाठीं उपाध्यायास उत्पन्न तोडून दिल्यास मूर्तिस्थापना करण्यास अडचण नाहीं, असें मत त्यानें लिहून कळविलें. तिला खूप आनंद झाला. लगेच दिनाजपूर जिल्ह्यांत देवीच्या खर्चासाठीं सव्वादोन लाख रुपयांची जमीन विकत घेऊन तिचें कायदेशीर बक्षिसपत्र राणीनें करवून घेतलें.

रासमणीचें स्वप्न साकार झालें. सत्, चित् व आनंद यांची सगुण मूर्ति मंदिरांत विराजमान झाली. तेव्हांपासून या दुःखी जीवनांतून ज्यांना विसावा हवासा वाटे ती शेंकडों भक्त मंडळी तेथें लोटूं लागली. प्रशस्त सभामंडप, भोंवतालीं दाट वृक्षराजी व पायरीजवळून वाहणारा गंगेचा प्रवाह यामुळें या मंदिरास एक अपूर्व शोभा प्राप्त झाली आहे. मुख्य मंदिराच्या उत्तरेस एक राधा-कृष्णाचें मंदिर आहे आणि पश्चिमेच्या परिसरांत एकाच नमुन्याचीं शिवाचीं बारा देवालयें बांधलेलीं आहेत. पुजाऱ्यांसाठीं राहण्याच्या जागा आहेत. देवालयासमोर दोन नगारखाने आहेत. पलीकडे एक भव्य इमारत बांधून रासमणीच्या घराण्यांतील लोकांची प्रसंगविशेषीं राहण्याची व्यवस्था करण्यांत आली आहे. फुलांच्या बागा, पाण्यासाठीं हौद व मोठमोठे वृक्ष यांनीं या ठिकाणाची शोभा खूपच वाढविली आहे. रासमणी नेहमीं देवळांत येऊन कालीमातेची प्रार्थना करी.

राणीचा जांवई मथूर यानें एकदां देवळाच्या आवारांत एक तरुण हिंडतांना पाहिला. त्याचें नीटस नाक, डोळे व कांहीं विशेष तेजानें चमकणारा

चेहरा आसपासच्या लोकांचें लक्ष आपोआपच वेधून घेत होता. तो एका वेगळ्याच जगांत वावरत आहे हें त्याच्याकडे पाहणाऱ्याच्या तावडतोब लक्षांत येत होतें. या तरुणाबद्दल मथूरला विलक्षण आकर्षण वाटून त्यानें त्याची अधिक चौकशी केली. तेव्हां त्यास असें समजलें कीं, त्याचें नांव गदाधर असून तो आपल्या वडील भावाजवळ (रामकुमार) देवालयाच्या बागेंत राहतो. गदाधरानें देवळांत कांहीं-तरी काम करावें यासाठीं रासमणी व मथूर यांनीं त्याचें मन वळवून त्याच्या-कडे देवीची वेशभूषा करण्याचें काम सोंपविलें. कांहीं दिवसांनीं राधाकृष्णाच्या मूर्ति रात्रीं शय्यागृहांत नेत असतांना उपाध्यायाचा पाय घसरून कृष्णाची मूर्ति त्याच्या हातांतून पडली व तिचा पाय मोडला. त्याला तावडतोब कामावरून दूर करण्यांत आलें. या अशुभ घटनेनें राणी फार अस्वस्थ झाली. पुढें काय करावें याविषयीं अनेकांशीं तिनें विचारविनिमय केला. पाय मोडलेल्या मूर्तीचें गंगेंत विसर्जन करून दुसरी नवी मूर्ति घडवून घ्यावी असा कांहींनीं सल्ला दिला. परंतु धार्मिक वृत्तीच्या राणीस हा निर्णय रुचेना. एका मध्यस्थामार्फत गदाधराचा सल्ला विचारण्यांत आला. चिंतनमग्न मनोवस्थेंत गदाधरानें उत्तर दिलें, "पाय भंगला म्हणून मूर्तीचें विसर्जन करणें चुकीचें आहे. राणीच्या जांवयाचा पाय मोडल्यास नवीन जांवई शोधण्यांत येईल कीं पायावर उपचार करण्यांत येतील ? कृष्णाच्या मूर्तीची दुरुस्ती करून तिचीच पूजाअर्चा चालू करावी." या सरळ व बिनतोड उत्तरानें राणीचें समाधान झालें. मूर्तीची दुरुस्ती गदाधरानेंच केली व तिची परत प्राणप्रतिष्ठा करण्यांत आली.

रामकुमाराच्या मृत्यूनंतर श्रीरामकृष्णाची मंदिराचे प्रमुख उपाध्याय म्हणून नेमणूक करण्यात आली. त्यांच्या दृष्टीनें कालीमाता म्हणजे निव्वळ दगडाची मूर्ति नसून सजीव विश्वमाता होती. दिवसेंदिवस ते मातेच्या ध्यानांत इतके मग्न राहूं लागले कीं आसपासचें जग त्यांच्याबद्दल काय म्हणते याविषयीं ते पूर्ण बेफिकीर झाले. अनेक वेळां ते समाधिस्थ अवस्थेंत राहिल्यानें त्यांच्या हातून दैनंदिन पूजाअर्चा वेळेवर करण्यात चुका होऊं लागल्या. पण राणी व मथूर यांना असा असामान्य उपाध्याय कालीमातेसाठीं लाभल्याबद्दल अति-शय धन्यता वाटे. कांहीं सामान्य मंडळी रामकृष्णांना वेड्यांत काढूं लागली होती. पण रासमणीची मनोदेवता मात्र रामकृष्णांच्या अलौकिक भक्तीची साक्ष

देत होती. तिच्या दृष्टीनें मंदिरांत जागृत देवता नांदत होती. त्यामुळें एक प्रकारच्या कृतार्थतेच्या भावनेनें तिचें हृदय भरून आलें होतें.

गंगास्नान करून एके दिवशीं राणी मंदिरांत आली व देवीचें स्तुति-स्तोत्र गावें असें तिनें श्रीरामकृष्णांना सांगितलें. मोठ्या भक्तिभावानें त्यांनीं एक भक्तिगीत गाईलें. पण राणीचें मन एका खटल्यांत गुंतलें असल्यानें रामकृष्णांच्या म्हणण्याकडे तिचें फारसें लक्ष नव्हतें. रामकृष्णांनीं हें ओळखून राणीच्या पाठीवर एक चापट मारली. त्याबरोबर राणी भानावर आली. पश्चात्तापानें विषण्ण झालेल्या मन:स्थितींतच ती घरीं परतली.

रामकृष्णांच्या कृत्यानें आश्चर्यचकित झालेल्या राणीच्या नोकरांनीं कडक शब्दांत त्यांच्या वर्तनाचा जेव्हां निषेध करावयास सुरुवात केली तेव्हां तिनें त्यांना गप्प बसविलें. " माझ्या चुकीबद्दल देवीनेंच रामकृष्णांच्यामार्फत मला समज दिली " असें स्पष्टीकरण तिनें केलें.

संपत्तीच्या कारभारांतून आपलें अंग काढून हळूहळू राणीनें ही व्यवस्था मथुरानाथाकडे सोंपविली व स्वतः दिवसाचा बराच वेळ देवीच्या मंदिरांत ती साधनेंत व्यतीत करूं लागली. कालीमातेवरील नितांत श्रद्धा, आध्यात्मिक मार्गदर्शक म्हणून रामकृष्णांची तिनें केलेली निवड व उपासनेस अनुकूल मनोवृत्ति यामुळें थोड्याच अवधींत तिची चित्तशुद्धि होऊन तिच्या साधनेची पातळी खूपच उंचावली.

राणीचें ऐहिक जीवन आतां फारसें उरलें नव्हतें. एके दिवशीं तिला ताप आला व तीव्र स्वरूपाची आव होऊन तिनें अंथरुण धरलें. तिच्या इच्छेवरून तिला आदिगंगेच्या किनाऱ्यावरील घाटाजवळच्या घरांत हलविण्यात आलें. निर्याणकाल जवळ आला. तिला कमरेइतक्या पाण्यांत उभें धरण्यांत आलें. आसमंतांतील मिणमिणते दिवे तिच्या सूचनेवरून बंद करण्यात आले. काली-माता प्रसन्न होऊन तिनें राणीला दर्शन दिलें. तिच्या तोंडावर एक आगळाच आनंद व तेज दिसूं लागलें. विश्वतेजांत रासमणीची आत्मज्योत विलीन झाली. इ. स. १८६१ च्या फेब्रुवारी महिन्याच्या १९ तारखेस राणी रासमणीचें जीवनकार्य संपलें.

**योगेश्वरी भैरवी ब्राह्मणी** :– इ. स. १८६१ च्या वसंत ऋतूंतील एका

रम्य प्रभातकाळीं श्रीरामकृष्ण मंदिरांतील आपल्या निवासस्थानांतून निघून पूजेसाठीं पुलें तोडण्याच्या निमित्तानें बागेकडे जात होते. सर्व वातावरण निरागस शांततेनें भरून गेलें होतें. इतक्यांत मंदिराच्या उत्तर घाटावर एक ल्हानशी बोट येऊन थांबली आणि त्यांतून भगवीं वस्त्रें परिधान केलेली एक मध्यम वयाची संन्यासिनी खालीं उतरली. तिनें आपल्या केसांची सैलशी गांठ मारली होती. हातांत एक छोटेसें पुडकें घेऊन ती मंदिराच्या दिशेनें वाट चालूं लागली. तिला भेटावें अशी रामकृष्णांना उत्सुकता वाटून ते थबकले. मंदिराच्या प्रमुख प्रवेशद्वारांतून तिनें सभामंडपांत प्रवेश केला व एका कोपऱ्यांत ती बसली. तिच्या हालचालीवरुन ती कोणाची तरी वाट पहात असावी. ब्रह्मचर्यपालनानें तिचें मूळचें सौंदर्य व सौष्ठव जसेंच्या तसें टवटवीत राहिलें होतें. तिच्या जवळच्या पुडक्यांत एक-दोन पुस्तकें होतीं. कांहीं विशेष हेतु मनांत धरून ती मंदिरांत आलेली असावी असा रामकृष्णांनीं बांधलेला तर्क पुढील घटनांवरून खरा ठरला.

खोलींत परतल्यानंतर रामकृष्णांनीं आपला भाचा हृदयनाथ याला हांक मारून सांगितलें, " हृदय, मंदिराच्या सभामंडपांत एक बाई बसल्या आहेत. त्यांना इकडे घेऊन ये. " ही विचित्र आज्ञा ऐकून हृदय क्षणभर थक्कच झाला. कारण रामकृष्ण एखाद्या अनोळखी स्त्रीशीं बोलण्याचें औत्सुक्य क्वचितच दाखवीत. हृदयची शंका ओळखून ते म्हणाले, " तूं तिच्याकडे जाऊन माझी तिला माहिती दे म्हणजे ती आपण होऊनच माझ्या भेटीस येईल. "

भैरवी एका कोपऱ्यांत डोळे मिटून चिंतनात मग्न झाली होती. हृदय हळूंच तेथें गेला. त्यानें तिला आपल्या मामांची माहिती दिली. भैरवीला भेटण्याची त्यांना इच्छा आहे हें समजतांच एका क्षणाचाहि विलंब न करतां ती निघालेली पाहून तर हृदय अधिकच गोंधळांत पडला.

रामकृष्णाना पाहतांच भैरवीचे डोळे भरून आले. चेहरा आनंदानें फुलला. देहमान विसरून ती बोलूं लागली, "बाळ, आज अखेरीस तूं भेटलास. किती दिवस मी तुझा शोध घेत हिंडत होतें. "

" आई, माझ्याबद्दल तुला कोणी माहिती दिली ? " रामकृष्णांनीं

आश्चर्यानें विचारलें. "कालीमातेनें तीन व्यक्तींना भेटण्याचा योग आपल्या दर्शनाच्या वेळीं सांगितला होता. पैकीं चंद्र आणि गिरिजा यांची भेट पूर्वबंगाल भागांत झाली. नंतर मी तुझ्या शोधार्थ हिंडूं लागलें. तूं आज भेटलास आणि मी धन्य झालें." तिच्या या उत्तरानें आनंदून रामकृष्ण एखाद्या लहान मुलासारखें तिला बिलगले आणि कालीमातेची भक्ति करूं लागल्यापासून त्यांना आलेले अलौकिक अनुभव त्यांनीं तिला सांगण्यास सुरुवात केली. "कालीमातेच्या चिंतनांत मग्न असतांना अनेक वेळां माझें देहभान हरपतें, झोंप उडते आणि कित्येक वेळां माझ्या सर्वांगाचा विलक्षण दाह होतो. लोक म्हणतात, मला वेड लागलें आहे! तुला काय वाटतें?" रामकृष्णांच्या या प्रश्नानें भैरवी पुन्हां भानावर आली. प्रेमानें त्यांची समजूत घालीत ती उत्तरली, "छे! छे! या समाधिचिन्हांना वेड कोण म्हणेल? भक्तांत महाभाव नांवाची एक अवस्था साधनेनंतर प्राप्त होते. ती तूं गांठली आहेस. अश्रु, शरीरास सुटणारा कंप, अंगावरील रोमांच व घर्मबिंदू अशा प्रकारचीं एकोणीस चिन्हें महाभाव या अवस्थेंत प्रत्ययास येतात. ज्या सामान्य माणसांना भक्तीची ही परमोच्च अवस्था गांठणें शक्य होत नाहीं, त्यांच्या दृष्टीनें तें वेड ठरतें. राधा आणि गौरांग हीं या अवस्थेस पोंचलेलीं होतीं, हें भक्तिशास्त्रावरून समजून येतें. हीं शास्त्रें माझ्याजवळ आहेत. त्यावरून मी कोणाळाहि असें सिद्ध करून देईन कीं, जो परमेश्वराला आपलें-सर्वस्व समर्पण करून अहर्निश त्याची भक्ति करतो त्या प्रत्येकास या अवस्थांचा अनुभव येतोच." भैरवीच्या या उद्गारांनीं रामकृष्णांचें समाधान झालें.

संभाषणाच्या ओघांत भैरवीनें स्वत:विषयीं आणखीहि कांहीं गोष्टी रामकृष्णांना सांगितल्या. तिचा जन्म जेसोर जिल्ह्यांतील एका ब्राह्मण कुटुंबांत झाला. तिचें नांव योगेश्वरी असें ठेवण्यांत आलें. अविवाहित राहून तिनें बरीच योगसाधना केल्यानें तिला कांहीं अद्‌भुत शक्ति प्राप्त झाल्या होत्या. रामकृष्णांना तांत्रिक पद्धतीच्या साधनेची दीक्षा दिल्यास या शक्ति सोज्ज्वळ व पवित्र हातांत राहून यांचा दुरुपयोग करणाऱ्या मंडळींपासून तांत्रिक पद्धति मुक्त होईल अशी भैरवीला कल्पना आली.

बोलण्याच्या भरात मध्यान्ह होत आली. भैरवीनें मंदिरांतील सर्व

देवांचें दर्शन घेतलें व नंतर रामकृष्णांनीं दिलेला देवीचा प्रसाद घेतला. व्यवस्थापकांनीं तिला शिधा दिला. तो घेऊन देवळाच्या पंचवटी भागांत तिनें सैंपाक केला. जवळची रघुवीराची छोटी मूर्ति काढून तिनें भक्तिभावानें नैवेद्य दाखविला. डोळे मिटून प्रार्थना सुरू करतांच तिची समाधि लागली आणि अननुभूत अशा दर्शनांत तिची ऐहिक जाणीव पूर्णपणें नष्ट झाली. इकडे चिंतनांत मग्न असलेल्या रामकृष्णांचे पाय आपोआप पंचवटीकडे वळले. तेथें पोंचल्यावर रघुवीरासमोर ठेवलेला नैवेद्य खाण्यास त्यांनीं सुरुवात केली. कांहीं वेळानें ब्राह्मणीची समाधि उतरली. तिनें डोळे उघडले आणि श्रीरामकृष्ण प्रसाद ग्रहण करीत असल्याचें पाहून तिला अतिशय आनंद झाला. समाधिअवस्थेंत श्रीराम ज्या स्वरूपांत प्रगट झाले व त्यांनीं प्रसाद खाल्ला तेंच दृश्य डोळे उघडल्याबरोबर दिसल्यामुळें तिला विशेष वाटलें. रामकृष्णांच्या सर्व क्रिया उन्मनी अवस्थेंतच घडत होत्या. भानावर येतांच ते जरा शरमिंदे झाले व तिला म्हणाले, " कांहीं वेळां ध्यानमग्न स्थितींत मी काय करतों हें मलाच कळत नाहीं. मुद्दाम हेतुपुरस्सर मात्र मी कांहीं करीत नाहीं. " भैरवी उत्तरली, " जें घडलें त्यांतून मला मात्र खरें ज्ञान झालें. तूं येथें कसा आलास व मी अर्पण केलेला प्रसाद कसा ग्रहण केलास हें मला माझ्या समाधिअवस्थेंत कळून आलें. श्रीरामप्रभूंच्या चरणीं माझी प्रार्थना रुजू झाली. मला देव भेटले. आतां मला औपचारिक साधनांची गरज उरली नाहीं. " इतकें बोलून भैरवीनें शिल्लक राहिलेला प्रसाद निःसंकोचपणें ग्रहण केला. एकीकडे तिच्या डोळ्यांतून आनंदाश्रु पाझरत होते. सदेह रघुनाथ आपल्याला भेटला, आतां दगडी मूर्तीची आवश्यकता नाहीं, अशी मनाची खात्री पटून तिनें गंगेच्या प्रवाहांत तिचें विसर्जन केलें.

दिवसेंदिवस भैरवी व श्रीरामकृष्ण यांचें गुरुशिष्यांचे संबंध दृढ होत गेले. वैष्णव वाङ्मयावर व तंत्रशास्त्रावर भैरवीचें प्रभुत्व वाखाणण्यासारखें होतें. रामकृष्णांची सिद्धावस्था दाखवून देण्यासाठीं ती अनेक प्रकरणांचा व त्यांतील श्लोकांचा आधार देई. एक आठवडाभर त्या दोघांनीं आपला बहुतेक सर्व वेळ पंचवटींत साधनेवर व इतर आध्यात्मिक विषयावर चर्चा करण्यात घालविला. श्रीरामकृष्ण आणि भैरवी यांच्या परिचयावर सर्वसामान्य लोक विनाकारण टीका करतील अशी कल्पना रामकृष्णांना येतांच त्यांनीं भैरवीलाही ती

सूचित केली. लगेच तिनें आपलें निवासस्थान दक्षिणेश्वराच्या उत्तरेस देवमंडल घाटावरील धर्मशाळेंत हालविलें. सच्छील, प्रेमळ स्वभाव, काटेकोर वर्तन व भारदस्तपणा या गुणांमुळें ती आसपासच्या खेडुतांत फार लोकप्रिय झाली. त्यामुळें तिला पोटापाण्याची काळजी उरली नाहीं.

ब्राह्मणी रोज नेमानें दक्षिणेश्वरास जाई व रामकृष्णांना मिठाई व इतर कांहीं दुधाचे पदार्थ खावयास देई. कांहीं वेळां हातांत लोणी व साय घेऊन ती 'गोपाल' 'गोपाल' अशा आर्त स्वरांत हांका मारी. अशा वेळीं दक्षिणेश्वरीं रामकृष्ण बेचैन होत. तडक उठून ते तिच्या निवासस्थानीं जात व एखाद्या लहान मुलाप्रमाणें लोणी व साय खाऊन परतत. कधीं कधीं भैरवी रेशमी साडी परिधान करी, अंगावर अलंकार घाली, अनेक स्त्रियांना बरोबर घेऊन भजन करीत रामकृष्णांच्या भेटीस जाई व अनेक खाद्यपदार्थ त्यांना अर्पण करी. या वेळीं गोपालाला जेवूं घालणाऱ्या यशोदामातेची उत्कटता व प्रेम तिच्या ठिकाणीं भासमान होई.

श्रीरामकृष्णांच्या ठिकाणीं श्रीचैतन्यांचीं सर्व वैशिष्ट्यें असून ते देवाचे अवतारच आहेत अशी ब्राह्मणीची खात्री होऊन चुकली होती. साधनेंत प्रगति करीत असतांना रामकृष्णांना एक विचित्र व्याधि निर्माण झाली. त्यांच्या सर्वांगाची इतकी विलक्षण आग होई कीं, शेवटीं ते गंगेच्या प्रवाहांत जाऊन उभे रहात व डोक्यावर ओला रुमाल ठेवीत. अनेक उपचार करूनहि हा प्रकार थांबेना. देवाच्या भेटीच्या ओढीनेंच रामकृष्णाना असें होतें अशी खात्री वाटून भैरवीनें एक साधा उपाय सुचविला. गळ्यात सुवासिक फुलांच्या माळा घालून सर्वांगास चंदनाचें लेपन केल्यास रामकृष्णांना बरें वाटेल असें तिनें सुचविलें. हा उपाय सर्वांना हास्यास्पद वाटला. तरी मथुरानाथांनीं प्रयोग करून पाहण्याचें ठरविलें. आश्चर्य असें कीं, तीनच दिवसांत या उपायांनीं रामकृष्णांना आराम वाटूं लागला. यावरून रामकृष्णांच्या दैवी अवताराबद्दल भैरवीची अधिकच खात्री पटली. व्याधि बरी होण्याच्या सुमारास सीहोरच्या मार्गावर असतांना आपल्या शरीरांतून दोन तेजःपुंज मुलें बाहेर येत आहेत असा श्रीरामकृष्णांना जो साक्षात्कार झाला त्याचा अर्थ ब्राह्मणीनें असा लावला कीं, श्रीचैतन्यांनीं आपले सहाध्यायी नित्यानंद यांच्या देहांत प्रवेश केला असावा.

ब्राह्मणीचा तर्क पक्का करणारी आणखी एक घटना या वेळीं घडली. रामकृष्णांना इतकी राक्षसी भूक लागे कीं कितीहि खाल्लें तरी तृप्तीची संवेदना येईना. या विचित्र प्रकाराचा अर्थ त्यांनीं ब्राह्मणीला विचारला. तिनें स्पष्टीकरण केलें कीं, साधनेच्या कालांत अधून-मधून असे विचित्र अनुभव येतात. यावर उपाय म्हणून मथुरबाबूंना तिनें एका खोलींत कांहीं विशेष खाद्यपदार्थ भरून ठेवण्यास सांगितलें. रामकृष्णांनीं त्या खोलींत रहावें व रात्रंदिवस मन मानेल तसें खावें असें तिनें सांगितलें. तीन दिवसांनंतर रामकृष्णांची भूक शमली व त्यांना मनःस्वास्थ्य लाभलें.

रामकृष्णांचे अनुभव इतरहि संतमहंतांना आले होते. त्यांचे आधार देऊन भैरवीनें रामकृष्णांची असामान्यता उघड रीतीनें सिद्ध करून दिली. एकोणिसाव्या शतकांत कांहीं विशिष्ट कार्यासाठीं रामकृष्णांचा अवतार झालेला आहे ही गोष्ट तिनें सर्वांना पटवून दिली.

एकदां श्रीरामकृष्ण, हृदय व मथूर यांच्याशीं पंचवटींत बसून गोष्टी करीत होते. बोलतां बोलतां रामकृष्ण म्हणाले, " वैष्णवधर्मवाङ्मयावर प्रभुत्व असलेली एक स्त्री येथें आलेली आहे. तिच्या मतें मी देवाचा अवतार आहे. " यावर मथुरानाथ उत्तरले, " वैदिक वाङ्मयांत फक्त दहा अवतारांचाच उल्लेख आहे. मग हें कसें शक्य आहे ? आपणांवर देवीची विशेष कृपा आहे यांत मात्र संदेह नाहीं. " यावर रामकृष्णांनीं अधिक स्पष्टीकरण केलें, " माझ्या देहांत व मनोधारणेंत अवताराचीं सर्व वैशिष्ट्यें दिसून येतात असें तिचें म्हणणें आहे व हीं वैशिष्ट्यें अधिकृत धर्मग्रंथांत नमूद केलेलीं आहेत असा दावा आहे. " एवढें बोलणें होत आहे तोंच ब्राह्मणी लांबून येत असलेली त्यांनीं पाहिली. तिच्या हातांत रामकृष्णासाठीं आणलेले कांहीं खाद्यपदार्थ होते. मथूरबाबूंना पहातांच तिनें आणलेले पदार्थ हृदयच्या हातीं दिले व ती तेथेंच थबकली. रामकृष्णांनीं तिला ती येण्यापूर्वी आपापसांतील संभाषणाचा सारांश सांगितला व ते म्हणाले, " मथूर म्हणतो, अवतार फक्त दहाच व्हावयाचे होते. तेव्हां मला देवाचा अवतार म्हणतां येणार नाहीं. " ब्राह्मणीनें लगेच उत्तर दिलें, " कां ? भागवत ग्रंथांत बावीस अवतारांचा स्पष्ट उल्लेख आहे व पुढेंहि जरूर पडेल त्याप्रमाणें देव अवतार घेईल असें त्यांत

स्पष्टपणें नमूद करून ठेवलें आहे. आपल्या ठिकाणीं अवताराचीं सर्व चिन्हें स्पष्ट आहेत हें कोणत्याहि विद्वानाशीं जाहीर चर्चा करून मी सिद्ध करून देईन." तिचें हें निर्णायक मत फार परिणामकारक ठरलें. त्या दिवसापासून रामकृष्णांना वेड्यांत काढणारे शेंकडों लोक त्यांना 'राम', 'कृष्ण', 'बुद्ध' अशा संज्ञा देऊन त्यांच्या चरणीं लीन होऊं लागले.

मथुरानाथांना मात्र संभ्रम उत्पन्न झाला. रामकृष्णांच्या आध्यात्मिक पूर्णत्वाबद्दल त्यांची खात्री होती. परंतु त्यांना अवतार म्हणावें कीं नाहीं याबद्दल त्यांचें मन थोडें साशंक होतें. स्वतःची खात्री करून घेण्यासाठीं व रामकृष्णांच्या समाधानासाठीं त्यांनीं एक विद्वत्परिषद् बोलावण्याचें ठरविलें.

निमंत्रणें गेलीं. त्या काळीं विद्वत्ता व साधना यांत पूर्णत्व गांठलेले नामांकित पुरुषश्रेष्ठ वैष्णवचरण व गौरीकान्त तर्कालंकार यांनाहि पाचारण करण्यांत आलें. ब्राह्मणीनें आपल्या अस्खलित वाणीनें सभेस आपले मुद्दे विशद करून सांगितले. आईच्या हिरीरीनें तिनें सर्व शंकाकुशंकांना समाधानकारक उत्तरें दिलीं. अखेरीस सभेस हजर असलेल्या प्रत्येक विद्वानानें तिचें मत ग्राह्य मानलें. महाभाव या भक्तीच्या परमोच्च अवस्थेंत दिसून येणारीं सर्व चिन्हें रामकृष्णांत आहेत इतकेंच नव्हे तर, सिद्धावस्थेचीं सर्व लक्षणें त्यांच्या ठिकाणीं पूर्णतेनें विकास पावलेलीं दिसून येतात. त्या काळांत वैष्णव वाङ्मयावरील अधिकारवाणीनें बोलणारे एकमेव विद्वान् म्हणून ओळखल्या जाणाऱ्या वैष्णवचरणांनींहि ही गोष्ट मान्य केली. वैष्णवचरणाचें हें मत ऐकून मथूर व इतर सर्व मंडळी आश्चर्यानें मूढ झालीं.

पहिल्या दिवशींच्या चर्चेला गौरीकान्त तर्कालंकार येऊं शकले नाहींत, पण दुसऱ्या दिवशीं ते आले. रामकृष्णासंबंधीं पुढें आलेल्या सर्व मुद्यांचा विचार करून त्यांनींहि असें जाहीर केलें कीं, "अवतारांतून अंशरूपानें प्रतीत होणारी विश्वशक्ति रामकृष्णांच्या कणाकणांतून वास करीत आहे. माझ्या मताला धर्मग्रंथांचा आधार आहे. माझी कल्पना मी कोणालाहि सिद्ध करून दाखवावयास तयार आहे." गौरीकान्तांचें हें भाषण ऐकून

रामकृष्ण एखाद्या निष्पाप बालकाच्या सहजतेनें उत्तरले, "तुम्ही काय जाणतां त्यांतलें मला स्वतःला कांहीं माहीत नाहीं."

भैरवी ब्राह्मणीची कल्पना विद्वत्परिषदेनेंहि उचलून धरलेली पाहून रामकृष्णांविषयींच्या भोंवतालच्या लोकांच्या कल्पनेंत आमूलाग्र बदल घडून आले. ते मात्र पूर्वीप्रमाणेंच लोकमतांविषयीं बेफिकीर वृत्ति बाळगीत. आतां औपचारिक-रीत्या ब्राह्मणी त्यांची गुरु बनली. तांत्रिक साधनेचे पद्धतशीर धडे तिनें रामकृष्णांना देण्यास सुरवात केली. यासाठीं धर्मग्रंथांत दिल्याप्रमाणें तिनें दोन विशेष आसनें तयार केलीं. एक पंचवटींत व दुसरें बेलवृक्षाखालीं मंदिराच्या उत्तरेकडील बागेंत. या साधनेसंबंधीं पुढें बोलतांना एकदां रामकृष्णांनीं सांगितलें, "तांत्रिक ग्रंथांत दिल्याप्रमाणें या तपस्येसाठीं लागणारें सर्व साहित्य आसमंतात् दिवसभर हिंडून ब्राह्मणी जमा करी. रात्र पडल्यावर तयार केलेल्या एका आसनावर ती मला बसवी. कालीमातेची यथासांग पूजा माझ्या हातानें करवून नंतर तिनें विधिपूर्वक दिलेला मंत्र जपण्यास मी सुरुवात करी. एखादी माळ ओढून होते न होते तोंच मी देहभान विसरूं लागे व उन्मनी अवस्थेंत जाई. या भावसमाधींत शब्दातीत असे अनेक अनुभव मला येत. विश्वशक्तीची निरनिराळ्या रूपांतील दर्शनें होत. हे सर्व अनुभव मी प्रत्यक्ष अनुभवीं. अशा रीतीनें तंत्रवाङ्मयांतील प्रमुख चौसष्ट ग्रंथांत दिलेलीं सर्व आसनें व इतर साधनाप्रकार भैरवीनें माझ्याकडून करवून घेतले. कालीमातेच्या कृपेनें मी या कठीण दिव्यांतून यशस्वी रीतीनें बाहेर आलों. यांपैकीं कांहीं भाग इतका अवघड आहे कीं, तो जर साधला नाहीं तर साधकाचा पूर्ण अधःपात होतो."

या साधनेनंतर रामकृष्ण अलौकिक आनंदाच्या परमोच्च पातळीवर जाऊन रात्रंदिवस सत्य व शिव यांच्या लाटांवर जणूं तरंगत रहात. आपला शिष्य पूर्ण लाभाप्रत पोंचल्याचें ब्राह्मणीनें जाहीर केलें. विश्वमातेशीं एकरूप अशी अवस्था तिच्या मतें त्यांना प्राप्त झाली होती.

श्रीरामकृष्णांनीं भैरवी ब्राह्मणीचा आध्यात्मिक गुरु म्हणून जो आदर केला त्यावरून भारतीय स्त्रीचें स्थान किती उच्च आहे याची कल्पना करण्यास हरकत नाहीं. रामकृष्णांनीं तंत्रवाङ्मय मानून त्यांत दिल्याप्रमाणें

साधना केल्यामुळें हें वाङ्मयहि भारतीय समाजांत मान्यता पावलें. सुखाचा नियंत्रित आस्वाद घेत साधकाला हळूहळू निवृत्तीकडे वळवीत वळवीत अखेरीस त्याला मुक्त अवस्थेप्रत नेऊन सोडणें हेंच तंत्रवाङ्मयाचें मुख्य उद्दिष्ट आहे. साधनेची प्रक्रिया चालू असतांना भक्त उत्तरोत्तर विकारांच्या कक्षेंतून बाहेर पडून देवरूप होतो. कालांतरानें अनेकांनीं विकाराला व सुखवादाला बळी पडून तंत्रवाङ्मयाचें सामाजिक स्थान धुळीस मिळविलें. भैरवी ब्राह्मणी व तिचे शिष्य श्रीरामकृष्ण या दोघांनीं तंत्रपद्धतीच्या साधनेचें खरें स्वरूप जनतेसमोर आणलें.

काल पुढें सरकत होता. ब्राह्मणी रामकृष्णांच्या पूर्णत्वाकडे कौतुकानें पहात होती. एकदां रामकृष्णांना अद्वैत मतप्रणालीचा तोतापुरी नांवाचा एक नागा संत भेटला. त्यानें त्यांना अद्वैत तत्त्वज्ञानाचीं तत्त्वें सांगून संन्यास घेण्याची सूचना केली. शंकराचार्यांचा ज्ञानमार्ग व संन्यास भैरवीच्या भक्तिप्रधान तत्त्वज्ञानाशीं जुळणारा नव्हता. तोतापुरीच्या सहवासांत जास्त काल श्रीरामकृष्ण राहिल्यास त्याची भक्तींतील तीव्रता कमी होईल अशी भीति एकदां तिनें त्यांच्याजवळ उघडपणें बोलून दाखविली. पण तिच्याकडे फारसें लक्ष न देतां रामकृष्णांनीं कालीमातेच्या प्रेरणेनुसार आपला दिनक्रम चालू ठेवला. दुर्दैवानें ब्राह्मणीच्या मनांत अहंभावना वाढूं लागली. आपण कोणीतरी फार मोठी सिद्ध व्यक्ति आहोंत अशा भावनेनें तिनें रामकृष्णांवर कांहीं निर्बंध लादण्याचा प्रयत्न केला.

अद्वैत सिद्धान्तानुसार आंखून घेतलेली साधना पुरी केल्यानंतर श्रीरामकृष्णांना फार अशक्तपणा आला. तीव्र स्वरूपाच्या आंवेचा त्रास सुरू झाल्यानें विश्रांतीसाठीं त्यांना कामारपुकूर येथें पाठविण्याचें ठरलें. इ. स. १८६७ च्या मे मध्यें हृदय व भैरवी ब्राह्मणी यांच्यासह ते कामारपुकूरला आले. पुष्कळ वर्षांनीं रामकृष्ण जन्मभूमींत आल्यामुळें सर्वांना खूप आनंद झाला. रामकृष्णांच्या आनंदी चेहऱ्यानें सर्व वातावरण पवित्र व भक्तिमय बनून गेलें. या वेळीं त्यांची पत्नी शारदामणी चौदा वर्षांची होती. तिला कामारपुकूर येथें आणण्यासाठीं निरोप पाठविण्यांत आला. पतीच्या सेवेची सुसंधि मिळाल्यामुळें शारदेस खूप आनंद झाला. ऐहिक व पारमार्थिक दोन्ही बाबतींत

पतीनें मार्गदर्शन करावें अशी इच्छा तिनें व्यक्त केली. घरांतील बारीकसारीक कामापासून तों देव आपलासा करून घेण्यापर्यंत सर्व बाबतींत रामकृष्ण आपल्या तरुण पत्नीस शिक्षण देऊं लागले.

आपल्या इष्ट देवाच्या ( पतीच्या ) शब्दाबरहुकूम वागून शारदामणी आपल्या ध्येयाचा मार्ग आक्रमूं लागल्या. तरुण पत्नीच्या सहवासांत रामकृष्णांचें ब्रह्मचर्य कदाचित् भ्रष्ट होईल अशी शंका येऊन ब्राह्मणीला त्या दोघांचा सहवास रुचेनासा झाला. रामकृष्णांना या शंकेंत कांहीं तथ्य वाटेना. उलट आपली साधना पूर्ण आहे कीं नाहीं हें ताडून पाहण्यास ही एक उत्कृष्ट संधि आहे अशी त्यांची भावना होती. त्यांना आपले गुरु तोतापुरी यांचे शब्द वारंवार आठवत. ते म्हणत, " विवाह झाला असला तरी काय बिघडलें? ज्याला ब्रह्मज्ञान झालें व आत्मा एकच आहे हें उमगलें तो स्त्री अगर पुरुष अशा भेदानें घाबरणार नाहीं. कोणीहि सहवासांत असलें तरी त्याच्या निवृत्तीस धक्का लागणार नाहीं." रामकृष्णांची मनशान्ति शारदामणींच्या सहवासानें कधींहि बिघडली नाहीं. उलट त्यांच्यांतील ज्ञानाग्नि अधिकच तेजःपुंज झाला.

ब्राह्मणी मात्र दिवसेंदिवस अधिक अहंभावी होत होती. एखाद्या आध्यात्मिक विषयावर एकदा तिच्यासमोर चर्चा झाल्यानंतर जर त्यासंबंधीं कोणी रामकृष्णाना कांहीं शंका विचारली तरी तिला राग येऊं लागला. एकदां एका अस्पृश्य भक्ताचें उष्टें काढण्याचा तिनें हट्ट धरला. गांवच्या लोकांना ही गोष्ट मुळींच आवडली नाहीं. यावरून तिचें हृदयशीं चांगलेंच भांडण जुंपलें. शेवटीं तिला माघार घ्यावी लागली. हा मायेचा खेळ पहात असतांना रामकृष्णांना हंसूं येत होतें. राग शान्त झाल्यावर ब्राह्मणीला स्वतःचीच शरम वाटूं लागली. रामकृष्णांना विसरून जावें व त्यांच्याविषयींचा जिव्हाळा कमी करावा यासाठीं कांहीं काल तिनें प्रयत्न केला. पण त्यांतहि ती अयशस्वी झाली.

एके दिवशीं पश्चात्तापदग्ध अंतःकरणानें ब्राह्मणी रामकृष्णांकडे आली. गंधपुष्पांनीं तिनें श्रीगौरांगस्वरूप रामकृष्णांची मनोभावें पूजा केली आणि त्यांची क्षमायाचना केली. मनात कोणताहि किंतु न बाळगतां तिनें कामारपुकूर सोडलें व उर्वरित आयुष्य चिंतनांत व्यतीत करण्यासाठीं ती काशीला निघून गेली. क्षणैक मायेनें पछाडलेल्या ब्राह्मणीस पुन्हां ज्ञानप्राप्ति झाल्याबद्दल

रामकृष्णांना आनंद झाला. पुढें ते स्वत: एकदां काशीला गेले. त्या वेळीं त्यांची ब्राह्मणीशीं भेट झाली. शेवटचे दिवस वृंदावनांत घालवावेत अशी त्यांनीं तिला सूचना दिल्यावरून त्यांच्याचबरोबर ती वृंदावनास आली. आतां तिच्या साधनेनें पूर्णावस्था गांठली होती. अशा रीतीनें खडतर आध्यात्मिक जीवनाचा आदर्श ब्राह्मणीनें भारतीय स्त्रियांसमोर उभा केला.

**अघोरमणी देवी**:–संवेदनेच्या चांचणीपात्रांत घातल्याखेरीज सत्याची परीक्षाच करतां येणार नाहीं अशी मिजास बाळगणाऱ्या आजच्या युगांत अघोरमणी देवीचें अद्भुतरम्य आध्यात्मिक जीवन एखाद्या कपोलकल्पित कथे-प्रमाणें भासेल. पण या जीवनाशीं ओळख असणाऱ्यांना मात्र 'गोपालाची मा' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या या महिलेचें जीवन किती प्रेममय होतें, किती पवित्र होतें आणि तिच्या भक्तीच्या जगांत कोणता आनंद भरून राहिलेला होता याची कल्पना येऊं शकेल.

युरोपच्या दौऱ्यावरून परत येतांना स्वामी विवेकानंदांबरोबर भारतांत आलेल्या तीन आंग्ल महिला-सिस्टर निवेदिता, बुलॅट् व सॅरा बुल या तिघीजणी गंगेच्या पूर्व तीरावर वसलेल्या व दक्षिणेश्वराहून तीन मैलांवर असलेल्या कामारहाटी या ठिकाणीं अघोरमणी देवीस भेटण्यासाठीं मुद्दाम गेल्या होत्या. भारतीय पद्धतीनें अघोरमणीनें त्यांचें खूप कौतुकानें स्वागत केलें आणि त्यांच्या आग्रहावरून स्वत:चे कांहीं गूढ अनुभव तिनें त्यांना सांगितले. हे विलक्षण अनुभव ऐकल्या-नंतर सिस्टर निवेदितानें अघोरमणीबद्दल काढलेले आदरोद्गार ऐकून स्वामी विवेकानंद म्हणाले, "असा आहे आमचा भारत देश आणि येथील स्त्रिया ! तोंडांत प्रार्थना, डोळ्यांत प्रेमाश्रु, सेवा आणि उपवास यांच्या आधारानें जीवन जगणाऱ्या भारतीय महिला यापुढें मात्र बघावयासहि सापडणार नाहींत." अघोरमणीचें जीवन म्हणजे भक्ति व प्रार्थना यांची एक मूर्तिमंत कथा.

इ. स. १८२२ मध्यें कामारहाटी येथें अघोरमणीचा जन्म झाला. तिचे वडील काशीनाथ भट्टाचार्य यांनीं तिचा विवाह तिच्या नवव्या वर्षी चेंगाजवळ पैघाटी येथें राहणाऱ्या एका गरीब ब्राह्मणाशीं करून दिला. परंतु कांहीं दिवसातच तिला वैधव्य प्राप्त झालें. कांहीं काल सासरीं घालवून नंतर ती वडिलांकडे रहावयास आली. या वेळीं या छोट्या मुलीस वैवाहिक सुखाची

पुसटशीसुद्धां कल्पना नव्हती. अघोरमणीचा मोठा भाऊ नीलमाधव भट्टाचार्य ह्या गावांतील राधामाधव मंदिरांत पुजारीपणा करी व त्यावर ह्या सर्व कुटुंबाचा निर्वाह चाले. गोविंदचंद्र दत्त नांवाच्या कलकत्याच्या एका श्रीमान् व्यापाऱ्यानें हें मंदिर बांधलें होतें. मंदिराचें प्रशस्त आवार आणि भोंवतालचा विस्तीर्ण बगीचा हे कामारहाटीचें एक मोठें आकर्षण होतें. अनेक भाविक लोक रोज येथें येत. अघोरमणीहि देवदर्शन व प्रार्थना यांच्या निमित्तानें वारंवार मंदिरांत येई. गोविंदचंद्र दत्त यांच्या निधनानंतर त्यांच्या पत्नीनें मंदिराच्या आवारांतच वास्तव्य केलें व भजनपूजनांत ती कालक्रमणा करूं लागली.

अघोरमणीच्या पापभीरु स्वभावामुळें घरांतील इतर मंडळींशीं तिचें पटेना. गोविंदचंद्रांच्या पत्नीच्या भाविक वृत्तीनें तिला तिच्याविषयीं आदर वाटूं लागला. लवकरच त्या दोघींचा दृढ स्नेह जमला. जवळचे सर्व पैसे आपल्या खर्चासाठीं गोविंदचंद्रांच्या पत्नीजवळ देऊन अघोरमणी मंदिरांतच कायम राहण्यासाठीं आली. गंगेच्या प्रवाहाजवळ असलेली बागेंतील एक छोटीशी खोली तिला खास साधनेसाठीं देण्यांत आली. भगिनी निवेदितेनें या खोलीचें वर्णन पुढील शब्दांत केलें आहे– " अघोरमणीच्या या लहानशा खोलींतील जमीन अतिशय खडबडीत होती. झोंपण्यासाठीं ती एका मोठ्या दगडाचाच उपयोग करी. आल्यागेल्यासाठीं असलेली एक चटई फक्त बसण्यापुरतीच पसरली जाई. छपरापासून कांहीं अंतरावर दोन शिंकीं टांगलेलीं असत. त्यांतील दोन मडक्यात भाजलेले तांदूळ व साखरेच्या कांहीं वड्या ठेवलेल्या असत. एवढींच तिच्याजवळचीं आदरातिथ्याचीं साधनें. येथील टापटीप व स्वच्छता मात्र वाखाणण्यासारखी असे. एका लहानशा पांढऱ्या पिशवींत रामायणाची एक पोथी, जपमाळ आणि चष्मा एवढ्या वस्तु तिच्या उशाशीं ठेवलेल्या असत. या एका जपमाळेवर गोपाल मानें संतपद मिळविलें होतें. तासन् तास, दिवसेंदिवस, नव्हे वर्षानुवर्षें या खोलींत बसून तिनें गोपालाचें नामस्मरण केलें होतें. "

अघोरमणीनें एका वैष्णव गुरुकडून दीक्षा घेतली होती. धकाधकीच्या जीवनापासून दूर असलेल्या या निवांत वातावरणांत तिची भक्तिवेल फोफावूं लागली व लवकरच तिचें पूर्ण आणि विकसित स्वरूप दिसूं लागलें. वर्षानुवर्षें

हृदयांत कोंडलेल्या प्रेमभावनेस विषय सांपडला. बाळकृष्णावर तिच्या या भावनेचा ती वर्षाव करूं लागली. या प्रेमाचा पूर तिच्या डोळ्यांतून अश्रु-रूपानें वाहूं लागला. जेवणखाण, राधामाधवाची पूजाअर्चा व थोडी विश्रांति एवढा वेळ वगळून बाकीचा सर्व दिवस ती जपच करी. सतत तीस वर्षे अघोरमणीनें अशी साधना केली.

श्रीरामकृष्णांची कीर्ति या वेळीं सर्वकडे पसरूं लागली होती. त्यांना एकदां पहावें अशी तीव्र इच्छा अघोरमणीस झाली. इ. स. १८८४ च्या वर्षा-ऋतूंत गोविंदचंद्रांची पत्नी व आणखी एक स्त्री यासमवेत ती दक्षिणेश्वरास आली. या सर्वांच्या भेटीनें श्रीरामकृष्णांना खूप आनंद झाला. त्यांच्याशीं बराच वेळ गप्पागोष्टी करून झाल्यानंतर रामकृष्णांनीं त्यांना कांहीं भक्ति-गीतें म्हणून दाखविलीं. कृष्णरूपांत दंग झालेली बासष्ट वर्षांची अघोरमणी बेभान होऊन डोलूं लागली. गोविंदचंद्रांच्या पत्नीनें त्यांना कामारहाटीस येण्याचें आग्रहाचें निमंत्रण दिलें. नंतर त्या सर्वजणी परतल्या.

रामकृष्णांनीं अघोरमणीच्या हृदयाची पहिल्याच भेटींत पूर्ण पकड घेतली. त्यांना पहावें अशी तिला रात्रंदिवस तळमळ लागली. एके दिवशीं रस्त्यावरील मिठाईच्या दुकानांतून थोडी शिळी मिठाई विकत घेऊन ती दक्षिणेश्वरास गेली. तिला पाहतांच रामकृष्ण आनंदून म्हणाले, " तूं पुन्हां आलीस ? माझ्यासाठीं काय आणलें आहेस तें दे ना ! मात्र हें बघ. परत येशील तेव्हां मिठाईसाठीं असे पैसे खर्च करूं नकोस. खोबऱ्यासाखरेचे एक दोन लाडू किंवा थोडी कढी करून आणलीस तरी तीहि मला खूप आवडेल ! " एवढें बोलून त्यांनीं ती मिठाई मोठ्या आवडीनें खाल्ली. ती शिळी मिठाई त्यांना देतांना अघोरमणी मात्र अतिशय शरमिंदी झाली. ती जेव्हां जेव्हां त्यांना भेटे तेव्हां तेव्हां ते तिच्याशीं खाण्याच्या गोष्टी बोलत. तिला वाटे, " असा कसा हा साधु ? देवाधर्माविषयीं बोलण्याचें टाकून खाण्याचा विषयच काय प्रत्येक वेळीं काढतो ! मी गरीब विधवा प्रत्येक वेळीं खाण्याचे पदार्थ कोठून आणणार ? " असा विचार करीत ती दक्षिणेश्वराहून निघे. मात्र मंदिराबाहेर पडतांच पुन्हां तिचें मन रामकृष्णांकडे विलक्षण ओढ घेऊं लागे.

नंतरच्या तीन-चार महिन्यांत अघोरमणी अनेक वेळां दक्षिणेश्वरास

आली. प्रत्येक वेळीं ती रामकृष्णांसाठीं कहीं करून आणी. कांहीं वेळां कंटाळून तिला वाटे, " गोपाला, तीस वर्षांच्या तपश्चर्येनंतर कसल्या खादाड साधूच्या वेडांत तूं मला अटकविलेंस ! मी याच्याकडे पुन्हां कधींहि येणार नाहीं." मात्र देवळांतून बाहेर पडतांच पुन्हां तिला त्यांच्याविषयीं विलक्षण प्रेम निर्माण होई आणि ती परत येई. मध्यंतरीं गोविंदचंद्रांच्या पत्नीस कबूल केल्याप्रमाणें श्रीरामकृष्ण एकदां कामारहाटीस गेले. राधामाधवासमोर भजन करतांना कित्येक तास कसे निघून गेले तें त्यांना कळलेंच नाहीं.

आणखी कांहीं काल असाच गेला. अघोरमणीची तपस्या पूर्ण होऊन ईश्वरी साक्षात्कार होण्याचा समय जवळ आला होता. एके दिवशीं नित्याप्रमाणें पहाटे उठून ती जपास बसली. एक माळ ओढून झाली असेल नसेल तोंच रामकृष्ण तिच्या शेजारीं बसलेले तिला दिसले. पायांची आढी व हातांत हात घालून ते हंसतमुद्रेनें अघोरमणीकडे पहात होते. आपणांस भास तर होत नाहीं ना, असें वाटून तिनें त्यांना स्पर्श करण्याचा प्रयत्न करतांच रामकृष्णांच्या ठिकाणीं दहा महिन्यांचा छोटा बाळकृष्ण रांगतांना दिसूं लागला. तो पुढें व ती मागें रुवें खोलीभर धावली. गोपाळ शेवटीं तिच्या मांडीवर बसला व तिच्या गळ्यात हात टाकून त्यानें तिजजवळ लोणी मागितलें. डोळ्यांत अश्रु आणून ती म्हणाली, " बाळा, माझ्या गरिबाच्या घरांत कुठून येणार लोणी ? " " मग दुसरें कांहींतरी दे " असा पुन्हां कृष्णाचा हट्ट सुरूं झाला. अघोरमणी उठली. शोकऱ्याचे वाळलेले दोन लाडू काढून तिनें त्याला खाऊं घातले. कृष्ण नाचूं लागला. उन्मनी अवस्थेंत असलेल्या अघोरमणीस पुढें मंत्र जपणें अशक्य झालें.

या अवस्थेंतच दुसऱ्या दिवशीं सकाळीं अघोरमणी दक्षिणेश्वराम निघाली. तान्हा बालकृष्ण तिच्या हृदयांत नाचत होता. त्याचीं छोटीं पावलें तिच्या मनात आनंदाच्या गुदगुल्या करीत होतीं. फार वर्षांची तिची तपश्चर्या फलद्रूप झाली होती. एका अननुभूत आनंदसागराच्या लाटांवर तिचें हृदय हेलावत होतें. विस्कटलेले केस, विस्फारलेले नेत्र व हारपलेलें देहभान अशा अवस्थेंत ती चालली होती. तिच्या वस्त्राचें एक टोंक रस्त्यावर लोळत होतें. मंदिराच्या दारांत पाऊल ठेवतांच ' गोपाळ ', ' गोपाळ ' अशा

हांका मारीतच ती श्रीरामकृष्णांच्या खोलींत शिरली. अघोरमणी खालीं बसताच एखाद्या अजाण बालकाप्रमाणें रामकृष्ण तिच्या मांडीवर बसले आणि तिनें आणलेले दूध, लोणी, मिठाई वगैरे पदार्थ त्यांनीं मोठ्या प्रेमानें खाल्ले. नंतर ते पुन्हां आपल्या बैठकीवर जाऊन बसले. अजूनहि अघोरमणी त्या अलौकिक जगांतच होती. ती साऱ्या खोलीभर नाचूं लागली. मधेंमधें ती कांहींतरी बोले, "हा बघ, गोपाल तुझ्या शरीरांत शिरला. तिकडून बाहेर आला. बाळा, ये रे, माझ्या मांडीवर बस!"

अघोरमणी बराच वेळ या उन्मनी अवस्थेंत होती. या दिवसापासून रामकृष्ण तिला 'गोपालाची मा' याच नांवानें संबोधूं लागले. तिच्या अंगावरून हात फिरवून त्यांनीं तिला खालीं बसविलें व खोलींत शिल्लक असलेले पदार्थ तिला खाऊं घातले. खातां खाताहि ती म्हणत होती, "गोपाला, तुझ्या आईला जन्मभर फार कष्ट सोसावे लागले. दोऱ्या वळून, गंडे विकून तिला आपला चरितार्थ कसाबसा चालवावा लागला म्हणून आज तूं तिला गोड खाऊं घालतो आहेस होय?"

श्रीरामकृष्णांनीं अघोरमणीस त्या दिवसभर दक्षिणेश्वरास ठेवून घेतलें. गंगास्नान करून तिनें त्यांच्याबरोबर भोजन केलें व नंतर संध्याकाळीं ती कामारहाटीस परतली. येताना व घरीं आल्यावरहि तिला बालकृष्णाचें सान्निध्य सतत जाणवत होतें. रात्रीं अंथरुणावर पडताच गोपाल तिच्या कुशींत शिरून मऊ उशी मागूं लागला. शेवटीं अघोरमणीनें आपल्या डाव्या हातावर कृष्णाचें डोकें ठेवलें व तो झोपीं गेला.

पुढेंहि छोटा कृष्ण सतत अघोरमणीच्या सहवासात राहूं लागला. लांकडें तोडताना व स्वयंपाक करताना तो तिला मदत करी आणि खोड्याहि करी. अशा रीतीनें राधामाधवाच्या देवळात हे जडवादी युग विश्वासहि ठेवणार नाहीं अशी देवरूप माता व मानवी डोळ्याना न दिसणारा देव एकमेकांच्या सहवासांत दंग झालेलीं होतीं.

कांहीं महिन्यानंतर भावनेची तीव्रता जसजशी ओसरूं लागली, तसतसें गोपालाच्या दर्शनाचा काल कमी कमी होऊं लागला. यामुळें अघोरमणी फार कष्टी होऊं लागली. रामकृष्णानीं तिची समजूत घातली. "या कलियुगांत

मन जर एकसारखें उन्मनी अवस्थेंत राहूं लागलें तर शरीर वाळलेल्या पाचोळ्यासारखें लवकर धरणीवर पडेल." त्यांनीं तिला असेंहि सांगितलें कीं, तिला यापुढें विशेष तपस्या करण्याची गरज नाहीं. जेव्हां जेव्हां बाळकृष्णाच्या भेटीची तीव्र ओढ तिच्या हृदयांत निर्माण होईल तेव्हां तेव्हां तो तिला भेटेल. मात्र कंटाळा येऊं नये म्हणून फावल्या वेळांत तिनें जप करीत रहावें. गोपालकृष्ण म्हणजेच श्रीरामकृष्ण हें आतां अघोरमणीस कळून चुकलें होतें. सर्व ठिकाणीं कृष्ण दिसूं लागल्यामुळें उचनीच भेदभावाची जाणीव तिच्या मनांतून पूर्णपणें नाहींशी झाली. रामकृष्णांना तिची सिद्धावस्था स्पष्ट दिसूं लागली. एके दिवशीं ते म्हणाले, " आजच्या युगांत दुर्मिळ अशी आध्यात्मिक पूर्णता तुला प्राप्त झालेली आहे."

श्रीरामकृष्णांच्या शिष्यांचीहि गोपाल मा स्फूर्तिदेवता बनली. तिच्या सान्निध्यांत बाळकृष्णाप्रमाणें रामकृष्ण जेव्हां वागूं लागत तेव्हां सर्वांची मति गुंग होई. एकदां बागबाजारांत राहणाऱ्या बलराम बोसांकडे रथयात्रेचा उत्सव चालू होता. अनेक शिष्यांसमवेत बसलेले रामकृष्ण एकदम छोट्या बाळकृष्णासारखे वागूं लागले. थोड्याच वेळांत गोपाल मा तेथें आली. त्यांच्याकडे पाहतांच ती म्हणाली, " माझा गोपाल नाचतो, दुडुदुडु धांवतो आणि सारख्या खोड्या करतो. असा एखाद्या लाकडी ठोकळ्यासारखा गप्प बसत नाहीं. मला नाहीं गोपालाचें हें गंभीर रूप बघायला आवडत !"

दक्षिणेश्वराच्या मंदिरांत एकदा रामकृष्ण, नरेंद्र ( स्वामी विवेकानंद ) व गोपाल मा बसले होते. देवाबद्दलची दोघांची कल्पना सांगावी असें रामकृष्णांनीं त्या दोघांना सुचविलें. एका दृष्टीनें नरेंद्र व गोपाल मा यांच्यांत जमीनअस्मानाइतकें अंतर होतें. एक पराकोटीचा विद्वान्, बुद्धिवादी व पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा अभ्यासू, तर दुसरी साधी, भोळी, अशिक्षित सगुण देवाची भक्त. " बाळकृष्णाच्या रूपाचें तूं पाहिलेंस तसें वर्णन कर " अशी रामकृष्णांची आज्ञा होतांच ती वर्णन करूं लागली. सांगतां सांगतां तिचें देहभान हरपलें व डोळ्यांतून अश्रूंचा पूर वाहूं लागला. हें दृश्य पाहून नरेंद्राच्या डोळ्यांतहि पाणी आलें. शेवटीं गोपाल मानें त्याला विचारलें, " हें सर्व खरें कीं फक्त कल्पना ? " नरेंद्र तावडतोब उत्तरले, " शंभर टक्के सत्य. "

इ. स. १८८६ त श्रीरामकृष्णांचें निर्याण झालें. यामुळें गोपाल माला बसलेल्या धक्क्यांतून ती कित्येक दिवस बाहेर येऊं शकली नाहीं. तिचेंहि वय फार झालें होतें. कामारहाटीला आपल्या खोलींत सर्व काळ ती मननांत घालवी. रामकृष्णांचें दर्शन अधूनमधून होऊं लागल्यानंतर तिला बरें वाटूं लागलें. कधीं कधीं वेलूरच्या मठांत जाऊन ती रामकृष्णांच्या शिष्यमंडळीशीं गप्पागोष्टी करी.

सेरामपूरजवळ माहेश येथें रथयात्रेच्या निमित्तानें अघोरमणी गेली असतां तिला एक अविस्मरणीय अनुभव आला. मिरवणुकीकडे पाहूं लागतांच मूर्तींत, रथांत, जमलेल्या हजारो यात्रेकरूंत, जिकडे तिकडे तिला वेगवेगळ्या स्वरूपांत बालकृष्णच दिसूं लागला. आनंदानें तिला वेड लागण्याची वेळ आली.

अहोरात्र देवाच्या संगतींत ही संतमहिला कशी कालक्रमणा करी याविषयीं आणखीहि एक घटना येथें नमूद करतां येईल. रामकृष्णांचे शिष्य स्वामी ब्रह्मानंद यांनीं एका शिष्याबरोबर कांहीं फळें व भाजी देऊन त्याला अघोरमणीकडे पाठविलें. त्या रात्रीं शिष्यानें तिच्याकडेच मुक्काम केला. मध्यरात्र उलटून गेल्यानंतर गोपाल मा कोणाशीं बोलत आहे हें तो पाहूं लागला. ती म्हणत होती, " राजा, जरा थांब. अजून पहाट झाली नाहीं. पक्षी किलबिल करूं लागले नाहींत. जरा उजाडूं दे. मग तुला आवोळ घालतें हं ! " सकाळीं उठून आश्चर्यानें त्या शिष्यानें विचारलें, " पहाटे तुम्हीं कोणाशीं बोलत होता ? " तिनें उत्तर दिलें, " गोपालाशीं ! माझ्याजवळ माझा बालकृष्ण राहतो हें तुम्हांला माहीत नाहीं का ? "

इ. स. १९०४ मध्यें गोपाल मा खूप आजारी झाली. औषधोपचारासाठीं तिला कलकत्त्यास बलराम बोस याच्याकडे आणण्यांत आलें. भगिनी निवेदिता तिच्या प्रेमानें इतकी आकृष्ट झाली होती कीं, तिनें गोपाल माला शुश्रूषेसाठीं स्वतःच्या घरीं नेलें व कन्येच्या भावनेनें रात्रंदिवस शेवटच्या क्षणापर्यंत तिनें तिची सेवा केली. अशा सिद्ध महिलेचा सहवास घडल्याबद्दल सिस्टर निवेदितांला कृतार्थता वाटे. या वेळीं शारदामणी बागबाजार रस्त्यावर भाड्याच्या घरांत रहात असत. त्या गोपाल माला भेटण्यासाठीं वारंवार निवेदितेकडे येत.

अघोरमणीच्या निर्याणापूर्वी दोन दिवस रिवाजानुसार शारदामणी समाचारासाठीं येऊन तिच्या उशाशीं बसल्या होत्या. त्या आल्याचें समजतांच खालच्या आवाजांत गोपाल मा बोलूं लागली, "गोपाला, आलास? आजपर्यंत तूं माझ्या मांडीवर बसत होतास. आज मात्र माझें मस्तक तूं तुझ्या मांडीवर घ्यावयाचें आहेस! घेतोस ना?" हे शब्द ऐकतांच शारदामणींनीं तिचें मस्तक आपल्या मांडीवर घेतलें व प्रेमानें तिच्या अंगावरून हात फिरविला. माताजींच्या ठिकाणीं छोट्या बाळकृष्णास पहात असलेली गोपाल मा पुन्हां म्हणाली, "बाळा, एवढीं वर्षें तूं माझे पाय धुऊन माझ्यासाठीं आसन घालून ठेवीत होतास. आज तुझी पायधूळ माझ्या कपाळीं लाव." हें ऐकून तेथें हजर असलेल्यांनीं माताजींची पायधूळ तिच्या कपाळीं लावली. माताजी केव्हांच समाधिस्थ झाल्या होत्या.

पूर्ण बेशुद्धावस्थेंतच गोपाल माचा देह गंगाकिनारीं हलविण्यांत आला. एक दिवस व एक रात्र गेल्यानंतर शेवटचा श्वास सुरू झाला. तिचे पाय गंगेच्या प्रवाहांत ठेवण्यांत आले आणि शरीराचें वस्त्र मागें ठेवून गोपाल मा अनंतांत विलीन झाली. अशा रीतीनें इ. स. १९०६ च्या जुलैच्या ८ तारखेस ह्या अपूर्व भक्तमहिलेनें आपली आध्यात्मिक जीवनयात्रा पूर्ण केली.

**योगींद्र मोहिनी विश्वासः**—योगींद्र मोहिनी विश्वास उर्फ योगीन माचें जीवन वेदकालीन सिद्ध महिलांची आठवण करून देतें. साधनेच्या योगानें आणि सेवेनें तिनें असामान्य शान्ति आणि तात्त्विक समज मिळविली होती. आपल्या अस्तित्वानें भोंवतालचें सर्व वातावरण पवित्र व आनंदमय बनविणें हेंच तिच्या जीवनाचें ध्येय होतें. रामकृष्णानीं एकदा तिजबद्दल यथार्थतेनें असे उद्गार काढले होते कीं, योगीन मा ही लवकर विकसित होणाऱ्या कळी-प्रमाणें नाहीं. सहस्रदळ कमळ विकसित होण्यास जसा वेळ लागतो त्याप्रमाणें हिच्या जीवनाचा विकास मंद गतीनें होत गेला आहे.

योगीन माचें मूळ नाव योगीन्द्र मोहिनी मित्र. कलकत्याच्या उत्तर विभागांत इ. स. १८५१ सालच्या जानेवारी महिन्याच्या १६ तारखेस तिचा जन्म झाला. तिचे वडील प्रसन्नकुमार मित्र हे एक नामांकित धोरोग-चिकित्सक म्हणून प्रसिद्ध होते. कलकत्याच्या मेडिकल कॉलेजांत या विषयाचें अध्यापनहि ते करीत. त्यांचें निवासस्थान बागबाजार रस्त्यावर होतें.

चोवीस परगण्यांतील खर्डा गांवच्या जमीनदार कुटुंबांतील अंबिकाचरण विश्वास नांवाच्या अतिशय देखण्या तरुणाशीं मोहिनीचा विवाह वयाच्या ६।७ व्या वर्षी झाला. वडिलांची अफाट संपत्ति हातीं येतांच अंबिकाचरणानें अनेक दुर्गुणांत ती सर्व उधळून टाकली. मोहिनीच्या वैवाहिक जीवनाच्या आकांक्षा निर्माण होण्यापूर्वीच धुळीस मिळाल्या व ती आपल्या जीवनास अगदीं कंटाळून गेली. अंबिकाचरणापासून तिला दोन अपत्यें झालीं. पैकीं मुलगा सहा महिन्यांचा होऊन निवर्तला व कन्या गणु हा एकच पाश शिल्लक राहिला. अशा व्यसनी पतीच्या सहवासांत रहावें कीं नाहीं असा प्रश्न तिच्यापुढें निर्माण झाला. गणूचें लग्न झाल्याबरोबर आपली वैयक्तिक संपत्ति घेऊन ती माहेरीं आली व आपल्या विधवा आईच्या आधारानें राहूं लागली.

सुखी वैवाहिक जीवनाचें स्वप्न विरून गेल्यानंतर मोहिनीच्या जीवनांत जी पोकळी निर्माण झाली, ती कशानें भरून काढावी हा एकच प्रश्न तिला भेडसावूं लागला. या अस्वस्थ मनःस्थितींत असतांना बलराम बोसांची व तिची भेट झाली. बलराम सासरकडून तिचे दूरचे नातेवाईक होते. त्यांचें घरहि तिच्या वडिलांच्या घरापासून जवळच होतें.

एके दिवशीं श्रीरामकृष्ण बलरामाकडे आले असता त्यांनीं मोहिनीला मुद्दाम घरीं बोलाविलें. या वेळीं दारू प्यालेल्या माणसाप्रमाणें रामकृष्ण बडबडत होते. नवऱ्याच्या अशा बडबडीनें धास्ती घेतलेल्या मोहिनीचें रामकृष्णांबद्दल प्रथमदर्शनीं चांगलें मत झालें नाहीं. पण पुढें पुढें सहवासानें रामकृष्णांची योग्यता तिला समजूं लागली आणि आध्यात्मिक शान्ति मिळविण्याची ओढ तिला वाटूं लागली. तिच्या सासऱ्याच्या घराण्यात पूर्वापार चालत आलेला देवीमंत्र पुन्हां रामकृष्णानीं तिला विधिपूर्वक दिला.

दक्षिणेश्वरास जाऊं लागल्यानतर थोड्या दिवसांत योगीन माची शारदामणीशीं दोस्ती झाली. पहिल्याच भेटींत त्या दोघींना एकमेकींविषयीं आकर्षण वाटूं लागलें. शारदामणींनीं मोहिनीविषयीं एकदां असे उद्गार काढले कीं, "कालीमातेची जया म्हणजे माझी योगीन मा. ती माझी रक्षक व मैत्रीण आहे." मन मोकळें करण्यास आपल्याला योगीन मासारखी सहचरी लाभली आहे याबद्दल शारदामणींना केवढें समाधान वाटे. शारदामणींविषयीं

बोलतांना योगीन मा म्हणे, "जेव्हां जेव्हां मी शारदामणींना भेटे तेव्हां तेव्हां त्या माझ्याशीं मनमोकळें बोलत. मला पूर्ण विश्वासांत घेऊन अनेक बाबतींत त्या माझा सल्लादि घेत. मी आठवड्यांतून एकदां तरी दक्षिणेश्वराच्या मंदिरांत जाई व गेलें म्हणजे रात्रींहि तेथेंच मुक्काम करी. माताजी मला आग्रह करून नगारखान्यांत झोंपावयास नेत. सर्व रात्र बोलण्यांतच संपे."

"माझ्या व माताजींच्या प्रथम भेटीनंतर कांहीं दिवसांनीं त्यांना जयरामवाटीस जावें लागलें. त्यांना घेऊन जाणारी बोट डोळ्याआड होईतों मी कांठावर उभी राहून पहात होतें. परत फिरतांच मला रडूं कोसळलें. पंचवटीच्या बाजूनें जाणाऱ्या रामकृष्णांनीं तें पाहिलें. खोलींत गेल्यावर मला बोलावणें पाठवून ते म्हणाले, "शारदामणींच्या विरहानें तूं एवढी कष्टी होतेस ?" यानंतर तांत्रिक साधनेंतील स्वतःचे कांहीं अनुभव त्यांनीं मला सांगितले. सुमारें दीड वर्षानंतर शारदामणी परत आल्यानंतर रामकृष्ण त्यांना म्हणाले, "मोठ्या मोठ्या काळ्याभोर डोळ्यांची ती मुलगी तूं गेल्यावर खूप रडली. खरंच ! तिचं तुझ्यावर फार प्रेम आहे." शारदामणी उत्तरल्या, "मला माहीत आहे. तिचें नांव योगीन."

दिवसामासा योगेनची आध्यात्मिक भूक वाढत होती. देवाची भेट होण्यासाठीं तिनें खडतर तपश्चर्येस सुरुवात केली. रामकृष्ण आणि शारदामणी यांच्या सिद्धावस्थेकडे पाहून तिची ही तळमळ आणखी वाढे. त्यांच्या प्रोत्साहनानें तिनें पुराणें, रामायण, महाभारत आणि श्रीचैतन्यांच्या चरित्राचा अभ्यास केला. तिची स्मरणशक्ति अतिशय तीव्र असल्यानें वाचलेल्या ग्रंथांतील, विशेषतः श्रीचैतन्यांच्या चरित्रांतील उताऱ्यांच्या उतारे ती तोंडपाठ म्हणे. भगिनी निवेदितेनें आपल्या 'क्रॅडल् टेल्स् ऑफ् हिंदुइझम्' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत योगीन माच्या साहाय्याचा जो कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला आहे त्यावरून भारतीय पुराणवाङ्मयावर योगीन माचें केवढें प्रभुत्व होतें याची कल्पना येते. स्वामी शारदानंदांनीं रामकृष्णांच्या चिरंजीव जीवनाचा जो इतिहास लिहिला त्यांतील अनेक घटना योगीन मानें कथन केलेल्या आहेत असें त्यांनीं नमूद करून ठेवलें आहे. रामकृष्णांचा निकट परिचय आणि तीव्र स्मरणशक्ति यामुळेंच तिनें सांगितलेला वृत्तान्त शारदानंदांनीं निःसंदेह

मान्य केला. रामकृष्णांच्या पूर्ण कृपेनें योगीन मा इतकी आध्यात्मिक प्रगति करूं शकली. योगीन मानें एकदां आपली मुलगी आणि वृद्ध माता यांना रामकृष्णांकडे नेलें. हृदय हालवून सोडणारें त्यांचें भाषण ऐकून त्या दोघी मुग्ध झाल्या. तिच्या प्रेरणेनें तिचा पती अंबिकाचरण रामकृष्णांच्या दर्शनास आला. अध्यात्माची आवड घेऊनच तो घरीं परतला. दुर्दैवानें पिसाळलेलें कुत्रें चावून त्यांतच त्याचा अंत झाला. रामकृष्णांच्या सूचनेवरून शेवटच्या आजारांत अंबिकाचरणास घरीं आणून योगीन मानें त्याची सेवा केली.

इ. स. १८८५ च्या जुलै महिन्याच्या २८ तारखेस श्रीरामकृष्ण योगीन माच्या घरीं गेले होते. आपल्या झोपण्याच्या खोलींत बसून स्वामींनीं थोडा फराळ करावा अशी इच्छा तिनें प्रदर्शित केल्यावरून स्वामींनीं तेथें बसून अल्पोपाहार घेतला. रामकृष्णांचे पाय लागले म्हणजे ती खोली पवित्र होईल व तेथें जर आपल्याला मृत्यु आला तर आपणांस मुक्ति मिळेल अशी योगीन माची भावना होती.

इ. स. १८८६ त रामकृष्णांचें निर्याण झालें. त्या वेळीं योगीन मा वृंदावनांत तपश्चर्या करीत होती. शेवटच्या आजारांत आपण त्यांना भेटूं शकलों नाहीं याची तिला फार हुरहुर लागून राहिली. याविषयीं बोलतांना ती सांगते—

" या प्रसंगानंतर जेव्हां माझी व माताजींची भेट झाली त्या वेळीं माझ्या गळ्यांत गळा घालून त्या खूप रडल्या. रामकृष्णांच्या निर्याणानें आम्हीं दोघीहि इतक्या विव्हल झालेल्या होतों कीं, आम्हाला रोजच्या गरजेच्या गोष्टी पार पाडणेंहि अशक्य झालें होतें. एके दिवशीं स्वामी आमच्यासमोर प्रकट होऊन म्हणाले, " तुम्ही इतका शोक कां करतां ? मी येथेंच आहे. फक्त एका दालनांतून दुसऱ्या दालनांत गेलों आहे इतकेंच ! " रामकृष्णांनीं धीर दिल्यानंतर मनाला बरीच स्वस्थता आली व आमचा दिनक्रम पुढें सुरूं झाला. "

वृंदावनांत असताना योगीन माचा बराच वेळ जप व साधना यांत जात असे. अशीच ती एकदा लालाबाबूंच्या देवळात ध्यानस्थ बसलेली असतांना तिची पूर्ण समाधि लागली. रात्र पडली. देवळाचे दरवाजे बंद

करण्याची वेळ आली तरी योगीन मा उठण्याचें चिन्ह दिसेना. पुजाऱ्यानें खूप हांका मारल्या. योगीन मा घरीं येण्यास उशीर झाल्यामुळें इकडे माताजी काळजींत पडल्या. तिला शोधण्यासाठीं त्यांनीं स्वामी योगानंदास कंदील देऊन पाठविलें. ते सरळ लालाबाबूंच्या देवळांत गेले. महत्प्रयासानीं त्यांनीं योगीन् माला समाधींतून जागें केलें व घरीं आणलें. याविषयीं माताजींशीं बोलतांना ती म्हणाली, "जप करतां करतां इष्ट देवता माझ्या डोळ्यांसमोर दिसूं लागली आणि मी देहभान विसरलें." या मानसिक अवस्थेंत ती तीन दिवस राहिली. अशी समाधि अवस्था वडिलांच्या घरीं रहात असतांनाहि तिनें एकदां अनुभावली होती. हें कळल्यानंतर स्वामी विवेकानंदांनीं असे उद्गार काढले कीं, "ज्यांनीं एकदां समाधिअवस्थेचा अनुभव घेतला त्यांना अशाच अवस्थेंत मृत्यु येतो. योगीन मा, तुम्हाला असें भाग्याचें मरण लाभेल."

योगीन माजवळ बालकृष्णाच्या दोन मूर्ति होत्या. तिचा भक्तिभाव इतका जाज्वल्य होता कीं त्या मूर्ति सजीव व तेजस्वी स्वरूपांत तिला दिसूं शकत. कृष्ण तिच्याशीं बोले, खेळे व खाऊसाठीं हट्टहि करी. आपला असाच एक अनुभव कथन करतांना ती सांगते, "पूजा करीत असतांना एकदां दोन अत्यंत गोजिरवाणे मुलगे माझ्याजवळ आले. दोघांनीं माझ्या गळ्याभोंवतीं हात घालून मला विचारलें, "ओळखलेंस का आम्ही कोण ते?" मी उत्तरलें, "हो, एक बलशाली बलराम व दुसरा कृष्ण!" यावर कृष्ण पुन्हां म्हणाला, "नातवंडांत गर्क झाल्यामुळें तुला आमची आठवण राहणार नाहीं!" या वेळीं वस्तुस्थिति अशी होती कीं योगीन माची मुलगी तीन पोरकीं मुलें मागें टाकून स्वर्गवासी झाल्यानें त्यांचें संगोपन योगीन मावरच येऊन पडलें. यामुळें तिची साधनेंतील तीव्रता नाइलाजानें कमी झाली होती.

शक्य तितक्या कमी अवधींत आध्यात्मिक साधना पूर्ण व्हावी यासाठीं योगीन मा खडतर तपश्चर्या व उपासतापास करीत होती. बेलूरला नीलांबर मुकर्जींच्या घरांत रहात असतांना 'पंचतप' नावाचें अत्यंत कठीण व्रतहि तिनें माताजींबरोबर केलें होतें. एकदां सहा महिने पाण्याऐवजीं दूध पिण्याचा प्रयोग तिनें केला, तर एका थंडीच्या मोसमांत ती प्रयाग व काशी येथें नदीकांठावर राहिली. स्वामी शारदानंदांकडून तिनें पुरी येथें संन्यासधर्माची

औपचारिक दीक्षा घेतली. भगवें वस्त्र मात्र ती फक्त पूजेच्या वेळींच परिधान करी.

" वेज् इन् द इंडियन् मोनेस्ट्री " या पुस्तकांत भगिनी देवमाता हिनें पुढील वृत्तान्त दिला आहे-- " कित्येक वर्षे योगीन मानें आपला दिनक्रम अगदीं घड्याळाप्रमाणें चालविला होता. रोज पहांटे ती चार वाजतां उठे व गंगेवर स्नानास जाई. माताजींचीं सर्व कामें उरकून नंतर ती पूजेस बसे. जेवावयास वाढण्याची कामगिरी तिच्याकडेंच असे. "

" यानंतर ती घरीं जाई. संध्याकाळीं आरतीच्या वेळीं पुन्हां ती माताजींकडे हजर असे. रात्रीचें वाढपहि तिच्याकडे असे. एकहि दिवस लहरीखातरसुद्धां तिनें या दिनक्रमांत बदल केला नाहीं. श्रीरामकृष्णांवर पूर्ण श्रद्धा ठेवून त्यांच्या शिष्यांची मनोभावें सेवा करणें हें ती जीवनाचें सारसर्वस्व मानी. योगीन मा फार कमी बोले, पण तिच्या अंतरंगांतील अध्यात्माची तेजस्वी ज्योत सतत अधिकाधिक तेजानें तेवत होती. "

आपल्या अनेक शिष्यांना माताजी सांगत, " योगीन व गोलाप यांनीं केवढी साधना केली आहे ! त्या खऱ्या तपस्विनी आहेत. त्यांच्या सिद्धावस्थेवर तुम्ही नुसती चर्चा केलीत तरी तुमचा फायदा होईल."

योगीन माचें कलकत्त्यांतील घर म्हणजे रामकृष्णांच्या शिष्यमंडळींचें एक विश्रांतिस्थान होतें. जगद्धात्री पूजेच्या वेळीं माताजी जर कलकत्त्यांत असल्या तर योगीन माच्या घरीं होणाऱ्या उत्सवास हजर रहात. या वेळीं स्वामी शारदानंद, स्वामी विवेकानंद वगैरे मंडळीहि तेथें जमत. स्वामी विवेकानंदांना तिनें तयार केलेले खाद्यपदार्थ फार आवडत. कधीं कधीं त्यांना आवडणारे पदार्थ ते तिला मुद्दाम तयार करावयास सांगत.

योगीन मा बरेच वेळां यात्रेच्या निमित्तानें कलकत्त्याच्या बाहेर असे. माताजींबरोबर कांहीं दिवस ती जयरामवाटीस अगर कामारपुकूरलाहि जाऊन राही. रामकृष्ण व माताजी या अवतारी जोडप्याचा सहवास व त्यांची सेवा, स्वतःची खडतर तपस्या, रामकृष्णांच्या व माताजींच्या शिष्यांचा सतत

सहवास, परोपकार आणि जप, पूजा, चिंतन वगैरे करतांना वर्षानुवर्षे अनुसरलेलें मतस्थ जीवन यामुळें योगीन माची आध्यात्मिक उन्नति आश्चर्यकारक गतीनें झाली. माताजी म्हणत, "योगीन मा खऱ्या अर्थानें ज्ञानी महिला आहे."

इ. स. १९२० मध्यें माताजी निवर्तल्यानंतर योगीन माला ऐहिक जीवनांत एकहि पाश उरला नाहीं. रामकृष्ण व माताजी यांच्याशीं पुनर्मीलन होण्यासाठीं लवकर देह पडावा अशी ती ईश्वराची प्रार्थना करूं लागली. यानंतर तीन वर्षांनीं इ. स. १९२३ सालीं स्वामी शारदानंदांबरोबर योगीन मा जयरामवाटीला शारदामणींच्या स्मरणार्थ बांधल्या जाणाऱ्या एका देवालयाच्या पायाभरणी-समारंभास गेली. इ. स. १९२४ च्या जून महिन्याच्या चार तारखेस योगीन मानें हें नश्वर जग सोडलें. मृत्यूपूर्वी दोन वर्षें ती आजारीच असे. पण गोपालाच्या सतत नामस्मरणानें तिची आंतरिक शान्ति मात्र वाढत गेली. बराच काल ती उन्मनी अवस्थेंत राही.

रामकृष्ण-माताजींच्या सहवासांत राहून सिद्धावस्था प्राप्त करून घेतलेल्या योगीन माबद्दल भगिनी देवमाता शेवटीं लिहिते, "अशा व्यक्ति एखाद्या तळ्यासारख्या अगर नदीसारख्या असतात. सूर्यानें जरी त्यांचें पाणी शोषून घेतलें तरी पुन्हां लोकांचें जीवन समृद्ध करण्यासाठीं तीं भरलेलीं राहतात. तद्वत् अशा भक्तांचे नश्वर देह जरी नाहींसे झाले तरी त्यांच्या आध्यात्मिक जीवनाचा परिमल आसमंतात् दरवळून निराश हृदयांना आशेचे किरण दाखवीत राहतो."

**गोलाप सुंदरी देवीः**— गोलाप सुंदरी देवी ऊर्फ गोलाप मा हिचा जन्म उत्तर कलकत्यांतील एका ब्राह्मण कुटुंबांत झाला. घरचें वातावरण जरी जुनें होतें तरी ती स्वतः उदार विचारांची होती. गोलाप सुंदरीचें वैवाहिक जीवन अतिशय दुःखी होतें. विवाहानंतर एक मुलगा आणि एक मुलगी लहान असतानाच तिचा पति निवर्तला. मागोमाग काळानें तिचा पुत्रहि हिरावून नेला. तिची मुलगी चंडी हिचा विवाह सौरींद्र मोहन टागोर यांच्याशीं झाला. पण विवाहानंतर तीहि मृत्युमुखीं पडली. दुर्दैवाच्या एकामागून एक पडलेल्या घाल्यांनीं गोलाप सुंदरी अगदीं खचून गेली. मनःशान्तीसाठीं

ईश्वरानें तरी आपल्यावर कृपा करावी अशी तळमळ तिला लागलेली असतांना अचानक तिला एक सुसंधि प्राप्त झाली.

योगीन मा गोलाप माच्या घराजवळ रहात असे. एके दिवशीं त्या दोघींची भेट झाली. आपलें मन मोकळें करण्यास योग्य व्यक्ति लाभल्याचें समाधान त्या दिवशीं गोलाप मास लाभलें. तिची विकल मनोवस्था पाहून योगीन मानें तिला आपल्याबरोबर दक्षिणेश्वरास श्रीरामकृष्णांकडे नेलें. या भेटीचा गोलाप मावर गंभीर परिणाम झाला. रामकृष्णांच्या पायाशीं बसून तिनें आपली कहाणी त्यांना सांगितली. तिची सर्व हकीकत सहानुभूतीनें ऐकून घेतल्यानंतर एखाद्या तज्ज्ञ वैद्याप्रमाणें रामकृष्णांनीं तिला कांहीं आध्यात्मिक उपाय सुचविले. देवाशिवाय एकहि पाश तिच्या जीवनांत उरला नाहीं, हें एका दृष्टीनें ठीकच झालें असें सांगून ते म्हणाले, " दुःखें हीं एकपरीनें आशीर्वादच असतात. एकाकी जीवनांत सर्व लक्ष ईश्वरावर केन्द्रित करतां येतें. संसारांत गुरफटलेल्या माणसांना एक क्षणहि देवासाठीं खर्च करायला फुरसतच नसते." स्वामींचे हे शब्द गोलापच्या हृदयावर ठसले आणि तिचा जीवनविषयक दृष्टिकोन आमूलाग्र बदलला. त्यांच्या सहवासांत तिचें मन शान्त होत गेलें. कांहीं कालानंतर तिच्या चेहऱ्यावर दुःखाचा लवलेशहि दिसेनासा झाला. तिचें सर्व लक्ष रामकृष्णांवर केन्द्रित झालें. त्यांनीं तिची शारदामणींशीं ओळख करून दिली. त्या उभयतांच्या सहवासांत गोलापला स्वर्गीय आनंदाचा लाभ झाला.

गोलाप मा आपल्या मावंडांसमवेत उत्तर कलकत्यांतील एका मोडकळीस आलेल्या घरांत रहात असे. रामकृष्णांनीं आपल्याकडे यावें व आपलें निवासस्थान त्यांच्या पदधूळीनें पवित्र व्हावें अशी तिची फार दिवसांची इच्छा होती. ती सफल होण्याचा योग इ. स. १८८५ च्या जुलै महिन्यांत आला. नंद बसू यांच्या घरीं आले असतांना स्वामींनीं गोलाप मालाहि भेट दिली. रामकृष्ण कधीं येतात असें तिला होऊन गेलें. उत्कंठेनें ती कितीतरी वेळ आंतबाहेर करीत होती. शेवटीं ती एका रस्त्यानें नंद बसूंच्या घरीं गेली व दुसऱ्या रस्त्यानें रामकृष्ण तिच्याकडे आले. परत येतांच स्वामींना पाहून तिचें हृदय आनंदानें मग्न आलें. ती त्यांना म्हणाली,

" आज माझें परमभाग्य उदयास आलें. चंडीचें दुःख आज माझ्या मनांतून पार नाहींसें झालें. धावत जाऊन योगीन माला मी ही शुभवार्ता सांगून येतें." भावनावेगानें ती पुढें बोलूं लागली, " एका पोर्टरला लॉटरीच्या एक रुपयाच्या तिकिटावर एक लाख रुपये बक्षिस मिळालें. ती वातमी ऐकतांच आनंदातिशयानें हृदयविकाराचा झटका येऊन तो मेला. माझीहि आज अगदीं तशीच अवस्था झाली आहे. मला आपण वांचवा." इतकें बोलून गोलाप एकतानतेनें रामकृष्णांकडे पहात उभी राहिली. जणूं एखादी दगडी पुतळीच ! आलेल्या मंडळींचें आदरातिथ्य करण्याची बहिणीनें सूचना दिल्यानंतर ती भानावर आली. सर्वांचें खाणेंपिणें झालें. नंतर रामकृष्ण योगीन माकडे गेले. तेथें दोन तास घालवून नंतर बलराम बोसांकडे ते मुक्कामास गेले. या दोन्ही ठिकाणीं गोलाप माहि त्यांच्याबरोबर होती. गारुड्याच्या पुंगीनें भारलेल्या नागाप्रमाणें या वेळीं तिची अवस्था झाली होती.

हळूहळू माताजींच्या निकटवर्तीयांत गोलापला कायमचें स्थान मिळालें. शारदामणींना श्रीरामकृष्ण नेहमीं सांगत, " गोलाप माला खूप जपत जा. सांवलीप्रमाणें निरंतर तुझ्याजवळ राहून ती तुझी सेवा करते." आणि खरोखरच छत्तीस वर्षें गोलाप मा माताजींजवळ राहिली व तिनें त्यांची मनोभावें सेवा केली. रामकृष्णांच्या शेवटच्या आजारांत त्यांची सेवा करण्यासाठीं ती माताजींबरोबर श्यामपुकूर आणि कोसीपूर या दोन्ही ठिकाणीं गेली होती. रामकृष्णांच्या निधनाचा धक्का गोलाप माला असह्य झाला. यानंतर माताजीं-बरोबर तीहि वृंदावनास गेली आणि तेथें एक वर्षभर तिनें खडतर तपस्या केली. माताजींबरोबर इतरहि यात्रा तिनें केल्या. त्या नेहमीं म्हणत, " गोलापखेरीज कोठें जाणें मला शक्यच नाहीं. ती जवळ असली म्हणजे मला एकप्रकारचें मनःस्वास्थ्य लाभतें. "

रामकृष्णांच्या निर्याणानंतर गोलाप माताजींची अधिकच काळजी घेऊं लागली. कांहीं उपासकांच्या अतिरेकी वर्तनाचा तिला बंदोबस्त करावा लागे. एका शिष्यानें माताजींना कालीमातेसारखें बसवून त्यांची पूजा आरंभिली. बराच वेळ झाला तरी पूजा संपेना. तेव्हां गोलाप त्याला रागानें म्हणाली, "माताजी एखादा लांकडी पुतळा आहे असें का तुम्ही समजलांत ?" हें ऐकतांच त्यानें आपली पूजा आवरती घेतली.

माताजी कलकत्त्यांत असोत किंवा जयरामबाटींत असोत, गोलाप मा सारखी त्यांच्याजवळ राही व त्यांच्या गरजा ओळखून त्या पुरविण्याची पराकाष्ठा करी. गाडींतून चढतांनाउतरतांना त्या तिचाच आधार घेत. त्यांचा शिष्यपरिवार जसजसा वाढत गेला तसतशी गोलाप मा त्यांच्या घरची प्रमुख व्यवस्थापिका बनली.

गोलाप माचा दिनक्रम रेखीव होता. पहाटे चारला उठून सुमारें तीन तास ती जप करी. नंतर सैंपाकाची तयारी करून मग मातांजींबरोबर ती गंगेवर स्नानास जाई. आल्यावर विडे लावण्याचें काम तिला करावें लागे. घरांतील सर्व मंडळींना प्रसाद वाटण्याचें काम तिच्याकडेच असे. जेवण झाल्यावर थोडी विश्रांति घेऊन नंतर ती गीता, महाभारत व रामकृष्ण आणि विवेकानंद यांच्या वाङ्मयाचें वाचन करी. संध्याकाळीं आरती झाल्यावर ती आपल्या खोलींत जाऊन रात्रीं ९-३० पर्यंत जप करी. नंतर अल्पोपाहार घेऊन झोपे. मातांजी म्हणत, "गोलाप व योगीन किती वेळ जप करतात! गोलापला बरीचशी उपरति जपामुळेंच झाली आहे."

गोलाप मा स्वच्छतेची फार भोक्ती होती. घरांतल्या कोणत्याहि शिष्यानें आपले कपडे न धुतां इकडेतिकडे ठेवलेले तिला दिसले तर ती ते तावडतोब धुऊन वाळत घाली. कोणतीहि गोष्ट वाया घालविल्यास मातांजी त्याकडे दुर्लक्ष करीत, पण गोलाप रागावे. भाजीचीं देठें व पानांत उरलेलें अन्न गायींनें खावें म्हणून रस्त्याच्या कडेला ती व्यवस्थित नेऊन ठेवी. विडे केले कीं पानांचीं काढलेलीं देठेंहि घरच्या जनावरांना घालण्यास ती कधीं चुकत नसे.

गोलाप अतिशय दयाळू व परोपकारी होती. तिचें स्वतःचें उत्पन्न महिना १० रु. असे. त्यातली निम्मी रक्कम ती गोरगरिबांसाठीं खर्च करी. कोणी आजारी पडल्यास उसने पैसे घेऊनहि ती त्याला औषधपाणी करी. स्वतः मात्र कोणाकडूनहि सेवा घेण्याचें ती टाळी.

स्पष्टवक्तेपणाबद्दल गोलापची अशीच ख्याति होती. समाजाच्या मान्य रूढीविरुद्ध कोणी कांहीं केल्यास कडक शब्दांत ती त्याचा निषेध करी. खरें बोलतांना मातांजींचीहि ती भीड ठेवीत नसे. तिचें मन जाणणाऱ्या मातांजी

तिच्या शब्दाकडे लक्ष देत नसत. पण गोलापच्या स्पष्टवक्तेपणानें अनेक माणसें दुखावत. म्हणून अप्रिय सत्य बोलण्याचें शक्यतों टाळावें असें माताजी तिला वारंवार सांगत. अशा वेळीं गोलाप मा तावडतोब गप्प बसे.

निंदा अगर स्तुति दोहोंकडे ती निर्विकार वृत्तीनें पाहूं शके. ब्राह्मण कुटुंबांत जन्म झाला असूनहि जातिभेद तिला मान्य नव्हता. हीनांत हीन जातींच्या माणसावरहि ती प्रेम करी. माताजी म्हणत, "गोलापचें मन पवित्र आहे." वृंदावनांत असतांना माधवजीच्या देवळापुढील सभामंडपांत एका मुलानें घाण करून ठेवल्यानें जाणाऱ्यायेणाऱ्यांना त्रास होऊं लागला. हें पाहतांच गोलापनें आपल्या नव्या साडीचा पदर फाडून ती जागा साफ केली. गंगेच्या घाटाच्या पायऱ्या केव्हांहि खराब झालेल्या दिसल्या तरी त्या धुतल्याखेरीज ती पुढें जात नसे. मनाचें पावित्र्य प्राप्त होण्यास फार तपश्चर्या लागते. अशी तपश्चर्या पुरी केल्यामुळें गोलापला पुन्हां जन्म घ्यावा लागणार नाहीं असें माताजी नेहमीं म्हणत.

माताजींच्या मरणानंतर गोलाप मा चार वर्षें जगली. माताजींच्या कलकत्याच्या निवासस्थानांत ती राही. रामकृष्णांचे व शारदामणींचे सर्व शिष्य तिला मातेप्रमाणें मानीत. अंगांत उभे राहण्याची ताकद असेपर्यंत तिनेंहि मनोभावें सर्वांची सेवा केली. सतत परिश्रम व तपस्या यांनीं अखेर तिचें शरीर थकलें. इ. स. १९२४ च्या डिसेंबर महिन्याच्या १९ तारखेस अत्यंत शान्त वातावरणांत गोलाप मा अनंतांशीं एकरूप झाली.

**गौरी मा** :—असामान्य बुद्धिमंत शिक्षणानें तयार करतां येत नाहीं, तो जन्मालाच यावा लागतो या नियमाचें उदाहरण म्हणून गौरी माच्या जीवनाकडे बोट दाखविता येईल. धार्मिक आणि शैक्षणिक क्षेत्रांत तिनें जी कामगिरी बजाविली त्यावरून तिच्या रचनात्मक कल्पकतेची पुरेपूर साक्ष पटते.

गौरी माचा जन्म इ. स. १८५७ सालीं झाला. हौऱ्याच्या सिब्पूर भागांत राहणाऱ्या पार्वतीचरण चट्टोपाध्यायांची ती मुलगी. तिची आई गिरिबाला देवी. तिचे आईबाप ती लहान असतांनाच वारले. परंतु तिचा ज्यानीं सांभाळ केला त्या तिच्या दक्षिण कलकत्यांत राहणाऱ्या मामेआजोबाकडून तिला बरीच संपत्ति मिळाली होती. मालक नसल्यानें मिळकतीची व्यवस्था पाहण्यासाठीं

म्हणून गिरिबाला बहुतेक माहेरींच राही. मृडानीचा ( गौरी मा ) मुक्काम आईजवळ असे. तिचें सर्व बालपण अतिशय -सुखवस्तु परिस्थितींत गेलें. पतीप्रमाणें गिरिबाला धार्मिक व व्यासंगी वृत्तीची होती. त्यामुळें तिला सर्वजण फार मान देत. बंगाली व संस्कृत या दोन भाषांवर तर गिरिबालेचें प्रभुत्व होतेंच, शिवाय तिला इंग्रजी व पर्शियन या भाषाहि अवगत होत्या. बंगाली भाषेंत तिनें शेंकडों गीतें रचलीं होतीं. संस्कृतांतहि तिनें कांहीं रचना केली आहे. आपल्या आईच्या प्रभावी व्यक्तिमत्त्वाचा मृडानीच्या मनावर फार परिणाम झाला यांत कांहींच नवल नाहीं.

अगदीं लहानपणापासून मृडानीचा कल देवदेवतांच्या पूजेअर्चेकडे होता. दातृत्व, सहानुभाव, परोपकार व ऐहिक सुखाविषयीं पूर्ण विरक्ति या तिच्यांतील गुणांवरून ती पुढें मानव्याची व ईश्वराची सेवा करणारी एक असामान्य भक्त महिला होणार हें स्पष्ट झालें होतें. लहान वयांत तिला एका मिशनरी शाळेंत दाखल करण्यांत आलें. पण तिचें शिक्षण लवकरच संपुष्टांत आलें. कारण त्या शाळेंत हिंदु धर्माबद्दल जी असहिष्णु वृत्ति दाखविली जाई ती तिला सहन होईना. कलकत्त्याच्या लॉर्ड बिशपची बहीण मराया मिलमन् ही त्या शाळेची एक प्रमुख व्यवस्थापिका होती. तिला मृडानी अतिशय आवडे. शिक्षणासाठीं मृडानीला इंग्लंडला पाठविण्याची एक योजना मरायानें गिरिबालेस सुचविली. पण मृडानीला ख्रिश्चन जगाचाच वीट आलेला होता. त्यामुळें ही योजना तिला पटली नाहीं.

घरीं मात्र मृडानीचें शिक्षण व्यवस्थित चालू होतें. एवढ्या लहान वयांत अनेक संस्कृत श्लोक, गीता, चंडी, रामायण व महाभारतांतील अनेक उतारे ती तोंटपाठ म्हणे. मुग्धबोध हा संस्कृत व्याकरणाचा ग्रंथहि तिनें अभ्यासला. दहाव्या वर्षी एका विद्वान् ब्राह्मणाच्या हस्तें तिचा दीक्षाविधि करण्यांत आला. याच सुमारास वृंदावनाहून आलेल्या एका भाविक यात्रेकरूनें मृडानीला गोपाल-कृष्णाची ( दामोदराची ) एक छोटीशी मूर्ति भेट म्हणून दिली. तिची पूजा-अर्चा करण्यांत मृडानीचा बराच वेळ जाई. या गोपालकृष्णानें जन्मभर तिची संगत केली.

मृडानीची ही असामान्य विरक्त वृत्ति पाहून गिरिबाला आश्चर्यचकित

होई. संसारांत तिचें मन रमलें तर बरें म्हणून सगळ्यांनी तिच्या लग्नाची खटपट चालू केली. या वेळीं मृडानीचें वय अवघें तेरा वर्षांचें होतें. तरी विवाहाबाबत तिच्या मनांत पूर्ण नावड निर्माण झालेली होती. आपल्या विवाहाची खटपट चालू असल्याचें जेव्हां तिला समजलें तेव्हां तिनें आईला सांगितलें, " अमरत्व प्राप्त झालेल्याशींच मी लग्न करीन. " यावरून तिचा विवाह फक्त देवाशींच होईल हें तिला सुचवावयाचें होतें. आईनें तिच्या हट्टाकडे कानाडोळा करून तिच्या विवाहाची सिद्धता केली. पळून जाण्याचा प्रयत्न करूं नये म्हणून तिला एका खोलीत कोंडून ठेवण्यांत आलें. हें सर्व समजतांच मृडानी फार संतापली व सर्वांचा डोळा चुकवून रात्रीं घराबाहेर पडली. दोन-तीन दिवसांनीं ती परत घरीं आली. यानंतर मात्र तिच्या विवाहाचा प्रश्न कोणींहि कधीं काढला नाहीं.

या घटनेनें तिची ईश्वरभेटीची तळमळ शतपटीनें वाढली. घरांतून दूर कोठेंतरी एकान्तवासांत जावें व साधना करावी यासाठीं तिची धडपड चालू होती. वयाच्या अठराव्या वर्षी कांहीं नातेवाइकांबरोबर गंगासागरच्या यात्रेस जाण्याचा तिला योग आला. या प्रवासांत इतरांचें लक्ष चुकवून तिनें एक साधूंचा तांडा गांठला व त्याच्यासमवेत ती थेट हरद्वारला गेली. यानंतर ईश्वरचिंतनांत तिनें रानावनांत बराच काल काढला. संसारी माणसांचा संपर्क मात्र ती कटाक्षानें टाळी. साधनेच्या आनंदांत शारीरिक कष्ट ती पार विसरे. गळ्यांत दामोदराची मूर्ति, एका छोट्याशा पिशवींत गीता, चंडी व भागवत हे ग्रंथ, गौरांगाची व कालीमातेची प्रतिमा आणि कांहीं आवश्यक किरकोळ वस्तु एवढ्या सिद्धतेनिशी मृडानीनें केदारनाथ, बद्रिनारायण, ज्वालामुखी, अमरनाथ, वृंदावन, द्वारका व पुरी एवढ्या ठिकाणाना भेटी दिल्या. या प्रवासांत आलेल्या अनुभवांचें तिनें केलेलें वर्णन अतिशय रोमांचकारी आहे.

आपला ठावठिकाणा कळूं नये म्हणून पुष्कळ वेळां मृडानी पुरुष-वैराग्याचा वेष परिधान करी, सर्वांगास राख फाशी व डोक्याला पागोटें बांधी. कधीं कधीं ती वेड्याचें सोंगहि घेई. द्वारकेस व कृष्णदेवाच्या इतर स्थानांत तिला कांहीं विलक्षण अनुभव आले. अनेक संकटांतून तिची आश्चर्यकारक रीतीनें सुटका झाली.

बागबाजारांत राहणाऱ्या बलराम बोसांकडून मृडानीला प्रथम श्रीरामकृष्णांची माहिती मिळाली. जगन्नाथपुरीला तत्पूर्वी एका शिष्याकडून तिनें त्यांच्याविषयींच्या कांहीं कथा ऐकल्या होत्या. इ. स. १८८२ मध्यें मृडानी कलकत्त्यास आली तेव्हां तिचा मुक्काम बलराम बोसांकडे होता. रामकृष्णांच्या सिद्धावस्थेविषयीं तिला माहिती सांगून तिनें एकदां त्यांना भेटावें असा बलराम बोसांनीं तिला आग्रह केला. मृडानी उत्तरली, " त्या सिद्ध पुरुषाच्या भेटीची खरी ओढ निर्माण झाल्याखेरीज मी जाणार नाहीं. "

वरील घटनेनंतर कांहीं दिवसांनीं नित्याप्रमाणें मृडानी दामोदराची पूजा करीत बसलेली असतांना मूर्तीपुढें दोन सजीव पावलें तिला दिसूं लागलीं. तिनें दामोदरास तुळस वाहिली कीं ती त्या पावलांवर पडे. असें लागोपाठ तीन वेळां घडलें. मृडानी समाधिस्थ झाली व कित्येक तासांनीं परत शुद्धीवर आली. एक सबंध दिवस व रात्र तिला आलेली अस्वस्थता पाहून बलराम बोस व त्यांची पत्नी यांनीं मृडानीस दक्षिणेश्वरास नेलें. एका कार्डाला सूत गुंडाळीत रामकृष्ण भजन करीत बसले होते. या मंडळींना पाहून त्यानीं भजन थांबविलें. रामकृष्णांना पाहतांच मृडानीची अस्वस्थता नाहींशी झाली. दामोदराच्या मूर्तीपुढें पाहिलेलीं पावलें रामकृष्णाचींच होतीं अशी तिची खात्री पटली. बलरामाकडून मृडानीची हकीकत ऐकल्यावर रामकृष्णांनीं तिच्याविषयीं त्यांना अगोदरच माहिती असल्याचें सांगितलें. अर्थात् अंतर्ज्ञानानेंच मृडानीची ओळख त्यांना पटली होती. सर्वांनीं त्याचा निरोप घेतला, तेव्हां रामकृष्णांनीं तिला पुन्हा येण्याची अगत्याची सूचना दिली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं गौरी मा ( मृडानी ) एकटीच दक्षिणेश्वरास गेली. मोठ्या विश्वासानें तिनें रामकृष्णाना आपल्या जीवनातील अनेक हकीकती सांगितल्या. रामकृष्णानीं तिला नगारखान्यात नेऊन शारदामणींशीं तिची ओळख करून दिली. यानंतर अनेक वेळां गौरी मा दक्षिणेश्वरास मुक्कामास जाऊं लागली. रामकृष्णांच्या सेवेंत उर्वरित जीवन व्यतीत करण्याचें आतां तिनें ठरविलें होतें. ती त्यांच्यासाठीं निरनिराळे खाद्यपदार्थ तयार करी. नगारखान्यांत बसून खड्या आवाजात गौरी मा भक्तिगीतें गाऊं लागली कीं इकडे रामकृष्णाची समाधि लागे. श्रीगौरांगांच्या ठिकाणीं

'महाभाव' अवस्थेंत जो भावनाविष्कार होत असे तो कसा असतो तें प्रत्यक्ष पाहण्याची तिला असलेली इच्छा एकदां अनपेक्षित रीतीनें पुरी झाली. गौरी मा जेवणाचें ताट घेऊन रामकृष्णांच्या खोलीत आली. त्यांनीं एक घांस तोंडांत घातला व ते एकदम उठून उभे राहिले. त्यांची समाधि लागली. खोलींतील सर्वच मंडळी एका अननुभूत तेजस्वी प्रकाशांत न्हाऊन निघाली. प्रत्येकजण दगडासारखा निश्चल होऊन जागच्याजागीं खिळून राहिला. रामकृष्णांनीं सर्वांस स्पर्श केला तेव्हांच ते सर्व शुद्धींत आले. श्रीगौरांग व श्रीरामकृष्ण हे एकरूप आहेत ही गोष्ट त्या दिवशीं गौरी मास पटली.

एके दिवशीं गौरी मा बागेंत फुलें वेंचीत होती. रामकृष्णांनीं तिला पाहतांच ते म्हणाले, " गौरी, मी पाणी घालीत आहें. तूं रोपांची मशागत कर." या उद्गारांचा वाच्यार्थ लक्षांत घेऊन गौरी खरोखरच जमीन सारखी करूं लागली. तें पाहून रामकृष्णांना हंसूं आलें. ते पुन्हां तिला म्हणाले, " मीं काय सांगितलें तें तुला समजलें नाहीं. या देशांतील स्त्रियांची अवस्था फार अनुकंपनीय आहे. त्यांच्या उद्धारासाठीं तूं कार्य करावेंस." गजबजलेल्या शहरांत राहून समाजकार्य करण्याची ही कल्पना गौरी मास फारशी रुचली नाहीं. ती उत्तरली, " या गोंगाटांत मला नाहीं कांहीं करतां येणार ! हिमालयांत जाऊन मी कांहीं मुलींना शिक्षण देऊं शकेन." " छे ! छे ! असं म्हणून चालणार नाहीं. या कलकत्ता शहरांतील दीनदुबळ्या स्त्रियांसाठींच तुला कार्य करावें लागेल. तुझी आध्यात्मिक पातळी पुरेशी उंचावलेली असल्यानें या साधनेचा उपयोग तूं या अभागी स्त्रियांसाठीं केला पाहिजेस."

गौरी माची विशेष खडतर साधना करण्याची इच्छा जाणून ती लवकर पुरी करण्याची रामकृष्णांनीं तिला सूचना केली. ती वृंदावनास गेली व नऊ महिन्यांच्या तपस्येचा एक कार्यक्रम आंखून तिनें त्याप्रमाणें सुरुवात केली. रामकृष्णाच्या ऐहिक जीवनाचा शेवट अगदीं नजिक आलेला आहे याची या वेळीं तिला कल्पनाहि आली नाहीं. रामकृष्णांच्या निर्याणाची व निर्याणापूर्वी तिच्या भेटीची इच्छा त्यांनीं व्यक्त केल्याची हकीकत जेव्हां तिला समजली तेव्हां तिला फार दुःख झालें. प्राणांतिक तपश्चर्येत स्वतःचा

शेवट करून घेण्याचा विचार ती करूं लागली. पण सर्वांनी समजूत घातल्यामुळें तिला तो बेत रद्द करावा लागला. शारदामणी वृंदावनास गेल्या असतां रावळजवळच एका गुहेंत त्यांना गौरी मा भेटली. सुमारें वर्षभर शारदामणींच्या सहवासांत राहिल्यानंतर ती परत हिमालयांत निघून गेली. सुमारें दहा वर्षे उत्तर भारतांत प्रवास केल्यानंतर ती कलकत्त्यास परत आली. यानंतर तिच्या जिवावरचीं दोन दुखणीं गेलीं. त्यांतून बरी होतांच ती दक्षिण भारतांत यात्रा करण्यासाठीं गेली. कन्याकुमारी, रामेश्वर व इतर कांहीं तीर्थांना भेटी देऊन पुन्हां ती कलकत्त्यास आली.

तीर्थयात्रेच्या निमित्तानें बहुतेक सर्व प्रदेश हिंडून आल्यानंतर स्त्रियांच्या केविलवाण्या परिस्थितीची गौरी माला स्पष्ट कल्पना आली. रामकृष्णांनीं सुचविलेल्या कार्याची तिला वारंवार जाणीव होऊं लागली. स्त्रियांची स्थिति सुधारण्यासाठीं त्यांना प्रथम शिक्षण मिळालें पाहिजे असें तिला वाटूं लागलें. आपल्या कार्यास कोठें व कशी सुरुवात करावी ह्या विचारांत असतांना ती कलकत्त्याच्या उत्तरेस गंगेच्या कांठावर वसलेल्या बराकपूर या ठिकाणीं आली. थोडीफार रक्कम जमा करून गौरी मानें या गांवीं शारदेश्वरी आश्रमाची स्थापना केली. गरीब अनाथ मुलींना ऐहिक व पारमार्थिक जीवनास योग्य असें शिक्षण देणाऱ्या एका महान् संस्थेची सुरुवात ही अशी झाली.

पहांटे गौरी माबरोबर सर्व आश्रमवासी कन्यका गंगेवर स्नानास जात. नंतर थोडें भजन व प्रार्थना झाल्यावर प्रत्येकजण नेमून दिलेल्या कामास लागे. गौरी माचा सहवास व प्रेम यापुढें इतर कोणत्याहि कष्टाची अगर अडचणींची त्यांना पर्वा नसे. सर्वसंगपरित्याग करून विरक्त वृत्तीनें स्त्रियांच्या उद्धारासाठीं जन्मभर कार्य करीत राहतील अशा महिला निर्माण करणें हाहि गौरी माचा एक उद्देश होता. यासाठीं तिनें स्थापन केलेला ' मातृसंघ ' भरभराटीस आलेला पाहण्याचें भाग्य तिला लाभलें.

अपूर्व उत्साह, चिकाटी आणि त्याग यांच्या जोरावर गौरी मानें आपल्या कार्यास अनेकांची सक्रिय सहानुभूति मिळविली. थोड्याच वर्षांत या लहानग्या आश्रमाचें एका मोठ्या शिक्षण संस्थेंत रूपांतर झालें. इ. स. १९११ मध्यें गोआबागान ( कलकत्ता ) येथें एका भाड्याच्या घरांत आश्रम

हालविण्यांत आला. अनेक ठिकाणें बदलत बदलत शेवटीं १९२४ मध्यें श्यामबाजारांतील क्र. २६ महाराणी हेमन्तकुमारी रस्त्यावरील स्वतःच्या जागेंत आश्रम कायम झाला.

गौरी मानें आपल्या आयुष्याचीं चाळीस वर्षे या संस्थेद्वारें बंगाली स्त्रियांची सेवा केली. बंगालमध्यें ज्यांनीं स्त्रीशिक्षणाचा पाया घातला त्यापैकीं एक असा तिचा आजहि लौकिक आहे. सुरुवातीस समाजाचा तीव्र विरोध तिला सहन करावा लागला, आश्रमाच्या दैनंदिन खर्चासाठीं दारोदार हिंडून मदत गोळा करावी लागली. निंदास्तुतीविषयीं ती पूर्ण बेफिकीर असे. अंगीकृत कार्यांत ईश्वर आपला सहकारी आहे याची तिला मनोमन खात्री वाटे.

गौरी मा नुसतीच शिक्षणाची पुरस्कर्ती नव्हती. आपल्या प्रभावी वक्तृत्वानें प्राचीन भारतीय स्त्रीजीवनाच्या आदर्शांचा तिनें हिरिरीनें प्रचार केला. जीवनाचें कोडें उलगडण्यासाठी हजारों माणसें तिच्याकडे येत. आयुष्यांत खूप तऱ्हेचे अनुभव घेतलेले असल्यानें ती सर्वांना अचूक मार्गदर्शन करी. बाह्यात्कारी जरी तिचा चेहरा रागीट दिसला तरी तिचें अंतरंग मेणाहून मऊ होतें. एकदां कांहीं माकडें घराच्या छपरावर बसलेल्या एका कुत्र्याच्या पिल्लाला त्रास देतांना तिला दिसल्याबरोबर पाठीला एक काठी बांधून भिंतीवरून ती छपरावर चढली आणि तिनें त्या पिल्लाला वांचविलें. तिला पोहतां येत नव्हतें. पण गंगेंत एक मुलगी बुडताना पाहून तिनें बिनदिक्कत प्रवाहांत उडी घेतली. तिला अन्याय मुळींच सहन होत नसे. गरीब स्त्रियांना मदत करतांना अनेक गंभीर संकटें तिजवर ओढवलीं. पण शान्तपणें त्यांना तोंड देऊन प्रत्येक वेळीं ती यशस्वी होई.

वयोमानानें तिची प्रकृति ढांसळत चालली होती. इ. स. १९३२ सालीं ती पुरीस जगन्नाथाच्या दर्शनास गेली असतां देवाला उद्देशून तिनें असे उद्गार काढले, "परमेश्वरा, आपली ही भेट कदाचित् शेवटचीच ठरेल !" यानंतर दोन वर्षांनीं हवापालट करण्यासाठीं ती वैद्यनाथ व नवद्वीपास गेली होती. या ठिकाणीं भाविक मंडळींना ती आपले गंमतीदार अनुभव सांगे, प्रवचनें करी व सुंदर सुंदर भक्तिगीतें गाऊन दाखवी. इ. स. १९३६ मध्यें श्रीरामकृष्णांचा जन्मशताब्दिउत्सव तिनें कलकत्त्यास पांच दिवस मोठ्या

थाटानें साजरा केला. १९३७ मध्यें तिला अशक्तपणा खूप वाटूं लागला. तिला खोकल्याचा त्रास होतच होता.

१९३८ च्या फेब्रुवारी महिन्याच्या अखेरचा महाशिवरात्रीचा दिवस उजाडला. त्या दिवशीं आश्रमाच्या व्यवस्थापिकेजवळ गौरी मा म्हणाली, " श्रीरामकृष्ण आयुष्याची दोरी ओढीत आहेत. " तिनें सर्व आश्रमवासी स्त्रियांना जमविलें व बराच वेळ त्यांना बहुमोल उपदेश केला. दुपारीं स्वतःचा देह पुष्पांनीं सुशोभित करण्याची तिनें सूचना दिली. मध्यरात्रीं पुन्हां व्यवस्थापिकेस हांक मारून रामकृष्णांची पुढची जयन्ती थाटानें साजरी करण्यास तिनें सांगितलें. पहाटे दामोदराची मूर्ति मागून घेऊन बराच वेळ ती हृदयाशीं धरून नंतर गौरी मानें ती बाजूस ठेवली. " दामोदर कसा दिसतो ? " असें कोणीतरी विचारतांच ती उत्तरली, " सुंदर ! डोळे मिटले तरी मला आतां तो सर्वकडे सारखा दिसतो आहे. " मूर्ति व्यवस्थापिकेच्या स्वाधीन करून तिची नीट काळजी घेण्याची गौरी मानें सूचना दिली. दुसरा सबंध दिवस तिचा चेहरा सात्त्विक आनंदानें फुलून निघाला होता. त्या दिवशीं ती फक्त रामकृष्ण व शारदामणी यांच्याविषयींच बोलत होती. शेवटीं तीन वेळा " गुरु रामकृष्ण " असें म्हणून तिनें दामोदराचा जप सुरूं केला. लवकरच तिची समाधि लागली. याच अवस्थेंत रात्रीं सव्वा आठला तिची जीवनज्योत अनंताशीं एकरूप झाली.

गौरी माचा नश्वर देह जरी नाहींसा झाला असला तरी स्त्रियांचा उद्धार करणारी व हजारोंना अध्यात्माचा मार्ग दाखविणारी एक साध्वी महिला म्हणून प्रत्येक बगाली माणसाच्या हृदयांत तिनें अढळपद प्राप्त करून घेतलें आहे.

**लक्ष्मीमणी देवी** :– ज्या स्त्रियांनीं आपल्या अविश्रांत परिश्रमांनीं जीवनाचा शोध घेतला आणि साधना व तपस्या या आध्यात्मिक मार्गांनीं चिरंजीवपद प्राप्त करून घेतलें, इतकेंच नव्हे तर आपलें ऐहिक जीवन इतरांना मार्गदर्शन करण्यांतच ज्यांनीं व्यतीत केलें त्यांच्या स्मृतीशीं मानवजात नेहमींच कृतज्ञ राहील. या अलौकिक महिलांच्या श्रेणींत लक्ष्मीमणी देवीचें नांव घालतां येईल. लक्ष्मीमणी उर्फ लक्ष्मी दीदी ही श्रीरामकृष्णांच्या मोठ्या बंधूंची–

रामेश्वर चट्टोपाध्यायांची–मुलगी. हिचा जन्म इ. स. १८६४ च्या फेब्रुवारी महिन्यांत कामारपुकूर येथें झाला. रामेश्वर व त्यांची पत्नी शाकंबरी देवी हीं दोघें अतिशय सात्त्विक व प्रेमळ स्वभावाचीं होतीं. रामकृष्णांना हीं उभयतां प्राणापलीकडे जपत. लक्ष्मीमणीच्या मोठ्या भावाचें नांव रामलाल व धाकट्याचें नांव शिवराम असें होतें. पुढील आयुष्यांत हीं मुलें वरींच वर्षें दक्षिणेश्वरास राहिलीं. त्यामुळें महंत रामकृष्णांच्या सहवासाचा लाभ त्यांना आपोआप मिळाला.

अगदीं लहानपणापासून लक्ष्मीमणीस देवदेवतांच्या पूजेअर्चेची अतिशय आवड होती. विशेषतः घराण्याचीं कुलदैवतें–शीतलादेवी व रघुवीर यांच्याविषयीं तर तिला फार आदर वाटे. स्वभावानें ती एकलकोंडी असल्यानें अगदीं जवळच्या नातेवाइकांखेरीज इतरांना, तिला बोलतां येतें कीं नाहीं याचीहि शंका वाटे. लक्ष्मीमणीची बुद्धिमत्ता व स्मरणशक्ति असामान्य होती. प्राथमिक अवस्थेच्या पलीकडे जरी तिचें शालेय शिक्षण कधीं गेलें नाहीं तरी बंगाली रामायण व महाभारत यांचीं ती पारायणें करी. यांतील प्रत्येक घटनेचा भावार्थ तिला समजत असे. या दोन ग्रंथांनींच तिला जीवनविषयक दृष्टिकोन दिला होता आणि त्यांच्या साहाय्यानें तिनें पुढील आयुष्यांत अनेकांना आध्यात्मिक जीवनाचा मार्ग दाखविला होता.

इ. स. १८७३ मध्यें रामेश्वरांच्या निधनामुळें या कुटुंबाला अतिशय हालाखीचे दिवस आले. वडिलांच्या इच्छेनुसार वयाच्या बाराव्या वर्षीच लक्ष्मीमणीचा विवाह हुगळी जिल्ह्यांतील गोघाट येथें धनकृष्ण घटक नांवाच्या गृहस्थाशीं करून देण्यांत आला. रामलाल वडिलांच्या रक्षाविसर्जनासाठीं जेव्हां दक्षिणेश्वरास गेला तेव्हां त्यानें रामकृष्णांना लक्ष्मीमणीच्या लग्नाची हकीकत सांगितली. रामकृष्णांनीं उन्मनी अवस्थेंत लक्ष्मीच्या वैधव्याचें भाकित वर्तविलें. त्यांचा भाचा हृदय जवळच बसला होता. ते भानावर येताच तो त्यांना म्हणाला, "लक्ष्मीवर तुमचें इतकें प्रेम असतांना तिच्या विवाहाची बातमी ऐकून तिला आशीर्वाद देण्याऐवजीं अशी अभद्र वाणी कशी उच्चारलीत?" यावर रामकृष्णांनीं सांगितलें, "कालीमातेनें माझ्या तोंडून तें वदविलें, त्याला मी काय करूं? लक्ष्मी म्हणजे आपल्या कुलदेवतेची–शीतलेची–साक्षात् मूर्ति आहे. त्या मानानें तिचा नवरा अगदींच सामान्य मनुष्य आहे. अशा माणसाशीं लक्ष्मी कदापि

संसार करूं शकणार नाहीं. वैधव्य हा एकच मार्ग तिची या दुःखी जीवनांतून मुक्तता करील. " लग्नानंतर लक्ष्मीमणीचा पति फक्त एक दिवस तिला कामारपुकूरला भेटावयास आला होता. त्यानंतर नोकरी शोधण्याच्या निमित्तानें तो जो निघून गेला तो पुन्हां कधींच परत आला नाहीं. बारा वर्षे झाल्यावर त्या वेळच्या हिंदु पद्धतीनुसार लक्ष्मीला पतीच्या उत्तरक्रियेसाठीं सासऱ्याकडे पाठविण्यांत आलें. श्रीरामकृष्णांच्या सल्ल्यानुसार लक्ष्मीनें पतीच्या संपत्तीवरील आपला अधिकार स्वेच्छेनें सोडला.

लग्नानंतर दोन वर्षें कामारपुकूरला राहून नंतर लक्ष्मीमणी वयाच्या चौदाव्या वर्षी दक्षिणेश्वरास माताजींकडे रहावयास आली. देवालयाचें भाविक वातावरण व देवस्वरूपी चुलता-चुलतींचा सहवास लाभल्यामुळें लक्ष्मीचें मनहि पूर्ण विरक्त होऊन सत्याचा शोध करूं लागलें. तिची इच्छा ओळखून रामकृष्णांनीं तिला वैष्णव उपासनापद्धतीची दीक्षा दिली. प्रपंचांत ओढणारा कोणताच ऐहिक पाश नसल्यामुळें इ. स. १८७२ ते १८८५ ह्या बारा वर्षांच्या काळांत लक्ष्मीनें एकतानतेनें आपली साधना चालू ठेवली. ती सतत माताजींबरोबर नगारखान्यांतल्या छोट्याशा खोलींत राहून त्यांना घरकामांत मदत करी. रामकृष्ण विनोदानें त्या दोघींना ' पिंजऱ्यांतील पोपट ' म्हणत. पण लक्ष्मी मात्र स्वर्गसुखांत होती.

श्रीरामकृष्णांच्या शेवटच्या आजारांत कामारपुकूर व कोसीपूर या दोन्ही ठिकाणीं माताजींबरोबर लक्ष्मीनेंहि त्यांची सेवा केली. ते हयात असेपर्यंत ती कधीं तीर्थयात्रेसहि गेली नाहीं. तिच्या दृष्टीनें दक्षिणेश्वरांत सर्व तीर्थांचें मीलन झालेलें होतें. परंतु रामकृष्णांच्या निधनानंतर मात्र तिच्या जीवनांत फार मोठी पोकळी निर्माण झाली. माताजींबरोबर ती वृंदावनांत एक वर्ष राहिली. या वेळीं तिचा दिनक्रम अतिशय खडतर होता. पुढें त्यांच्यासमवेत पुरीसहि ती जाऊन आली. रामकृष्णांनीं माताजींना सांगून ठेवलें होतें कीं, " लक्ष्मीवर फक्त थोडें लक्ष ठेवा. तिचा योगक्षेम ती चालवील. निर्वाहासाठीं ती कोणाला भारभूत होणार नाहीं. " रामकृष्णांच्या निर्याणानंतर लक्ष्मी दीदी बहुतेक कामारपुकूरला राही. शक्य तेव्हां कांहीं दिवस ती माताजींकडे रहावयास जाई. रामलालची पत्नी इ. स. १९०५ मध्यें निवर्तल्यानंतर त्यानें लक्ष्मीला

दक्षिणेश्वरास रहावयास बोलाविलें. त्यामुळें पुढील दहा वर्षांतील बराच काल लक्ष्मी भावाजवळच होती.

लक्ष्मी दीदीच्या विरक्त वृत्तीची अनेकांवर छाप पडे. थोड्याच कालांत तिच्याभोवतीं बराच मोठा भक्तगण जमा झाला. कांहींनीं तिच्याकडून दीक्षादि घेतली. भावाच्या लहान घरांत लक्ष्मीची अनेक प्रकारें गैरसोय होई. हें लक्षांत घेऊन शेजारी रिकाम्या असलेल्या एका प्लॉटवर एक दुमजली घर बांधण्यांत आलें. माडीवरच्या खिडकींत उभें राहिलें कीं गंगा नदी दिसे. या ठिकाणीं लक्ष्मी सुमारें दहा वर्षें राहिली. दिवसाकाठीं बराच वेळ स्वतःची तपस्या व उरलेल्या वेळांत भाविक मंडळींसाठीं प्रवचन करणें असा तिचा उपक्रम असे. ती रामकृष्णांविषयीं अगर राधाकृष्णांविषयीं रसाळ वाणीनें बोलूं लागली कीं श्रोते मंत्रमुग्ध होऊन डोलूं लागत. तिच्या घरीं जाऊन थोडा वेळ तिच्या सहवासांत घालविणाऱ्या भाविकांना तीर्थयात्रेचा आनंद मिळे.

वृंदावन व पुरी यांव्यतिरिक्त उत्तर भारतांतील अनेक क्षेत्रांना लक्ष्मी दीदीनें भेट दिली. साधना व तीर्थाटन यामुळें तिच्या मनावर जे संस्कार घडले ते फार मोलाचे ठरले. ईश्वराविषयीं दृढ श्रद्धा व ऐहिक जीवनाच्या विफलतेचें तर्कशुद्ध विवेचन करण्याइतकी तिची बौद्धिक पातळी आपोआप उंचावली.

सुप्रसिद्ध कवि जयदेव याचें जन्मस्थान केंदुली येथें एकदां लक्ष्मी दीदी गेली असता हीन जातीच्या वैष्णवांनीं मोठ्या आदरानें प्रसाद म्हणून तिला आणून दिलेलें अन्न तिनें आनंदानें ग्रहण केलें. कोणीहि वैष्णव भक्त मदतीसाठीं तिच्याकडे गेल्यास ती त्याला कधींहि विन्मुख परत पाठवीत नसे. एका गरजू माणसास एकदां तिनें आपलें मूल्यवान् लोकरीचें पांघरूणहि देऊन टाकलें. मात्र ती जितकी मायाळू तितकीच कडकहि होती. एकदां कामारपुकूरच्या एका श्रीमान् गृहस्थानें शीतलादेवीसमोर बोकडाचा बळी देण्याचें ठरविलें. लक्ष्मी दीदीस हें समजतांच ती देवळांत गेली व बोकड मारणाऱ्या माणसाच्या हातून तिनें तलवार हिसकावून घेतली. इतकेंच नव्हे तर त्याचा दूरवर पाठलाग करून तिनें त्याला पिटाळून लावलें आणि देवळाचा दरवाजा बंद केला. यानंतर शीतलादेवीला बळी देण्याची कामारपुकूरची प्रथा आपोआप बंद पडली.

वृंदावनांत असतांना एकदां लक्ष्मी दीदीच्या एका सेविकेनें तिच्या पेटींतले दोनशे रुपये चोरले आणि ती पळून गेली. लक्ष्मीजवळ फक्त कांहीं आणे शिल्लक राहिले. कामारपुकूरहून पैसे येईपर्यंत लक्ष्मीनें वाळक्या भाकरीच्या तुकड्यांवर दिवस काढले. इकडे चोरी केलेली बाई आजारी पडली. मृत्यु-शय्येवर तिला खूप पश्चात्ताप झाला. लक्ष्मी दीदीला निरोप पाठवून तिनें क्षमा-याचना केली. " पैसे खर्च झाल्यानें मी ते परत करूं शकत नाहीं " असा निरोपहि तिनें दिला. उदार मनाची दीदी सर्व राग पार विसरून गेली.

इ. स. १९२२ साली पुरीला तिनें नगरपालिकेकडून एक छोटीशी जागा विकत घेऊन त्यावर एक घर बांधविलें. इ. स. १९२४ सालीं ती तेथें रहावयास गेली. आयुष्याचे शेवटचे दिवस जगन्नाथाच्या पायाशीं घालवा-वेत या उद्देशानें लक्ष्मी पुरीस आली. अधूनमधून तिची प्रकृति एकसारखी बिघडे. इ. स. १९२६ सालच्या फेब्रुवारी महिन्याच्या २४ तारखेस तिनें आपल्या नश्वर देहाचा त्याग केला.

प्रार्थना, भक्ति आणि सेवा यांना वाहिलेल्या लक्ष्मी दीदीच्या उदात्त जीवनाचा असा शेवट झाला. भगिनी निवेदितेनें लिहिलेल्या " द मास्टर अॅज् आय् सॉ हिम् " या पुस्तकांत लक्ष्मी दीदीचें जें स्वभावचित्र रेखाटलें आहे त्यांत ती लिहिते:—

" इ. स. १८९८ च्या सुमारास शारदादेवींच्या कायम परिवारांत गोपाल मा, योगीन मा, भगिनी लक्षी ( लक्ष्मी दीदी ) वगैरेंचा समावेश झालेला असे. यापैकीं गोपाल मा व भगिनी लक्षी या बालविधवा असून त्यांना दक्षिणे-श्वरांत रहात असतांना प्रत्यक्ष रामकृष्णांचें शिष्यत्व लाभलें होतें. लक्ष्मी दीदी तर रामकृष्णांची पुतणीच होती. इतरांच्या मानानें ती वयानें लहान होती. अनेक भाविक मंडळी तिचा उपदेश घेण्यासाठीं येत. तिचा सहवास सर्वांना अतिशय सुखद वाटे. लक्ष्मीची स्मरणशक्ति आश्चर्यकारक होती. जुन्या पौरा-णिक कथा नाटकांतील पात्रांच्या गानें ती पाठ म्हणे. धार्मिक कथांतील निर-निराळ्या भूमिका स्वतः करून दाखवीत असतांना तिच्या भोंवतालचें शान्त वातावरण सात्त्विक आनंदानें भरून जाई. क्षणात काली तर क्षणांत सरस्वती,

कधीं जगद्धात्री तर कधीं कदंब वृक्षाखालीं उभा असलेला बाळकृष्ण, अशीं अनेक रूपें घेऊन लक्ष्मी दीदी त्यांचें यथातथ्य जीवनदर्शन घडवी. जवळ कांहीं साहित्य नसूनसुद्धां फक्त चेहऱ्यावरील भावदर्शनानें ती हें नाट्य अतिशय यशस्वी करी."

" एखाद्या लहान मुलासारखी लक्ष्मी दीदी साधी भोळी होती. कोणतांहि ऐहिक विकार तिच्या शुद्ध व पवित्र मनाला शिवूं शकत नसे. तिच्या हृदयांत द्वेष अगर मत्सर यांस जागाच नसे. जवळ येईल त्याला प्रेम व ज्ञान द्यावें हाच तिचा धर्म. आध्यात्मिक पूर्णतेस पोंचलेली एक साध्वी महिला म्हणून तिची स्मृति अमर होईल यांत शंका नाहीं."

---

# प्रकरण २४ वें

## पूज्य माताजी श्रीशारदादेवी

पूर्वपीठिका:—निरनिराळ्या काळांत वेगवेगळ्या क्षेत्रांत चमकून गेलेल्या आतांपर्यंतच्या महिलांत एक वैशिष्ट्य सर्वांत दिसून येतें व तें म्हणजे आध्यात्मिक मनोबल. भारतीय समाजानें पहिल्यापासूनच जडापेक्षां चैतन्याला अधिक महत्त्व दिलें आहे. वैषयिक सुखापेक्षां किंवा इतर कोणत्याहि ऐहिक सुखापेक्षां पावित्र्य, मानव्य, भक्ति, आत्मनियंत्रण, नैतिक धैर्य व निष्काम प्रेम हीं आत्म्याचीं भूषणें या समाजास अधिक मोलाचीं वाटतात. जीवनाच्या विकासांत मानवी अपूर्णत्व जिंकून त्यामध्यें वास करणाऱ्या दैवी तत्त्वाचा साक्षात्कार घडवून आणण्याची आमची एकसारखी धडपड चाललेली आहे.

आमच्या इतिहासाचीं सर्व पानें अद्वितीय साधुसंतांच्या साधनेच्या प्रकाशांत उजळून निघालेलीं आहेत. आत्मविकासाच्या या कल्पना भारतांत हजारों वर्षांपासून रुजलेल्या आहेत. वैदिक धर्माविरुद्ध बंडाचें निशाण उभारणारा गौतमबुद्धसुद्धां ख्रिस्तापूर्वीं ६०० वर्षें भारतांत होऊन गेला. इतिहास आणि दंतकथा यांतून सत्याची निवड करणें अतिशय कठीण आहे. वैदिक वाङ्मयाचें शास्त्रीयदृष्ट्या संशोधन सुरू होण्यापूर्वीं लोककथा, दंतकथा व इतर मार्गांनीं भारतीय संस्कृतीचीं जीं वैशिष्ट्यें नमूद झालेलीं आहेत त्याचा काल ख्रि. पू. तिसऱ्या शतकापर्यंत नेऊन पोंचवितां येतो. यावरून असें म्हणतां येईल कीं, गेलीं सुमारें अडीच हजार वर्षें भारतीय संस्कृतींत अनेक महिलांनीं आपल्या आध्यात्मिक जीवनाचा ठसा उमटविला आहे.

आमच्या सांस्कृतिक इतिहासांत किंग् आर्थरशीं साम्य असणाऱ्या शेंकडों व्यक्ति आढळतात. पण गनिव्हरसारखी एकाहि व्यक्ति आढळत नाहीं ही गोष्ट विशेष लक्षांत घेण्यासारखी आहे. प्रत्येक दैवी मानवाची सहचरी आध्यात्मिक पूर्णतेंत त्याची बरोबरी करणारी आहे. पुराणकालीन सीता व सावित्री

अजूनहि स्त्रियांचे आदर्श म्हणून मानल्या जातात. स्त्री असो या पुरुष असो, त्यांच्या जीवनाचें ध्येय हजारो वर्षांपूर्वीच्या वैदिक ऋषींनीं घडवून दिल्याप्रमाणें एकच आहे. मानवांतील दैवी अंश व वरवर दिसणाऱ्या अनित्यांतून प्रतीत होणारें नित्य तत्त्व या दोन आधारस्तंभांवर भारतीय संस्कृतीची इमारत उभी आहे. जीवनाच्या तत्त्वज्ञानाचा तपशील कालमानाप्रमाणें बदलत गेला. पण हीं मूलभूत तत्त्वें मात्र आजपर्यंत अबाधित राहिलीं आहेत.

वरील दोन तत्त्वांच्या चष्म्यांतून निसर्गाकडे दृष्टिक्षेप केल्यास असें दिसतें कीं, वैचित्र्य, बदल व स्थित्यंतर हे जड वस्तूचे गुणधर्म आहेत. यामागील जें आधारभूत तत्त्व म्हणजेच ब्रह्म, तें अविनाशी आहे. मनुष्याचा आत्मा हा या अविनाशी तत्त्वाचा एक अविभाज्य भाग आहे. आत्म्यांत लिंगभेद नाहींत. त्याचें स्वरूप स्त्री-पुरुषांत एकच आहे. शरीराच्या व मनोरचनेच्या दृष्टीनें विचार केल्यास स्त्री व पुरुष भिन्न आहेत, पण आत्मतत्त्वाच्या दृष्टीनें तीं दोघें अभेद आहेत. या विचारसरणीनुसार हिंदी जीवनाचें ध्येय निश्चित झालें. वरवरच्या जडत्वाचें आवरण दूर सारून सृष्टींत भरून राहिलेलें एक सत्तत्त्व शोधून त्याच्याशीं आपली एकरूपता पाहणें हेंच तें ध्येय. जन्मजन्मांतराच्या धडपडीचें साफल्य ह्या ध्येयांत सांठविलेलें आहे. यामुळें भारतीय स्त्रिया व पुरुष या दोहोंपुढें हें एकच ध्येय आज शतकानुशतकें ठेवलें गेलें आहे. वैदिक कालापासून अनेक पुरुषोत्तम याच तऱ्हेची शिकवण प्रत्येक भारतीयास देत आहेत.

परमतत्त्वाशीं एकरूप होण्यासाठीं म्हान् साधनेची आवश्यकता असते. मुख्य म्हणजे आत्मत्वाभोंवतीं जें अज्ञानाचें व मलिनतेचें अवगुंठन असतें तें प्रथम दूर करावें लागतें. " मनानें निर्मळ व पवित्र माणसेंच देवाला पाहूं शकतात " असा आध्यात्मिक जगाचा अबाधित नियम आहे. वैषयिक सुखाचा त्याग करणें व अभेद वृत्तीनें मानवतेची सेवा करणें हीं अंतःकरण निर्मळ करण्याचीं दोन साधनें आहेत. आध्यात्मिक प्रगतीचा गाभा म्हणजे अहंकाराचें निर्मूलन. हें निर्मूलन याच दोन साधनांनीं साध्य होतें. यामुळें हिंदु धर्म म्हणजे त्याग व सेवा या मार्गांनीं हृदयाचें पावित्र्य वाढविण्याची एक प्रयोगशाळाच बनली आहे.

हिंदु समाजाची धारणा करणाऱ्या पायाभूत धर्माचें स्वरूप श्रद्धामय आहे. वयाप्रमाणें या श्रद्धेचें प्रतीक बदलत जातें. प्रत्येक अवस्थेंत प्राप्त होणारीं कर्तव्यें पार पाडीत असतांना स्वार्थत्यागाची शिकवण मिळत जाते. धर्ममूल्यांवर असीम श्रद्धा असल्यामुळेंच प्रत्येक व्यक्ति मोठ्या आनंदानें हीं कर्तव्यकर्मे अंगीकारते.

नचिकेताप्रमाणें ऐहिक जगांतील सर्व विषय म्हणजे क्षणैक आभास आहेत अशी मनाची धारणा होणें म्हणजेच त्यागाचें शिखर गांठणें होय. " जें धन, जें ऐश्वर्य, जी संपत्ति मला चिरकालीन आनंद प्राप्त करून देणार नाहीं ती घेऊन मी काय करूं ? " असा पतीला प्रश्न विचारणारी मैत्रेयी मुक्तावस्थेचें एक आदर्श उदाहरण म्हणून सांगतां येईल. या अवस्थेंत ऐहिक जगाचा मोह नष्ट होऊन एका अननुभूत आत्मिक सुखानें अंतःकरण भरून येतें. भारतांतील सर्व ऋषि-मुनि म्हणजे मानसिक पावित्र्याचीं आणि त्यागाचीं प्रतीकेंच होत. या महंतांनीं देशाच्या जीवनांत आत्मत्यागाचे कायमचे आदर्श उभे केले आहेत.

धार्मिक व सामाजिक जीवनांत ब्रह्मचर्याच्या खालोखाल मातृत्वाचें पावित्र्य भारतीयांनीं मानलेलें आहे. नैसर्गिक प्रेम व त्याग या दोन गुणामुळें आध्यात्मिक जीवनांत स्त्रीचें स्थान आपोआपच उंचावतें. पत्नीप्रेम हें पतीच्या प्रेमावर थोडेंफार तरी अवलंबून असतें. पण आईचें प्रेम मुलाच्या मागोमाग नरकांतहि आनंदानें उडी घेतें. " मातृत्वांत मायेची पांखर आहे, कळकळीचा आशीर्वाद आहे, सातत्य आहे, संरक्षण आहे, अथांग प्रेम आणि अवीट गोडवा आहे, न तुटणारीं बंधनें आहेत आणि पावित्र्य आहे " असें आयरिश महिला निवेदिता भारतीय मातेचें वर्णन करून पुढें म्हणते, " मातेच्या प्रेमांत एक दिव्य अनुभूति आहे, स्वामित्वाचा यांत अंशहि नाहीं. या पवित्र दीप्तींत न्हाऊन कृतज्ञबुद्धीनें आयुष्य जगावें एवढेंच मनुष्य करूं शकतो. "

मातृत्वाच्या अशा थोरवीमुळें आणि त्याग व सेवा याचें मातृत्व हें प्रतीक असल्यानें भारतीय जीवनांत मातृत्वाला असामान्य स्थान प्राप्त झालें. देवाला मातेच्या रूपात पाहून त्याची भक्ति करणारे पंथ येथें आहेत. स्त्री म्हणजे त्या महामातेच्या छोट्या छोट्या प्रतिकृति या भावनेनें भारतीय पुरुष स्त्रियांकडे पाहतात. स्त्रियांचा हा सामाजिक दर्जा कायम रहावा म्हणून प्रत्येक

स्त्रीस प्रेमाचे व त्यागाचे धडे प्रथमपासूनच दिले जातात. घराबाहेरील विशाल क्षेत्रांतहि याच भूमिकेवरून स्त्री कार्य करते. सर्व मानवजातीवर पुत्रवत् प्रेम करण्याचा मार्गच तिची आध्यात्मिक प्रगति घडवून आणतो. तारुण्य व सौंदर्य यांपेक्षांहि अनुभवपूर्ण प्रौढत्व भारतीय स्त्रीस अधिक आदरणीय कां वाटतें याचें उत्तर वरील दृष्टिकोनांतून मिळतें. यावरून भारतीय स्त्री क्षणभंगुर यौवनांत गुरफटून न राहतां आत्मिक उन्नतिसाठीं झटून आपलें सामाजिक स्थान कायम ठेवण्यासाठीं कां धडपडते याचें रहस्य वाचकांस सहज उमगेल.

आत्मिक उन्नतीसाठीं भारतीय स्त्रीनें दोन मार्ग आंखून घेतले आहेत. पहिला मानसिक पावित्र्याचा व दुसरा पतीशीं एकनिष्ठेचा. हिंदु स्त्री मरणांतहि पतीला अनुसरते. कितीहि कठीण समरयांना तोंड द्यावें लागलें तरी विवाह-विच्छेदाची कल्पनाहि खऱ्या हिंदु मनाला सहन होणार नाहीं. सिंहासनावरून देवाची मूर्ति खालीं पडल्याइतकाच धक्का घटस्फोट घ्यावयास निघालेल्या आईकडे पाहून आजच्या हिंदु मुलांना बसेल. पतीशीं एकनिष्ठ राहण्याच्या कल्पनेमुळें विधवा-विवाहास समाजाचें मत प्रथमपासून प्रतिकूल आहे. मातृत्वाचा आस्वाद घेण्यासाठीं व मातृत्वांतून आध्यात्मिक पूर्णता प्राप्त करून घेण्यासाठीं प्रत्येक स्त्रीच्या जीवनांत विवाह ही एक अपरिहार्य बाब समजली जाते. वैवाहिक जीवनातच सेवा व कर्तव्य यांची कांस धरून स्त्री हळूंहळूं वैषयिक सुखाचा त्याग करावयास शिकते. ही तपस्या पूर्ण झाल्यानंतर तिच्यांतील दैवी अंश प्रतीत होऊं लागतो.

अशा उच्च ध्येयानें प्रेरित झालेला भारतीय समाज अधूनमधून सामान्य पातळीवर घसरत राहिला. जीवनाच्या क्षणभंगुर कक्षेत फिरत राहिलेल्या सामान्य माणसाला कांहीं काल या आध्यात्मिक ध्येयाचा विसर पडला. ही अधोगति सुरू झाली कीं प्रत्येक वेळीं एखादी विभूति समाजांत अवतरते आणि लोकांना स्वधर्माची जाणीव करून देते असा आजपर्यंतचा अनुभव आहे. नैतिक जीवनाच्या भरती-ओहोटी भारतीय समाजांत आज अनेक शतकें चालू आहेत अशा तऱ्हेचें धर्मसंस्थापनाचें कार्य आज आपल्या डोळ्यांसमोर घडत आहे. धर्मदृष्टीनें समाज अतिशय उदासीन व निरीश्वरवादी होऊं लागला असतां गेल्या शतकाच्या अखेरीस मानवधर्माचें पुनरुत्थापन करणाऱ्या कांहीं विभूति समाजांत निर्माण झाल्या.

भारताचे एक देशभक्त महंत व पाश्चात्यांनीं ज्यांचें वर्णन ' एक झुंझार भारतीय संत ' अशा शब्दांत केलें आहे, ते स्वामी विवेकानंद म्हणतात, " आजच्या धार्मिक आंदोलनाचा वेग आणि व्याप इतका प्रचंड आहे कीं त्यापुढें भूतकालांतील सर्व आंदोलनें सूर्यापुढें तारकांच्या प्रकाशा-इतकीं फिक्कीं पडतील. त्या कार्याची तुलना लहान मुलांच्या खेळांशींच करावी लागेल."

या देशव्यापी आंदोलनाचे प्रणेते श्रीरामकृष्ण परमहंस हे होते. राम-कृष्णांच्या व्यक्तिमत्त्वांत त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या सर्व धर्मसंस्थापकांच्या व्यक्तित्वांचें मनोहर मिश्रण झालेलें होतें. प्रसिद्ध फ्रेंच लेखक रोमाँ रोलाँ यानें इ. स. १९२६ मध्यें श्रीरामकृष्णांच्याबद्दल असें म्हटलें आहे कीं, या दैवी पुरुषश्रेष्ठांत दोन हजार वर्षांच्या ३०० कोटी भारतीयांच्या आध्यात्मिक आकांक्षा जणूं साकार झालेल्या होत्या. रामकृष्णांचा नश्वर देह अनंतांत विलीन होऊन चाळीस वर्षे होऊन गेलीं, परंतु अजूनहि त्यांनीं निर्माण केलेली जागृति आमच्या रक्तांत खेळते आहे. रामकृष्ण बंगालमधील एका खेड्यांतील ब्राह्मण कुटुंबांत जन्मले. त्या वेळच्या राजकीय व सामाजिक जीवनापासून ते जवळजवळ अलि-प्तच राहिले. पण त्यांच्या आंतरिक जीवनानें सर्व मानवता व्यापली होती. सृष्टीचें नियंत्रण करणाऱ्या आदिशक्तीचा ते एक अंश होते असें म्हटल्यास गैर होणार नाहीं.

श्रीरामकृष्णाचें जीवन ( इ. स. १८३६-१८८६ ) पुराणांतील एखादा अद्भुत कथेप्रमाणें भासतें. अज्ञानानें भरलेला व कांहींसा भयाण भूत-काल आणि अतीव बुद्धिवादानें भारलेला वर्तमानकाल या दोहोंना सांधणारा हा एक दुवा होता. शास्त्रीय संशोधनाची प्रज्ञा क्षणभर दिङ्मूढ होऊन त्यांच्यापुढें विनीत होते आणि चमत्कृतिजन्य अशा या असामान्य पुरुषाच्या जीवनांतील सत्तत्त्व शोधून काढण्याचा प्रयत्न करूं लागते. रामकृष्णांच्या हृदयांत प्रत्यक्ष राम व कृष्ण दोघांच्या अस्तित्वाचें संवेदन स्पष्टपणें आढळे.

अखिल जगांत आजपर्यंत होऊन गेलेल्या ऋषि-मुनींच्या या प्रतिनिधीनें आजच्या शास्त्रीय युगाला आध्यात्मिक अनुभूतीचें प्रात्यक्षिक दाखविलें. सामान्य जीवनांतील टप्प्यापासून तों सिद्ध जीवनापर्यंत सर्व प्रकार त्यांच्या जीवनांत

दिसतात. युगप्रवर्तक आध्यात्मिक अनुभवांनीं जीवन कसें उजळून निघतें तेंहि रामकृष्णांच्या चरित्रांत बघावयास सांपडतें. सर्व धर्मांच्या मूलभूत तत्त्वांवर रामकृष्णांच्या कार्यानें एक नवीन प्रकाशझोत टाकला. आपल्या पारलौकिक जीवनानें त्यांनीं निरीश्वरवादास व संदेहवादास उघड आव्हान दिलें आहे. ज्या वेळीं एकीकडे शास्त्राची घोडदौड पारलौकिक जीवन व आध्यात्मिक मूल्यें पायाखालीं तुडविणार कीं काय अशी साधार भीति उत्पन्न झाली होती आणि दुसरीकडे ज्या काळांत संकुचित धर्मकल्पनांचा धुमाकूळ माजला होता, त्या काळांत श्रीरामकृष्ण जन्माला आले हें एक सुदैवच म्हटलें पाहिजे. धर्म कोणताहि असो, त्याची शिकवण एकच आहे ही गोष्ट त्यांनीं सिद्ध करून दिली व बुद्धिवादांना बुद्धीच्या मर्यादांची जाणीव करून दिली.

श्रीरामकृष्णांच्या कार्यानंतर आध्यात्मिक जीवनाविषयींच्या आस्थेची एक लाट आली; आपल्या पूर्वजांच्या पारमार्थिक जीवनाचें संशोधन करण्याची ओढ भारतीय समाजांत निर्माण झाली. नैतिक मूल्यांना व जीवनादर्शांना एक नवीन प्रकारचा उजळा मिळाला.

स्त्रीजीवनाचें ध्येय व पावित्र्य आजच्या सुधारणेच्या युगांत नामशेष होण्याची जी भीति निर्माण झाली होती, ती रामकृष्णांच्या कार्यानें नाहींशी झाली व पुरातन कालापासून जपून ठेवलेलीं स्त्रीजीवनाचीं मूल्येंच योग्य आहेत हें समाजाला पटलें. कालीमातेची भक्ति करून, पत्नीला कालीमातेच्या ठिकाणीं कल्पून तिची पूजा करून व सर्व स्त्रिया म्हणजे या महामातेच्याच प्रतिकृति आहेत असा विश्वास निर्माण करून रामकृष्णांनीं मातृत्वाची महती शतपटीनें अधिक वाढविली. या सर्वांवर शिखर चढविण्यासाठींच जणूंकाहीं प्रत्यक्ष कालीमातेचा अवतार अशा श्रीशारदामणींना—आपल्या पत्नीला—आपल्यामागें जगासमोर ठेवून रामकृष्णांनीं आपल्या तत्त्वज्ञानाचें प्रात्यक्षिक लोकांना पटविलें. रामकृष्णांचे सर्व भक्त शारदामणींना 'पवित्र माताजी' या नांवानें ओळखतात.

एक कोडें.—माताजींचें जीवन म्हणजे एक कोडें आहे. वरवर पाहणाऱ्यांस त्यांच्या जीवनांत सामान्य बंगाली ब्राह्मण स्त्रीच्या जीवनाहून वेगळें असें कांहीं दिसत नाहीं. परंतु त्यांना रामकृष्णांपासून दूर राहण्याची जी

शिक्षा झाली त्यांत मात्र त्यांचें असामान्य पतिप्रेम व दृढ जीवननिष्ठा व्यक्त झाल्याशिवाय राहात नाहीं. त्यांच्या व्यक्तिमत्त्वांतील दैवी गुण या काळांत उफाळून वर आला आणि त्यांनीं सर्व सृष्टीचा खरा अर्थ याच काळांत समजावून घेतला.

आजच्या शास्त्रीय युगांत पंचेंद्रियांना गम्य अशा गोष्टींवरच फक्त विश्वास ठेवण्याची प्रवृत्ति दिसून येते. जें दिसतें, स्पर्शानें समजतें, मोजतां येतें, ज्याचें पृथक्करण करतां येतें व जड साधनांनीं ज्याची चांचणी घेतां येतें, तेवढेंच खरें असें मानणारी ही विचारसरणी आहे. या वेदनक्षम संस्कृतींत अतींद्रिय वस्तु व त्यांचा अनुभव या गोष्टींचा समावेश होऊं शकत नाहीं. म्हणून फक्त जडवादी दृष्टिकोनांतून पाहणाऱ्यांस शारदामणींच्या जीवनांत कांहीं असामान्य आढळणार नाहीं.

अलौकिकावर ज्यांचा मुळींच विश्वास नाहीं अशीं माणसें जेव्हां रामकृष्णांना समाधिअवस्थेंत पहात व त्यांच्या तोंडून जीवन-तत्त्वज्ञान ऐकत तेव्हां पूर्णपणें भारलीं जात असा अनुभव आहे. पण शारदामणींचें आध्यात्मिक जीवन व त्यांतील तेजःपुंज पैलू अशा बुद्धिवाद्यांपुढें फारसे आले नाहींत. त्यांच्या मुखावरील पडद्यानें जणूं त्यांच्या आंतरिक सौंदर्यावर एक रक्षक आवरणच घालून ठेवलें होतें.

शारदामणींचें सौजन्य, प्रेमळपणा आणि पवित्र शांति यांचा आसपासच्या मंडळींवर विलक्षण परिणाम होई. त्यांचें स्वर्गीय तेज त्यांच्या सहवासांत येणाऱ्या प्रत्येक व्यक्तीच्या मनाची तावडतोब पकड घेई. ख्रिश्चन धर्मांतील देवदूती जशी चित्रित करतात तशाच त्या भासत. त्यांचें शारीरिक सौंदर्य व ऐहिक जीवनांतील घटना अधिक काटेकोरपणानें वर्णन करतां येतील. पण या वर्णनांतून अंतरींच्या सौंदर्याचा थांग लागणार नाहीं. चैतन्याचा प्रकाश जडाच्या आधारें कसा दि·णार ?

वरवर सामान्य दिसणाऱ्या माताजींच्या जीवनांत कांहीं गोष्टी अशा होत्या कीं त्या पाहून कोणीहि स्तंभित व्हावें. त्यांना जे साक्षात्कार होत, देवाच्यासान्निध्याचें जे क्षण त्या अनुभवीत, ते पाहून देव व मानव यांच्या सहजीवनाविषयींच्या पुराणांतील कथांची आठवण होते. हे

साक्षात्कार म्हणजे फक्त वैयक्तिक आभास आहेत असें म्हणून भागत नाहीं. वैदिक कालांतील ऋषि-मुनींच्या जीवनांतील पारलौकिक अनुभवांचें लोण आजच्या बुद्धिप्रधान समाजापर्यंत येऊन पोंचलेलें पाहून आमच्या संस्कृतीच्या सातत्याची साक्ष पटते आणि शास्त्र व अनुभूति अविरोध असूं शकतात याची जाणीव होते.

माताजींच्या जीवनावरून ओझरती नजर टाकली तरी कांहीं मूलभूत विरोधी प्रवृत्तींचा समन्वय त्यांच्या व्यक्तिमत्त्वांत झालेला आढळून येतो. मानवी आयुष्यांत अनंताचें इतकें स्पष्ट पडलेलें प्रतिबिंब क्वचितच पहावयास मिळेल. आध्यात्मिक पूर्णत्वास पोंचलेली माताजींसारखी दुसरी स्त्री शोधूनहि सांपडणें कठीण !

*माताजींच्या जीवन-दर्शनानें भारतीय स्त्रीजीवनाचा आदर्श आपोआपच* उंचावला. या देशांत होऊन गेलेल्या अनेक थोर स्त्रियांहून माताजी कांहीं वेगळ्याच होत्या. कदाचित् या शतकांत सांस्कृतिकदृष्ट्या समाजाची जी घसरगुंडी सुरू झाली ती थोपवून धरण्यासाठीं शारदामणींच्या जीवितकार्याची योजना झाली असावी.

*माताजींना प्राचीन संप्रदायांतील शेवटचा दुवा म्हणाव्यात कीं नव्या युगांतील सुरुवातीचा दुवा मानाव्यात हें सांगणें अवघड आहे. जुन्या-नव्यांतील* सांधा असें त्यांना म्हटल्यास कदाचित् अधिक शोभेल. या दृष्टीनें त्यांचें जीवन एक गूढच आहे.

अशा दिव्य आणि भव्य व्यक्तिमत्त्वाची शब्दरेखा काढणें सोपें नाहीं. *तरीहि त्यांच्याबद्दलच्या उपलब्ध माहितीच्या आधारें त्यांचें शब्दचित्र काढण्याचा* प्रयत्न त्यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्तानें करण्याचें योजिलें आहे. चोखंदळ अभिरुचीस पात्र ठरण्यासाठीं या माहितीवर कोणताहि सफाईचा हात फिरविण्याचा प्रयत्न लेखकानें केलेला नाहीं.

पुढें दिलेल्या माताजींच्या शब्दचित्रावरून वाचकानीं या युगप्रवर्तक *महिलेविषयीं स्वतःची कल्पना बांधावी.*

खेड्यांतील बालपण :—शारदामणींना लाभलेलें खेडवळ वातावरण शहरी भपकेदार वातावरणाहून अगदीं भिन्न स्वरूपाचें होतें. निसर्गसौंदर्यानें

नटलेल्या पण शहरी वारे न लागलेल्या अशा बंगालमधील एका खेड्यांत यांचा जन्म झाला. हें गांव मलेरियानें पछाडलेलें असे. लोक शेती व तत्सम कष्टांवर कशीबशी गुजराण करीत. शहरांतील गगनचुंबी इमारतींशीं विरोधानें तुलना करूं पाहणाऱ्या दगडामातीनें बांधलेल्या व गवताचें छप्पर असलेल्या एक हजार झोपड्या हीच या गांवाची वसाहत. कांहीं थोडे कारागीर व उपाध्याय ब्राह्मण सोडल्यास बाकी सर्व कुटुंबांत प्रामुख्यानें शेतकी हाच व्यवसाय चाले.

धकाधकीच्या व धावपळीच्या शहरी जीवनापासून अलिप्त असलेल्या या खेड्यांतील माणसांना निसर्गाच्या सान्निध्यांत अपूर्व अशी मनःशान्ति लाभे. सृष्टिदेवीनें उधळलेल्या मनोहर रंगांवर गिरण्यांच्या धुराचें आवरण चढण्याची येथें भीति नसे. निळें निरभ्र आकाश, ऋतुमानानें फुलून बहरून येणारें सृष्टीचें विविधरंगी सौंदर्य व धान्यानें समृद्ध होऊन डोलणारीं शेतें निसर्गाची शोभा शतपटीनें वाढवीत. आसपास कोठेंहि नुसता दृष्टिक्षेप केला तरी शीणभाग नाहींसा व्हावा व मनन-चिंतनाला अनुकूल वृत्ति निर्माण व्हावी असें हें खेडें होतें.

देव आणि धर्म यांच्या अस्तित्वाची शंका घेण्याइतकी गांवच्या लोकांची बौद्धिक पातळी नसल्यानें दिवसाचा भागोटा घालविण्यासाठीं ते भजन करीत. दुखणीं, दारिद्र्य व अपघात अशा आपत्तींचें दुःख हलकें करण्यासाठीं वर्षाच्या कांठीं अनेक जत्रा, उत्सव व समारंभ साजरे केले जात. एक शेजारी दुसऱ्या शेजाऱ्याला सहानुभूति दाखवी व त्याच्या सुखदुःखांत सहभागी होई. शहरात शेजाऱ्याची तोंडओळख होण्याचीहि फारशी शक्यता नसते. तर याच्या उलट खेड्यांतील लोक एका कुटुंबांतील माणसांसारखे जगतात. " देहात हृदय व आकाशांत ईश्वर " यांवर श्रद्धा ठेवून धर्मानें आणि नीतीनें परंपरागत घालून दिलेल्या रीतिरिवाजांचें पालन करीत खेड्यांतील माणसें शतकानुशतकें समाधानी जीवन जगत असतात.

बनकूर जिल्ह्याच्या आग्नेय दिशेस वसलेली छोटी जयरामवाटी ही अशी होती. या ठिकाणीं रामचंद्र मुखोपाध्याय आपल्या पत्नीसह ( श्यामासुंदरी देवी ) रहात. त्यांची आर्थिक परिस्थिति यथातथाच होती. थोडासा

जमिनीचा तुकडा व उपाध्यायाचा व्यवसाय या दोहोंवरील मिळकतींत आपल्या तीन भावांचीं कुटुंबें रामचंद्र कशीबशीं पोशीत. असें असूनसुद्धां तीं सर्व समाधानांत होतीं. कारण त्यांच्या गरजा इतक्या मर्यादित होत्या कीं, प्रपंच भागून रामचंद्र दुसऱ्यांनाहि वेळोवेळीं थोडीफार मदत करूं शकत.

अर्थात् हें मानसिक स्वास्थ्य सदाच या कुटुंबास लाभत नसे. कांहीं वेळां रामचंद्र पैशाच्या काळजींत असत. असेच एकदां ते अस्वस्थ मन:स्थितींत असतांना त्यांना एक दैवी साक्षात्कार झाला. त्यांच्या कुटुंबांत जन्माला येणारी कन्या त्यांचें जीवन बदलून टाकणार आहे, असा दिलासा त्यांना मिळाला. थोड्याच दिवसांनीं पत्नीसहि अशाच तऱ्हेचा साक्षात्कार झाला. दोघांच्याहि अपेक्षेप्रमाणें श्यामासुंदरीस, इ. स. १८५३ मध्यें डिसेंबरच्या २२ तारखेस एक कन्यारत्न झालें. आपल्या घरीं देव जन्माला आले अशा श्रद्धेनें आईवडील या नव्या कन्येचा आदर करीत. आईवडिलांच्या प्रेमळ छायेंत व नीलमाधव नांवाच्या चुलत्याच्या विशेष लाडांत शारदा वाढत होती.

शारदेच्या मनाची ठेवण सर्वसामान्य मुलांहून फार वेगळी होती. स्वभावानें शान्त अशी ही मुलगी लहान मुलांच्या भांडणांत नेहमीं समझोता घडवून आणी. इतर मुलांची दंगामस्ती तिला कधीं आवडत नसे. तिच्या खेळांत काली आणि लक्ष्मी यांच्या मूर्ति असत. मोठ्या माणसांचें अनुकरण करून छोटी शारदा या दोन देवतांचें भजन-पूजन करी, कांहीं वेळां प्रार्थनेंत तिची इतकी तंद्री लागे कीं, घरांतील सर्व मंडळींना तिच्या या तल्लीनतेचें आश्चर्य वाटे.

वयोमानाप्रमाणें शारदेला गृहशिक्षण मिळूं लागलें. आईला घरकामांत मदत करावी, गुडघाभर पाण्यांत उभें राहून जनावरांसाठीं गवत कापून आणावें, शेतावर काम करणाऱ्यासाठीं न्याहारी घेऊन जावें आणि आईबरोबर कापूस तोडण्यास लागावें असा तिचा दिनक्रम असे. एकदां टोळधाड येऊन तिनें सर्व धान्याची नासाडी केल्यामुळें एकेक दाणा वेंचीत फिरण्याचा अनुभवहि शारदेस आला. जयरामवाटींत एक मोठा दुष्काळ पडला. त्या वेळीं शारदेच्या वडिलांनीं आपला तांदुळाचा सांठा उपाशी लोकांसाठीं खुला केला.

बारा वर्षांची शारदा अहोरात्र शिजलेल्या अन्नाचें मातेच्या वत्सल हृदयानें वांटप करीत होती.

शारदेस शालेय शिक्षण फारसें मिळालेलें नव्हतें. आपल्या भावांच्या बरोबर कांहीं दिवस ती एका प्राथमिक शाळेंत जात होती. पण तें लवकरच थांबवावें लागलें. कारण मुलींनीं नुसतें लिहायला-वाचायला शिकणें हेंहि खेड्यांतील लोकांना फारसें मानवण्यासारखें नव्हतें. पुढील आयुष्यांत मात्र आलेल्या प्रत्येक संधीचा फायदा घेऊन जेवढें शिकतां येईल तेवढें शारदा शिकली. वाचन, लेखन व गणित यांच्यापैकीं तिची मजल वाचनापर्यंत कशीबशी गेली. नंतरच्या आयुष्यांत तिनें रामायण, महाभारत वाचलें. पण स्वतःचें नांव लिहिण्याची वेळ एकदां तरी तिच्यावर आली कीं नाहीं कोण जाणें !

प्रौढपणीं शारदेचें जें अंगभूत चातुर्य व हुशारी दिसूं लागली त्यांना शाळेय शिक्षणाचा अभाव म्हणजे उपकारक पार्श्वभूमीच ठरली. घरांतील श्रद्धेचें वातावरण, गृहजीवनांतून मिळालेलें त्यागाचे व सेवेचे धडे, निसर्गाचें सतत लाभलेलें सान्निध्य आणि अधूनमधून पौराणिक कथानाटकांच्याद्वारें मनावर झालेले नैतिक संस्कार यांनीं तिच्या मनोरचनेंत जरूर त्या धार्मिक व नैतिक कल्पना उत्तम रीतीनें रुजल्या. भारतांतील खेड्यांत शालेय शिक्षणाचा अभाव असला तरी जीवनाच्या नैतिक घडणीकडे लोकांचें दुर्लक्ष होत नाहीं ही गोष्ट ध्यानांत घेण्यासारखी आहे. पूर्वायुष्यांत मिळालेल्या गृहशिक्षणाचा उपयोग समतोल व शिस्तबद्ध जीवन जगण्यास फार मोठ्या प्रमाणांत होई. नुसतें पद्धतशीर गृहशिक्षण व्यक्तिमत्वाची किती उत्कृष्ट प्रकारें घडण करूं शकतें हें शारदामणींच्या जीवनावरून सिद्ध होतें.

**एक महत्त्वपूर्ण घटना** :-विवाह ही शारदामणींच्या जीवनांतील अतिशय महत्त्वपूर्ण घटना मानली जाते. या विवाहासारखे विवाह पाश्चात्य जगाला धक्का देतील, पण भारतीय समाजाला त्यांत भयंकर असें कांहीं वाटणार नाहीं.

कोणत्याहि रूढीला चांगली व वाईट दोन्ही बाजू असतात. पति-पत्नी सुदृढ व निरोगी असतील तर मुलेंहि तशींच होतील ही गोष्ट सामान्यतः खरी, पण हीं मुलें गृहजीवन सुखी करतीलच असें मात्र निश्चित सांगतां येत नाहीं.

आदर्श गृहजीवन निर्माण करण्यासाठीं एकत्र कुटुंबसंस्थेचा पुरस्कार करतांना शारीरिक विकासाकडे हिंदी समाजाचें दुर्लक्ष झालें. निरोगी जीवनाचा परिपोष व्हावा म्हणून विवाह जरी लहानपणीं झाला, तरी पति-पत्नींचा शरीरसंबंध कौमार्यावस्थेंत पदार्पण करीपर्यंत होऊं नये असा नियम समाजानें केला. हा नियम जर कांटेकोरपणें पाळला गेला तर बालविवाहाविरुद्ध प्रकृतिदृष्ट्या मांडण्यांत येणारा मुद्दा आपोआपच फोल ठरतो. विवाहानंतर हिंदु स्त्री पतीच्या कुटुंबाची एक घटक बनते व तिची मानसिक घडण नवीन प्रकारें सुरू होते. मानसिकदृष्ट्या जितक्या लहानपणीं हें नवीन वातावरण लाभेल तितकी हीं घडण अधिक सुलभ होते. त्याग आणि सेवा यांचे धडे बाल्पणींच्या वैवाहिक जीवनांत जसे मिळतील तसे ते प्रौढ विवाहांत मिळूं शकणार नाहींत ही गोष्ट फक्त एकांगी विचारवंताखेरीज इतरांना पटण्यास कांहीं हरकत नाहीं.

शारदामणींच्या असामान्य वैवाहिक जीवनानें मानवजातीपुढें स्त्रीपुरुषसंबंधाचा एक नवाच आदर्श वास्तविक ठेवला गेला. सहा वर्षांच्या शारदेचा सुमारें २५ वर्षांच्या रामकृष्णांशीं विवाह झाला म्हणजे त्या दोघांचे नेमके कोणते संबंध निर्माण झाले याचें वर्णन करण्यास योग्य शब्द आमच्याच काय परंतु जगांतल्या कोणत्याच भाषेंत सांपडणार नाहींत. कारण विवाह व तत्सम सर्व शब्द पति-पत्नींतील लैंगिक संबंध व प्रजोत्पादनाचा प्रमुख हेतु स्पष्ट करतात. पण या दोन व्यक्तींत लैंगिक जीवनाला स्थान नाहीं. फक्त आध्यात्मिक पातळीवर घडून आलेल्या या दोन आत्म्यांचें मीलनास खरोखर ' विवाह ' या शब्दापेक्षां वेगळाच एखादा शब्द शोधून काढावयास हवा. इंग्रजींत ' प्लेटॉनिक् लव्ह ' या शब्दानें जो अर्थ प्रतीत होतो, तशाच तऱ्हेचें वैवाहिक जीवन रामकृष्ण व शारदामणी हीं दोघें जगलीं.

पण भाषेच्या दारिद्र्यामुळें शारदामणी व रामकृष्ण यांच्या संबंधास विवाह हा शब्द लावण्याखेरीज गत्यंतर नाहीं. मात्र ज्या जीवनांत दोघांनींहि आमरण ब्रह्मचर्य पाळलें असा हा लोकविलक्षण विवाह होता. ज्यानें सर्वस्वाचा त्याग केला होता अशा महादेवाशीं पार्वतीनें ज्याप्रमाणें विवाह केला त्याचप्रमाणें देवानें वेड लावलेल्या गदाधर चट्टोपाध्यायाशीं शारदेनें विवाहसंबंध जोडला. हा गदाधर म्हणजेच श्रीरामकृष्ण.

पहिली तीन वर्षें गदाधरानें दक्षिणेश्वराच्या देवळांत कालीमातेस प्रसन्न करून घेण्यासाठीं अहोरात्र साधना केली. याचा परिणाम त्याची शरीरप्रकृति संपूर्ण ढांसळण्यांत झाला. शहरी औषधोपचार व्यर्थ ठरल्यानंतर गदाधराची रवानगी कामारपुकूर येथें त्याच्या जन्मस्थानीं करण्यांत आली. येथें त्याच्या शारीरिक व्याधींना थोडाफार उतार पडला. त्याचें मन मात्र सदासर्वदा चिंतनांत व्यग्र असे. त्याच्या वृत्तींत थोडीतरी सर्वसामान्यता यावी म्हणून शेवटीं त्याचा विवाह करण्याची कल्पना त्याच्या आईनें काढली. विरोधा-ऐवजीं गदाधरानें विवाहास तावडतोब अनुकूलता दाखवितांच त्याचे मोठे बंधु रामेश्वर त्याच्यासाठीं वधूसंशोधन करूं लागले. बराच काल गेला तरी गदाधरास योग्य अशा मुलीची निवड त्यांना करतां आली नाहीं. बंधु निराश होत आहे असें पाहून गदाधरानें स्वतःच त्याला जयरामवाटीच्या रामचंद्र मुखोपाध्यांकडे जावयास सांगितलें. रामचंद्रांची शारदा हिची आपली पत्नी म्हणूनच विधात्यानें योजना केलेली आहे हें गदाधरास कसें समजलें तें एक परमेश्वरच जाणे. साधुसंतांचें सर्वच अननुभूत ! निसर्गापलीकडे त्यांची दृष्टि सहज पोंचते. ईश्वरी इच्छा त्यांना समजते. दैवी घटनांची योजना त्यांना आधींच कळल्यामुळें अशा अतर्क्य गोष्टी ते सहजासहजीं करूं शकतात.

शारदेला आपल्या जीवनाच्या सोबत्यासंबंधीं कांहीं दैवी प्रेरणा मिळाली होती कीं काय न कळे ! लहानगी शारदा आईबरोबर एका समारंभास सिहोर नांवाच्या खेड्यांत गेली असतां सहज विनोदानें तिला कोणीतरी प्रश्न विचारला, " तुला नवरा कसा हवा ? " तावडतोब तिनें तेथें हजर असलेल्या गदाधराकडे अंगुलिनिर्देश केला. कांहींतरी ' योगायोग ' असा या घटनेचा अर्थ लावण्यापेक्षां नियतीचें ज्ञान या असामान्य बालिकेस झाल्यामुळेंच तिनें आपला पति अचूक हेरला असें म्हणणें अधिक संयुक्तिक होईल.

लौकिक पद्धतीनुसार शारदा व गदाधर यांचा विवाह इ. स. १८५९ च्या मे महिन्यांत जयरामवाटीस साजरा झाला. या घटनेनें शारदेच्या सामाजिक दर्जांत कोणता व केवढा बदल घडून आला हें त्या वेळीं तिला काय कळणार ! तिच्या आंतरिक जीवनाचें एक महान् दालन या घटनेनें खोललें जाणार होतें. विवाहविधि पार पडल्यानंतर पुन्हां शारदेचा जीवनौघ पूर्वीप्रमाणें आईवडिलांच्या छत्राखालीं संथपणें वाहूं लागला.

**मळलेल्या वाटेपलीकडे** :–विवाहानंतरच्या शारदादेवींच्या जीवनांत अनेक अद्‌भुत घटना सामावलेल्या आहेत. ओढ आणि अपेक्षा यांचें दुःख, काळजी निर्माण करणारे गैरसमज व त्यांचें आनंददायी निराकरण, संकटें आणि त्यांचा सुखद शेवट अशा अनेक तीव्र भावनायुक्त आंदोलनांमुळें शारदा-देवींचें आयुष्य म्हणजे एक सुरसरम्य कथाच बनली आहे. डिसेंबर १८६० मध्यें कामारपुकूर येथें पतिसहवासांत व्यतीत केलेला थोडासा काल सोडला तर वयाच्या चौदाव्या वर्षापर्यंत ती आईवडिलांच्याकडेच होती. त्या वेळच्या रूढीनुसार शारदेस सातवें वर्ष पूर्ण झाल्यावर गदाधराला सासुरवाडीस जाऊन तिला कांहीं काल कामारपुकूरला आणावें लागलें. ता जयरामवाटीला जातांच कोणीहि न सांगतां शारदेनें पतीचे पाय धुऊन ती त्याला वारा घालतांना पाहून घरांतील सर्व मंडळी चकित झाली. ज्याच्या पारलौकिक जीवनांत तिचें पुढील जीवन पूर्णपणें मिसळून गेलें त्याची सेवा करण्याची प्रवृत्ति तिच्यांत स्वयंस्फूर्त होती यांत आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं.

सात वर्षांचा अवधि गेल्यानंतर तिची व पतीची पुन्हां भेट झाली. या वेळीं शारदा चवदा वर्षांची झाली होती. वैवाहिक जीवनाची तिची कल्पना आतां साकारली होती. गदाधरहि दीर्घकालानंतर कामारपुकूरला आला होता. या वेळीं तो पूर्वीचा गदाधर राहिलेला नव्हता. ज्यानें ऐहिक जीवनांतून पूर्ण निवृत्ति प्राप्त करून घेतली आहे असा तो एक संन्यासी बनला होता. त्यानें पूर्वीचें नांवहि बदलून टाकलें होतें.

इ. स. १८६० मध्यें दक्षिणेश्वरास आल्यावर गदाधराला अनेक महंत भेटले व कांहींच्या सहवासांत त्याला पद्धतशीर योगसाधना करण्याची संधि मिळाली. त्यानें सतत केलेल्या सत्यशोधनास यश मिळालें. अनंताशीं एकरूप होण्याची योग्यता त्याच्या अंगीं आतां आलेली होती. नांवासकट संसाराचीं सर्व बंधनें तोडून त्यानें श्रीरामकृष्ण परमहंस हें नवीन नांव धारण केलें. इ. स. १८६६ पर्यंत रामकृष्णांनीं आध्यात्मिक पूर्णता प्राप्त करून घेतली. आतां त्यांना अंतर्बाह्य फक्त ईश्वर भरून राहिलेला दिसे. मूळ स्वरूपांतील ईश्वरापासून सृष्टींतील निर्मितींतून प्रतीत होणाऱ्या त्याच्या स्वरूपा-पर्यंतचें ज्ञान करून घेण्याइतकी त्यांच्या बुद्धीस पात्रता आलेली होती. मानव्याची सेवा व प्रेम हे आदर्श महाकालीच्या प्रेरणेनें त्यांनीं निश्चित केले होते.

साधनेच्या या काळांत गदाधराविषयीं अनेक विपर्यस्त बातम्या कामारपुकूरपर्यंत येऊन पोंचल्या होत्या. अतिशय आदरणीय व त्याचप्रमाणें अतिशय गलिच्छ वार्ता जयरामबार्टीतल्या गल्लीगल्लींतहि प्रसृत झाल्या होत्या. रामकृष्ण एक फार उच्च दर्जाचे महंत बनले आहेत असें कांहीं लोक सांगत, तर बरेचसे त्यांना वेड लागलें आहे असें समजत. अनेक गोष्टी शारदेच्या कानांवर आदळत. रस्त्यानें ती जाऊं लागली कीं, "वेड्याशीं लग्न झालेली हीच ती श्यामाची मुलगी शारदा !" असें बायका आपापसांत कुजबुजत.

सात वर्षांपूर्वी तिच्या बालमनावर कोरलेली पतीची मूर्ति तिच्या डोळ्यासमोर उभी राही. तिची खात्री नव्हती, पण गदाधराला वेड लागलें यावर तिचा विश्वास बसेना. "तो संन्यासी झाला असला तर आतां माझा पत्नी म्हणून कसा स्वीकार करील ?" अशा प्रकारच्या अनेक शंकाकुशंकांनीं शारदा व्याकूळ होई. याच मनःस्थितींत इ. स. १८६७ च्या जूनमध्यें ती पतीकडे गेली.

रामकृष्णांच्या भेटीनंतर तिला पूर्ण मनःस्वास्थ्य लाभलें. संन्यासी झालेले असूनहि त्यांनीं तिला आदरानें व प्रेमानें वागविलें. जगाच्या अंतिम सत्याचा उलगडा कसा करावा हें ती आतां त्यांच्याकडे शिकूं लागली. साधना करीत असतांना भोंवतालच्या सृष्टीविषयीं आपली भावना कशी असावी हेंहि तिला कळूं लागलें.

एका ज्योतीनें दुसरी ज्योत प्रज्वलित व्हावी त्याप्रमाणें शारदेचें झालें. रामकृष्णांच्या परिसानें तिच्या जीवनाचें सोनें झालें. तिला एका परम शान्तीचा अनुभव पतीच्या सान्निध्यांत येऊं लागला. सुमारें वर्षभरानें रामकृष्ण परत दक्षिणेश्वराला गेले व शारदामणी जयरामबाटीस गेल्या. जयरामबाटींत पतीबद्दल कोणतीहि वार्ता कळूं नये अशा स्थितींत वर्षानुवर्षे कंठीत असतांनासुद्धां तिची मानसिक शान्ति कधीं ढळली नाहीं. आसपासच्या बायका रामकृष्णांबद्दल नाहीं नाहीं ते प्रश्न विचारून तिला पूर्वीप्रमाणें सतावीत. पौराणिक कथेंतील जटिला व कुटिला ज्याप्रमाणें राधेला छळीत, त्याचप्रमाणें जयरामबाटींतल्या बायका शारदेची स्थिति करून सोडीत. पण विरहापूर्वीच्या

रामकृष्णांच्या शेवटच्या भेटीची स्मृति इतकी ठळकपणें तिच्या मनावर कोरली गेली होती कीं तिच्या आधारावर हा सर्व छळ ती सहज सोशी. कोणताहि अपशब्द कानीं येऊं नये म्हणून ती सहसा घराबाहेर पडत नसे.

दिवसेंदिवस पतीचा विरह शारदेस असह्य होऊं लागला. राधेपासून द्वारकेचा कृष्ण जितका दूर तितकेच रामकृष्णाहि आपल्यापासून दूर आहेत असें तिला वाटूं लागलें. राधा जशी कृष्णासाठीं झुरे, तशीच तीहि रामकृष्णांच्या भेटीसाठीं झुरूं लागली. पण त्यांच्याकडून कांहीं वार्ता मिळेना. दक्षिणेश्वरीं जाऊन पतीच्या सान्निध्यांत व सेवेंत उरलेलें आयुष्य वेंचण्याचा बेत ती मनांत कायम करीत होती.

शारदेस हवी असलेली संधि इ. स. १८७२ च्या मार्चमध्यें मिळाली. जयरामवाटींतील कांहीं मंडळी गंगास्नान करण्यासाठीं कलकत्त्यास जावयास निघाली. त्यांच्याबरोबर तिनें जाण्याची तयारी केली. वडिलांनीं तिची मनीषा ओळखून तिला यात्रेकरूंबरोबर जाण्याची अनुज्ञा दिली. ठरलेल्या वेळीं ही सर्व मंडळी निघाली. त्या वेळीं स्वस्त असें कोणतेंहि प्रवासाचें साधन उपलब्ध नसल्यामुळें हा साठ मैलांचा प्रवास त्यांना पायींच करावयाचा होता. इतक्या चालीची संवय नसल्यामुळें २--३ दिवसांनंतर शारदा मलेरियानें आजारी झाली. इतर मंडळी पुढें मार्गस्थ झाली व शारदेच्या वडिलांनीं एका धर्मशाळेंत तिला बरें वाटेतों मुक्काम केला.

पतीच्या भेटींत या दुखण्यानें अडथळा येणार या कल्पनेनें शारदा फार दुःखी झाली. रात्रीं झोपेंत शारदेच्या उशाशीं एक सांवळ्या रंगाची अतिशय तेजस्वी स्त्री येऊन बसलेली तिला दिसली. तिच्या शीतल स्पर्शानें शारदेला एकदम आराम वाटूं लागला. " ही स्त्री कोण असावी " हें कळण्याची तिला अतिशय उत्कंठा वाटून तिनें प्रश्न केला, " आपण कोठून आलांत ? " " दक्षिणेश्वराहून " ती स्त्री उत्तरली. हें नाव ऐकतांच शारदेचें औत्सुक्य आणखी वाढलें. ती पुन्हां म्हणाली, " मीहि माझ्या पतीला भेटण्यासाठीं तिकडेच निघालें आहे. पण या दुखण्यानें माझा नाइलाज झाला आहे." यावर समजावणीच्या स्वरांत ती स्त्री म्हणाली, " माझ्या रक्षणाखालीं सुखरूप असलेल्या तुझ्या पतीला तूं लवकरच भेटशील ! " हें ऐकून शारदा आनंदली.

या मोहक व अनोळखी स्त्रीला आपल्याबद्दल इतकी सहानुभूति कां वाटावी हें तिला समजेना. तिनें आश्चर्यानें विचारलें, " आपलें व माझें नातें आहे का ? " चटकन् तिला उत्तर मिळालें, " मी तुझी वहीण. " एवढें संभाषण झाल्यावर शारदेस झोंप लागली.

दक्षिणेश्वरची देवी कालीमाताच शारदेचें दुःख निवारण्यासाठीं आली असेल का ? वरील सर्व वर्णनावरून हाच तर्क खरा ठरतो. अशा तऱ्हेचीं दृश्यें तिला लहानपणींहि दिसत. खोल पाण्यांत जाऊन ती जेव्हां गवत कापूं लागे तेव्हां एक तिच्याच वयाची अनोळखी मुलगी तिला मदत करतांना शारदा नेहमीं पाही. लग्नानंतर ती जेव्हां कामारपुकूरला प्रथम आली तेव्हां तळ्यावर एकटी स्नानास जाण्याची तिला भीति वाटे. या वेळीं तिच्याच वयाच्या आठ मुली कोठून तरी येत व तीं परतलीं कीं निघून जात. अनुभूतीच्या पातळीवर पोंचल्याखेरीज या दृश्यांच्या सत्यतेची चर्चा करतां येणार नाहीं. वासनांचा त्याग केलेल्या निर्मळ मनाला येणारे हे अनुभव शंभर टक्के असत्य आहेत असा निर्वाळा देणें धाष्टर्याचें होईल.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठल्यावर शारदेस विलक्षण हुशारी वाटूं लागलेली पाहून तिच्या पित्यास आनंद झाला. क्षणाचाहि वेळ न गमावतां त्यांनीं आपली वाटचाल सुरूं केली. भाड्याची पालखी घेऊन जाणारीं माणसें त्यांना थोड्या अंतरावर भेटलीं. तींत शारदेस बसवून त्यांनीं पुढें प्रवास चालू केला. रात्रीं नऊच्या सुमारास तीं दोघें दक्षिणेश्वरास येऊन पोंचलीं.

धरधरत्या अंतःकरणानें शारदा दक्षिणेश्वराच्या मंदिरांत शिरली. सुमारें चार वर्षें रामकृष्णांना आपल्या पत्नीच्या अस्तित्वाचाहि जणूं विसर पडला होता. परमेश्वराशीं एकरूप झालेल्या या भक्ताच्या जीवनांत अजूनहि प्रेमळ पत्नीस स्थान होतें का ? चार वर्षांपूर्वी कामारपुकूर येथील शारदामणींच्या सहवासांत त्यांनीं जो जिव्हाळा दाखविला, तो आतां नाहींसा झाला होता का ? दक्षिणेश्वराच्या वाटेवर तिला जो अनुभव आला त्यावरून पतीच्या भावनांबद्दल तिला थोडी आशा वाटूं लागली होती. तिच्या मनांतील निराशेच्या मेघांना हीच एक रुपेरी कडा दिसत होती. या संभ्रमावस्थेंत ती पतीच्या सन्निध येऊन ठेपली. रामकृष्णांनीं केलेल्या हार्दिक स्वागतानें तिच्या

सर्व शंकाकुशंका पार नाहींशा झाल्या. सर्व जगापासून अलिप्त वृत्तीनें जो एकाकी चिंतनमग्न जीवन जगत होता त्याच्या हृदयांत तिच्याबद्दल अजूनहि प्रेम आहे हें दिसतांच तिचें मन आनंदानें फुलून गेलें.

दक्षिणेश्वराच्या मंदिरांत शारदेनें प्रवेश केला ती वेळ शुभदायक आहे कीं नाहीं हें रामकृष्णांनीं प्रथम पाहिलें. या शुभमुहूर्ताची खात्री पटतांच स्वत:च्या दीर्घ मौनाबद्दल कांहीं बोलण्याऐवजीं शारदेनें त्यांच्या भेटीस इतका विलंब कां केला असा त्यांनीं तिला प्रश्न केला व ते पुढें म्हणाले, " मथूरबाबू (देवळांतील जुने उपाध्याय) असते तर त्यांनीं तुझी उत्तम व्यवस्था ठेवली असती. पण आतां तशी व्यवस्था कोण करणार ? " हें ऐकून पतिभेटीस विलंब केल्याबद्दल तिला वाईट वाटलें. या असामान्य पतिपत्नींत सात्त्विक प्रेमाचा जो लपंडाव चालू होता त्याचें वर्णन करण्यास शब्द अपुरे पडतील. या स्वर्गीय प्रेमांत न्हाऊन पतीच्या आत्म्याशीं एकरूप होण्याची शारदादेवींची तळमळहि अपूर्व आणि अतुलनीय म्हणावी लागेल.

आदल्या दिवसापर्यंत शारदेला आलेल्या तापामुळें ती फार अशक्त झालेली पाहून रामकृष्णांनीं प्रथम त्यांच्या स्वत:च्या खोलींत तिच्या औषधपाण्याची व विश्रांतीची व्यवस्था केली. तिच्या शुश्रूषेसाठीं एका स्वतंत्र सेविकेची योजना करण्यांत आली. सुमारें चार पांच दिवसांत तिला चांगलें बरें वाटूं लागल्यावर देवळांतील संगीतशाळेच्या शिखर-निवासांत रामकृष्णांच्या आईकडे त्यांनीं शारदेची राहण्याची व्यवस्था केली.

दक्षिणेश्वरास रहावयास आल्यावर थोड्या दिवसानंतरची गोष्ट. रामकृष्णांनीं आपल्या एकोणीस वर्षांच्या पत्नीस विचारलें, " ईश्वरचिंतनापासून माझें मन विचलित करून मला पुन्हा संसारांत ओढण्यासाठीं तूं येथें आली आहेस का ?" तत्परतेनें शारदेनें उत्तर दिलें, " मुळींच नाहीं. आपलें परमार्थसाधन अधिक तन्मयतेनें व्हावें म्हणून आपली सर्वतोपरी काळजी घेण्यासाठीं व सेवा करण्यासाठीं मी आलें आहे." ऐन तारुण्यांत दीर्घ कालावधीनंतर पतीची प्रथम भेट होतांच शारदेनें दिलेलें हें उत्तर किती असामान्य आहे हें वाचकांस सहज समजून येईल. या उत्तरांत नुसती क्षणैक भावना नव्हती. दिलेल्या शब्द पतीच्या मरणापर्यंत तिनें पाळला. पुढें एकदां आपल्या शिष्यांशीं

बोलत असतांना रामकृष्णांनीं अशी स्पष्ट कबुली दिली कीं, पत्नीनें जर त्यांना कामुक जीवनाकडे ओढण्यासाठीं धडपड केली असती, तर त्यांची साधना कदाचित् वर्षाच्या तुटलेल्या शिलाखंडाप्रमाणें मातीला मिळाली असती. शारदेच्या स्फटिकवत् शुद्ध अंतःकरणांत सामान्य वासनांना व भावनांना कधीं स्थानच मिळालें नाहीं. साधनेंत पतीशीं बरोबरी करावी अशाच वृत्तीची ती असल्यामुळें, वैवाहिक जीवनाचा एक निराळाच आदर्श तिनें जगापुढें उभा केला. दोन आत्म्यांचें हें आध्यात्मिक पातळीवरील एकीकरण आजच्या सुधारलेल्या समाजाला एखाद्या ध्रुवताऱ्याप्रमाणें पारलौकिक जीवनाची वाट दाखवील.

**अलौकिक जीवनाची वाटचाल** :– मार्च १८७२ पासून सुमारें एक-दीड वर्ष शारदेनें पतीच्या स्फूर्तिदायक सहवासांत घालविलें. यांपैकीं आठ महिने तिला रात्रंदिवस पतीचें सान्निध्य लाभलें. पतीच्या बिछान्याच्या एका टोंकाशीं बसून दिव्यत्वाशीं एकरूप झालेल्या चिंतनमग्न पतीकडे ती तासन् तास टक लावून पहात राही. एका निराळ्याच जगांत वावरणाऱ्या रामकृष्णांची कांहीं वेळा समाधि लगे. ऐहिकाची अशा वेळीं त्यांना जाणीवहि रहात नसे. अनंताशीं एकरूप झाल्याचा हा अनुभव त्यांचा चेहरा एका विशेष तेजानें उजळून काढी. अशा रीतीनें साधनेच्या परमोच्च स्थितीचें दर्शन प्रत्येक रात्रीं आपल्या शिष्येला ( पत्नीला ) घडवून त्यांनीं तिला विचार, चिंतन व सत्तत्त्वाशीं एकरूप होण्याचे धडेच दिले असें म्हणतां येईल. प्रथम प्रथम चाह्यात्कारी विचित्र वाटणाऱ्या रामकृष्णांच्या वर्तनानें शारदामणी आश्चर्यचकित होत. विशेषतः कांहीं वेळां त्यांची सर्व हालचाल बंद होऊन ते एखाद्या निर्जीव ठोकळ्याप्रमाणें भासूं लागत. तें पाहून शारदामणी भयभीत होऊन हृदयला ( रामकृष्णांच्या मोठ्या बहिणीचा मुलगा ) हाक मारीत. तो येऊन त्यांच्या कानाशीं कांहीं मंत्र म्हणे व तो ऐकून रामकृष्ण पुन्हां भानावर आले कीं त्यांना हायसे वाटे. हळूहळू रामकृष्णानीं तिलाच हे सर्व मंत्र शिकविले व त्यामुळें रामकृष्णांना कोणत्याहि वेळीं समाधि लागली अगर त्यांची ऐहिक जगाची शुद्ध हरपली कीं शारदामणी त्या मंत्रांचा उपयोग करून त्यांना शुद्धीवर आणीत. रामकृष्णांची ऐहिक जाणीव नष्ट होऊन त्यांना केव्हां समाधि लागेल याचा कांहीं नियम नसे. म्हणून रात्रभर त्यांच्यावर लक्ष ठेवण्याची कामगिरी शारदामणींना करावी लागे. हें आलोचन जागरण त्यांनीं आठ महिने

केलें. नंतर पतीच्या सूचनेवरून त्यांची निजण्याची जागा संगीत शाळेंत हालविण्यांत आली.

एकत्र सहवासाच्या या आठ महिन्यांच्या अवधींत वासना-नियंत्रणाची दोघांचीहि परीक्षा झाली व तीं दोघेंहि असामान्य पातळीवरचीं दैवी माणसें आहेत हें पुरेपूर सिद्ध झालें. भावनानिरोध हा शब्द त्यांच्या वृत्तीस लावण्यापेक्षां साधनेनें त्यांच्या वृत्तींचें संपूर्ण उदात्तीकरण झालेलें होतें असें म्हणणें अधिक सयुक्तिक ठरेल. शारीरिक पातळीवरील जीवन विसरून ज्यांना आत्मिक पातळीवर जगतां येऊं लागतें त्यांच्या मनांत सामान्य भावनांना स्थानच उरत नाहीं. पतीची समाधि-अवस्था अनेक वेळां प्रत्यक्ष पाहिल्यानंतर शारदामणीहि हळूहळू वरच्या पातळीवर जाऊं लागल्या. अनंताशीं एकरूप होण्याची त्यांनाहि ओढ वाटूं लागली. सामान्य शारीरिक सुखांचा त्यांना केव्हांच विसर पडला. आठ महिन्यांत साधनेचे पहिले धडे त्यांना पतीकडून मिळाले. ते पक्के करून गांठलेल्या शिखरावरून खालीं न घसरणें व आपल्या गुरूची ( पतीची ) मनोभावें सेवा करणें एवढेंच ध्येय त्यांच्या आयुष्यांत आतां उरलें होतें.

पति आणि पत्नी हें नातें एका अर्थी संपून शारदामणी रामकृष्णांच्या पट्टशिष्या बनल्या. या सिद्ध पुरुषाच्या पत्नीनें त्यांच्या सन्निध आल्यापासूनच कडक ब्रह्मचर्याचें व्रत घेतलें, इतकेंच नव्हे तर पतीइतकीच निवृत्ति आयुष्यांत त्यांनींहि आपल्या अंगीं बाणविली. त्याचे दोघांचे संबंध कळण्यासाठीं आणखीहि कांहीं गोष्टी समजावून घ्याव्या लागतील. नित्याप्रमाणें श्रीरामकृष्णांचे पाय चेपीत असतांना एकदां शारदामणींनीं त्यांना विचारलें, " माझ्याबद्दल आपल्याला काय वाटतें ? " पटकन् रामकृष्णांनीं उत्तर दिलें, " देवळांतील कालीमाता, मला जन्म देणारी माझी माता व आतां माझें पादसेवन करणारी शारदामणी या सर्व एकाच महामातेच्या निरनिराळ्या प्रतिमा आहेत, असें मला वाटतें. " पत्नीच्या, सेविकेच्या आणि शिष्येच्या अशा प्रत्येक भूमिकेंतून त्यांचें पवित्र व दैवी तेज कसें प्रतीत होई याची रामकृष्णांना पूर्ण कल्पना आलेली होती. दोन भिन्न लिंगी जीवांची येवढी ही एकरूपता ! हृदयनें एकदां खोडसाळपणें शारदामणींना विचारलें, " तूं मामांना वडिलांप्रमाणें कां संबोधत नाहीस ? " तिनें उत्तर दिलें, " ते माझे फक्त वडीलच नाहींत

तर आई, वडील, मित्र सर्व कांहीं आहेत." आणि खरोखरच देवळांतल्या कालीमातेवर तिनें जसा भरंवसा टाकला होता तेवढाच विश्वास, तितकीच श्रद्धा आपल्या पतीविषयीं तिच्या मनांत वसत होती. अशा रीतीनें रामकृष्ण व शारदामणी यांचें एकमेकांविषयींचें प्रेम वासनारहित व स्वर्गीय होतें. दोघेहि एकमेकांना महामातेचीं रूपें समजत. अनुभूतीची पातळी सारखीच असल्यामुळें दोघांनाहि एकमेकांच्या आध्यात्मिक जीवनाची पूर्ण जाणीव होती. ही जाणीव फक्त बुद्धिवादी नव्हती, तर त्या उभयतांना विश्वाचें व त्यामागील शक्तीचें जें प्रत्यक्ष दर्शन घडलें होतें त्या अनुभवांतून त्यांची अंतःप्रेरणा चेोल्त होती. "इंद्रियांच्या पलीकडे गेल्यानंतर जें ज्ञानाचें कवाड उघडतें त्यांतून आंत गेल्यावर ज्या ज्ञानसाधनाची प्राप्ति होते ती अंतःप्रेरणा" अशीच रामकृष्णांनीं या प्रेरणेची व्याख्या केली आहे. श्रद्धेच्या आणि साक्षात्काराच्या सामर्थ्यानें त्यांना विश्वरूपाचें जें ज्ञान प्राप्त झालेलें होतें त्याच्या आधारावरच ते "शारदामणी म्हणजेच कालीमाता" असें ठासून सांगूं शकले.

दक्षिणेश्वरास आल्यावर पौर्णिमेच्या शुभदिनीं रामकृष्णांनीं एक खास आसन तयार करून त्यावर शारदामणींना बसावयास सांगितलें आणि त्यांची मनोभावें समंत्रक षोडशी पूजा केली. पूजा सुरू होतांच शारदामणींची शारीरिक पातळीवरील जाणीव कमी कमी होऊं लागली. पूजा संपतांना दोघेहि पूर्ण समाधिसुखांत विलीन झालीं. शरीराची जाणीवच नाहींशी झाल्यानें दोघांना या वेळीं आत्मिक एकत्वाचा प्रत्यय आला. रात्रीच्या तिसऱ्या प्रहरानंतर तीं दोघें पुन्हां ऐहिक पातळीवर उतरलीं. एका देहाकृति कालीमातेची आपण पूजा करीत आहोंत ही कल्पना जागृत होतांच त्यांनीं साष्टांग नमस्कार घालून शारदामणींच्या पायाशीं आपली सर्व पुण्याई अर्पण केली. नंतर त्यांनीं आपली जपमाळहि त्यांच्या चरणीं वाहिली. शेवटची प्रार्थना म्हटल्यानंतर हा विधि समाप्त झाला. अशा प्रकारें ज्या ईश्वरसाधनेची सुरुवात रामकृष्णांनीं सुमारें बारा वर्षांपूर्वीं केली तिची सांगता पवित्र माताजींच्या पूजनानें झाली.

ज्या रामकृष्णांच्या भक्तींत दक्षिणेश्वराच्या दगडी मूर्तींत चेतना ओतण्याचें सामर्थ्य होतें त्या रामकृष्णांची पूजा व भक्ति आपल्या ठिकाणी

केन्द्रित करून घेणाऱ्या शारदेचें दैवी सामर्थ्य केवढें मोठें असेल याची सामान्य वाचकांस कल्पना करणेंहि कठीण आहे. शारदामणी दोन भूमिका करतात. एक प्रत्यक्ष कालीमातेची. या भूमिकेंत रामकृष्ण त्यांचें शिष्यत्व पत्करतात. दुसरी रामकृष्णांच्या पत्नीची. यांत त्या रामकृष्णांच्या शिष्या बनतात. एका अर्थी तीं दोघेंहि त्या विश्वशक्तीचीं रूपें भासतात. सर्वच अद्भुत ! सर्वच गूढ ! जों जों या दोघांच्या जीवनांत अधिक खोल जावें तों तों जास्तच गोंधळांत पडल्यासारखें वाटतें.

नुसत्या बुद्धिवादी भूमिकेवरून विचार केला तरी या जोडप्यासारखें दुसरें जोडपें सांपडणें अशक्य आहे. जगांतल्या कोणत्याहि धर्मोपदेशकानें आपल्या शिष्येची अशी पूजा व उपासना केलेली नाहीं. पण हें प्रत्यक्ष घडलें, अगदीं आपल्या डोळ्यांसमोर गेल्या शतकांतच घडून आलें. आध्यात्मिक जीवनांत वृत्ति नियंत्रित करण्याची केवढी महती आहे हीहि गोष्ट रामकृष्णांनीं आपल्या जीवनानें सिद्ध करून दिली. ज्याला आध्यात्मिक उन्नति साधावयाची आहे त्यानें 'स्त्री-पुरुष' या भेदाच्या पलीकडे जाणें किती अगत्याचें आहे हा आणखी एक नवीन धडा रामकृष्णांपासून शिकावा लागेल. एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या सत्तर वर्षांत होऊन गेलेल्या या विभूतीनें भारतीय समाजांत मातेची थोरवी काय आहे हें पुन्हां एकदां जगास सिद्ध करून दिलें.

**आध्यात्मिक पूर्णतेवर प्रकाश पाडणाऱ्या कांहीं घटना** :—साधनेच्या अग्निदिव्यांतून बाहेर पडल्यानंतर इ. स. १८७२ च्या आक्टोबरमध्यें शारदादेवी कामारपुकूरला आल्या. कांहीं दिवसांनीं रामकृष्णांचा दुसऱ्या नंबरचा भाऊ रामेश्वर व त्याच्या मागोमाग शारदादेवींचे वडील रामचंद्र हीं दोघें कालवश झालीं. इ. स. १८७४ मध्यें त्या पुन्हां दक्षिणेश्वरास आल्या. या वेळीं त्यांचा मुक्काम सुमारें दीड वर्ष होता. रामकृष्णांचा एक शिष्य शंभूचरण मल्लिक यानें बांधलेल्या छोट्याशा बंगलींत शारदादेवींचें वास्तव्य असे. त्यांना मदत व सोबत म्हणून एका सेविकेची योजना करण्यांत आली होती.

दक्षिणेश्वरास आल्यावर वर्षभरांत त्यांना अतिशय तीव्र स्वरूपाची आव झाली. शंभूबाबूंनीं काळजीपूर्वक केलेल्या औषधोपचारांनीं त्यांना जरा बरें

वाटूं लागल्यावर हवापालट करण्यासाठीं त्या जयरामवातीस गेल्या. दुर्दैवानें येथें येतांच त्यांच्या दुखण्यानें उलट खाल्ली. कोणत्याच औषधानें गुण वाटेना. तेव्हां शारदादेवी गांवच्या सिंहवाहिनी देवीच्या देवळांत गेल्या व साष्टांग नमस्कार करून त्यांनीं आमरणान्त उपोषणास आरंभ केला. देवीनें दर्शन देऊन उपचार सांगितला व तो केल्यावर शारदादेवी पूर्ण बऱ्या झाल्या. या दैवी चमत्काराची कथा आसमंतात पसरून सिंहवाहिनीच्या मंदिराकडे दुःखी-कष्टी लोकांची रीघ लागूं लागली. आजार आला कीं सिंहवाहिनीला आवाहन करण्याची प्रथा आजतागायत तेथें रूढ झालेली आहे.

इ. स. १८७६ च्या फेब्रुवारींत रामकृष्णांच्या सान्निध्यांत रहात असलेली त्यांची मातोश्री चंद्रादेवी दक्षिणेश्वरास निवर्तली. शारदादेवींचें हें सर्व वर्ष दुखण्यांतच गेलें. खेडेगांवीं वैद्याच्या उपचारांनींच त्यांना बरें वाटूं लागलें. जानेवारी महिन्यांत त्या दक्षिणेश्वरास परतल्या. प्रथम त्यांचा मुक्काम शंभूबाबूंच्या घरांत होता. पण रामकृष्णांना आंवेची गंभीर व्यथा जडल्यानें त्यांच्या शुश्रूषेसाठीं त्या देवळांतील नगारखान्यांत रहावयास आल्या. रामकृष्ण आजारी असतांना बनारसहून एक अनोळखी वयस्क स्त्री तेथें आली व ती शारदामणींना रामकृष्णांच्या शुश्रूषेंत मदत करूं लागली. तिच्याच सल्ल्यानें शारदामणींनीं एकदां जें आपलें निवासस्थान नगारखान्यांत हलविलें तें परत कधींच बदललें नाहीं.

इ. स. १८८१ च्या फेब्रुवारी महिन्यांत त्या चौथ्यांदा दक्षिणेश्वरास आल्या. या वेळीं त्यांचें वास्तव्य सुखकर झालें नाहीं. त्यांच्या बरोबर त्यांची आई आणि इतर नातेवाईक मंडळी आली होती. पण हृदयबाबूंच्या उद्दाम वर्तनामुळें तीं सर्वजण दुखावलीं गेलीं व आल्या दिवशींच त्यांना परत जावें लागलें. कालीमातेची योजना रामकृष्ण मुकाट्यानें अवलोकन करीत होते. सुमारें सहा महिन्यांनीं हृदयला मंदिराच्या व्यवस्थापकांनीं तेथून हांकलून लावलें. हृदय गेल्यानंतर रामकृष्णांच्या सेवेस कोणीच राहिलें नाहीं म्हणून त्यांनीं जयरामबातीस शारदादेवींना येण्याबद्दल निरोप पाठविला. त्यांची करुणास्पद अवस्था पाहून फेब्रुवारी १८८२ त शारदामणी दक्षिणेश्वरास येऊन हजर झाल्या.

या वेळींहि त्या सुमारें दीड वर्ष दक्षिणेश्वरास राहून नंतर सहा महिने जयरामवाटीस गेल्या. इ. स. १८८४ च्या जानेवारींत परत रामकृष्णांकडे थोडे दिवस राहिल्यानंतर कामारपुकूरच्या एका नातेवाइकाच्या लग्नासाठीं त्यांना जावें लागलें. जानेवारी १८८५ पासून मात्र त्या शेवटपर्यंत रामकृष्णांजवळच होत्या. रामकृष्णांचें निर्वाण इ. स. १८८६ च्या ऑगस्ट महिन्यांत झालें. इ. स. १८७२ ते १८८६ या चौदा वर्षांच्या कालांत जवळजवळ प्रत्येक वर्षी त्यांना जयरामवाटीस जावें लागे.

शारदामणींच्या माहेरीं घडलेली एक घटना उल्लेखनीय आहे. रामचंद्रांच्या मृत्यूनंतर सर्व कुटुंबाच्या पोषणाची अतिशय अवघड कामगिरी त्यांच्या पत्नीवर येऊन पडली. पराकाष्ठेच्या प्रयत्नांनीं व शारदामणींच्या सहकार्यानें तिनें थोड्याच वर्षांत कुटुंबाची घडी पुन्हां नीट बसविली. जगद्धात्रीच्या वार्षिक पूजेनंतर या कुटुंबाचे ग्रह अनुकूल होऊं लागले.

गांवच्या कालीपूजेसाठीं श्यामासुंदरी देवीनें तांदुळाचा कांहीं सांठा बाजूला राखून ठेवला होता. पण प्रत्यक्ष पूजेच्या वेळीं पुजाऱ्यांनीं तिजकडून तांदूळ घेण्याचें नाकारलें. श्यामासुंदरीला अतिशय दुःख झालें. ती सर्व रात्र तिनें रडून काढली. त्या रात्रीं देवीनें स्वतः प्रगट होऊन तिचें सान्त्वन केलें आणि सांगितलें, " दुःखी होऊं नकोस. कालीच्या उत्सवानंतर थोड्याच दिवसांनीं माझा उत्सव असतो. त्या वेळीं या तांदुळाचा तूं उपयोग कर. " देवीच्या चेहऱ्यावरून श्यामासुंदरीस जगद्धात्रीची ओळख पटली आणि देवीच्या सूचनेनुसार तिनें त्याच वर्षापासून जगद्धात्रीचा उत्सव सुरू केला.

दुसऱ्या वर्षी उत्सवाचे दिवस जवळ येतांच श्यामसुंदरीनें उत्सवासाठीं कांहीं मदत देण्यास शारदादेवींना सांगितलें. त्या म्हणाल्या, " गेल्या वर्षी उत्सव झाला, आता यंदा परत कशासाठीं उत्सव करतेस ? " त्या रात्रीं जगद्धात्री तिच्या दोन सख्या जया व विजया यांच्यासह शारदादेवींच्या स्वप्नांत आली. तिनें विचारलें, " उत्सवास तूं प्रतिकूल आहेस याचा अर्थ आम्ही येथून जावें असाच होत नाहीं का ? " शारदादेवी तत्परतेनें उत्तरल्या, " छे ! छे ! ! माताजी, आपण जावें असं मी कसं म्हणेन ? आपण येथेंच रहावें. " यानंतर आदल्या वर्षाप्रमाणें मोठ्या थाटानें जगद्धात्रीचा उत्सव साजरा करण्यांत आला.

शारदादेवी दरवर्षी उत्सवाच्या वेळीं भांडीं स्वच्छ करण्याची कामगिरी स्वतः करीत. रामकृष्णांचे शिष्य स्वामी योगानंद यांनीं उत्सवाच्या वेळीं वापरण्यासाठीं म्हणून लांकडी भांड्यांचा एक संच देऊं केला. देवीच्या उत्सवाप्रीत्यर्थ होणाऱ्या खर्चाची तरतूद करण्यासाठीं नंतर थोडी शेतीहि खरीदण्यांत आली.

जयरामवाटी ते दक्षिणेश्वर या प्रवासांतहि अशीच एक आश्चर्यकारक घटना एकदां घडली. या वाटेवर मध्येंच कांहीं भागांत दाट अरण्य आहे. तेथें दरोडेखोरांची एक हीन जमात वस्ती करून राहिलेली होती. या भागांतून प्रवास करतांना लोकांना अतिशय भीति वाटे. दरोडेखोर कालीचे पूजक असल्यामुळें त्यांना तिचा पाठिंबा आहे अशीहि लोकांची समजूत होती. शारदादेवी, त्यांचे कांहीं नातेवाईक व गांवकरी जयरामवाटीहून दक्षिणेश्वरास जाण्यासाठीं पायीं निघाले. अरण्यापर्यंत येईतों संध्याकाळ पडूं लागली. वाटेल तें झालें तरी अंधार पडण्यापूर्वी अरण्य पार होणें निकडीचें होतें. पण शारदामणी थकल्या होत्या. त्यांना इतरांबरोबरीनें भराभर चालणें अशक्य झालें. आपलें काय व्हायचें तें होवो पण इतरांनीं सुरक्षित अरण्यपार व्हावें म्हणून त्यांनीं सर्वांना पुढें होण्यास सांगितलें. जिवाच्या भीतीनें सर्वजण त्यांना मागें टाकून चालूं लागले. शारदामणी हळूंहळूं वाट चालत होत्या.

थोड्या वेळांत पूर्ण अंधार पडला. बरोबरची सर्व मंडळी खूपच दूर गेली होती. शारदामणींनीं आसपास पाहिलें तोंच एक काळाकभिन्न पुरुष हातांत मोठी कुन्हाड घेऊन त्या रोखानें येत असलेला त्यांनीं पाहिला. पाठीमागून आणखीहि एक व्यक्ति येत असावी. प्रसंगाचें गांभीर्य त्यांच्या लक्षांत आलें व तोंड देण्याची त्यांनीं मनाची तयारी केली.

त्या भयानक दरोडेखोरानें जवळ येऊन शारदामणींना दटावणीच्या स्वरांत विचारलें, " या वेळीं तूं एकटीच येथें काय करते आहेस ? " मोठ्या मधुर वाणीनें शारदादेवी म्हणाल्या, " पिताजी, माझ्याबरोबरची सर्व मंडळी पुढें निघून गेली. आम्ही सर्व दक्षिणेश्वरास निघालों आहोंत. आपले जामात दक्षिणेश्वरास मंदिरांत असतात. मला जर आपण तेथपर्यंत सोबत केलीत तर ते तुम्हांला भेटतील. आपल्याला पाहून त्यांना खूप आनंद होईल. " सुदैवानें ती दुसरी जवळ आलेली व्यक्ति म्हणजे त्या दरोडेखोराची पत्नीच होती.

तिच्याजवळ जाऊन तिचा हात आपल्या हातीं घेत त्या म्हणाल्या, " आई, मी भाग्यवान् म्हणून तुम्हीं दोघें या ठिकाणीं माझ्या रक्षणासाठीं आहांत. नाहींतर आज माझी काय अवस्था झाली असती कोण जाणें ? "

शारदादेवींच्या मधुर व प्रेमळ शब्दांनीं आणि नितान्त श्रद्धेनें तीं दगडी अंतःकरणें विरघळलीं. शेजारच्या खेड्यांत त्यांना नेऊन त्यांनीं त्यांच्या विश्रांतीची व्यवस्था केली. त्या माणसानें त्यांच्यासाठीं थोडा भात आणला. तो खाऊन त्या झोंपी गेल्या. दुसऱ्या दिवशीं तीं दोघें अरण्याच्या दुसऱ्या टोकापर्यंत त्यांना पोंचविण्यास गेलीं. ती बागदी जातीची स्त्री आपल्या पतीला म्हणाली, " रात्रीं माझ्या लेकीला चांगलें जेवण मिळालें नाहीं. बाजारांत जाऊन थोडें मासे व भाजी आणा. आज तिला आपण सुमास जेऊं घालूं." तो बाजारांत जावयास निघाला. इतक्यांत शारदाम्णींबरोबरची मंडळी त्यांना शोधीत तेथें येऊन पोंचली. सद्गदित अंतःकरणानें त्यांनीं आपल्या त्या आई-वडिलांचा निरोप घेतला व इतरांबरोबर त्या पुढें निघाल्या.

पुढील आयुष्यांत आपल्या शिष्यांना जेव्हां शारदामणींनीं ही हकीकत सांगितली तेव्हां त्या म्हणाल्या, " एकाच रात्रीच्या सहवासांत आमच्यांतील स्नेहबंधन इतकें दृढ झालें कीं, दुसऱ्या दिवशीं त्या दोघांना सोडून जातांना मला रडूं कोसळलें. सवड होईल तेव्हां दक्षिणेश्वरास मला भेटण्याचें आश्वासन मी त्यांच्याकडून घेतलें. त्या स्त्रीनें वाटेंत मिळालेल्या वाटाण्याच्या हिरव्या शेंगा घेऊन माझ्या पदरांत बांधल्या आणि रात्रीच्या जेवणात त्यांचा उपयोग करण्यास मला बजाविलें. पुढें तीं दोघें मला भेटण्यासाठीं अनेकदां दक्षिणेश्वरास आलीं. प्रत्येक वेळीं माझ्यासाठीं कांहींतरी वस्तु भेट म्हणून ते आणीत. रामकृष्णांहि त्यांच्याशीं जांवयासारखेच वागत व त्यांचा आदर ठेवीत. मात्र माझ्याशीं इतक्या सात्विक वृत्तीनें वागणाऱ्या माझ्या या बापानें पूर्वायुष्यांत मोठमोठे गुन्हे केले होते."

एका असहाय तरुणीच्या विनंतीवरून तीं अट्टल गुन्हेगार पति-पत्नी इतकीं कशीं बदललीं याचें खरोखर आश्चर्य वाटतें ! आपल्या हातीं सांपडलेल्या सावजास सहजासहजीं ते लोक कधींहि सोडणारे नव्हेत. शारदामणींचे

दैवी गुण इतके परिणामकारक होते म्हणूनच त्यांचें हृदय-परिवर्तन त्या करूं शकल्या.

शारदादेवींचें व्यक्तिमत्त्व किती प्रभावी होतें याचे कांहीं पुरावे त्यांच्या दक्षिणेश्वराच्या वास्तव्यांतहि आढळतात.

त्या वेळीं शारदामणी सुमारें तीस वर्षांच्या असाव्यात. साधनेंत बरीच प्रगति केलेली योगीन मा नांवाची रामकृष्णांची एक शिष्या तेथेंच रहात असे. शारदामणी तिला म्हणाल्या, " माझ्यासाठीं रामकृष्णांना अशी विनंती कर कीं, त्यांनीं माझी भावसमाधि लावण्याची तयारी करून घ्यावी." योगीन मानें तिचा निरोप रामकृष्णांना सांगतांच ते गंभीर झाले. त्यांनीं उत्तरादाखल फक्त मौन स्वीकारलें. परंतु योगीन मा जेव्हां नगारखान्यांत परत आली तेव्हां शारदादेवींची अनंताशीं एकरूप झालेली समाधि-अवस्था पाहून ती चकितच झाली. या प्रसंगाची हकीकत सांगतांना योगीन मा म्हणते, "मी नगारखान्यांत परत येऊन पाहतें तों शारदादेवी ( माताजी ) आपल्या नित्याच्या प्रार्थनेस बसलेल्या दिसल्या. दार थोडें उघडून मी आंत डोकावलें. माताजी स्वतःशींच क्षणांत हंसत तर क्षणांत त्यांच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागत. हा प्रकार आळटून पालटून चालू होता. शेवटीं गालावर सारखे अश्रु ओघळूं लागले. त्या आपल्यांत पूर्णपणें तल्लीन झालेल्या होत्या. मला समजलें कीं माताजींची ही समाधि-अवस्था आहे. म्हणून मीं दार लावलें व बाहेरच थांबलें. बऱ्याच वेळानें मी दार उघडून परत आंत गेलें तेव्हां माताजी म्हणाल्या, " तूं गुरूंकडून आतांच परत आलीस का?" मीं म्हटलें, " आपण मला सांगितलें कीं आपण समाधि-अवस्थेपर्यंत पोंचला नाहीं. मग आता दिसली ती अवस्था कोणती?" उत्तरादाखल शारदामणी फक्त हंसल्या.

कांहीं वेळां मध्यरात्रींच्या वेळीं शारदादेवी समाधि-अवस्थेंत आहेत असें योगीन मास आढळून येई. दूर कोणीतरी बासरी वाजवी व तिचे सूर त्यांच्या कानीं आले कीं त्यांच्या वृत्तींत एकदम फरक पडे. श्रीकृष्णच बासरी वाजवीत आहे असा भास होऊन राधेचा संभ्रम त्यांच्या ठिकाणीं निर्माण होई. त्या देहभान विसरत. देवाचें सान्निध्य त्यांना जाणवूं लागे व त्यांची समाधि लागे.

एका पौर्णिमेच्या रात्रीं तीन वाजतां शारदामणी नगारखान्याच्या जिन्यापाशीं बसल्या होत्या. तेथेंच त्यांची समाधि लागली. रामकृष्णांच्या खटावांचा आवाजहि त्यांना ऐकूं आला नाहीं. देहभान हरपल्यामुळें त्यांच्या खांद्यावरील पदर सरकून बाजूला गेला आहे हें त्यांच्या ध्यानीं आलें नाहीं. रामकृष्णांचा शिष्य योगेन ( स्वामी योगानंद ) त्या बाजूनें सहज गेला. शारदामणींची ती ध्यानावस्था पाहून तो विलक्षण गोंधळून गेला.

शारदामणींच्या आध्यात्मिक पूर्णत्वाची कल्पना रामकृष्णांच्या त्यांच्याविषयींच्या भावनेवरूनहि स्पष्ट होते. हिंदु रूढीप्रमाणें पति स्वतःला पत्नीपेक्षां सर्व बाजूंनी अधिक श्रेष्ठ समजतो. पण या अहंगंडाचें अस्तित्वहि रामकृष्णांच्या ठिकाणीं दिसत नसे. शारदामणी पाठमोऱ्या चालल्या असतांना आपली भाचीच (लक्ष्मीदेवी) जात आहे अशा समजुतीनें त्यांनीं त्यांना एकवचनांत संबोधून खोलीचें दार लावण्याची आज्ञा दिली. उत्तरादाखल आलेल्या आवाजावरून झालेली चूक रामकृष्णांच्या लक्षांत आली. त्यांना रात्रभर झोप आली नाहीं. दुसऱ्या दिवशीं त्यांनीं जेव्हां शारदामणींची भेट घेऊन चुकीची दुरुस्ती केली तेव्हां त्यांचें मन शान्त झालें. पुढील आयुष्यांत रामकृष्णांबद्दल बोलतांना - त्या म्हणत, " केवढें माझें भाग्य म्हणून मला असा पति लाभला. त्यांनीं मला कधीं एकवचनी हांकहि मारली नाहीं, कधीं कठोर शब्द उच्चारला नाहीं व फूल फेकूनहि मला कधीं दुखापत केली नाहीं."

शारदादेवींना कालीमातेसमान मानल्यामुळें रामकृष्णांनीं त्यांना कधींहि कोणतेंच बंधन घातलें नाहीं. एखादे वेळीं त्यांच्या इच्छेविरुद्ध जरी त्या वागल्या तरी त्याचा उच्चारहि ते करीत नसत. एक हीन चारित्र्याची बाई शारदामणींकडे वारवार येत असलेली पाहून रामकृष्णांनीं तिचें येणें बंद करण्याची त्यांना सूचना दिली. परंतु मातेच्या डोळ्यांनीं सर्वांकडे पाहणाऱ्या शारदामणींना त्या बाईस ' येऊं नको ' असें सांगणें शक्य होईना. दुसरी एक अर्धवट स्वभावाची बाई एकदा रामकृष्णांकडे गेली असता त्यांनीं रागावून तिला हांकलून लावलें. हें पाहून शारदादेवींना तिची कींव आली व त्यांनीं तिची समजूत घातली. रामकृष्ण हें सर्व मुकाट्यानें पहात होते. एका तरुण शिष्याला शिस्तीपेक्षा अधिक स्वादेर्से वाटे. त्यामुळें त्याची वृत्ति बिघडेल

म्हणून रामकृष्ण त्याला रागावले. शारदामणींनीं त्याची बाजू घेतली आणि "मी त्याला भरपूर खायला घालूनहि त्याच्या वृत्तींत व साधनेंत खंड पडणार नाहीं अशी हमी घेतें" असें त्यांनीं आश्वासन दिल्यावर ते गप्प राहिले.

शारदादेवींना आनंदी ठेवण्यासाठीं रामकृष्ण कांहीं वेळां आपलीं तत्त्वेंहि बाजूला ठेवीत. त्यांना स्वतःला सोनें दृष्टीसमोरहि खपत नसे. पण शारदादेवींना दागिन्यांची हौस वाटे. म्हणून त्यांनीं त्यांच्यासाठीं कांहीं दागिने मुद्दाम करवून घेतले. ते विनोदानें म्हणत, "शारदा म्हणजे प्रत्यक्ष सरस्वती, विद्येची देवता ! तिला कांहीं विभूषणें हवींतच." त्यांना साक्षात्कार झाला त्या वेळीं रामचंद्रांच्या सीतेनें जशा नक्षीच्या बांगड्या घातल्या होत्या तशाच नमुन्याच्या बांगड्या त्यांनीं शारदादेवींसाठीं करवून घेतल्या.

घरांतली कोणतीहि वस्तु मनांत आली कीं कोणालाहि देऊन टाकावी हा शारदामणींचा स्वभाव होता. याबद्दल एकदां रामकृष्णांनीं नापसंती व्यक्त करतांच शारदामणी रागावल्या व चालूं लागल्या. त्या निघून जात आहेत असें पाहून रामकृष्ण अस्वस्थ झाले व आपल्या शिष्यास म्हणाले, "रामलाल, जा, तुझ्या मावशीची समजूत घालून तिला परत घेऊन ये. ती रागावून गेली तर मला जीवन असह्य होईल."

आपल्या भाचा हृदय शारदामणींचा कधीं कधीं अपमान करतो हें पाहून ते त्यास एकदां म्हणाले, "हृदय, तूं मला वेडेंवांकडें बोललास तर तें मी सहन करतों. पण ती ( शारदामणी ) जर तुझ्यावर एखादे वेळीं रागावली तर मात्र तिच्यापासून ब्रह्मा, विष्णु अगर महेशहि तुझी सुटका करूं शकणार नाहींत."

मात्र अशा कौतुकानें शारदामणी कधीं बहकल्या नाहींत. पतिसेवा, आज्ञाधारकपणा, विनय व प्रेमळपणा हे गुण त्यांच्यांत जणूं साकार झाले होते. रामकृष्ण त्यांचे केवळ पतीच नव्हते तर ते त्यांचे गुरु—नव्हे प्रत्यक्ष परमेश्वर होते. याच भावनेनें त्यांनीं त्यांची जन्मभर सेवा केली.

रक्षक देवता :—आयुष्याच्या शेवटीं शेवटीं रामकृष्ण विनोदानें एकदां आपल्या एका वयस्क शिष्यास म्हणाले, "माझ्या विवाहाचा ऐहिक हेतु तुमच्या

लक्षांत आलं का? अहो, शारदामणी नसत्या तर या अशक्त व रोगी शरीराची एवढी काळजी कोणीं घेतली असती? प्रत्येक पदार्थ करतांना तो मला पचेल कीं नाहीं याचा त्या विचार करतात!" हा विनोदी भाग बाजूला ठेवला तर रामकृष्णांच्या विवाहांत अलौकिक अर्थ फार मोठा आहे.

रामकृष्णांचें जीवन म्हणजे मानवतेला लाभलेला एक अमूल्य वर आहे. या विभूतीनें सामाजिक जीवनावर घडविलेला परिणाम पुढेंहि रहावा यासाठीं विधात्यानें रामकृष्णांचा विवाह योजून शारदामणींना त्यांचें कार्य करण्यास मार्गे ठेवलें. रामकृष्णांच्या हयातींत त्यांची प्रकृति सांभाळणें हेंच त्यांचें महत्त्वाचें काम असे. हें साधण्यासाठीं कितीहि परिश्रम झाले तरी त्या पर्वा करीत नसत. आपल्या खडतर सेवेनें त्यांनीं पतिव्रता व शिष्य यांच्यासाठीं एक महान् आदर्श निर्माण केला.

वरील दृष्टीनें शारदामणींचा दक्षिणेश्वरांतील दिनक्रम पाहणें मोठें मनोरंजक ठरेल. शंभूबाबूंच्या घरांतील थोडा काल सोडला तर बाकी सर्व काल शारदामणींचें वास्तव्य नगारखान्याच्या तळमजल्यावरच असे. ही खोली सुमारें ९ फूट उंच व ५० चौरस फूट क्षेत्रफळाची असेल. खोलीभोंवतीं सुमारें ४-४॥ फूट रुंदीचा एक व्हरांडा होता. या खोलीला एक दार व हवेसाठीं दोन झरोके ठेवलेले होते. खिडकी अशी एकहि नव्हतीच. दाराची उंची ४ फूट २ इंचच असल्यानें आत जातां येतां शारदामणींच्या कपाळाला अनेकदां दुखापत होई. व्हरांड्याच्या कडेस वरपर्यंत बांबूची तट्टी लावल्यामुळें ही खोली इतर सर्व मंदिरापासून आपोआपच अगदीं एकाकी बनली होती. त्या वेळच्या पडदापद्धतीस या जागेची बांधणी अनुकूल अशी होती.

या एका खोलींत शारदादेवींचें स्वैंपाकघर, देवघर, कोठी, शय्यागृह सर्वांचा समावेश झालेला होता. कधीं कधीं त्यांच्या जोडीनें एखादी शिष्याहि तेथें झोंपावयास येई. रामकृष्णांची माता निवर्तल्यानंतर आणखी कांहीं शिष्यांची सोय त्यांच्या खोलींत करण्यांत आली. एवढ्याशा अंधारकोठडींत शारदादेवी इतकीं वर्षे कशा राहिल्या असतील याची कल्पनाहि करवत नाहीं!

स्वभावानें शारदामणी अतिशय लाजऱ्या होत्या. खेड्यातील वातावर-

णांत वाढल्यामुळें पडदापद्धतीवर त्यांचा विश्वास होता. इतरेजनांच्या दृष्टीस त्या क्वचितच पडत. स्वतः रामकृष्णांच्या समोरहि वयाच्या पंचवीस वर्षांपर्यंत त्या पडदा दूर सारीत नसत. बनारसची एक वयस्कर स्त्री दक्षिणेश्वरास आल्यानंतर तिच्या सांगण्यावरून रामकृष्णांसमोर पडदा दूर करण्याची प्रथा शारदादेवींनीं सुरू केली. पड्याविषयीं रामकृष्णांचें मतहि अनुकूल होतें. ते म्हणत, " विनय सोडल्यानंतर स्त्रींत राहिलेंच काय ? " पावित्र्याचें रक्षण करण्यास विनयाचा फार उपयोग होतो असें त्यांचें मत होतें. फक्त कांहीं भक्त स्त्रियांबाबत रामकृष्ण अपवाद मानीत. अर्थात् शारदामणी आपला दिनक्रम असाच ठेवीत कीं त्यांच्या अस्तित्वाची मंदिरांत कोणाला जाणीवहि होऊं नये. देवळाचा व्यवस्थापक म्हणे, " शारदादेवी येथें राहतात एवढेंच आम्हांला माहीत आहे. त्यांना आम्ही कधींच पाहिलें नाहीं. "

शारदामणी पहाटे तीन ते चारच्या सुमारास उठून गंगेवर स्नानास जात. परत आल्यावर पूजाअर्चा आटोपून त्या स्वयंपाकास लागत. स्वयंपाक झाल्यावर जर रामकृष्ण एकटे असतील तर त्यांच्या अंगास त्या तेल लावून देत. त्यांचें स्नान आटोपल्यावर त्या त्यांना जेवावयास वाढीत. जेवण आटोपल्यावर थोडा वेळ इकडल्यातिकडल्या गप्पा चालत. रामकृष्णांनीं लगेच समाधि लावूं नये हाच त्या गप्पांचा मुख्य उद्देश असे. सकाळच्या प्रहरांत विडे बनविण्याचेंहि एक काम शारदामणी करीत. दुपारीं १ ते ३ हा त्यांचा वेळ केस वाळविण्यांत जाई. या वेळींच फक्त त्या नगारखान्याच्या पायऱ्यांवर बसत. कारण या वेळीं देवळांत सर्वकडे शुकशुकाट असे. दुपारचीं निवडण-टिपणाचीं कामें झाल्यावर संध्याकाळचें जेवण तयार करण्याची कामगिरी असे. यांतच रामकृष्णांच्या दर्शनास येणाऱ्या स्त्रियांची उठबस त्यांना करावी लागे.

एका ल्हानशा खोलींत वर्षानुवर्षे रात्रंदिवस कष्ट करणें ही गोष्ट सोपी नाहीं. रामकृष्णांच्या सेवेंत वाटणाऱ्या सुखामुळेंच हे सर्व कष्ट त्या सहन करूं शकल्या. स्वतःच्या विश्रांतीची व जेवणाची त्या कधींच फारशी पर्वा करीत नसत. रात्रींच्या ४–५ तासांच्या विश्रांतीसाठीं एक पातळशी

गोधडी ओल्या जमिनीवर पसरून त्या निजत. पुढें पुढें रामकृष्णांच्या सूचनेवरून त्या संध्याकाळीं थोड्या बाहेर पडत व शेजारपाजारच्या स्त्रियांत थोडा वेळ घालवीत. या वेळीं मागच्या दारानेंच त्यांचें जाणेंयेणें होई. या कष्टाळू राहणीनें नंतरच्या वयांत त्यांना संधिवाताचा विकार जडला व तो अखेरपर्यंत कायम राहिला.

रामकृष्णांची आई हयात असेपर्यंत ते नगारखान्यांत आईबरोबर भोजन करीत व शारदामणी त्या दोघांना वाढीत. पतीप्रमाणेंच सासूची सेवाहि त्यांनीं भक्तिभावानें केली. सासूस आवडणार नाहीं अशी एकहि गोष्ट त्या कधीं करीत नसत. शिष्यपरिवार वाढल्यानंतर दूरदूरच्या ठिकाणांहून रामकृष्णांच्या दर्शनासाठीं मंडळी दक्षिणेश्वरास येत व दोन-दोन दिवस रहात. या सर्वांचा स्वयंपाक शारदामणींनाच करावा लागे. ज्यांना जसा स्वयंपाक आवडे तसे पदार्थ त्या तयार करीत व तेहि मोठ्या प्रमाणावर करावे लागत. विडे करण्याचें कामहि अशा वेळीं वाढे. कांहीं दिवसांनीं लाटू (स्वामी अद्भुतानंद) नांवाचा एक तरुण मुलगा रामकृष्णांचा शिष्य बनून तेथेंच राहूं लागला. तो घरकामांत शारदामणींना बरीच मदत करी.

श्रीरामकृष्णांचें पोट वारंवार बिघडे. त्यांच्या खाण्याचें प्रमाण व शिजविण्याची पद्धति या दोन्हींबाबत फार काळजी घ्यावी लागे. त्यांच्या दिनक्रमावर सतत लक्ष ठेवून ज्या दिवशीं जेवढें व जें खाणें त्यांना पचेल तेच पदार्थ शारदामणी तयार करीत. सर्व तऱ्हेचें पौष्टिक अन्न त्यांच्या पोटांत कसें जाईल ही त्याना सतत काळजी असे. आवश्यक तेवढें अन्न त्यांच्या पोटांत जावें म्हणून भात दाबून वाढणें, दूध जास्त उकळून देणें अशा पद्धतींचा त्यांना अवलंब करावा लागे. आपल्या पोटाची आपल्यापेक्षां शारदामणींनाच अधिक चांगली कल्पना आहे याची रामकृष्णांना खात्री होती. ते कधीं कधीं विनोदानें म्हणत, " तूं खायला घाढून घाढून मी किती लठ्ठ होत चाललों आहे हें तुझ्या लक्षांत आलें आहे का ? " शारदामणी जयरामबातीला अगर कामारपुकूरला गेल्या कीं रामकृष्णांच्या खाण्यांत फरक पडून त्यांचें पोट बिघडे आणि मग ते त्यांना लवकर परत येण्यासाठीं निरोप पाठवीत.

रामकृष्णांच्या सेवेंत व सहवासांत खर्च होणारा प्रत्येक क्षण शारदामणींना स्वर्गीय सुखाचा वाटे. त्यांच्या जेवणाच्या वेळेची त्या किती आतुरतेनें वाट पहात ! ही एकच वेळ अशी असे कीं त्यांना त्यांच्या परमेश्वराचें सर्व लक्ष त्यांच्याकडे वेधून घेतां येई. त्यांच्या अमृततुल्य भाषणानें कानांचें व दर्शनानें डोळ्यांचें पारणें फिटे.

गोपाल मा नांवाच्या एका शिष्येच्या इच्छेस मान देऊन तिनें तयार केलेलें जेवण रामकृष्ण एकदां जेवले. पण तिनें तोच उपक्रम पुढेंहि चालू ठेवला. शारदामणींची पतिभेटीची एकुलती एक संधिहि गमावली. तरी त्यांनीं तोंडांतून याविषयीं एक चकार शब्दहि काढला नाहीं. दोन महिन्यांनंतर रामकृष्णांना आपोआपच शारदामणींच्या दुःखाची कल्पना आली. लगेच त्यांनीं गोपाल मास जेवण आणणें बंद करण्यास सांगितलें. शारदामणींचे हरवलेले सुखाचे क्षण परत गवसले.

श्रीरामकृष्णांचें शिष्यांसमवेत भजन चाले. ईश्वरचिंतनांत तल्लीन होऊन ते नाचतहि. या सर्व गोष्टी बांबूच्या झरोक्यांतून अतृप्त नजरेनें शारदामणी तासन्तास पहात. इतर कोणतेंहि काम त्या करीत असल्या तरी अहर्निश त्यांचें मन पतिचिंतनांत मग्न असे. त्यांचे कान रामकृष्णांच्या खोलीकडे लागलेले असत. रामकृष्णांच्या एका तरुण शिष्यास ( स्वामी त्रिगुणातीतानंद ) त्यांनीं परतीच्या प्रवासाचे पैसे शारदामणींकडून घेण्यास सांगितलें. ते घेण्यासाठीं स्वामीजी जेव्हां नगारखान्यांत गेले तेव्हा खोलीच्या दाराबाहेर पैसे ठेवलेले त्यांना आढळलें. नरेननें ( स्वामी विवेकानंद ) आपल्याबरोबर जेवावें असा निरोप देऊन त्याला जेव्हां रामकृष्णांनीं शारदामणींकडे पाठविलें तेव्हां त्याला आवडणारे पदार्थ शेगडीवर शिजत असलेलेच दिसले. यावरून रामकृष्णांच्या खोलीकडे शारदामणींचे कान व डोळे कसे लागलेले असत याची कल्पना येते. शरीरानें जरी त्या रामकृष्णांपासून दूर असत तरी मनानें त्या रात्रंदिवस त्यांच्यापाशींच वावरत.

त्यागी आणि विरक्त वृत्ति दोघांच्या ठिकाणीं सारखीच होती. रामकृष्णांच्या एका व्यापारी भक्तानें एकदां त्यांना देणगी देण्यासाठीं मोठी रक्कम आणली. उद्देश असा कीं रामकृष्णांना अधिक सुखांत राहतां यावें. परंतु

रामकृष्णांनीं त्या देणगीचा स्वीकार केला नाहीं. आशेनें तो मनुष्य शारदामणींकडे गेला. त्यांनींहि विनयपूर्वक परंतु स्पष्ट शब्दांत त्या देणगीचा स्वीकार करण्यास नकार दिला.

गंगाकिनारीं पनिहाटी या ठिकाणीं एका उत्सवासाठीं रामकृष्ण आपल्या शिष्य व शिष्यिणींसह एकदां बोटींतून निघाले. अशा मिश्र समुदायांत आपण सामील होऊं नये या कल्पनेनें शारदामणींनीं जाण्यास नकार दिला. रामकृष्णांच्या मनांत होतें तेंच त्यांनीं केलेलें पाहून रामकृष्णांना खूप कौतुक वाटलें.

या उत्सवांत रामकृष्णांना खूप परिश्रम झाले. क्षणोक्षणीं येणारी उन्मनी-अवस्था व भजनाचें जागरण यामुळें त्यांना फार ताण पडला. पनिहाटीहून परत येतांच जून १८८५ मध्यें त्यांना घशाचा कॅन्सर झाला. शारदादेवी अतिशय चिंतातुर झाल्या. अंगावरील सर्व अलंकार काढून अहोरात्र त्या पतिसेवा करूं लागल्या. आक्टोबर महिन्यांत कलकत्याच्या उत्तर बाजूस श्यामपुकूर विभागांत एक भाड्याचें घर घेऊन उपचारांसाठीं रामकृष्णांना तेथें हालविण्यांत आलें. या छोट्याशा दुमजली घरांत ते कांहीं महिने होते. थोडा शिष्यपरिवार व शारदामणी अहर्निश त्यांची शुश्रूषा करीत होतीं. फक्त लाटू व गोपाळ या दोन शिष्यांखेरीज येथेंहि शारदामणी कोणाच्या नजरेस पडत नसत.

पहाटेस त्या खालीं येत. रामकृष्णांची खोली स्वच्छ करून त्यांचें खाणेंपिणें उरकून त्या वर जात. पुन्हां रात्रीं त्यांच्या खोलींतून सर्व मंडळी निघून गेली म्हणजे त्या खोलींत येत व एका बाजूला सुमारें तीन तास बसत. नंतर स्वयंपाकघरांतल्या छपरात निघून जात. या महंत रोग्याची शुश्रूषा एखाद्या देवदूतीनें येऊन करावी व कोणालाहि नकळत त्यांच्याभोंवतीं वावरावें असेंच इतरांना वाटे.

डिसेंबरमध्यें कोसीपूर नांवाच्या उपनगरांत एका प्रशस्त हवेशीर बंगल्यांत रामकृष्णांना डॉक्टरांच्या सल्ल्यानुसार हालविण्यांत आलें. तरुण शिष्य-मंडळी त्यांची सेवा करीत, प्रौढ मंडळी खर्चाची बाजू सांभाळीत आणि गोपाल माच्या मदतीनें सर्वांच्या जेवणाखाणाची व पथ्यपाण्याची व्यवस्था शारदामणी पहात. हवापालट झाल्यानें रामकृष्णांना कांहीं काळ बरें वाटलें. पण इ. स. १८८६ च्या ऑगस्ट महिन्यात त्यांचें दुखणें अतिशय गंभीर झालें.

ऐहिक उपचार निरुपयोगी ठरत आहेत असें पाहून दैवी उपायांनी पतीचे प्राण वांचवावेत या कल्पनेनें शारदामणी तारकेश्वराच्या मंदिरांत गेल्या व त्यांनीं उपोषणास व ध्यानास प्रारंभ केला. दोन-तीन दिवसांनंतर कुन्हाडीच्या घावानें बरीचशीं मातीचीं गाडगीं फुटावींत तसा एक विलक्षण आवाज शारदामणींच्या कानांवर आला. तत्क्षणीं त्यांचें मन एखाद्या कोऱ्या करकरीत पाटीसारखें झालें आहे असें त्यांना वाटलें. कोणताच ऐहिक पाश यापुढें आपणांस बांधूं शकणार नाहीं अशा भावनेनें त्या देवळांतून परतल्या.

महानिर्याण :– १६ ऑगस्ट १८८६ या दिवशीं डॉक्टरांनीं जाहीर केलें कीं श्रीरामकृष्ण आतां या समाधींतून पुन्हां जागृतावस्थेंत येणार नाहींत. हें ऐकतांच सर्व शिष्यांच्या मुखावर दुःखाची दाट छाया पसरली. पडदा झुगारून एखाद्या लहान मुलासारख्या शारदामणी रामकृष्णांच्या शय्येकडे धांवल्या. " भगवन्! माझ्या हातून असा कोणता अपराध घडला म्हणून मला मागें ठेवून आपण निघून गेलांत ?" असा टाहो फोडून त्या रडूं लागल्या. फक्त एकदांच त्यांच्या दुःखाला वाचा फुटली. कांहीं वेळानें इतरांनीं त्यांना दुसऱ्या खोलींत नेलें. अश्रु आवरून त्यांनीं मौन धारण केलें.

दुसऱ्या दिवशीं त्या आपलीं सौभाग्यचिन्हें उतरवूं लागल्यावरोबर श्रीरामकृष्ण त्यांच्यासमोर प्रगट झाले व म्हणाले, " मी कोठें गेलों आहे ? फक्त एका दालनांतून दुसऱ्या दालनांत मीं प्रवेश केला. तुझें सौभाग्य अखंड आहे." पतीचा आत्मा आपल्याजवळच आहे अशी या साक्षात्कारानें खात्री होतांच शारदामणींनीं आपलें सौभाग्यलेणें पुन्हां अंगावर चढविलें.

शरीरानेंसुद्धां रामकृष्णांचा विरह शारदामणींना असह्य झाला होता. पांच दिवसांनी त्या कोसीपूरच्या बंगल्यांतून बाहेर पडल्या. सुमारें आठ दिवस कलकत्त्यांतील रामकृष्णांचे उपासक बलराम बोस यांच्याकडे मुक्काम करून नंतर कांहीं शिष्यमंडळींसह उत्तर हिंदुस्थानांत यात्रेसाठीं शारदामणी निघाल्या. वैद्यनाथ, काशी व अयोध्या हीं ठिकाणें पाहून झाल्यानंतर मंडळी वृंदावनास आली. येथें शारदामणी सुमारें एक वर्षभर राहिल्या.

काशीला एकदां विश्वनाथाची सायंपूजा पहात असतांना त्यांची समाधि लागली. रामकृष्णांनीं त्यांचा हात धरून त्यांना निवासस्थानीं पोंचविल्याचा

अनुभव या वेळीं त्यांना आला. वृंदावनाच्या मार्गावर आगगाडींत खिडकीपाशीं त्या बसल्या होत्या. रामकृष्ण खिडकींतून डोकावले व मरणसमयीं दिलेलें सोन्याचें कंकण ( इष्ट कवच ) जपून ठेवण्यास त्यांनीं शारदामणींना सांगितलें.

रामकृष्णांच्या सान्निध्याचे असले क्षण जरी त्या अधूनमधून अनुभवीत होत्या तरी वृंदावनांत पाऊल ठेवतांच राधेची कृष्णविरहाची अवस्था डोळ्यांसमोर येऊन त्या विलक्षण अस्वस्थ झाल्या. विवेकाचा बांध फुटून डोळ्यांतून अश्रूंचा पूर वाहूं लागला. राधेचें सर्व दुःख त्यांनीं अनुभविलें. रामकृष्ण पुनः पुन्हां त्यांना दर्शन देत व म्हणत, " मी तर सतत तुझ्याजवळ आहे. मग तूं अशी एकसारखी रडतेस कां ? " आध्यात्मिक पातळीवरील या भेटीगांटींनीं शारदामणींच्या जीवास पुष्कळ धीर येई. रामकृष्णांच्या आत्म्याशीं आपण किती एकरूप आहोंत याची जाणीव त्यांना अतिशय सुखद वाटे. एकदां अशाच समाधि-अवस्थेंत त्यांची ऐहिक शुद्ध पूर्ण मावळली आणि रामकृष्ण अशा अवस्थेंत जें जें करीत तें सर्व त्यांनीं केलें. पुन्हां जागृतावस्था प्राप्त झाल्यावर त्यांनीं इतरांना सांगितलें, " रामकृष्णांचें व माझें एकाच विश्वतत्त्वांत पूर्ण मीलन झालेलें मीं पाहिलें."

वारंवार होणाऱ्या साक्षात्कारांनीं शारदामणींचा कायापालट होत होता. त्यांचें दुःख हळूंहळूं नाहींसें झालें व आनंदी वृत्तीनें त्या आपला दिनक्रम आचरूं लागल्या. देवदर्शनासाठीं त्या मंदिरांतहि जाऊं लागल्या. एका निराळ्याच आनंदांत आपण पोहत आहोंत असें त्यांना वाटूं लागलें. कांहीं वेळां राधेची आठवण झाली कीं इतराना चुकवून त्या एकट्याच तासन्तास यमुनाकांठीं जाऊन बसत. कित्येक वेळां त्यांना शोधून आणावें लागे.

त्या राधारमणाच्या दर्शनास गेल्या म्हणजे प्रत्येक वेळीं अशी प्रार्थना करीत कीं, कोणाचेंहि दोष मला कधीं दिसूं नयेत. पुढील काळांत त्या प्रत्येकाविषयीं जें प्रेम व सहानुभाव दाखवीत त्यावरून राधारमणानें त्यांची प्रार्थना मान्य केली होती हें पटतें.

कांहीं दिवसांनीं रामकृष्णानीं दर्शन देऊन त्यांच्या सान्निध असलेल्या योगेनला दीक्षा देण्याची शारदामणींना सूचना दिलेली पाहून त्या आश्चर्यचकित झाल्या. साधनेस जरूर असा त्याला द्यावयाचा मंत्रहि रामकृष्णांनीं

त्यांना सांगितला. ज्याच्यापुढें तोंडावरील बुरखाहि त्यांनीं कधीं दूर केलेला नव्हता त्याच्यापुढें गुरु म्हणून बसून त्याला दीक्षा देण्याच्या वेळीं शारदामणींना प्रथम अतिशय संकोच वाटला. प्रत्यक्ष दीक्षा-समारंभाच्या वेळीं त्या उन्मनी अवस्थेत होत्या.

कोसीपूरच्या बंगल्यांत असतांना एकदां रामकृष्णांनीं त्यांना विचारलें, " मीच सर्वकांहीं करतों. तूं मला मदत नाहीं का करणार? " यावर शारदामणी म्हणाल्या होत्या, " मी बाई माणूस! मी काय करूं शकणार? " यावर ते पुन्हां म्हणाले, " छे! छे! तुझ्याकडून फार मोठें कार्य व्हावयाचें आहे. " रामकृष्णांच्या निर्याणानंतर जेव्हां त्यांना त्यांच्या शेंकडों शिष्यांना दीक्षा देण्याची व मार्गदर्शन करण्याची वेळ आली तेव्हां या सूचक संभाषणाचा अर्थ त्यांना उमगला. वृंदावनांत स्वामी योगानंदांना दीक्षा दिल्यानंतर आध्यात्मिक गुरूच्या नव्या भूमिकेंत शारदामणी वावरूं लागल्या.

वृंदावनांत एक वर्ष मुक्काम झाल्यानंतर शारदामणींना सांधेदुखीचा त्रास होत होता. तरीहि त्या इतर कांहीं यात्रेकरूंबरोबर आसपासच्या बऱ्याच ठिकाणीं पायीं हिंडल्या. या वेळीं त्यांच्यावरोबर असणाऱ्या योगीन माला असें आढळलें कीं शारदामणी चालतां चालतां मध्येंच थांबत. कांहीं जागा त्यांना विशेष ओळखीच्या वाटत, जणूं त्या तेथें पूर्वीं खूप वावरलेल्या होत्या! कसल्यातरी गोड स्मृति जागृत झाल्याप्रमाणें त्यांच्या चेहऱ्यावर आनंद व उल्हास दिसे.

वृंदावनाहून परततांना शारदामणींनीं रामकृष्णांचे कांहीं अवशेष हरद्वारच्या ब्रह्मकुंडांत व त्यांच्या जटा अलाहाबादच्या त्रिवेणीसंगमावर विसर्जन केल्या.

इ. स. १८८७ च्या उत्तरार्धांत त्या कामारपुकूरला पोंचल्यावर त्यांना एका नवीन संकटास तोंड द्यावें लागलें. रामकृष्णांच्या निधनानंतर शारदामणी प्रथमच येथें आल्या होत्या. त्या वेळच्या सामाजिक रूढीस अनुसरून विधवेचा वेश त्यांनीं परिधान केलेला नव्हता. यामुळें गांवांतील सामान्य माणसांकडून त्यांच्यावर कडक टीका होऊं लागली. मागच्याप्रमाणेंच त्यांनीं पुन्हां एकदां सौभाग्यचिन्हें उतरविण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण याहि वेळीं रामकृष्ण प्रगट होऊन त्यांनीं त्यांना परावृत्त केलें. ह्या खेपेस रामकृष्ण बऱ्याच शिष्यांसमवेत आले. समोर येतांच त्यांच्या पायांतून पाण्याचा लोंढा वाहूं लागला.

शारदामणींनीं शेजारच्या झाडाचीं फुलें तोडून तीं त्या प्रवाहांत वाहिलीं आणि आदरानें नमस्कार केला. आतां मात्र त्यांची खात्री झाली कीं त्यांचे पति म्हणजे साक्षात् श्रीविष्णुच असून त्यांच्या पायांतून वाहतांना दिसलेला पाण्याचा पवित्र प्रवाह म्हणजे गंगामाईच होय. वृंदावनांत एके ठिकाणीं असा मजकूर कोरलेला आहे कीं, "कृष्णदेवाशीं जिचा विवाह झालेला आहे तिला कधींच वैधव्य येत नाहीं." यांतील सत्य शारदामणींच्या प्रत्ययास आलें. यानंतर मात्र आपल्या अखंड सौभाग्यावर दृढ श्रद्धा ठेवून लोकनिंदेकडे दुर्लक्ष करण्याचा त्यांनीं निश्चय केला आणि शेवटपर्यंत हातांतलीं कंकणें व लाल किनारीची साडी हा वेश कधींहि पालटला नाहीं. शेजारच्या जमीनदाराची कन्या प्रसन्नमयी हिनें शारदामणींचें असामान्यत्व इतरांना पटवून दिल्यावर जननिंदा आपोआप बंद झाली.

कामारपुकूरचा शारदामणींचा दिनक्रम पाहून वनवासी सीतेची आठवण येते. त्या एकट्याच रहात. दारिद्र्याचे चिमटे क्षणोक्षणीं त्यांचें हृदय रक्तबंबाळ करीत. थोडा भात व मिळेल ती एखादी भाजी स्वतः उकडावी व खावी. मीठ विकत आणण्यासाठींहि त्यांच्याजवळ पैसे नसत. पण एवढ्या विपत्तींतहि त्यांची मनःशान्ति कधीं ढळली नाहीं. कारण मरतेसमयीं रामकृष्णांनीं त्यांना सांगून ठेवलें होतें कीं, "माझ्या माघारीं तूं कामारपुकूरलाच रहा. जो मिळेल तो भाजीभात खा आणि ईश्वरचिंतनांत कालक्रमणा कर." शारदामणींनीं हा आदेश शब्दशः पाळला. जयरामवातीस आपल्या आईलासुद्धां त्यांनीं आपल्या हालअपेष्टा कधीं कळविल्या नाहींत.

रामकृष्णांच्या संन्यासी उपासकांना कांहीं काल शारदामणींचा पूर्ण विसर पडला होता. रामकृष्णांच्या देहावसानानंतर त्या सर्वांना फार मोठा धक्का बसला आणि त्यांच्या चित्ताला परमार्थाची एकच ओढ लागून राहिली. शारदामणींची कामारपुकूरला किती केविलवाणी अवस्था झाली होती याची कोणाला कल्पनाहि नव्हती. प्रसन्नमयींमुळें शारदामणींची असहाय अवस्था रामकृष्णांच्या कलकत्यातील उपासकांच्या कानांवर गेली. पुरें एक वर्ष या उपासमारीच्या तपश्चर्येंत गेल्यानंतर शिष्यांनीं शारदामणींना कलकत्त्यांत रहावयास नेण्याचा आग्रह केला. या सुमारास शारदामणींची अंतःशुद्धि पूर्ण

झाली होती. चित्त चैतन्याशीं एकरूप होऊन त्यांना एका लोकोत्तर शान्तीचा लाभ झाला होता.

पुत्रवत् मानलेल्या शिष्यांच्या आग्रहावरून शारदादेवी इ.स. १८८८ च्या मे महिन्यांत कलकत्यांत रहावयास आल्या. थोड्याच दिवसांनीं बलरामबाबूंच्या घराच्या छपरावर संपूर्ण समाधि-अवस्थेत बसलेल्या शारदादेवी योगीन मानें पाहिल्या. हा अनुभव तिला सांगत असतांना त्या म्हणाल्या, "मी एका वेगळ्याच जगांत गेलें होतें. तेथील माणसें अतिशय प्रेमळ दृष्टीनें माझ्याकडे पहात होतीं. माझें सर्वांग अप्रतिम सुंदर दिसूं लागलें. सर्वांनीं आग्रह करून मला रामकृष्णांजवळ बसविलें. त्या वेळचा माझा आनंद शब्दांत वर्णन करणें अशक्य आहे. कांहीं वेळानें या जगाची जाणीव जागृत झाली आणि मी माझ्या या देहाजवळ आलें. मला वाटलें, "या कुरूप देहांत मी कसा प्रवेश करूं ? मोठ्या प्रयासानें मी परत कायाप्रवेश केला."

याच सालच्या आक्टोबर महिन्यांत शारदामणी जेव्हां नीलांबर बाबूंच्या भाड्याच्या घरांत रहात होत्या तेव्हां एकदां अशीच त्यांची निर्विकल्प समाधि लागली. कित्येक तास त्यांचा देह निश्चेष्ट होता. पुन्हां जागृतावस्थेत येतांना त्या मोठ्यानें ओरडल्या, "योगेन्, माझे हात कोठें आहेत ? माझे पाय कोठें आहेत ?" योगीन मानें जेव्हां बराच वेळ त्यांचे हातपाय दाबले तेव्हां त्यांना पुरी शुद्ध आली.

याच घरांत पुन्हां इ. स. १८९३ मध्यें शारदामणी रहात असतांना त्यांनीं व योगीन मानें 'पंचतपा' नांवाची साधना केली. पहांटे उठून गंगेचें स्नान करून येऊन दोघीजणी ध्यानास बसत. बैठकीच्या चारी बाजूंस चार अग्नि प्रज्वलित केले जात व पांचवा अग्नि सूर्य वरतून तळपे. सूर्यास्त होईपर्यंत त्या दोघी ध्यानमग्न असत. हें तप पांच दिवस केल्यावर त्यांचीं शरीरें जळलेल्या लाकडासारखीं दिसूं लागलीं.

या तपश्चर्येच्या काळांत शारदामणींना एक सूचक दर्शन घडलें. गंगेचा प्रवाह वहात आहे. रामकृष्ण स्नानाच्या मिषानें प्रवाहांत उतरले. हळूंहळूं त्यांचा देह पाण्यांत विरघळूं लागला. कांहीं वेळानें त्यांचा संपूर्ण देह गंगामाईशीं एकरूप झाला. लगेच स्वामी विवेकानंद ( नरेन्द्रनाथ ) तेथें आले

व ' जय रामकृष्ण ' असा घोष करीत हजारों लोकांवर त्या पवित्र जलाचें त्यांनीं सिंचन केलें. विवेकानंदांनी पुढें जो रामकृष्णांच्या कार्याचा प्रसार केला त्याची यथायोग्य कल्पना या दृश्यानें शारदामणींना मिळाली.

**पूज्य माताजी**:—शारदामणींच्या समाधि-अवस्था पाहण्याचें भाग्य फक्त योगीन मा व गोपाल मा या त्यांच्या निकटवर्ती शिष्यिणींनाच लाभे. अशा अवस्थेंत त्यांनीं शारदामणींना दक्षिणेश्वरास व वृंदावनास अनेक वेळां पाहिलें होतें. इ. स. १८८८ त कामारपुकूरहून कलकत्त्यास आल्यावर शारदामणींच्या मनोरचनेंतील फरक त्या दोघींनाहि आश्चर्यकारक वाटला. या वेळीं त्यांना सिद्धावस्था प्राप्त झाली होती. बहुतेक वेळ त्या अंतर्मुख असत. त्यांच्या चेहऱ्यावर एक विशेष तेज दिसे. इतरांनाहि त्यांच्या सहवासांत कांहीं वेगळीच अनुभूति जाणवे. कालीमातेची जणूं चालती बोलती प्रतिकृतिच भासणाऱ्या शारदामणी स्वत: मुक्त होऊन इतरांना मार्गदर्शन करण्यास सिद्ध झाल्या होत्या.

योगीन मा व गोपाल मा यांच्याप्रमाणें रामकृष्णांच्या इतर शिष्यवर्गाचीहि शारदामणींच्या पारलौकिक सामर्थ्याविषयीं व अधिकाराविषयीं लवकरच खात्री पटली. रामकृष्णांत ज्या अलौकिक शक्तीचा प्रत्यय येई तीच शक्ति शारदामणींतहि असल्याची अनेकांना प्रचीती आली. रामकृष्णांच्या निर्याणानें शेंकडों मुमुक्षूंचीं मनें निराश व खिन्न झालीं होतीं. त्यांना दिलासा देऊन मार्गदर्शन करण्यास योग्य वेळीं शारदामणी हजर झाल्या. हें पाहून रामकृष्णांचे शेंकडों शिष्य पुन्हां उत्साहानें त्यांच्याकडे आले व ' पूज्य माताजींना ' गुरुस्थानीं कल्पून त्यांनीं परत साधनेस सुरुवात केली.

शारदामणींच्या दैनंदिन गरजा व्यवस्थित भागविण्याची सर्वांनीं प्रथम दक्षता घेतली. माताजींची एखादी क्षुल्लक गरज ज्या शिष्यास भागवितां येई तो स्वत:स भाग्यवान् समजे. शारदामणींनीं ज्यांना प्रथम दीक्षा दिली ते स्वामी योगानंद माताजींचे प्रमुख सेवक होते. योगानंदाना मदतनीस म्हणून स्वामी अद्भुतानंद व स्वामी अद्वैतानंद हे दोघे असत. योगानंद इ. स. १८९९ त निवर्तले. यांच्या खालोखाल माताजींच्या सेवेंत स्वामी त्रिगुणातीतानंद व त्यांच्यानंतर स्वामी शारदानंद यांचा क्रम लागे. शारदानंदांनीं माताजींची

शेवटच्या दिवसापर्यंत चोख व्यवस्था ठेवली. रामकृष्णांचे उपासक बलराम बोस आणि महेंद्रनाथ गुप्त ('द गॉस्पेल ऑफ श्रीरामकृष्ण' या पुस्तकाचे कर्ते) माताजींच्या खर्चाची बाजू उचलीत. अशा रीतीनें चपाच्या पस्तिसाव्या वर्षी स्वतःची साधना पूर्ण करून श्रीशारदादेवी मुमुक्षूंना मार्गदर्शन करूं लागल्या. सुप्तावस्थेंतील त्यांची आध्यात्मिक शक्ति या वेळीं प्रकट झालेली होती. शेंकडों स्त्री-पुरुष माताजींच्या स्फूर्तीनें आपल्या जीवनाचें सोनें करण्याची धडपड करीत होतीं.

शारदामणींची दीक्षा देण्याची पद्धति वैशिष्ट्यपूर्ण होती. या प्रक्रियेविषयीं त्यांनीं स्वतःच कथन केलेल्या हकीकतींपैकीं कांहीं सांगितल्या कीं वाचकांस कल्पना येईल. त्या म्हणत, "मंत्राच्या साहाय्यानें गुरूची शक्ति शिष्यांत संक्रमित होते. दीक्षा देतांना गुरु शिष्याचीं अनेक पापें आपल्या माथीं घेऊन शारीरिक पीडेच्या रूपानें तीं भोगतो. मला जें देण्यासारखें असतें तें मी मंत्ररूपानें देऊन टाकतें. ज्याला तावडतोब मनःशान्ति हवी असेल त्यानें कडक तपस्या आचरावयास हवी."

"माझ्याकडे येणाऱ्या कांहीं लोकांनीं भूतकाळांत घोर पातकें केलेलीं असतात. पण एकदां त्यांनीं मला माताजी म्हणून साद घातली कीं, मी सर्व विसरून त्यांच्यावर त्यांच्या पात्रतेहून अधिक कृपा करतें."

माताजींनीं ज्या शारीरिक व्याधि भोगल्या त्या पाहिल्या म्हणजे त्यांच्या शब्दांची सत्यता पटते. एखाद्या पापी माणसानें त्यांच्या चरणांस स्पर्श करतांच त्यांना विलक्षण वेदना होऊं लागत. मग त्या शमविण्यासाठीं शारदामणी कितीतरी वेळ गंगेच्या पात्रांत पाय सोडून बसत, ही गोष्ट अनेकांनीं पाहिलेली आहे. अशाच तऱ्हेचा एक अनुभव शारदामणींनीं आपल्या शिष्यांस खालील शब्दांत निवेदन केला होता.

"एका वयस्कर माणसाबरोबर दुसरा एक नवीन मनुष्य आलेला पाहून मी चटकन् आंत जाऊन माझ्या आसनावर बसलें. माझ्या इच्छेविरुद्ध बळजबरीनें त्या नव्या माणसानें माझ्या पायांना स्पर्श केला. तेव्हांपासून माझ्या पावलांची व पोटाची अशी भयंकर आग होते आहे! तूं त्या वेळीं तेथें हजर असतास तर माझ्या चेहऱ्यावरील नाराजी पाहून त्या गृहस्थाला

घोपविलें असतेस. तीनचार वेळां गंगेत पाय भिजविले पण अजून आग थांबली होत नाही."

अशाच प्रकारची आणखी एक तक्रार त्यांनी योगीन माता सांगितली होती.

" कांहीं माणसांचा माझ्या पायांना स्पर्श होतांच मला हुशारी वाटते, आनंद वाटतो. उलट कांहींच्या स्पर्शानें मला गांधीलमाशा चावल्यासारख्या वेदना होतात. अशा वेळीं गंगेत पाय बुडविले म्हणजेच थोडें बरें वाटतें."

इतकें असूनहि त्यांनी हें सहन करून अनेक पाप्यांचा उद्धार केला. यासंबंधीं बोलतांना त्या म्हणत, " पण हें सर्व शरदला सांगूं नका हं! नाहीतर तो लोकांना माझ्याकडे येण्याची बंदी करील."

अनेक वत्स्या-पुत्रांना वांचविण्यासाठीं हें दुःख त्या हंसतमुखानें सहन करीत. हेंच त्यांच्या आयुष्याचें ध्येय होतें. त्यांच्या शेवटच्या आजारांत त्यांना ऐकूं येईल अशा आवाजांत एक शिष्य दुसऱ्यास म्हणाला, " या दुखण्यांतून माताजी उठल्या तर यापुढें त्यांनी कोणालाहि दीक्षा देऊं नये अशी आपण तजवीज करूं. इतरांचीं पापें त्यांनी कां भोगायचीं ?"

हे शब्द कानीं पडतांच अंथरुणास खिळलेल्या माताजींनी मंद स्मित करून त्यांना विचारलें, " असें का बोलता ? रामकृष्णांनीं लोकांच्या फक्त पुण्याचाच वांटा उचलला होता का ?"

आयुष्याच्या अतापर्यंत शारदामणींना आपल्या कार्याचा सतत ध्यास लागलेला होता. रामकृष्णांनीं मरतांना त्याना सांगितलें होतें कीं, " सामान्य माणसें अंधारांतील किडेमुंग्याप्रमाणें जगतात. तूं त्यांना वांचविण्यासाठीं परिश्रम केले पाहिजेत."

निरनिराळ्या वृत्तींच्या माणसासाठीं रामकृष्णांनीं दिलेले मंत्र माताजींच्या कानांत एकसारखे घुमत. लोकांना सन्मार्गावर आणण्यासाठीं त्यांनीं अविश्रांत परिश्रम केले. रामकृष्णांनीं जशी शिष्यांची निवड केली तशी निवड

शारदामणींनीं कधीं केली नाहीं. अलौकिक बुद्धिमत्तेची कांहीं मंडळी हाताशीं धरून त्यांना रामकृष्णांनीं इतके तयार केलें कीं त्यांनीं जगभर रामकृष्णांच्या संदेशाचा व शिकवणीचा यशस्वी रीतीनें प्रसार केला. शारदामणींनीं जवळ येणाऱ्या प्रत्येक माणसास ज्ञान व भक्ति देण्याचा यत्न केला. त्या एकदां योगीनला म्हणाल्या, "रामकृष्णांनीं विलक्षण खाराखुशणीनें शिष्यांची निवड केली आणि माझ्याकडे मात्र त्यांनीं माशा-मुंग्यांसारखीं जमणारीं सामान्य माणसें पाठविलीं ! त्यांच्या शिष्यांशीं माझ्या उपासकांची तुलनाच होऊं शकणार नाहीं." त्यांच्या या उद्गारांत शिष्यांबद्दल अनुदारता नमून त्यांच्या व रामकृष्णांच्या कार्यांतील भेद अभिप्रेत आहे. अगदीं सामान्य माणसांतहि त्या केवढें आध्यात्मिक परिवर्तन घडवून आणूं शकत हेंहि वरील उद्गारांवरून कळून येण्यासारखें आहे. रामकृष्णांचे नामवंत शिष्य स्वामी प्रेमानंद यांनीं एकदां असे उद्गार काढले कीं "जें विष आम्हांला पचवितां येत नाहीं तें आम्ही माताजींकडे धाडतों. कारण त्यांच्या अंगांत कोणतेंहि कालकूट पचविण्याची धमक आहे. त्या वाटेल त्याला आसरा देऊं शकतात." भारतांतील सर्व भागांतून मुमुक्षु येऊन शारदामणींकडून दीक्षा घेऊन जात यांतील मर्म वरील उद्गारांवरून ध्यानांत येईल.

शारदामणींचा मुक्काम वर्षांतून सुमारें सहा महिने कलकत्यांत व सहा महिने खेड्यावर असे. या खेड्यांतील मुक्कामांपैकीं कांहीं महिने कामारपुकूरला व कांहीं महिने जयरामवाटीस त्या रहात. इ. स. १९१५ पर्यंत त्या बंधूसमवेत रहात. नंतर स्वामी शारदानंदांनीं त्यांच्यासाठीं एक स्वतंत्र झोंपडी जवळच बांधून घेतली. इ. स. १९११ त त्यांनीं कोआलपारा येथें 'जगदंबा-आश्रम' स्थापन केला. प्रतिवर्षी कांहीं दिवस त्या तेथें येऊन रहात. कलकत्यांत सुमारें वीस वर्षे त्या भाड्याच्या घरांत राहिल्या. गंगानदीपासून जवळ असें एखादें घर त्यांच्यासाठीं निवडलें जाई. बागबाजार किंवा श्यामबाजारची बाजू त्या अधिक पसंत करीत. नदीच्या पलीकडल्या काठाकडे रहावयाचें असल्यास बेलूर किंवा घुसुरी या भागांत घर पाहिलें जाई. अगदीं अल्पकाल वास्तव्य करावयाचें असल्यास त्या बहुतेक बलराम बोस यांच्याकडे व क्वचित् महेन्द्रनाथ गुप्त यांच्याकडे रहात. इ. स. १९०९ च्या मे महिन्यांत स्वामी शारदानंदांनीं अतिशय परिश्रम घेऊन बागबाजारांत त्यांच्यासाठीं स्वतंत्र घर

तयार केल्यानंतर मात्र त्या नेहमीं तेथेंच रहात. हें घर 'मातानी-निवास' या नांवानें कलकत्त्यांत अजूनहि पहावयास सांपडतें.

कक्षेच्या बाहेर :—कांहीं प्रसंगीं यात्रेच्या निमित्तानें अगर प्रकृति-स्वास्थ्यासाठीं म्हणून एखाद्या हवेच्या ठिकाणीं जाण्यासाठीं शारदामणी बाहेर पडत. अशा तऱ्हेचा पहिला प्रवास त्यांनीं इ. स. १८८८ त केला. नीलांबर-बाबूंच्या घरीं सुमारें सहा महिने राहिल्यानंतर बऱ्याच शिष्या, स्वामी ब्रह्मानंद, स्वामी योगानंद आणि स्वामी शारदानंद यांच्यासह पटकपर्यंत त्यांनीं आग-बोटीनें प्रवास केला. पुढें बैलगाडीनें त्या पुरीच्या जगन्नाथाला गेल्या. बलराम बोस यांच्या एका नातेवाइकाच्या घरांत ही सर्व मंडळी सुमारें दोन महिने राहिली.

जगन्नाथपुरीस त्या हरिवल्लभ बोस नांवाच्या एका प्रख्यात वकिलाच्या सन्माननीय पाहुणा म्हणून गेल्यामुळें देवळांतील पुजाऱ्यांनींहि त्यांना फार इतमामानें वागविलें. पण त्या स्वतः मात्र एखाद्या सामान्य यात्रेकरूप्रमाणेंच वागत. देवळांत जाण्यासाठीं एका उपाध्यायानें जेव्हां त्यांच्यासाठीं पालखी आणली तेव्हां त्या म्हणाल्या, "आपण पुढें व्हा. त्या विश्वनियंत्या जगन्नाथाच्या दर्शनास सामान्य माणसासारखें पायीं जाणेंच मला अधिक आवडेल." पर्वतशिखरावर वनराजाच्या थाटांत विराजमान झालेल्या जगन्नाथाच्या आपण एक भाविक सेविका आहोंत हीच एक भावना या वेळीं त्यांच्या हृदयांत होती.

सामान्य माणसास कांहींशी विचित्र वाटावी अशी एक गोष्ट या ठिकाणीं शारदामणींनीं केली. रामकृष्ण जगन्नाथपुरीस गेलेले नव्हते. म्हणून त्यांचा फोटो आपल्या पदराखालीं घाढून एकदां त्या जगन्नाथाच्या दर्शनास गेल्या. रामकृष्णांचा फोटो ही त्यांच्या दृष्टीनें जड वस्तु नव्हती. म्हणून त्यांचा फोटो जगन्नाथासमोर धरण्यानें रामकृष्णांना विश्वनाथाचें दर्शन झाल्याचें समाधान त्यांना लाभलें. गूढ अध्यात्मवादी माणसांच्या अनुभवाच्या पातळीवर सामान्य माणसें पोंचूं शकत नाहींत. यामुळें त्यांचें वागणेंहि समजत नाहीं.

महेन्द्रनाथ गुप्तांच्या रोजनिशींत नमूद करून ठेवल्याप्रमाणें इ. स. १८९० मध्यें मार्चच्या २५ तारखेस शारदामणी वैद्यनाथावरून गयेस गेल्या आणि जूनच्या दोन तारखेस पुन्हां कलकत्त्यास परतल्या. रामकृष्णांच्या

मातोश्री चंद्रमणीदेवी यांच्या इच्छेनुसार त्यांनीं ही गयेची यात्रा केली. धार्मिक विधि उरकल्यावर पुढें गौतम बुद्धास जेथें ज्ञानप्राप्ति झाली त्या बुद्धगयेस शारदामणींनीं भेट दिली. तेथील हिंदु भिक्षूंनीं संन्याशांच्या राहण्याची केलेली व्यवस्था पाहून त्यांचें मातृहृदय रामकृष्णांच्या संन्यासी शिष्यांच्या आठवणीनें सद्गदित झालें. त्यांनीं हा अनुभव नंतर स्वतःच एकदां कथन केला.

" बुद्धगयेच्या मठांत संन्यास घेऊन धर्मसाधना करणाऱ्यांच्या सर्व ऐहिक गरजा व्यवस्थित भागविल्या जातात. भिक्षूंना पैशाची कमतरता नाहीं हें पाहून रामकृष्णांच्या संन्यासी शिष्यांच्या हालांची आठवण होऊन मला रडूं कोसळलें. पोट भरण्यासाठीं त्यांना दारोदार भीक मागावी लागते. क्षणभर विश्रांति घेईन म्हटल्यास त्यांना एकहि सोयिस्कर ठिकाण नाहीं. मीं म्हटलें, " देवा, या सर्वांची नीट व्यवस्था व्हावयास हवी."

शारदामणींच्या इच्छेनुसार रामकृष्णांच्या प्रेरणेनें बेलूरला मठस्थापना करण्यांत आली. इ. स. १८९८ मध्यें शारदामणींनीं जागा नक्की करून भूमिपूजन केलें आणि लवकरच हा मठ सुरूं झाला.

इ.स. १८९४ त बलराम बोसांची पत्नी कृष्णभामिनी आजारी झाली. तिला, एका शिष्येला आणि तीन संन्यासी शिष्यांना बरोबर घेऊन शारदामणी बिहारमधील कोइल्वार या थंड हवेच्या ठिकाणीं गेल्या. तेथें त्यांचा मुकाम सुमारें दोन महिने होता. तेथील वनश्री आणि रानटी हरणांचे बागडणारे कळप त्यांना लहान मुलांप्रमाणें वेड लावीत. पण या खेड्यांतील लोकांचें दारिद्र्य पाहून मात्र त्यांचें हृदय पिळवटून जाई. रामकृष्ण मथूरबरोबर वैद्यनाथास व त्याच्या गांवीं गेले असतां तेथील लोकांच्या हालअपेष्टा पाहून ते असेच दुःखी होत असत.

इ.स. १८९५ च्या पहिल्या तिमाहींत शारदामणी काशी-वृंदावनाच्या यात्रेस गेल्या. या वेळीं त्यांच्याबरोबर योगीन मा, गोपाल मा, शारदामणींचे भाऊ व आई एवढी मंडळी होती. या यात्रेची योजना प्रामुख्यानें त्यांच्या आईसाठींच करण्यांत आली असावी. प्रवासाची व्यवस्था व मार्गदर्शन स्वामी योगानंदांनीं केलें. या खेपेस शारदामणींनीं वृंदावनाहून एक बाळगोपाळाची मूर्ति आणली व अखेरपर्यंत तिची पूजा-अर्चा त्या करीत. वृंदावनास जाण्यापूर्वीं

त्यांना कृष्णानें प्रत्यक्ष दर्शन दिलें आणि ' माझी भक्ति कर ' असें त्यानें सांगितल्यावरून त्यांनीं ही पूजा सुरू केली.

इ. स. १९०४ मध्यें स्वामी प्रेमानंदांनीं जगन्नाथपुरीच्या यात्रेची एक योजना आंखली. या वेळीं शारदामणींची अनेक नातेवाईक मंडळी व शिष्य-शिष्यिणी त्यांच्याबरोबर होत्या. या यात्रेहून परत आल्यानंतर थोड्याच दिवसांत शारदामणींचे चुलते नीलमाधव वारले. इ. स. १९०६ मध्यें त्यांच्या मातोश्री ( श्यामासुंदरी देवी ) निवर्तल्या. या दोघांच्या मृत्यूपूर्वीं त्यांना ही यात्रा घडली हें त्यांचें महतभाग्यच होय.

पुरीच्या यात्रेनंतर सुमारें सहा वर्षांनीं बलराम बोस यांच्या ओरिसामधील कौटुंबिक मालकीच्या कक्षेत असलेल्या कोठार या ठिकाणीं शारदामणी सुमारें दोन महिने राहिल्या. त्या गांवचा पोस्ट-मास्तर मूळ बंगाली, पण त्यानें ख्रिश्चन धर्माचा स्वीकार केला होता. शारदामणींची भेट झाल्यावर हिंदुधर्मांत परत येण्याची त्याला तीव्र इच्छा झाली. माताजींच्या सूचनेवरून त्याला हिंदु करून घेण्यांत आलें आणि त्यांनीं त्याला दीक्षाहि दिली. या ठिकाणीं शेंकडों मुमुक्षु मंडळींनीं शारदामणींचें शिष्यत्व पत्करलें. आसाममधील शिलाँगसारख्या दूरदूरच्या ठिकाणीं त्यांचे शिष्य विखुरलेले दिसतात.

इ. स. १९११ मध्यें शारदामणी आठ शिष्यांसमवेत दक्षिण भारताच्या यात्रेस गेल्या. स्वामी रामकृष्णानंद या रामकृष्णांच्या एका नामवंत शिष्यानें या यात्रेच्या कार्यक्रमाची आंखणी व व्यवस्था केली होती. रामेश्वरलाहि शारदामणींनीं भेट दिली. रामकृष्णानंदांनीं दक्षिण भारतांत पहिल्या रामकृष्णमठाची स्थापना केली. मद्रासमध्यें मैलापूर येथील मठाजवळ एका भाड्याच्या घरांत या मंडळींचा सुमारें एक महिना मुक्काम झाला. अनेक स्त्रीपुरुषांना व एका अमेरिकन् मठवासीयालाहि शारदामणींनीं या वेळीं दीक्षा दिली. त्यांच्या या मुक्कामांत असंख्य सुशिक्षित स्त्रीपुरुष त्यांच्या दर्शनास येत आणि त्यांच्याशीं चर्चा करीत. हें पाहून त्यांना फार आनंद व थोडें आश्चर्यहि वाटे.

मद्रासहून स्वामी रामकृष्णानंदाच्या मार्गदर्शकत्वाखालीं सर्वजण रामेश्वराला निघाले. वाटेंत एक दिवस मदुरेस थांबून त्यांनीं शिव आणि मीनाक्षी यांचीं प्रसिद्ध मंदिरें पाहिलीं.

रामेश्वराच्या देवळांत पुजाऱ्यांखेरीज इतर कोणालाहि गाभाऱ्यांत प्रवेश करतां येत नाहीं. परंतु रामनाडच्या राजाच्या आज्ञेवरून शारदामणी व त्यांच्या शिष्यांना गाभाऱ्यांत जाऊन रामेश्वराच्या पायास हात लावून दर्शन घेण्याची सवलत मिळाली. कारण रामनाडचा राजा हा स्वामी विवेकानंदांचा शिष्य होता. स्वामी रामकृष्णानंदांनीं मुद्दाम तयार करवून घेतलेली सुवर्णाची बेलाचीं १०८ पानें शारदामणींनीं मोठ्या भक्तिभावानें शिवाला अर्पण केलीं.

नंतर मद्रासमार्गे शारदामणी बंगलोरला गेल्या व तेथील रामकृष्ण आश्रमांत चार दिवस राहून त्यांनीं सर्व आसमंत पवित्र केलें. बंगलोरच्या स्वागताविषयीं स्वतः शारदामणी सांगतात, "मी स्टेशनवर उतरतांच लोकांनीं माझ्यावर फुलांचा अक्षरशः पाऊस पाडला. सर्व रस्ते फुलांनीं भरून गेले होते. या भागांत रामकृष्णांच्या संदेशाचा भरपूर प्रसार झाला असल्यामुळेंच माझ्याबद्दल इतकी आदरभावना व्यक्त झाली."

वाटेंत राजमुंद्रीस गोदास्नानासाठीं एक दिवस व पुरीस दोन दिवस मुक्काम करून शारदादेवी एप्रीलच्या ११ तारखेस कलकत्यास पोंचल्या. स्वामी रामकृष्णानंदांनीं केलेल्या व्यवस्थेवर शारदामणी खुष झाल्या. माताजी कलकत्यास परतल्यावर कांहीं महिन्यांतच स्वामी कालवश झाले. शारदामणींची रामेश्वर-भेट व त्यावेळीं लाभलेली त्यांच्या सेवेची संधि हेंच त्यांच्या आयुष्यांतील शेवटचें महत्कार्य ठरलें.

इ. स. १९१२ च्या नोव्हेंबरपासून पुढच्या जानेवारीपर्यंत त्या काशीस जाऊन राहिल्या होत्या. रामकृष्णांचे सुप्रसिद्ध संन्यस्त शिष्य स्वामी ब्रह्मानंद हे या वेळीं माताजींच्या सेवेसाठीं त्यांच्याजवळ राहिले होते. स्वास्थ्यानें आणि सवडीनें त्यांना सर्व ठिकाणें पाहतां यावींत अशी योजना या प्रवासांच्या वेळीं आंखण्यांत आली होती.

शारदामणींच्या प्रवासाचा हा तक्ता जरी तयार करतां आला तरी प्रत्येक ठिकाणाचा त्यांच्या मनःपटलावर काय ठसा उमटला हें सांगणें तितकेंसें सोपें नाहीं. फक्त एक दोनदाच त्यांनीं आपली प्रतिक्रिया बोलून दाखविली

होती. मंदिरांतील केदारनाथाला पाहून त्या म्हणाल्या होत्या, " हा केदारनाथ व हिमाल्यांतील केदारनाथ यांचा संबंध आहे. याचें दर्शन घेतलें म्हणजे त्याच्याहि भेटीचें श्रेय लाभतें. या मूर्तीत ईश्वर जागृत आहे हें स्पष्ट दिसतें. "

सारनाथास बौद्धधर्मियांनीं बांधलेल्या इमारतींचे अवशेष पाहून कांहीं अमेरिकनांनीं आश्चर्य व्यक्त केलें. त्यांच्याकडे नजर टाकून शारदामणी म्हणाल्या, " यांनींच आपल्या पूर्वजन्मांत या इमारती बांधल्या. परंतु त्याची आतां आठवण न राहिल्यानें त्यांच्याच कर्तृत्वाचें ते आश्चर्य करीत आहेत. "

या सुमारास काशीला रामकृष्णमठामार्फत एका मोफत रुग्णालयाच्या कामास सुरुवात करण्यांत आली. शारदामणींनीं या ठिकाणाला भेट दिली त्यावेळीं त्यांनीं असे उद्गार काढले कीं, " या ठिकाणीं रामकृष्णांचें अस्तित्व भासमान होतें. लक्ष्मीहि येथें रमलेली दिसते. एकंदरीनें हें ठिकाण इतकें आकर्षक आहे कीं मला येथें कायम वस्ती करण्यास खूप आवडेल. "

काशीला आणखी एक उल्लेखनीय प्रसंग घडला. शारदामणी व त्यांच्या बरोबरीच्या मंडळींना सारनाथला जाण्यासाठीं एक घोडागाडी ठरविण्यांत आली. पण ती यावयास उशीर झाल्यानें दुसरी एक गाडी भाड्यानें घेऊन मंडळी निघाली. ठरविलेली गाडी मागाहून आली व त्यांत बसून स्वामी ब्रह्मानंद गेले. परत येतांना शारदादेवींसाठीं योजलेल्या गाडींत त्यांनीं बसावें असें ब्रह्मानंदांनीं सुचविलें. त्यावर त्या म्हणाल्या, " ही दुसरी गाडीहि चांगली आहे. स्वामी ब्रह्मानंदांनींच त्या गाडींतून यावें. " पण सर्वांनीं फार आग्रह केल्यामुळें शारदामणी पूर्वनियोजित गाडींत बसल्या व ब्रह्मानंद दुसऱ्या गाडींत बसले. वाटेंत ब्रह्मानंदांच्या गाडीला अपघात होऊन त्यांना दुखापत झाली. हें पाहून शारदामणी म्हणाल्या, " माझ्यावरचें संकट ब्रह्मानंदांनीं आपल्यावर घेतलें. जर उलट घडतें तर परिणाम फार घोर झाले असते ! "

रामकृष्णांच्या शिष्यमंडळींच्या परिश्रमांमुळेंच शारदामणींना इतकीं ठिकाणें पाहतां आलीं.

एक सामान्य व सुशील यात्रेकरु या दृष्टीनें दिसून आलेली भाविक वृत्ति व निसर्गसौंदर्यानें उचंबळून येणारी त्यांची काव्यि वृत्ति हे त्यांच्या

व्यक्तिमत्त्वांतील दोन पैलू प्रवासाच्या वेळीं स्पष्टपणें प्रगट होत. ईश्वराच्या सान्निध्यांत गेल्याबरोबर या सिद्ध महिलेच्या मनोवृत्ति कशा उन्मीलित होत हें जर आणखी जवळून पाहतां आलें असतें तर त्यांचें वर्णन याहूनहि अधिक यथार्थतेनें करतां आलें असतें !

**कृपेचा पूरः**–इ. स. १८८८ नंतरचें माताजींचें जीवन म्हणजे विश्वशान्तीचा संदेश देणारा एक ज्ञानदीपच भासे. त्यांचा शिष्यपरिवार दिवसेंदिवस वाढत होता. आध्यात्मिक योग्यतेच्या दृष्टीनें या परिवारांत सिद्धांपासून तों अतिसामान्य साधकांपर्यंत सर्व प्रकार दिसून येत. रामकृष्णांचे पूर्णावस्थेस पोंचलेले अनुयायीहि माताजींना गुरुस्थानीं मानीत. फक्त कांहीं ऐहिक सुखप्राप्तीसाठीं त्यांच्या दर्शनास येणाऱ्यांनाहि त्या तितक्याच ममतेनें वागवीत. अंतिम सत्याचें दर्शन घडलेल्या शिष्यांकडे पाहून त्यांना विशेष आनंद वाटे, पण दुर्गुणी माणसांचा त्या कधींहि द्वेष करीत नसत.

" तुमच्या कन्येभोंवतीं इतकीं मुलें जमा होतील कीं त्यांच्या सर्वांच्या गरजा भागविणें तिला शेवटीं कठीण होईल. " हे रामकृष्णांनीं श्यामासुंदरीजवळ काढलेले उद्गार अगदीं सार्थ ठरले. एकदां दर्शनास आलेल्या स्त्रिया दाराबाहेर पडतांच शारदामणी आपल्या शिष्येस म्हणाल्या, " मी फार थकलें आहे. मला थोडा वारा घाल. माझ्या शरीराचा विलक्षण दाह होत आहे. जगांतील पाप व दुःख अगणित आहे. आज चार वाजल्यापासून माणसांची रीघ लागली आहे. समाजांतील हें दुःख मला आतां पाहवत नाहीं. "

एखाद्या स्त्रीस पतीनें मारलें तरी ती त्यांच्याकडे येऊन आपलें मन हलकें करी. कोणी नुसती गाय-वासराची ताटातूट केल्याचें कळलें तरी त्या कष्टी होत.

पति आजारी आहे, मूल मृत्युशय्येवर पडलें आहे, जवळचें प्रेमळ मनुष्य सोडून गेलें आहे, कोणाचें वंध्यत्व फिटावयास हवें आहे, अशा एक ना दोन हजारों व्याधींनीं पीडलेले जीव शारदामणींकडे धांव घेत, कामनापूर्तीसाठीं त्यांची आळवणी करीत. प्रत्येकाचें सान्त्वन करून ईश्वरास शरण जाण्याची शारदामणी त्यास सूचना करीत. कांहीं वेळां त्याहि या प्रार्थनेंत

भाग घेत आणि इतरांसाठीं ईश्वराची करुणा भाकीत. बहुतेक वेळीं देव त्यांच्या हांकेस धांवे.

कांहीं माणसें आपल्या पापांचा पाढा त्यांच्यासमोर वाचून त्यांना दुःखी करून टाकीत. कितीहि पापी मनुष्य असला तरी शारदामणी त्याला आश्रय देत. एकदां एका कुलीन घराण्यांतील स्त्रीच्या हातून अनैतिक वर्तन घडलें. ती माताजींकडे आली, पण त्यांच्या खोलींत पाऊल घालण्याचें धाडस तिला होईना. ती ओक्साबोक्शी रडूं लागली. घडलेल्या सर्व गोष्टी तिनें त्यांना सांगितल्या व मनाची वोंच कशी कमी करावी असें त्यांना विचारलें.

तिची केविलवाणी अवस्था पाहून त्यांचें मन द्रवलें. त्या स्वतः उठून खोलीबाहेर आल्या व तिच्या गळ्याभोंवतीं प्रेमानें हात टाकून तिला म्हणाल्या, "बाई, आंत चल. तुझीं सर्व पापें त्या दयाघनाच्या चरणीं ठेवून त्याची क्षमा माग. मी तुला दीक्षा देते."

शिस्तीचें फाजील स्तोम माजविणाऱ्या एका गृहस्थानें एका शिष्येच्या पूर्वायुष्यांतील गैरवर्तनावर टीका करून तिला आपलें द्वार माताजींनीं बंद करावें असें सुचविलें. पण गोड शब्दांत माताजींनीं त्याला असें उत्तर दिलें कीं हिरमुसलें तोंड करून तो निघून गेला. त्या म्हणाल्या, "माझ्या मुलाचें अंग घाणीनें खराब झाल्यास तें स्वच्छ करून त्याला मांडीवर घेणें हें माझें कर्तव्य नव्हे का?" शारदामणींनीं अशा अनेक पापी जीवांचा उद्धार केला होता.

आपल्या वाईट वृत्ति बदलाव्यात म्हणून कित्येकजण माताजींचा सल्ला मागत आणि ती प्रेमळ माउली सर्वांवर मायेचे पाखरूण घाली. हीन मार्गापासून त्यांनीं अनेकांना परावृत्त केलें. अशा लोकांना त्या दीक्षा देत व आध्यात्मिक शिस्तबद्ध जीवनाची वाट दाखवून देत. पुढचे प्रयत्न ज्याचे त्यानें करावेत असें त्यांचें म्हणणें असे. एखाद्याला भावनांच्या तडाख्यांतून वांचविण्यासाठीं क्वचित् प्रसंगीं त्या आपली सर्व शक्ति पणाला लावीत.

स्वामी शारदानंदाच्या शिष्यानें एकदां त्यांना विचारलें, "शारदामणींचा दीक्षाविधि किती लवकर आटोपतो आणि आपल्याला इतका वेळ कां

लागतो ? " यावर स्वामींनीं उत्तर दिलें, " माताजींच्या नुसत्या स्पर्शांत इतकें सामर्थ्य आहे कीं शिष्य तावडतोब ऐहिकांतून बाहेर पडून अध्यात्माकडे वळतो व ईश्वरानें आपला स्वीकार केला आहे अशी त्याची खात्री पटते. उलट मी दीक्षा दिल्यानंतर शिष्यावर ईश्वरानें कृपा करावी यासाठीं मला प्रथम कांहीं वेळ चिंतन करावें लागतें. "

माताजींचा एक दृष्टिक्षेपहि शिष्याच्या जीवनप्रवाहाची दिशा बदलून टाकण्यास कांहींवेळां पुरेसा असे. अशी अलौकिक आध्यात्मिक शक्ति हीच स्वामी विवेकानंदांच्या मतें मुक्तात्म्यांतील ईश्वरी अंशाची खूण आहे. यामुळेंच माताजींना गुंतागुंतीच्या दीक्षाविधीची फारशी गरज वाटत नसे. या विधीसाठीं स्थलकालाचीहि - त्यांनीं कधीं निवड केली नाहीं. बहुतेक हा विधि त्या देवळांत स्वतःच्या प्रातःप्रार्थनेनंतर उरकीत. कलकत्याच्या घराच्या पडवींत किंवा खेड्यांतील घराच्या सोप्यावरहि अनेकांना त्यांनीं दीक्षा दिली. त्यांना योग्य वाटेल अशी कोणतीहि वेळ त्या या विधीसाठीं मुक्रर करीत. एका शिष्याला दीक्षा देतांना त्यांनीं एका मोकळ्या मैदानावरील सांवलीची जागा पसंत केली होती, तर दुसऱ्या एका वेळीं हा विधि रेल्वे स्टेशनच्या आवारांत छत्रीच्या सांवलींत उरकण्यांत आला. या वेळीं पावसाचें पाणी भांड्यांत धरून त्यांनीं काम भागविलें.

एका प्रज्वलित अग्नीनें अनेक ज्योती पेटवाव्यात त्याप्रमाणें त्यांच्या तपस्येचा संपर्क घडतांच अनेकांत आध्यात्मिक ज्योत उजळूं लागे. माताजींची तेजस्वी प्रज्ञा दीक्षाविधीबावत कोणत्याहि ऐहिक रूढीस महत्त्व देत नसे. उदा. सुतककाल कोणत्याहि शुभ कार्यास वर्ज्य मानला जातो. परंतु माताजी म्हणत, " देहाचीं बंधनें आत्म्यावर लादण्याचें कारण नाहीं. " सुतकांत त्यांनीं अनेकांना दीक्षा दिली आहे. कोणत्याहि बाह्यात्कारी प्रतिकूलतेस न जुमानतां त्यांच्या सात्त्विक प्रेमाचा ओघ कित्येक पाप्यांना पावन करी. देवाचा उपासक कोणत्याहि धर्माचा अगर जातीचा असो, तो पुरुष असो अगर स्त्री असो, त्याची शरणागति प्रामाणिक हवी एवढाच त्यांचा मुद्दा असे. अंतरींची शुद्धता ही बाह्य उपचारांपेक्षां शतपटीनें त्या अधिक महत्त्वाची मानीत.

एखाद्या माणसाला आपला शिष्य म्हणवितांना आपण कोणती

जबाबदारी घेत आहों याची त्यांना पूर्ण कल्पना असे. त्यांच्या शेवटच्या दिवसांत, त्या दिवंगत झाल्यास आपली स्थिति किती करुणास्पद होईल याची कल्पना एका शिष्यानें त्यांना देतांच त्या उत्तरादाखल म्हणाल्या, "माझा एकहि शिष्य जोंपर्यंत अमुक्त स्थितींत आहे तोंपर्यंत माझ्या आत्म्यास शान्ति लाभणार नाहीं. गुरूची जबाबदारी फार मोठी असते. दीक्षा देणें म्हणजे पोरखेळ नव्हे ! शिष्याच्या साध्याची गुरूला सतत चिंता लागलेली असते."

शिष्यांच्या उद्धारासाठीं माताजी दररोज ईश्वराची प्रार्थना करीत. शेवटच्या आजारांतहि रात्रीं दोन वाजतां अंथरुणावर बसून त्या देवाचें नांव घेत असलेल्या आढळत. या वेळीं वास्तविक त्या उठून बसण्याच्याहि स्थितींत नव्हत्या. मध्यरात्रींची त्यांची प्रार्थना पाहून सकाळीं उठल्यानंतर एका शिष्यानें त्यांना विचारलें, "माताजी, रात्रीं आपल्याला स्वस्थ झोंप लागली नाहीं का ?" यावर त्या म्हणाल्या, "कशी येईल ? कित्येक शिष्य फक्त दीक्षा घेतात, पण त्यानंतर नियमानें जप करीत नाहींत. नियमानें तर राहोच, पण एकदांहि ते मनापासून देवाचें चिंतन करीत नाहींत. या सर्वांची जबाबदारी मी पत्करलेली आहे. त्यांच्यासाठीं मी देवाची प्रार्थना करतें आणि त्याला सांगतें, "ईश्वरा, या जगांत अमाप दुःख आहे. ज्यांनीं माझी करुणा भाकली त्यांना या सुखदुःखाच्या भोंवऱ्यांतून सोडव. त्यांना पुनर्जन्म नसावा."

दर्शनाच्या द्वारें अनेक दूरदूरच्या शिष्यांना त्यांचा सहवास घडे. ज्यांनीं त्यांना एकदांहि पाहिलेलें नसे त्यांना त्या देवतारूपानें स्वप्नांत येऊन दर्शन देत. कांहींच्या स्वप्नांत जाऊन त्यांना त्या मंत्र व जप देत. नंतर त्यांच्या प्रत्यक्ष भेटींतहि त्यांना तोच जप मिळे. नुसत्या त्यांच्या स्वप्नांतील दर्शनानें मोठमोठे धोके टळल्याचे अनेक शिष्य सांगत. अशा तऱ्हेचा एक विलक्षण अनुभव बंगालचे सुप्रसिद्ध नट व नाटककार आणि स्वामी रामकृष्णांचे अनुयायी गिरीशचंद्र बोस यांनीं नमूद करून ठेवला आहे. ऐन तारुण्यांत गिरीशचंद्रांना एका भयंकर व्याधीनें ग्रासलें होतें. या वेळीं माताजींनीं देवतारूपानें त्यांच्या स्वप्नांत येऊन त्यांचा रोग बरा केला. यानंतर तीस वर्षांनीं जेव्हां त्यांनीं इ. स. १८९१ त जयरामवाटींत माताजींना प्रथम पाहिलें त्या वेळीं स्वप्नांतील देवतेच्या चेहऱ्याशीं असलेलें त्यांच्या चेहऱ्याचें साम्य पाहून गिरीशचंद्र थक्क झाले.

एका अमेरिकन् मातेलाहि असाच अनुभव स्वामी रामकृष्णांबाबत आला होता. तिच्या तारुण्यांत तिची व रामकृष्णांची भेट साक्षात्काररूपानें झाली. नंतर अनेक वर्षांनीं तिनें जेव्हां रामकृष्णांचा फोटो पाहिला तेव्हां तिला झालेल्या दर्शनांतील रामकृष्णांचा चेहरा आठवून ती चकित झाली.

रामकृष्णांच्या शिष्यत्वाप्रमाणें माताजींचा आशीर्वाद अगदीं सुरुवातीपासून आपल्याला लाभल्यामुळेंच आपली जीवननौका अनेक संकटांतून सुखरूप पैलतीरीं पोंचली असा गिरीशबाबूंना नेहमीं विश्वास वाटे.

**मूर्तिमंत सौहार्द**ः—ज्यांचा पारमार्थिक अधिकार व शिष्यांच्या जीवनावरील नियंत्रण एवढें अमर्याद आहे त्या माताजी इतक्या साध्या व आढ्यताशून्य कशा, हा विचार कोणालाहि क्षणभर मूढ बनवील. या मूर्तिमंत सौजन्यानें कोणत्याहि घटनेचें श्रेय स्वतःकडे कधीं घेतलें नाहीं. ईश्वरीकृपा कोणावर झालेली दिसली कीं तिचें श्रेय त्या रामकृष्णांच्या अलौकिकत्वास देत. रामकृष्णहि सर्व कर्तृत्वाचें श्रेय अशाच प्रकारें कालीमातेच्या कृपेस देत. शारदामणींच्या मतें रामकृष्ण या युगांतील ईश्वरी अवतार होते आणि त्यांच्या एकनिष्ठ सेविका ही माताजींच्या जीवनांतील प्रमुख भूमिका असल्यानें स्वतःच्या जीवनांत जें जें चांगलें घडलें तें रामकृष्णांच्या कृपेनेंच, अशी त्यांची श्रद्धा असे. रामकृष्णांच्या ज्या प्रतिमेची त्या दररोज पूजा करीत त्यांत चैतन्य प्रतीत होतें असा त्यांचा अनुभव होता. पूजेच्या नैवेद्याचें म्हणाहि ते करीत. एखाद्या दिवशीं जर त्यांनीं प्रसाद घेतला नाहीं तर त्याहि उपाशी रहात. इतरांच्या दृष्टीनें ह्यात नसलेले रामकृष्ण शेवटपर्यंत माताजींच्या प्रत्यक्ष सहवासांत असत ही वस्तुस्थिति आहे.

असें लोकविलक्षण श्रद्धामय जीवन जगणाऱ्या माताजी कधीं कोणावर रागावतील ही शक्यताच नव्हती. कोणी कांहींहि मागितलें तरी त्याला त्या नकार देत नसत. एखाद्याच्या बोलण्यांत उघड उघड विरोध दिसत असला तरीहि सत्य सांगण्यासाठीं त्या आपलें तोंड उघडीत नसत. हळूंच सूचना अगर प्रश्नाच्या रूपानें त्या दुसऱ्यास इष्ट विचारावर आणीत. त्यांच्या संभाषणपद्धतीचें सॉक्रेटीसच्या वादविवादपद्धतीशीं खूप साम्य आढळून येतें.

श्रीरामकृष्णांप्रमाणेंच खोट्या स्वाभिमानाचा सर्वस्वी त्याग केलेल्या

शारदामणी म्हणजे सामान्य जनांच्या उद्धारार्थ अवतरलेल्या प्रेममूर्तिच होत्या. आपल्या परिवारांतील प्रत्येक माणसाच्या शरीरस्वास्थ्याविषयीं त्या अतिशय दक्ष असत. आपल्यामुळें कोणाला जेवायला उशीर होऊं नये म्हणून सकाळीं लवकर उठून त्या आपली पूजा-अर्चा आटोपीत. परंतु एखाद्या विशेष प्रसंगीं मात्र सर्वांची गैरसोय झाली तरी त्या उदासीन असत. एकदां कांहीं मंडळी खूप हालअपेष्टा भोगीत त्यांच्या भेटीसाठीं कलकत्त्यास आली होती. त्यांपैकीं एकजण मोठ्या भक्तिभावानें शारदामणींना आपली हकीकत सांगूं लागला. बराच वेळ झाला. सर्वजण जेवणासाठीं खोळंबून बसलीं होतीं. एक तरुण मठवासी शेवटीं त्या पाहुण्यास म्हणाला, " तुम्हांला आणखी कांहीं सांगायचें असेल तर खालीं जाऊन तेथील सिद्ध शिष्यवर्यांशीं बोलत बसा. " हें ऐकतांच माताजी निश्चयी स्वरांत उत्तरल्या, " नाहीं, जीं मंडळी एवढ्या लांबून माझ्या-साठीं येथवर आली आहेत त्यांचें समाधान करणें हें माझें कर्तव्य आहे. रोजच्या गोष्टींना विलंब झाला तरी हरकत नाहीं. "

माताजी सर्वांवर सारखें प्रेम करीत. एखाद्याकडेच त्यांचा विशेष ओढा नसे. त्यांचें हृदय आकाशासारखें विशाल व समुद्रासारखें खोल होतें. तेथें सर्वांना सारखाच प्रवेश मिळे. माताजींचें जयरामबाटींतील घर बांधण्याच्या कामावर अमझद नांवाचा एक मुसलमान मजूर होता. त्याला त्यांनीं व्हरांड्यांत जेवूं घातलें. स्पर्शास्पर्शाच्या रूढ कल्पना उराशीं बाळगणाऱ्या त्यांच्या नलिनी नांवाच्या भाचीनें त्याला वाढण्यास नाखुषी दाखवितांच माताजींनीं स्वतः त्याला वाढलें व त्याचें जेवण झाल्यावर ती जागाहि स्वतः साफ करून टाकली. रागानें नलिनी माताजींना म्हणाली, " आत्या, तूं धर्मबाह्य झालीस. " यावर माताजी उत्तरल्या, " कां ? शरद जसा माझा मुलगा, तसाच अमझदहि माझा मुलगा नव्हे का ? " वरवर पाहणाऱ्याच्या दृष्टीनें या दोघांत केवढा भेद होता ! एक सिद्धावस्थेस पोंचलेला संन्यासी तर दुसरा मोलमजुरी करणारा एक क्षुद्र मनुष्य. पण माताजींच्या समतेंत ऐहिक दृष्टि नव्हतीच.

या समदृष्टीमुळें माताजी आपल्या अगदीं अज्ञानी भक्ताकडेहि सहानु-भूतीनें पाहूं शकत. एकदां त्यांच्या एका शिष्यानें देवीप्रमाणें त्यांची षोडशोप-चारें पूजा करण्याचा आग्रह धरला. माताजी पाय खालीं सोडून व अंगावर

एक शाल लपेटून आपल्या अंथरुणावर बसल्या. प्रथमोपचार झाल्यावर फुलें वाहून त्यानें प्राणायामास आसन ठोकलें. बराच वेळ झाला. माताजी एखाद्या निर्जीव मूर्तीप्रमाणें स्तब्ध होत्या. शेवटीं गोपाल मा तेथें आली आणि त्या शिष्यास रागानें म्हणाली, "तुम्हांला कांहीं कळतें कीं नाहीं? एकाच ठिकाणीं इतका वेळ बसून माताजींना त्रास होईल हें तुमच्या लक्षांत कसें आलें नाहीं? तुमच्या या प्राणायामानें एखाद्या निर्जीव देवतेस प्रसन्न करून घ्यायचें अशी का तुमची समजूत आहे?"

अशाच दुसऱ्या एका प्रसंगीं एका दांडगट शिष्यानें नमस्काराच्या निमित्तानें आपलें डोकें माताजींच्या पायांवर इतक्या जोरानें आपटलें कीं त्यामुळें माताजींच्या पायाला दुखापत झाली. "असें कां केलेंस?" म्हणून विचारतां तो म्हणाला, "मुद्दामच! मी दर्शनाला आलों होतों हें त्यांच्या कायम लक्षांत रहावें म्हणून!"

माताजींकडे कोणीहि माणूस आलें तरी तें विन्मुख परत जात नसे. जेवणाच्या वेळीं आल्यास जेवण व इतर वेळीं कांहीं मिठाई किंवा फळ तरी त्या भेटावयास येणाऱ्याच्या हातावर ठेवीतच! गृहव्यवस्था पाहणारी गोपाल मा कांहीं वेळीं या अनपेक्षित पाहुण्यांमुळें अगदीं गोंधळून जात असे.

शहरीं वातावरणांत माताजींच्या दातृत्वास पुष्कळ वेळां आपोआपच लगाम बसे. पण जयरामवाटींत मात्र कोणीहि गेल्यास त्या त्याला खूप आग्रहानें दोन चार दिवस ठेवून घेत. कारण जयरामवाटीचा प्रवास किती दगदगीचा होता याची त्यांना कल्पना होती. त्या विनोदानें म्हणत, "गया किंवा काशीची यात्रा एक वेळ सोपी, पण जयरामवाटीचा प्रवास कठीण!"

माताजींची आतिथ्याची कल्पनाहि किती विलक्षण! थकूनभागून आलेल्या प्रवाशास वारा घालणें किंवा त्याच्या पायांवर पाणी घालण्यांतहि त्यांना कमीपणा वाटत नसे. अशा वेळीं भक्तांनीं कितीहि विरोध केला तरी त्याचा कांहीं उपयोग होत नसे. त्या म्हणत, "खरें पाहिलें तर मी तुमच्या-साठीं काय केलें आहे? मुलांसाठीं आईनें तसदी घेतली तर त्यांत वावगें काय आहे?" आपल्या घरीं आलेल्या उपासकांच्या जेवणाखाणाची व्यवस्था त्या

जातीनें पहात. कोणासाठीं सकाळीं उठून दूध आणावें लागे तर कोणासाठीं एक कप चहाची सामुग्री जमवावी लागे. त्यांच्याकडे आल्यावर कोणी आजारी झाल्यास त्या जातीनें त्याची सेवा करीत, त्याच्यासाठीं आलोचन जागरणें करीत.

रामकृष्णांच्या एका उपासकास एकदां अशी शंका आली कीं माताजी स्वामी शारदानंदांना जें जेऊं घालतात तें आपल्याला घालीत नाहींत. माताजींनीं त्याचें मन ओळखलें. त्या रात्रीं त्यांनीं शारदानंदांबरोबरच त्या शिष्यास जेवावयास वाढलें. परंतु रात्रभर त्याला अपचनाचा त्रास झाला. दुसरे दिवशीं त्याला पटलें कीं ज्याच्या प्रकृतीस जें खाणें इष्ट तेंच माताजी त्यास घालतात. यांत भेदभावाचा प्रश्न नसतो.

जयरामवातीसारख्या ठिकाणीं फारशा वस्तु मिळत नसल्यामुळें इच्छा असूनहि आपल्या भक्तांचें आदरातिथ्य मनाजोगें करणें माताजींना शक्य होत नसे. शारदानंद कलकत्त्याहून नेहमीं त्यांच्यासाठीं मिठाई व फळफळावळ पाठवीत. त्यापैकीं गांवच्या देवीपुढें ठेवण्यासाठीं त्या कांहीं भाग पाठवीत. उरलेल्यापैकीं नातेवाईक व शेजारीपाजारी यांना कांहीं भाग वांटून बाकीची मिठाई व फळें आल्यागेल्यांना देण्यासाठीं त्या राखून ठेवीत.

आलेल्या सर्वांना जेऊं घातल्यानंतर माताजी जेवीत. कितीहि उशीर झाला तरी त्या पाहुण्याच्या आधीं जेवीत नसत. एकदां असाच एक तरुण शिष्य सकाळीं बाहेर गेला. तो दुपार टळून गेल्यानंतर घरीं आला. त्याचें जेवण राहिलें म्हणून माताजीहि जेवल्या नाहींत. त्या वेळीं त्या आजारी होत्या तरी त्यांनीं आपल्या या परिपाठांत बदल केला नाहीं. त्या शिष्याला जेव्हां हें समजलें तेव्हां तो म्हणाला, "प्रकृति बरी नाहीं म्हणून तरी आपण वेळेला जेवून घ्यायला हवें होतें?" यावर माताजींनीं उत्तर दिलें, "तुझें जेवण झालें नाहीं तर मी तरी कशी जेवणार?" यावर तो निरुत्तर झाला. जन्मदात्या आईच्या प्रेमाची जग स्तुति करतें. पण ती आईसुद्धां आजारी असल्यास मुलासाठीं दिवसभर उपाशी राहील असें वाटत नाहीं. ऐहिक हेतूंनीं प्रेरित झालेलें कोणतेंहि प्रेम माताजींच्या प्रेमापुढें फिकें पडेल.

आलेली कोणतीहि व्यक्ति परत जाण्याची वेळ आली कीं माताजी

अस्वस्थ होत. निरोप देण्यासाठीं पाहुण्यांबरोबर कांहीं अंतर चालून गेल्यानंतर त्या थांबत व मंडळीं दिसत नाहींशीं होईतों भरलेल्या नजरेनें त्यांच्याकडे पहात रहात. यामुळें माताजींपासून दूर जाणें प्रत्येकास अवघड वाटे. त्यांच्या दर्शनास आलेल्या प्रत्येक माणसाच्या मनावर त्यांच्या या दिव्य प्रेमाचा कायमचा ठसा उमटे.

जयरामवाटीस जाऊन माताजींचें दर्शन घेण्याची सुसंधि ज्यांना लाभली त्यांना अध्यात्माच्या मार्गाचा शोध लागला. त्यांचें नुसतें स्मरण आयुष्याचा मार्ग उजळून काढी. अनेकांना माताजींच्या चेहऱ्यांत आपल्या जन्मदात्या पण लहानपणींच निवर्तलेल्या आईशीं असलेलें साम्य प्रतीत होई. इंद्रियांच्या पलीकडील अनुभव सिद्ध करण्यास आज शास्त्रीय साधनें उपलब्ध नाहींत, पण त्यांचें सत्यत्व नाकारणेंहि अशक्य आहे. ज्यांना ज्यांना माताजींचा सहवास लाभला त्या सर्वांना माताजींभोंवतीं असलेलें विश्वमातेचें तेजोवलय जाणवें. त्या कलकत्त्यांत असोत अगर जयरामवाटींत असोत, त्यांची ऋजुता, प्रेम, स्फटिकासारखें स्वच्छ अंतःकरण व मातृभाव सर्व आसमंत भरून टाकी.

माताजींच्या गोडव्यांत अज्ञानाचें अंधत्व नव्हतें. त्यांची बुद्धि अतिशय कुशाग्र व विशाल होती. त्यांच्यापुढें प्रश्न येण्याचा अवकाश कीं त्याचें बिनतोड उत्तर त्या एका क्षणांत देत. अशा वेळीं त्यांच्या अभिजात बुद्धीचें विलोभनीय दर्शन घडे. त्यांच्या उपदेशांतून सर्व विश्वाचा विचार व तत्त्वज्ञान प्रकट होई. शब्द साधेच, पण आशय मोठा ! आत्मविश्वास जबर, पण कथनपद्धति अतिशय नम्र !

माताजींचें हृदय हळुवार असलें तरी त्यांच्यांत भावनोद्रेक कधीं दिसत नसे. मेणाहून मऊ असलेल्या माताजी जरूर पडल्यास वज्राहून कठोर होऊं शकत. समोरचा मनुष्य कितीहि ग्वबलेला असला तरी तो त्यांच्या एका दृष्टिक्षेपानें नरमे.

हरीश नांवाच्या स्वामी रामकृष्णाच्या एका उपासकास वेड लागलें. या वेळीं शारदामणी त्यांच्या कामारपुकूरच्या घरांत रहात होत्या. काय मनांत आलें कोण जाणे, हरीश त्यांना पकडण्यासाठीं त्यांच्यामागें धांवूं लागला कोठीच्या खोलीभोंवतीं पुढें माताजी व मागें हरीश असें दोघे पळत होती.

सात फेऱ्या झाल्यानंतर कांहीं विशेष विचार करून माताजी थांबल्या. त्यांनी हरीशला खालीं पाडून त्याच्या छातीवर गुडघा टेवला व फडाफड त्याला तोंडांत मारण्यास सुरुवात केली. हा मार शेवटीं असह्य होऊन तो धापा टाकूं लागला.

निर्मिती आणि नाश या परस्परविरोधी शक्ति निसर्गात कशा एकरूप झालेल्या आहेत हें गूढ उकलणें जेवढें कठीण तेवढेंच माताजींच्या स्वभावांतील प्रेम व कठोरता हें ध्रुव कळणें कठीण होतें.

स्वामी रामकृष्णांचे अत्यंत बुद्धिमान् व पूर्णत्वास पोंचलेले शिष्यहि माताजींपुढें विनम्र होत या एकाच गोष्टीवरून त्यांच्या असामान्यत्वाची कल्पना येते. इ. स. १८९७ सालीं युरोपहून परत आल्यावर स्वामी विवेकानंद माताजींच्या दर्शनासाठीं निघाले. पण वाटेंत त्यांना इतकें मनोवैकल्य आलें कीं अनेक वेळां गंगेच्या पाण्याचे घोट घेऊन त्यांना आपलें मनोधैर्य वाढविण्याचा प्रयत्न करावा लागला. पाश्चात्य देशांत वास करीत असतांना मनांत प्रसंगोपात्त निर्माण झालेली अपवित्रता साफ धुऊन काढल्याखेरीज माताजींसमोर उभे राहणेंहि आपल्याला अशक्य होईल ही एकच कल्पना त्यांना सारखी अस्वस्थ करीत होती.

माताजींचा आशीर्वाद पाठीशीं होता म्हणूनच स्वामींना पाश्चात्य देशांत भारतीय तत्त्वज्ञानाचा प्रसार करण्याचें महत्कार्य करतां आलें ही गोष्ट प्रथम नमूद करावयास हवी. स्वामी ब्रह्मानंदासारखा थोर सिद्ध पुरुषहि माताजींच्या दर्शनास गेल्यावर थरथर कांपे व त्यांचें अंगास दरदरून घाम सुटे. देवतेसमोर उभे राहतांच भक्ताची जी अवस्था होते तशीच अवस्था शारदामणींच्या दर्शनाच्या वेळीं या मोठमोठ्या स्वामींची होई.

विशुद्धतेची मूर्ति म्हणून समजले जाणारे स्वामी प्रेमानंद माताजींच्या समोर एखादा लहान बालकाप्रमाणें भासत. स्वामी योगानंदांनीं माताजींची सेवा हीच आपल्या आयुष्याची इतिकर्तव्यता मानली होती. योगानंदांच्या मृत्यूनंतर त्या नेहमीं म्हणत, " योगेनचें माझ्याविषयींचें प्रेम अपूर्व होतें. त्याला कोणी आट आणे दिले तरी माझ्या यात्रेच्या वेळीं उपयोगी पडतील म्हणून तो ते जपून टेवी. " स्वामी शारदानंदांचें माताजींवरील प्रेमहि असेंच अतुलनीय होतें.

माताजींना कसलीहि ददात नसावी म्हणून ते अविश्रांत धडपड करीत. त्या म्हणत, " शरद आहे तोंपर्यंत मला कसलीच काळजी नाहीं. त्याच्यानंतर माझी अशी काळजी कोण घेईल कोण जाणें ! " स्वामी शारदानंदांची अशी दृढ श्रद्धा होती कीं माताजींच्या परिसरांतील प्रत्येक वस्तूला एक विशेष पावित्र्य प्राप्त होतें. त्यांचे नातेवाईकच काय, पण जयरामवाटींतील जनावरां-बद्दलहि शारदानंद विशेष आदर दाखवीत. स्वामी रामकृष्णानंद, स्वामी अद्‌भुतानंद, स्वामी शिवानंद व रामकृष्णांचे इतर अनेक थोर शिष्य शारदा-मणींना ईश्वरस्वरूप मानीत. असें असलें तरी शारदामणी मात्र स्वतःस स्वामी रामकृष्णांच्या एक नम्र शिष्या समजत. स्वतःचा संसार नसूनहि दिवसांतील ठराविक वेळ त्या गृहकृत्यांत घालवीत. भांडीं घासणें, स्वयंपाक करणें, भाजी निवडणें, झाडून काढणें इतकेंच काय पण शेतीचें काम करतांनाहि त्यांना अनेकांनीं पाहिलें आहे. हीं सर्व कामें त्यांना कोणी सांगत नसत, पण त्या स्वयंस्फूर्तीनेंच करीत. कर्मयोगाचा मूर्तिमंत आदर्श अशा माताजी प्रवृत्ति आणि निवृत्ति यांचा समन्वय सर्व हयातभर जगास दाखवीत होत्या.

रामकृष्णांच्या पत्नी असल्या तरी अत्यंत पवित्र आणि निर्मळ मनाच्या संन्यासिनीचें जीवन त्या जगल्या. त्यांना मूल नसलें तरी शेंकडों भक्तांच्या माता म्हणून जग त्यांना ओळखतें. घरदार नसूनहि जेथें त्या राहतील तेथें अनेक लेकरांची ही माता अक्षरशः गोकुळ निर्माण करीत असे. मानवी अपूर्णता व आध्यात्मिक पूर्णता यांचें मीलन शारदामणींच्या जीवनात स्पष्ट दिसतें. आपल्या नातेवाईक मंडळींबद्दल माताजी जी ओढ दाखवीत ती पाहून त्यांच्या शिष्यांना अचंबा वाटे. मरेपर्यंत आपल्या जयरामवाटीच्या घराविषयी त्या काळजी व्यक्त करीत.

शारदामणींना एकूण चार भाऊ होते — प्रसन्नकुमार, कालीकुमार, वरदाप्रसाद व अभयचरण. शारदामणी सर्वांत मोठ्या असल्यानें या सर्व भावांना त्यांनीं वाढविलें होतें. ते सर्व वर्तेसवरते झाले, त्यांचे विवाह झाले तरी शारदामणींवर त्यांची मदार असे. इ. स. १९०६ मध्यें माताजींची आई निवर्तल्यानंतर तिची जागा त्या घरांत माताजींनींच भरून काढली. सर्वांत धाकटा अभयचरण वगळल्यास वरचे तिघे भाऊ अगदीं सामान्य वृत्तीचे होते.

वारीकसारीक गोष्टींवरून त्यांची नेहमीं भांडणें चालत. सर्वांचेंच कर्तृत्व बेताचें असल्यानें मोठ्या वहिणीच्या मर्जीनें वागून तिच्याकडून जेवढा लभ्यांश साधतां येईल तेवढा साधण्याचा ते सर्वजण प्रयत्न करीत. द्वेष आणि मत्सर यामुळें हे सर्व भाऊ सहकुटुंब एकत्र राहणें अशक्य झालें. वडिलार्जित संपत्तीच्या समाधानकारक वांटणीची करण्याची जबाबदारी माताजींनीं शारदानंदांवर सोंपविली. त्याप्रमाणें हे सर्व भाऊ वेगळे झाले. तरीसुद्धां माताजींकडून, कोणाला काय मिळतें याविषयीं त्यांची नेहमीं कुरबूर चालूच असे. अशा वर्तनानें आपण आपल्या देवतातुल्य वहिणीस किती यातना देतों हें कोणाच्याहि लक्षांत येत नसे.

माताजी जयरामबातीस असतांना त्या घरकामांत भावजयांना खूप मदत करीत. आई हयात असेतों सर्व सुना तरुण होत्या. सर्वांना कामांत हातभार लावून शिवाय त्यांचीं मुलेंहि माताजी सांभाळीत. प्रसन्नकुमारच्या प्रथम पत्नीपासून झालेल्या नलिनी व माकू या दोन मुली तर आई वारल्यानंतर सर्वस्वी माताजींच्याच अंगावर पडल्या. या दोघी मोठ्या होऊन लेकुरवाळ्या झाल्या तरीहि आत्याचा त्यांना विलक्षण लळा होता. कालीकुमारचा मुलगा भूदेव हाहि इतर शिष्यांबरोबर बराच काल माताजींच्या सहवासांत होता.

माताजींच्या परिसरांतील आणखी दोन नातेवाईक मंडळींचा येथें उल्लेख करणें आवश्यक आहे. भावंडांपैकीं सर्वांत लहान भाऊ अभयचरण हा माताजींचा फार आवडता होता. वैद्यकीचा उच्च अभ्यास करीत असतांनाच इ. स. १८९९.त त्याला मृत्यु आला. यावेळीं त्याची पत्नी सुरबाला गरोदर होती. मृत्यूपूर्वीं आपल्या तरुण पत्नीचा व होणाऱ्या मुलाचा वहिणीनें सांभाळ करावा अशी अभयचरणनें माताजींना विनंती केली. दिलेल्या शब्दाला त्या शेवटपर्यंत जागल्या. पतीच्या मृत्यूनंतर सुरबालेला थोड्याच दिवसांनीं वेड लागलें. यांतच तिला मुलगी झाली. पण मुलीचा सांभाळ करण्याच्या दृष्टीनें ती अगदींच निरुपयोगी झाली होती. अर्थात पहिल्या दिवसापासून स्वतःच्या मुलीप्रमाणें माताजींना त्या मुलीचा सांभाळ करणें भाग पडलें. या मुलीचें नांव राधाराणी असें ठेवण्यांत आलें. प्रचारांत तिला सर्वजण राधू उर्फ राधी या नांवानें संबोधीत. माताजींना तिजबद्दल फार ओढा वाटे. रात्रंदिवस त्या तिची कशी काळजी घेत हें पाहून त्यांच्या सर्वच शिष्यांना

फार आश्चर्य वाटे. स्वामी ब्रह्मानंद, स्वामी शारदानंद व त्यांच्या तोडीचे सिद्ध शिष्य मात्र ओळखून होते कीं राधूच्या ओढीमुळेंच शारदामणी ऐहिक जीवन दीर्घकाळ जगूं शकल्या, नाहींतर त्यांच्या मुक्त आत्म्यानें नश्वर देहाचा केव्हांच त्याग केला असता.

राधूच्या जन्मापूर्वीं कित्येक वर्षें माताजींना रामकृष्णांकडून एक संदेश मिळाला होता. यासंबंधीं कांहीं शिष्यांजवळ बोलतांना त्या म्हणाल्या होत्या, " रामकृष्णांच्या निर्याणानंतर मला सर्व जग शून्यवत भासूं लागलें. कशांतहि मन रमेना. मी एकसारखी प्रार्थना करी, " ईश्वरा, आतां जगण्या-सारखें काय उरलें आहे ? " असें मनांत घोळत असतांनाच एकदां रामकृष्ण प्रगट झाले व त्यांनीं माझ्यापुढून जाणाऱ्या लाल वस्त्र नेसलेल्या एका दहा-बारा वर्षांच्या मुलीकडे बोट दाखवून मला सांगितलें, " ऐहिक जीवनाचा आधार म्हणून हिला जवळ कर, म्हणजे इतरहि शेंकडों शिष्य तुझ्या आस-पास जमा होतील. " हा संदेश मिळाला तेव्हां ही मुलगी कोण याचा उलगडा झाला नाहीं. पण पुढें एकदां असें झालें कीं राधूची वेडी आई चिंध्या फाडीत बसली असतां राधू रांगत तिच्याकडे जाऊं लागली. आई तिला घेईना. तें पाहून माझ्या मनांत आलें, " मी जर या पितृहीन मुलीला जवळ केलें नाहीं तर हिचा सांभाळ कोण करील ? " मी चटकन् तिला उचललें. याच वेळीं रामकृष्ण प्रगट झाले व म्हणाले, " मी पूर्वीं दाखविलेली मुलगी हीच ! ही योगमाया आहे. त्यामुळें ऐहिक जीवनांत तुला हिचा आधार घेतां येईल. "

वरील हकीकतीवरून शारदामणी योगमायेचा सांभाळ करीत असतांना मातृत्वाच्या परमसुखाचा कसा आस्वाद घेत असतील याचा उलगडा होतो. रात्रंदिवस त्या राधूच्या सहवासांत असत. तिच्याशिवाय त्याना जेवण जात नसे कीं झोंप येत नसे. तब्बल वीस वर्षें या उच्छृंखल मुलीचा तापटपणा व तिच्या आईचे वेडेचार माताजींनीं सहन केले. यांच्या आयुष्यांतील या एकाच घटनेवरून त्यांची पराकोटीची सहनशीलता सिद्ध होते.

वेडाच्या भरात सुरबाला अनेक वेळां माताजींना मर्मभेदक वाक्ताडन करी. राधूबद्दल माताजी दाखवितात ती ओढ खरी नसून आई व

मुली यांची ताटातूट करण्याचा तो एक डाव आहे असा उघड आरोप अनेक मंडळींसमोर ती माताजींवर करी. राधू आजारी पडल्यास औषधपाणी सुरू केलें कीं सुरवातीला वाटे, माताजी तिजवर विषप्रयोगच करीत आहेत ! अशा वेळीं ती रागानें बेभान होई. आपल्या मृत भावाची स्मृति सतत डोळ्यांसमोर ठेवून माताजी शान्त मनानें हा सर्व छळ सहन करीत. एका कठोर शब्दानेंहि त्यांनीं सुरवातीला कधीं प्रत्युत्तर दिलें नाहीं. तिच्या अविचारी वर्तनाचा उल्लेख करतांना त्या म्हणत, "मी शिवाची पूजा करतांना कदाचित् त्याला कांटे असलेलें बिल्वदळ वाहिलें असेल ! म्हणून माझ्या जीवनांत हा कांटा मला रुपतो आहे."

राधू प्रकृतीनें अशक्त असल्यामुळें मनानेंहि अस्थिर वृत्तीची होती. आईसारखी ती अतिशय तापट होती. भावनेच्या भरांत ती हवा तो अविचार करीत असे. लग्नानंतरहि अनेक बाबतींत ती माताजींवर अवलंबून असे. माताजींच्या अलोट प्रेमाच्या बदल्यांत तिच्याकडून त्यांना एक गोड शब्दहि मिळत नसे. अगदीं बारीक सारीक काल्पनिक कारणांनींहि ती अस्वस्थ होई व आपल्या उद्रेकाचें अप्रस्तुत प्रदर्शन करी. अशा वेळीं माताजींवर ती हवेंतसें तोंडसुख घेई. माताजींसारख्या देवतेचा सात्त्विक सहवास सतत लाभूनहि राधूच्या मनावर त्याचा काडीइतकाहि परिणाम झाला नाहीं. उलट वयोमानानें तिचें गैरवर्तनच वाढलें.

इ. स. १९१९ मध्यें वारंवार मलेरियाचा ताप येऊन माताजी अतिशय अशक्त झाल्या. यावेळीं त्यांचा मुक्काम कोआलपाऱ्याच्या जगदंबाश्रमांत होता. याच ठिकाणीं मे महिन्यांत राधूला मुलगा झाला. प्रसूतीनंतर सहा महिने झाले तरी उठून उभे राहण्याची ताकदहि तिला राहिली नाहीं. त्यांतच तिला अफूचें व्यसन जडलें. एके दिवशीं माताजी भाजी चिरत बसल्या असतांना खुरडत खुरडत राधू त्यांच्यापाशीं गेली व अफूसाठीं पैसे मागूं लागली. तिच्या या व्यसनाची माताजींना शिसारी येऊं लागली होती. त्या जरा चढत्या आवाजांत तिला म्हणाल्या, "बस झाली आतां अफू ! तुझ्या असल्या गुणांनीं तुझा सांभाळ करणें दिवसेंदिवस मला अशक्य होत आहे. तुझ्यासाठीं मी कमा व किती खर्च करतें याची तुला कल्पना तरी आहे का ?" हें ऐकून राधूला

संताप आला व त्या भरांत एक मोठें वागें माताजींच्या पाठींत मारून तिनें त्यांना जखमी केलें. समोर रामकृष्णांची तसवीर होती. पाठींतली कळ दाबून त्या फोटोसमोर नम्र झाल्या व म्हणाल्या, "ईश्वरा, राधूला क्षमा करा, तिला कळत नाहीं म्हणून ती अशी वागते!" राधूच्या कपाळास थोडी पदरक्षा लावून त्यांनीं तिला उपदेशपर चार शब्द सांगितले. "राधी, स्वत: रामकृष्णांनीं *एका शब्दानेंहि मला कधीं दुखविलें नाहीं आणि तूं मला किती यातना देतेस!* माझी भूमिका तुला कशी समजणार? तुमच्यांत राहून मी सदोदित तुमचे कष्ट उपसते म्हणून माझी खरी किंमत तुम्हांला समजत नाहीं." माताजींच्या या शब्दांनीं राधूला तात्पुरता पश्चात्ताप झाला व ती रडूं लागली.

अशा रीतीनें आयुष्याचीं वीस वर्षें माताजींनीं भावाच्या संसाराचें ओझें आपल्या शिरावर पेललें. असें असूनहि या काळांत त्यांची साधना चालूच राहिली. परिचयांत येणाऱ्या गरजू व दुःखी जीवावर त्या अलोट प्रेम करीत, दीक्षा देत. एकीकडे राधूसारख्या दुर्गुणी मुलीसाठींहि जीव पाखडीत. हें पाहिलें म्हणजे गरुडाची भरारी घेणारें माताजींचें मन पृथ्वीतलावर कसें विसावतें याचें आश्चर्य वाटतें. सर्वसामान्य माणसास या अथांग प्रेमसागराच्या अंतरंगाची कल्पनाच येणार नाहीं.

जीं सामान्य माणसें माताजींकडे निव्वळ त्यांना बघण्याच्या औत्सुक्यानें जात, त्यांच्यापासून दूर राहण्यासाठीं कौटुंबिक कर्तव्यांचा मुखवटा माताजींना उपयोगी पडे. इ. स. १९१९ मध्यें माकूचा छोटा मुलगा वारला. या वेळीं अगदीं सामान्य स्त्रीप्रमाणें माताजींनीं शोक केला. पण रोजच्या प्रार्थनेसाठीं मंदिरांत शिरतांच या दुःखाचा लेशहि त्यांच्या चेहऱ्यावर दिसत नसे. ही गोष्ट फक्त त्यांच्या निकटवर्ती शिष्यांच्याच लक्षांत येई.

माताजी कौटुंबिक जीवनांत गुरफटलेल्या पाहून योगीन माधुद्यां एकदां साशंक झाली. गंगेच्या कांठावर बसून विचार करतांना तिला वाटलें, "रामकृष्ण निवृत्तीचे मूर्तिमंत प्रतीक होते. माताजी मात्र रात्रंदिवस भावंडें, भावजया आणि त्यांचीं मुलें यांचाच विचार करतांना दिसतात. याचा अर्थ काय समजावा?" हे विचार तिच्या मनांत घोळत असतांना रामकृष्ण

तेथें प्रकटले. वारेंत लडबडलेलें, प्रवाहांतून वहात चाललेलें एक मूल तिला दाखवून ते म्हणाले, " या मुलाच्या घाणीनें गंगेचें पाणी अशुद्ध होतें का? तसेंच माताजींचें आहे. वरवर पाहणाऱ्यांच्या दृष्टीनें जरी त्या संसारांत घोळत असल्या तरी कमलपत्राप्रमाणें त्यांच्या अंतःकरणास कांहींच शिवत नाहीं. मी आणि त्या एकरूप आहोंत."

यानंतर मात्र माताजींची थोरवी योगीन माच्या मनावर कायम ठसली. माताजींच्या शेवटच्या आजारांत याची प्रचीति सर्व शिष्यांस आली. या वेळीं त्यांनीं आपले सर्व ऐहिक पाश एकदम दूर केले. अनंताशीं एकरूप होण्याची त्यांनीं एका क्षणांत सिद्धता केली.

*निर्याण*:—इ. स. १९१८ पासून राधूच्या काळजीनें माताजींचें मन पोखरून गेलें होतें. इ. स. १८१९ च्या जानेवारी महिन्यांत राधूला घेऊन त्या कोआल्पाऱ्याच्या जगदंबाश्रमांत गेल्या. राधूचे दिवस भरून प्रसूतीचा समय जवळ आलेला होता. या ठिकाणीं त्यांचे सहा महिने राधूच्या व तिच्या मुलाच्या शुश्रूषेंत गेले. जुलैमध्यें त्या दोघांना घेऊन माताजी जयरामवातीस गेल्या. मुलासहित कलकत्त्याचा प्रवास करण्याइतकी दोघांची प्रकृति ठीक झाली कीं त्यांना पाठवावें असा माताजींचा मानस होता. वर्षभराच्या परिश्रमानें त्यांना विलक्षण थकवा वाटूं लागला. त्यांतच त्यांना वारंवार हिंवताप येऊं लागला. डिसेंबरच्या १९ तारखेस त्यांचा वाढदिवस होता. त्या दिवशीं त्यांची प्रकृति फारच चिंताजनक झाली. ' काळा-ताप ' या नांवानें ओळखला जाणारा आजार त्यांना झाला. इ. स. १९२० च्या फेब्रुवारींत औषधोपचारासाठीं त्यांना कलकत्त्यास आणण्यांत आलें. अस्थिचर्म राहिलेल्या माताजींवर नामवंत डॉक्टर्स उपचार करूं लागले. पण दिवसेंदिवस त्या अधिक क्षीण होत चालल्या. इतकें झालें तरी त्यांचा सर्व वेळ इतरांची विचारपूस करण्यांतच जाई. स्वतःच्या आजाराबद्दल त्या पूर्ण बेफिकीरी दाखवीत. डॉक्टर आले तरी त्यांची विचारपूस करून कांहींतरी खाल्ल्याखेरीज त्या त्यांना जाऊं देत नसत. रात्रीं अंथरुणावर पडल्यावर झोंप घेण्याऐवजी मध्यरात्रीपर्यंत चिंतन व शिष्यांच्या यशासाठीं त्या प्रार्थना करीत.

जयरामवातीहून कलकत्त्यास येत असतांनाच माताजींनीं सर्वांस सांगून

टाकलें कीं यापुढें राधू अगर इतर कोणाहि नातेवाईकांत माझें मन गुंतणार नाहीं. हें ऐकून सर्वांनाच धक्का बसला. कांहीं शिष्यांच्या मार्फत स्वामी शारदानंदांनीं राधूची व नातेवाइकांची बाजू घेऊन माताजींनीं त्यांना दूर करूं नये अशी त्यांची विनवणी करण्याचा प्रयत्न केला. पण माताजींनीं सर्वांना एकच उत्तर दिलें, " एकदां दूर केलेली वस्तु पुन्हां जवळ करतां येत नाहीं शरद !" माताजींचा हा निर्णय त्यांचें निर्याण जवळ येत असल्याचेंच चिन्ह आहे अशा समजुतीनें पुष्कळांच्या अंतःकरणानें ठाव सोडला. कारण राधू ही योगमाया आहे असें रामकृष्ण वदले होते. मायेंतून मुक्तता म्हणजे जीवनांतून मुक्तता असाच सर्वांनीं अर्थ लावला.

निर्याणापूर्वीं पांच दिवस एक वृद्ध शिष्या माताजींना भेटावयास आली होती. त्यांची अवस्था पाहून तिला रडूं कोसळलें. केविलवाण्या स्वरांत ती म्हणाली, " माताजी, आपल्या मागें आमचें कसें होणार ?" क्षीण स्वरांत तावडतोब उत्तर आलें, " तुम्ही कां काळजी करतां ? तुम्ही तर प्रत्यक्ष रामकृष्णांना पाहिलें आहे ! खरें सांगूं ? ज्याला मनःशान्ति मिळवावयाची आहे त्यानें इतरांतील दोष शोधीत बसूं नये. स्वतःतील उणीवा शोधून त्या सुधाराव्यात. कोणालाहि परकें मानूं नये. सर्वांवर आपल्या लेकरांप्रमाणें प्रेम करावें. "

माताजींचे हे शब्द म्हणजे नुसतें कोरडें ब्रह्मज्ञान नव्हतें. ज्यांनीं या तत्त्वाचें आचरण हयातभर केलें त्यांचे ते अनुभवाचे बोल होते. जें जीवन माताजी जगल्या त्याच जीवनाची शिकवण त्यांनीं इतराना दिली. एका शिष्येजवळ काढलेले वरील उद्गार म्हणजे त्यांनीं सर्व मानवतेला दिलेला शेवटचा संदेश होता. अविश्वास, द्वेष, मत्सर यांनीं पीडलेल्या आजच्या समाजाला नवजीवनाची वाट दाखविणारा हा उपदेश लाख मोलाचा नाहीं असें कोण म्हणेल ?

इ. स. १९२० सालची जुलैची २० तारीख उजाडली. रात्रीं १ वाजून ३० मिनिटांनीं उशाशीं बसलेल्या स्वामी शारदानंदांना माताजी म्हणाल्या, " शरद, मी जातें. " योगेन, गोलाप वगैरे मंडळी मागें आहेत. त्यांची काळजी घे. " एवढें बोलून माताजींची प्राणज्योति त्यांच्या नश्वर देहांतून निघून अनंतांत विलीन झाली.

## उपसंहार

एकोणिसाव्या शतकांत सुरू झालेलें एक अद्‌भुत नाट्य संपलें. ज्यू लोक जगाला वांचविण्यासाठीं ज्या परमेश्वरी अवताराची वाट पहात होते त्या येशू ख्रिस्ताची उपमा रोमाँ रोलाँनें स्वामी रामकृष्णांना दिली, ती तितक्याच यथार्थतेनें माताजींनाहि लागू पडते. माताजींच्या अंतरंगानें विश्वाचा ठाव घेतला होता. त्यांच्या रूपानें विश्वशक्तिच वावरत होती. या दोन संतांनीं ज्या पति-पत्नीच्या भूमिका केल्या त्या रूढिबद्ध हिंदु वैवाहिक जीवनाशीं तंतोतंत जुळल्या होत्या ही एक आश्चर्याचीच गोष्ट म्हणावी लागेल.

वैदिक वाङ्मयांतील अद्वैताच्या कल्पनेनुसार एक सत्तत्त्व ब्रह्म दोन वेगवेगळ्या रूपांत प्रकट होतें. परा आणि अपरा प्रकृतीनें मंडित ईश्वर विश्व रचतो. पराप्रकृति ईश्वराची-अपेक्षकाची भूमिका सिद्ध करते तर अपरा प्रकृति द्रव्यांचा संयोग-वियोग घडवून आणणारी गतिमान् बाजू दाखविते.

हें दर्शनी द्वित्व हिंदु तत्त्वज्ञानानें शिव व शक्तीच्या दोन अंगांनीं प्रकट केलें आहे. शिव हा द्रष्टा तर शक्ति ही दृश्य. पहिला निश्चल व निरंतर चिंतनमग्न तर दुसरी साऱ्या विश्वाची निर्मिति, धारणा व नाश या व्यापांत गढलेली. दोन्हीं एकाच तत्त्वाचीं दृश्य रूपें. शिव या तत्त्वाचें परमोच्च स्वरूप दाखवितो तर शक्ति विश्वनियंत्या मायेचें रूप प्रकट करते. वेगळ्या शब्दांत सांगावयाचें झाल्यास निरंतर आकर्षक अशा नारायणस्वरूप सत्तत्त्वाची शक्तिस्वरुप लक्ष्मी सतत भक्ति करते. शेंकडों हिंदूंची अशी श्रद्धा आहे कीं राम व सीता किंवा कृष्ण आणि राधा हीं नारायण-लक्ष्मीचींच स्वरूपें आहेत. त्याचप्रमाणें रामकृष्ण व शारदामणी हीं दोघे एकोणिसाव्या शतकांतील नारायण-लक्ष्मीचे अवतार आहेत अशी आमची दृढ श्रद्धा आहे.

हिंदूंची अवतारांची कल्पना ज्याना समजूं शकत नाहीं त्यानीं ती समजावून देण्याचा शीणहि देण्याचें कारण नाहीं. शारदामणींचें आतांपर्यंत ग्रथित केलेलें जीवन म्हणजे रामकृष्णांची हिंदु स्त्रीची साकार कल्पना एवढें जरी पटलें तरी कांहीं कमी नाहीं. अनेक साधुसंतांच्या अनुभवावर आधारित असा हा भारतीय स्त्रीचा आदर्श आज शेंकडों वर्षें आमच्या स्त्रियांच्या

जीवनाचें मार्गदर्शन करीत आहे. प्रत्येक शतकांत होऊन गेलेल्या थोर महिलांच्या जीवनाग्नीनें हा मार्ग पुनः पुन्हां उजळून निघाला आहे. मानवाचा आध्यात्मिक विकास रोखला जाऊं नये म्हणूनच कीं काय अशा अनेक स्त्रियांचीं जीवनें युगायुगांतून दीपस्तंभासारखीं उभीं आहेत.

पावित्र्य, विश्वबंधुत्व, त्याग, प्रेम वगैरे गुणांची मूर्तिच अशा शारदामणींनीं आपल्या जीवनानें पुन्हां एकदां भारतीय स्त्रीत्वाच्या आदर्शास उजळा दिला. आजचा मानवसमाज एका विचित्र भोंवऱ्यांत सांपडलेला दिसतो. द्रव्य व प्रभुत्व यांची त्याला लागलेली तृष्णा भयानक आहे. दररोज नवनवीन लागणाऱ्या शास्त्रीय शोधांनीं त्याची वैषयिक भूक अधिकाधिक प्रज्वलित होत आहे. अविनाशी आत्म्याचा संकुचित वाटणारा मार्ग सोडून तो शरीरसौख्याच्या दिशेनें भरधांव दौड करीत आहे. मनोनियंत्रण, वासनांचें उदात्तीकरण वगैरे गोष्टी तत्त्वज्ञाच्या काल्पनिक स्वप्नांत वसवून व्यक्तिस्वातंत्र्य व भोग यांचें तत्त्वज्ञान अधिक लोकप्रिय करण्यासाठीं आम्ही झटत आहोंत. उत्क्रान्तीच्या प्रक्रियेंत नेतृत्व करणारा मानवसमाज कदाचित् आपलें पाऊल मागें घेईल असाहि संभव आहे.

मानवाला आणखी एक शाप मागें ओढीत आहे. व्यक्तिव्यक्तींत व वर्गावर्गांत दिसून येणारे कलह सर्व मानवसमाजांना केव्हां धुळीला मिळवितील हें सांगतां येत नाहीं. जीवनाच्या झगड्यांत यशस्वी होण्यासाठीं विषयसुखाच्या कर्दमांतून माणसाला बाहेर पडणेंच भाग आहे. याच्या पुढची पायरी म्हणजे स्त्री व पुरुष यांच्यांतील दैवी अंशाचा विकास करून आध्यात्मिक जीवन अधिक समृद्ध करणें. विश्वशान्ति प्रस्थापित करण्यास हा एकच मार्ग आहे. जोंपर्यंत माणूस ज्ञानेंद्रियें व बुद्धि यांच्याच कक्षेत फिरत राहील आणि जोंपर्यंत आपल्यांतील दैवी शक्तीची जाणीव त्यास होणार नाहीं तोंपर्यंत एका विश्वसमाजाची कल्पना कल्पनेंतच विरणार. आधुनिक युग जरी स्वातंत्र्य व समता यांच्या घोषणांनीं दुमदुमलेलें असलें तरी जोंपर्यंत मानवा-मानवांतील एक आत्मीयत्व प्रतीत होत नाहीं तोंपर्यंत विश्वबंधुत्वाची कल्पना साकार होणार नाहीं. विश्वप्रेमाशिवाय मिळालेलें स्वातंत्र्य फक्त आपल्या समाजापुरतेंच मर्यादित राहणार, म्हणजेच त्यांतून इतर समाजाबद्दल शत्रुत्व पैदा

होणार. समतेचा कितीहि जयघोष केला तरी निसर्गानें निर्माण केलेल्या भिन्नभिन्न प्रकृतींच्या निर्मितीचे हेतु जोंपर्यंत स्पष्ट होऊं शकत नाहींत तोंपर्यंत समाज चुकीच्या दिशेनें जाण्याचाच संभव अधिक.

उदाहरणार्थ, सध्यां स्त्रीपुरुष-समानतेचा फार हिरीरीनें प्रचार केला जात आहे. कोणीहि कोणावर प्रभुत्वासाठीं प्रभुत्व गाजविण्याची आकांक्षा बाळगूं नये ही गोष्ट निर्विवाद आहे. एक दुसऱ्याची शारीरिक भूक भागविण्यासाठींच निर्माण झालेला आहे असें मानणेंहि चुकीचें आहे. स्त्री व पुरुषांत वावरणारा आत्मा एकच असल्यानें त्यांची विकासशक्ति अमर्याद आहे. दोघांतहि शारीरिक, बौद्धिक व आध्यात्मिक मार्गांनीं पूर्णतेस पोंचण्याची कुवत आहे. यामुळें एकाचा विकास रोखण्याचा दुसऱ्यास अधिकार नाहीं. पण सर्व मानवतेच्या स्वास्थ्याच्या दृष्टीनें स्त्री व पुरुष यांच्यांतील रचनात्मक व भावनात्मक फरक लक्षांत घेणें अतिशय आवश्यक आहे.

समानतेचा पाठपुरावा करतांना पुरुषांशीं साम्य निर्माण करणें हें स्त्रीचें उद्दिष्ट नाहीं. जर स्त्रिया असें पुरुषी जीवन जगण्याची आकांक्षा बाळगूं लागतील तर त्यांत सर्व समाजाचा नाशच सांठविला जाईल ही गोष्ट उघड आहे. शेंकडों वर्षांच्या बंधनांतून मुक्त झालेल्या स्त्रियांना उत्साहाच्या भरांत पुरुषांची प्रत्येक क्षेत्रांत बरोबरी करण्यांत आज कदाचित् धन्यता वाटत असली तरी मानवतेचें अंतिम हित अशानें साध्य होणार नाहीं. सुमारें पन्नास वर्षांपूर्वी स्वामी विवेकानंदांनीं असे उद्गार काढले होते कीं, " युरोपांत पुष्कळ स्त्रिया, स्त्रिया आहेत असें भासतच नाहीं. पुरुषांच्या विकृत प्रतिकृतिच अशा त्या वाटतात. फक्त भारतांत स्त्रीसुलभ शालीनता व विनय डोळ्यांना समाधान देतात." असें जरी स्वामीजींनीं त्यावेळीं म्हटलें असलें तरी आज मात्र भारतांतहि ही परिस्थिति झपाट्यानें बदलत आहे असें खेदानें म्हणावें लागतें.

इतर खंडांतील ऐहिक सुखी जीवनाचें आकर्षण इतकें जबरदस्त आहे कीं भारतीय लोकहि या जडवादी जीवनाकडे झपाट्यानें खेंचले जात आहेत. त्यांना त्यांच्या आध्यात्मिक जीवनाचा विसर पडत चालला आहे.

" भारताच्या पवित्र भूमीवर अजूनहि सीता अगर सावित्री यांचे

आदर्श जगणाऱ्या महिला दिसतात. सेवा, त्याग, प्रेम, सहानुभाव, समाधान व औदार्य या गुणांनीं मंडित अशा स्त्रिया अजूनहि सुदैवानें आमच्या समाजांत बहुसंख्येनें आहेत " असे विवेकानंदांनीं अभिमानानें उद्गार काढले असले तरी पाश्चात्य पद्धतीचें शिक्षण घेतलेल्या स्त्रिया हे मोलाचे सद्गुण पायाखालीं तुडविण्यास सज्ज झालेल्या दिसत आहेत. भारतीय समाजांतील गृहसौख्य ही एक आख्यायिका होऊं पहात आहे. इतर देशांतून आणलेलें स्त्री-पुरुष-समानतेचें वेड इकडे पसरविण्याचा पद्धतशीर प्रयत्न चालूं आहे. ज्यांनीं आपल्या गगनचुंबी आदर्शांनीं इतरांचे सांस्कृतिक आदर्श घडवावेत, त्या समाजाचा केवढा हा अधःपात ! -

या घसरगुंडीपासून भारतीय संस्कृतीचें रक्षण व्हावें म्हणूनच अशा आणीबाणीच्या काळांत माताजींचें जीवनकार्य घडवून आणण्याची योजना नियतीनें आंखली असेल. त्यांच्या जीवनांत पावित्र्य, विनय, मातेचा जिव्हाळा, सेवावृत्ति, क्षमाशीलता, दया व ईश्वरनिष्ठा हे गुण प्रकर्षानें आढळून येतात. जात, वर्ग, पंथ असल्या संकुचित भावनांना त्यांनीं कधींच थारा दिला नाहीं. परंपरेचा जाज्वल्य अभिमान बाळगूनहि त्यांच्या काळांतील संकुचित रूढींना त्यांनीं धैर्यानें ठोकरलें. त्यांचा चेहरा झांकणारा बुरखा हें जुनाटपणाचें अगर बुरसटलेल्या रूढिबद्धतेचें प्रतीक नसून त्यांचा विनय व इतर अमोलिक गुणांचे रक्षक असें तें एक अवगुंठन होतें असें समजणें अधिक सयुक्तिक होईल. [illegible]ल्याच्या शिखरावर आरूढ झालेल्या माताजींनीं समानता, स्वातंत्र्य व [illegible]श्वबंधुत्व या तत्त्वांचें काटेकोर पालन आपल्या ऐहिक जीवनांत केलें. [illegible]रतीय जीवनांत जें जें विलोभनीय आहे तें जगास दाखवीत असतांनाच [illegible]र्व समाजांनीं अनुसरावा असा जीवनादर्श त्यांनीं जगांतील स्त्रियांपुढें ठेवला.

मानव्य व श्रद्धा याविषयीं श्रीरामकृष्णांनीं दिलेला संदेश जगाच्या [illegible]नाकोपऱ्याला पोंचविणारे असामान्य ऋषि विवेकानंद आपल्या एका गुरु-[illegible]ला इ. स. १८९४ त लिहिलेल्या पत्रांत म्हणतात, " शारदामणींच्या [illegible]वनांतील गूढार्थ आज समजला नाहीं तरी तो कालांतरानें सर्वांस [illegible]गेल. माताजी विश्वशक्तीचें प्रतीक आहेत. त्यांच्या प्रेरणेनें भारतीय समाजांत [illegible]हां अनेक गार्गी व मैत्रेयी निर्माण होतील. " विवेकानंदांनीं केलेल्या या

भाविकतानुसार आमच्या महिलांना माताजींच्या जीवनांतून स्फूर्ति मिळून त्यांच्यांत आमच्या आध्यात्मिक जीवनाचीं ध्येयें साकार झालेलीं दिसावींत व त्यांनीं अखिल मानवतेचा भविष्यकाळ उज्वल करावा हीच एकमेव अपेक्षा !

कर्तव्यशील अशा माताजींच्या जीवनाकडे पाहून अनेक निराश लोक उमेदीनें पुन्हां आपला मार्ग आक्रमूं लागतील. आपल्यांतील दैवी अंशाचा त्यांना साक्षात्कार होईल. आयुष्याचें चीज करण्याच्या समान संधि उपलब्ध करून घेत असतांना स्त्रिया व पुरुष एकमेकांना साहाय्य करतील. एकमेकांना सुसंवादी राहून मानवतेचें सौंदर्य बिघडूं देणार नाहींत. जीवनाचें हें सुरेल संगीत फक्त आमच्याच नव्हे तर जगांतील सर्व जातींच्या संस्कृतींत प्रतीत होईल. या ओघाला गति मिळालेली आहे. तात्पुरत्या ऐकूं येणाऱ्या बदसुरांनीं गांगरून अगर नाउमेद होऊन जाण्याचें कारण नाहीं. भेद आणि झगडे यांच्या पलीकडे आपण आपली दृष्टि उंचावूं म्हणजे स्वामी विवेकानंदांच्या प्रभावी संदेशाप्रमाणें ज्ञानाचें व आनंदाचें कवाड खुलें होईल आणि सर्व मानवता या चित्प्रकाशांत न्हाऊन निघेल.

— समाप्त —



# सूची

---

# परिशिष्ट

( टीपः—खालीं दिलेली विषयसूची मूळ इंग्रजी पुस्तकांतील आहे. )

## CONTENTS

## शुद्धिपत्र

| अशुद्ध | शुद्ध | पान | ओळ |
|---|---|---|---|
| सौगंध | सुगंधा | ३.४ | ८ |
| शिनीवाली | शिनिवाली | ५१ | ११ |
| जाक्रियन्वे | जाक्रिअन्वे | २६१ | १० |
| धात्रा पत्ता | धात्री पत्ता | २०८ | ३ |
| सिंहगडावर | सज्जनगडावर | ३११ | २१ |
| गुजरीबाई | गवरीबाई | ३५२ | १८ |